# दोन शब्द

९ डिसेंबर १९४६ रोजीं घटना परिषद् सुरू झाली व तींत हिंदुस्थानच्या भावी घटनेबद्दल चर्चा सुरू होऊन प्रमुख प्रमुख बाबींसंबंधीं ठराव होऊं लागले. पुढें ३ जून १९४७ च्या योजनेप्रमाणें घटना–परिषद घटना-समिति बनली, व संक्रमण कालासाठीं तिला मध्यवर्ती कायदेमंडळाचें स्वरूप देण्यांत आलें. याच घटना-समितीनें डॉ. आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखालीं एक पोटसमिति नेमून घटनेचा मसुदा तयार केला, व तो मे १९४८ मध्यें प्रसिद्ध केला आहे. या मसुद्यावर नोव्हेंबरपासून कलमवार चर्चा होऊन घटनाकायदा पास होईल व त्याप्रमाणें तो ताबडतोब अमलांतही येईल. घटनेच्या मसुद्यावर चर्चा होत असतांना सामान्य वाचकांना सुबोध मार्गदर्शन व्हावें या दृष्टीनें प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे.

प्रत्येक कलम शक्य तितकी क्लिष्टता कमी करून प्रथम दिलें आहे, व त्यानंतर कोणत्या तत्त्वावर त्या कलमांतील व्यवस्था आधारली आहे याचें विवरण केलें आहे. त्याचप्रमाणें जगांतील अन्य राष्ट्रांच्या घटनेंत तत्संबंधीं काय व्यवस्था आहे, याचा परामर्श घेतला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, राज्यशास्त्रांतील सिद्धांतांचें या घटना-कायद्यांत किती व कसें प्रमाण झालें आहे, हें दाखविलें आहे. वाचक इंग्रजी न जाणणारा असें गृहित धरून त्याला समजेल अशा रीतीनें ग्रंथांतील भाषा व विवरण केलें आहे. वैयक्तिक व अन्य अनेक अडचणी असतांना सुद्धां हा ग्रंथ लिहून झाला याचें श्रेय अनेक व्यक्तींना आहे. तथापि त्यांचा उल्लेख मी करीत नाहीं; पण श्रीलक्ष्मी-नारायण छापखान्याचे मालक श्री. रघुनाथराव मोरमकर यांना असा ग्रंथ लिहिण्याचें वचन दिलें होतें, तें पुरें करण्याच्या जबाबदारीनें हा ग्रंथ पुरा झाला. दिल्ली येथील पत्रपंडित श्री. लोकूरकर यांनीं या कामीं साहाय्य केलें आहे. तसेंच मुंबईचे माझे नवीन मित्र श्री. भा. वि. नाडकर्णी ह्यांनीं मुद्रितें दुरुस्त करण्याचें व इतर देखरेखीचें अवघड काम केलें. ग्रंथाची छपाई व तत्संबंधीं सर्व व्यवस्था जी चांगली झाली आहे, त्याचें श्रेय श्रीलक्ष्मी-नारायण छापखान्यांतील लहानथोर मंडळींना आहे. हा ग्रंथ मराठी बोलणाऱ्या वाचकांना उपयुक्त होईल, अशी आशा आहे.

नवी दिल्ली
ता. १२–१०–४८
विजयादशमी

# हिंदुस्थानची घटना-समिति

## मसुदा-समिति

डॉ. भीमराव रामजी आंबेडकर—अध्यक्ष

श्री. एन्. गोपालस्वामी अय्यंगार

श्री. अल्लादि कृष्णस्वामी अय्यर

श्री. कन्हय्यालाल माधवजी मुनशी

सय्यद महमद सादुल्ला

श्री. एन्. माधव राव

श्री. देवीप्रसाद खैतान

[ श्री. ब्रिजेंद्रलाल मित्तर हे जरी आरंभीं समितीचे सदस्य नेमले गेले होते, तरी समितीची पहिली बैठक झाल्यानंतर, ते घटना समितीचे सदस्य न राहिल्यामुळें, ते मसुदा समितीच्या बैठकीस उपस्थित राहूं शकले नाहींत. ]

# घटना-प्रबोधिनी

## अनुक्रमणिका

## भाग ४

### राज्याच्या धोरणाबाबत आदेश



## भाग ५

### संघ

### प्रकरण १ लें-कार्यकारी

## प्रकरण २ रें-पार्लमेंट

## प्रकरण ३ रें–अध्यक्षाचे विधिविषयक हक्क



## प्रकरण ४ थें–संयुक्त सरकारचें न्यायखातें

## प्रकरण ३ रें–कायदेमंडळ

## प्रकरण ४ थें-प्रमुखाची कायदेकानूबाबत सत्ता



## प्रकरण ५ वें—आणीबाणीच्या परिस्थितीबाबत व्यवस्था



## प्रकरण ६ वें-परिशिष्टांत घातलेले व वन्य प्रदेश



## प्रकरण ७ वें-घटक-राज्यांतील मुख्य न्यायालयें

## प्रकरण ९ वें–मुख्य हिशोबतपासनीस



## भाग ७

### परिशिष्ट १, भाग २ मधील घटकांबाबत



## भाग ८

### परिशिष्ट १, भाग ४ मधील प्रदेशांबाबत आणि या परिशिष्टांत उल्लेख नसलेल्या प्रदेशांबाबत



## भाग ९

### संघ व घटक-राज्यें यांचे संबंध

## प्रकरण १ लें–कायदेकानूविषयक संबंध

## प्रकरण २ रें—कारभारविषयक संबंध

## भाग १०

### अर्थ, मिळकत, करार व दावे

### प्रकरण १ लें-अर्थ

## भाग ११

### आणीबाणीच्या प्रसंगाबाबतची व्यवस्था



## भाग १२

### संघ आणि घटक यांतील नोकरवर्ग

### प्रकरण १ लें—नोकरवर्ग



### प्रकरण २ रें—नोकर-निवडमंडळें



## भाग १३

### निवडणुका

## भाग १४

### अल्पसंख्यांकांबाबत तरतूद



## भाग १५

### किरकोळ



## भाग १६

### घटनादुरुस्ती



## भाग १७

### तात्पुरती व संक्रमणकालीन व्यवस्था

## भाग १८

### घटनाप्रारंभ व विघटनक्रिया

# परिशिष्टें

# स र ना मा

समाजांत सुव्यवस्था राहावी, व्यवहारांत विश्वास व निश्चितपणा यावा, न्याय मिळेल अशी परिस्थिति असावी, व्यक्तीला देशांत व राष्ट्राला परराष्ट्रापासून संरक्षण मिळावें, व्यक्तित्वविकासाला वाव मिळून सामाजिक स्थैर्य व प्रगति दोन्हीं साधावीं, या सर्व गोष्टींसाठीं राज्य ही संस्था आहे. समाजाचें राजकीय दृष्ट्या संघटन म्हणजे राज्य. आणि कोठलेंही संघटन म्हटलें म्हणजे त्यांत कांहीं नियम, कांहीं संकेत हे असतातच. व्याकरणानें भाषा निश्चित होते व त्यामुळें ती सुलभही होते. हीच गोष्ट राज्याला घटना असल्यानें होते. कांहीं देशांत घटना अलिखित, तर कांहींत लिखित अगर लेखनिष्ठ असतात. अलिखित म्हणजे कांहींही लेखी नव्हे असें नाहीं, तर मौलिक बाबतींत अमुकच एक असा कायदा नसतो; तर निरनिराळ्या कायद्यांत निरनिराळ्या बाबींचा समावेश असतो. कायदा सामान्य व संघटनात्मक अशा द्विविध स्वरूपाचा असतो. ज्याचा संबध मौलिक बाबींशीं असतो असा कायदा संघटनात्मक होय. ज्याचा सामान्य बाबींशीं असतो, तो सामान्य कायदा होय. घराचा पाया, मजले, छप्पर यांसंबंधींचा भाग अधिक महत्त्वाचा, तर किती फडताळें, किती दारें, किती खिडक्या हा भाग कमी महत्त्वाचा. एक वास्तुविषयक व एक थोडा वागणुकीबाबत. कांहीं देशांत सर्व संघटनात्मक बाबींचा समावेश एकाच कायद्यांत करतात व असें असलें म्हणजे त्या देशाची घटना लेखनिष्ठ आहे असें होतें. लेखनिष्ठ घटना असली म्हणजे प्रत्येक हक्क व प्रत्येक बाब निश्चित असते व तिचा उल्लेख ताबडतोब कलम दाखवून नागरिक करूं शकतो. उलट अलिखित घटनेंत अनिश्चितता असते. कायद्यापेक्षां न्यायाधीशाच्या वृत्तीवर नागरिक स्वातंत्र्य व अन्य गोष्टी अवलंबून असतात. उलट लेखनिष्ठ घटनेंत बदल करणें अवघड असतें. दरवर्षी कांहीं मनुष्य घराचा पाया अगर मजले कमीजास्त करीत नाहीं. त्याला अधिक विचार करावा लागतो. सामान्यपणें आधुनिक जगांत बहुतेक राष्ट्रांतून घटना लेखनिष्ठ आहे. घटना-कायदा म्हणून बहुतेक राष्ट्रांतून आहे व हीच विचारसरणी स्वीकारून हिंदुस्थानची घटना तयार केली आहे.

कायदा म्हटला म्हणजे त्याचें स्वरूप व उभारणी कांहीं ठराविक सिद्धांत व संकल्प याला अनुसरून असते, व घटना-कायद्याचें तंत्र पण अनुभवानें सिद्ध झालें आहे. घटना-कायद्यांतील मुख्य गोष्ट म्हणजे सरनामा. यांत देशांतील प्रभुत्व कोणाचें, देश राज्यामार्फत काय आदर्श पुढें ठेवतो, इत्यादिक गोष्टींचा उल्लेख

केलेला असतो. सरनामा म्हणजे घटना नाटकांतील नांदी. त्यांत या नाटकांत काय होणार याची कल्पना सूक्ष्म रीतीनें दिलेली असते. कायदेपंडित कायद्यांतील कलमें सरनाम्यांतील सिद्धांतांना अनुसरून असलींच पाहिजेत असें मानतात. कलमें व सरनामा यांत विरोध असूं नये. हिंदुस्थानांतील घटना-कायद्यांतील सरनामा या दृष्टीनें विचारार्ह आहे. सदर्हू सरनामा घटना-परिषदनें एतद्विषयक पास केलेल्या ठरावाला अनुसरून आहे. हा सरनामा असा:

**आम्ही हिंदुस्थानचे लोक हिंदुस्थान हें एक प्रभुत्वपूर्ण लोकशाही प्रजातंत्र राज्य प्रस्थापित करण्याचें ठरवून व त्याचप्रमाणें सर्व नागरिकांना**

सरनामा

**न्याय**—सामाजिक, आर्थिक व राजकीय;

**स्वातंत्र्य**—विचारप्रदर्शन, समजुती, श्रद्धा व पूजाविषयक;

**समता**—स्थान व संधि यांबाबत; हीं मिळावीं म्हणून, आणि

**भ्रातृभाव**—सर्वांत वाढावा म्हणून, व्यक्तीची प्रतिष्ठा व राष्ट्राची एकता राहील असा विश्वास देऊन या घटनापरिषदेंत विधियुक्त मान्यता देऊन ही घटना आमची म्हणून स्वीकारीत आहों व घेत आहों.

हा सरनामा एक उत्कृष्ट नमुना आहे. यांत आधुनिक जगांतील राजकारणांतील अनुभव व सिद्धांत समाविष्ट झालेले आहेत. ही घटना लोकमान्यता देऊन स्वीकारीत आहेत, याचा अर्थ राजकीय भविष्य व भवितव्य ठरविण्याचा हक्क लोकांचा, आम जनतेचा आहे. कोणी एक व्यक्ति, अगर कुटुंब, कोणी जात अगर वर्ग यांचा हा हक्क नाहीं हें उघड आहे. राज्याची मालकी, प्रभुत्व हें जनतेचें आहे; कोणा व्यक्तीचें अगर वर्गाचें नाहीं, ही गोष्ट सरनाम्यांतील घोषणेनें स्पष्ट केली आहे. राज्यांतील सत्ता जनतेची, तिचा उगम जनतेंतून, हा सिद्धांत येथें स्पष्ट आहे. हें राज्य प्रभुत्वपूर्ण म्हणजे स्वाधीन राहील व कोणालाही दुय्यम अगर जबाबदार राहणार नाहीं. प्रभुत्व म्हणजे देशांत सर्व नागरिकांवर अधिकार, सर्व नागरिक त्या राज्याला आज्ञाधारकत्व देणारे, तर परदेशांत, सरहद्दींबाहेर ते कोणालाही आज्ञाधारकत्व न देणारे; याचा अर्थ असा कीं हिंदुस्थान पूर्ण स्वतंत्र, कुठल्याही अन्य राज्याला अगर साम्राज्याला जबाबदार नाहीं. जनतेचें राष्ट्रावर पूर्ण स्वामित्व व राष्ट्र हें पूर्णपणें प्रभुत्वपूर्ण अशी ही घोषणा आहे. राज्याचें स्वरूप लोकशाही प्रजातंत्र आहे. लोकशाही म्हणजे राष्ट्रांतील अगर राज्यांतील

प्रत्येक व्यक्तीला राज्यकारभारांत हक्क आहे. हा मतदानानें बजाविला जातो. होणारे निर्णय जनतेला कौल लावून, जनमत अजमावून होणार, हा यांतला आशय आहे. हे निर्णय जनतेचे प्रतिनिधि घेतील. प्रतिनिधींचा विश्वास असलेलें मंत्रिमंडळ तें अमलांत आणील हा भाव यांत आहे. बहुमताप्रमाणें राज्यकारभार चालेल, हें तंत्र यांत समाविष्ट आहे. प्रजातंत्र याचा अर्थ, यांत कोणी जन्मानें राज्यप्रमुख असणार नाहीं. निवडणुकीनें ही गोष्ट ठरेल. तसेंच प्रमुखपद ठराविक मर्यादेपर्यंतच असेल, हयातीपर्यंत तें असणार नाहीं. लोकशाही ही रीत आहे व ती हुकुमशाहीच्या विरुद्ध कल्पनांवर आधारलेली आहे. लोकशाहींत जनता निर्णय घेते, सरकार तो अमलांत आणतें. हुकुमशाहींत एक व्यक्ति अगर मूठभर लोक निर्णय घेतात व सत्तेच्या जोरावर ते जनतेवर लादतात. मूलभूत फरक या दोन्हींत आहेत. प्रजातंत्र व राजतंत्र यांत रीतीचा फरक कोठें नसेलही; पण बाह्य स्वरूपाचा निश्चित आहे. राजा असून राज्य लोकशाही रीतीनें चालूं शकेल. तथापि बाह्य स्वरूप, मुखवटा राजाचा राहील. प्रजातंत्रांत मुखवटा राजाचा नाहीं. अध्यक्ष अगर प्रमुख ही स्थानप्राप्ति लोकप्रियतेनें उपलब्ध होते. जन्मानें अगर जातीनें नव्हे.

आशयाच्या दृष्टीनें या राज्यांत काय असेल, कसें जीवन राहील याचा प्रपंच देखील थोडक्यांत या सरनाम्यांत केला आहे. सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय सर्वांना मिळेल. जन्मानें हीनता येणार नाहीं, कर्तृत्वानें मनुष्याचें मूल्यमापन होईल ही गोष्ट स्पष्ट आहे. संपत्तीच्या जोरावर श्रमाची योग्य किंमत न देतां दारिद्र्याचा फायदा घेऊं दिला जाणार नाहीं, असा विश्वास यांत आहे. अडचणींत राहणारांचे श्रम अडचणींमुळें अडवणूक करून अयोग्य किंमतीस घेतले जाणार नाहींत, याची ग्वाही यांत आहे. श्रम व पारितोषिक अगर त्याचा मोबदला यांत कांहीं प्रमाण, कांहीं न्याय राहील ही गोष्ट उघड आहे. राजकारणांत पक्षोपपक्ष राहणारच. किंबहुना संघर्षांतूनच जसें जीवन व्यापक व पूर्ण होत जातें, तसेंच राजकारणांत संघर्ष अपरिहार्य व आवश्यकही आहे. एकजिनसी राष्ट्र असावें, पण एकजिनसी राजकारण नसावें. तसें झालें तर देश प्रगतिविन्मुख होतो. लोकशाहींत राज्यकारभार निर्दोष व कार्यक्षम होण्यासाठीं निदान एकापेक्षां अधिक पक्ष पाहिजेत. फार झाले तर नाश, एकच असेल तर हुकुमशाही होण्याचा धोका असतो. तथापि पक्ष असले म्हणजे पुष्कळ वेळां राजकीय न्याय मिळत नाहीं. अधिकाराच्या कटा दाबून धरून प्रचलित सत्तारूढ पक्ष हवें तें दान घेतो व देतो. आजचा विरोधक उद्यांचा राज्यकर्ता होणें हें लोकशाहीचें लक्षण व भूषणही आहे. या स्थितींत कांहीं संकेत सर्व पक्षांनीं पाळले पाहिजेत. सर्वांना न्याय मिळाला पाहिजे. संधीचें मैदान सर्वांना मोकळें पाहिजे. राजकीय क्षेत्रांत न्याय मिळेल, पक्ष-अभिनिवेशानें अन्याय होणार

नाहीं; कोणताही पक्ष अगर जात अगर समूह राजकीय हक्कापासून कायद्याला सोडून वंचित केला जाणार नाहीं, असा संकेत यांत आहे.

विचार व त्यांचें प्रदर्शन यांत स्वातंत्र्य राहील. या स्वातंत्र्याच्या मर्यादा अर्थात् असणारच; पण त्या मर्यादा स्वातंत्र्य निश्चित करतील, स्पष्ट करतील, व सुरक्षित करतील. विचारप्रदर्शन-स्वातंत्र्यांत मुद्रणस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य यांचा समावेश होतो. उच्चार म्हणजे एकांतांत नव्हे, चारचौघांत हाच अर्थ आहे. तसेंच विचारप्रदर्शन मुद्रणानेंही होतें म्हणून तेंही स्वातंत्र्य यांत आलें. उच्चारस्वातंत्र्य म्हणजे तोंडाची बदनामी करणें नव्हे. मुद्रणस्वातंत्र्य म्हणजे अश्लील लिहिणें नव्हे. या सर्व स्वातंत्र्यांबाबत विहित व विधियुक्त मर्यादा सामान्य परिस्थितींत असतात व असामान्य परिस्थितींत हीं स्वातंत्र्यें क्षणभर देशहितार्थ कमी अगर स्थगित सुद्धां करावीं लागतात. या सर्व गोष्टी लक्षांत धरून सरनाम्यांतील ग्वाहीचा अर्थ लावला पाहिजे. धार्मिक समजुती व श्रद्धा, पूजाकर्में करण्याचें स्वातंत्र्य सर्वांना राहील. याही बाबतींत कांहीं कांहीं विहित व कांहीं विधियुक्त मर्यादा राहतील. सार्वजनिक कायदा व नीतिमत्ता यांना धरून हें स्वातंत्र्य असलें पाहिजे हें उघड आहे. भजन करण्याचा हक्क, याचा अर्थ रात्रभर टाळ वाजवून सर्व आळींतील लोकांची झोप-मोड करणें नव्हे. सार्वजनिक आरोग्य व सुरक्षितता याहीमुळें कांहीं ठिकाणीं व कांहीं प्रसंगीं या स्वातंत्र्यावर मर्यादा येतात. या सर्व जमेला धरून या स्वातंत्र्याचा अर्थ लावला पाहिजे.

सर्वांचें स्थान कायद्याच्या दृष्टीनें सारखें राहील; यांत समता असेल. अमुक ठिकाणीं जन्मला म्हणून, अगर अमुक भाषा बोलतो म्हणून, अगर अमुक प्रदेशांत राहतो म्हणून, अगर अमुक जातींत जन्मला म्हणून, एकाद्याची राज्यदरबारीं कमीजास्त योग्यता असणार नाहीं. सर्वांची प्रतिष्ठा सारखी राहील, त्यांत समता असेल. तसेंच सर्वांना सारखी संधि मिळेल. धर्म, जन्म, निवासस्थान अगर जन्मस्थान यांमुळें कांहीं फरक होणार नाहीं. संधीचें मैदान सर्वांना मोकळें. ज्यानें त्यानें आपआपल्या प्रयत्नाचें घोडें दामटावें. जीवनांतील शर्यतींत सर्व घोडे एका अर्थानें एका रेषेंत राहून एकदम सुटतील. यशाचा मुक्काम गांठण्यांत पुढेंमागें जें होईल तें सर्वस्वी व्यक्तीवर अवलंबून राहील. त्यांत राज्य पंक्तिप्रपंच करणार नाहीं. हा विश्वास यांत दिला आहे.

तसेंच देशांतील नागरिक समतेच्या वातावरणांत राहतील व त्यांच्यांत सर्वत्र भ्रातृभाव निर्माण व्हावा, म्हणून व्यक्तिमात्राची प्रतिष्ठा जोपासली जाईल. त्याच-बरोबर राष्ट्राची एकता राहील असेंही होईल. व्यक्ति आणि राष्ट्र यांची मौलिक एकता ही सर्व सामाजिक व राजकीय जीवनाचा आधार आहे. राज्यरथाचा तो कणा आहे.

व्यक्तीची प्रतिष्ठा या एकतेस पोषकच असली पाहिजे. व्यक्तीचें श्रेष्ठत्व राष्ट्राला श्रेयस्कर ठरलें पाहिजे. व्यक्तीच्या विकासांत राष्ट्राचा विकास असला पाहिजे. याचाच अर्थ व्यक्तिव्यक्तीच्या विकासांत कांहीं प्रमाण असलें पाहिजे. भ्रातृभाव विषम वातावरणांत निर्माण होत नाहीं. तथापि भ्रातृभाव निर्माण करण्यासाठीं व्यक्तींतील व्यक्तिमत्व अगर विजिगीषा, उन्नतीकडे धांव घेण्याची हुरहुर दाबली जाऊं नये. किमान प्रतिष्ठा प्रत्येक व्यक्तीला राहून योग्य मर्यादेंत असामान्यांना विकासास पूर्ण वाव राहील अशी योजना यांत आहे.

येणेंप्रमाणें सामाजिक आदर्श व संकेत या राज्यांत राहतील. तसे आदर्श वस्तुस्थितींत आणण्यासाठीं, त्यांना कार्यान्वित करण्यासाठीं राखण्याचें एक साधन म्हणजे घटना ही आहे व या घटनेला लोकांच्या प्रतिनिधींनीं घटनापरिषदेंत मान्यता देऊन तिचा स्वीकार केला आहे. ही घोषणा सरनाम्याच्या शेवटल्या भागांत आहे. लोकांनीं विचार केला, लोकांनीं तिला घडविली व आपली म्हणून विधियुक्त ती घेतली. चित्रकारानें शाडू आणावा, मेहनत करावी, गजाननाची मूर्ति निर्माण करावी व तिला मानून तिची पूजा करावी, असेंच थोडेंसें हें आहे.

## भाग १

# संघ – त्याचें क्षेत्र व अधिकार

सरनाम्यानंतर राज्याचें क्षेत्र व अधिकार यांचा विचार केला जातो. कोणते प्रदेश राज्यांत समाविष्ट होतात याचा उल्लेख असणें जरूर असतें. तसेंच घटनेंत अधिक प्रदेश मिळविला अगर आला तर त्याला विधियुक्त सामील करून घेण्याची तजवीज पण असावी लागते. तसेंच राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीनें राज्यांतील प्रांत अगर विभाग अगर घटक यांना कमीजास्त करणें झाल्यास त्याची देखील व्यवस्था घटनेमध्यें असावी लागते.

**संघराज्य–अभिधान व व्याप**

**१. हिंदुस्थान हें संघराज्य राहील व त्यांत आज असलेले ९ प्रांत, ३ कमिशनरचे प्रांत, सर्व संस्थानें व अंदमान व निकोबार हीं बेटें यांचा समावेश होईल. शिवाय यानंतर जे प्रदेश येतील अगर मिळविले जातील, त्यांचाही समावेश होईल. या राज्याचें अभिधान हिंदी संघराज्य हें राहील.**

हिंदी संघराज्य या नांवावरून राज्यसंघस्वरूप संयुक्त राज्यपद्धतीचें आहे, असें स्पष्ट केलें आहे. एकसंघी राज्य एवढ्या मोठ्या प्रदेशावर राहणें कठीण, म्हणून एकंदर राज्याचे अनेक विभाग अगर घटक कल्पून प्रत्येक विभागाला अगर घटकाला कांहीं बाबतींत स्वायत्तता देऊन मुख्य व मध्यवर्ती बाबी केंद्रीय सरकारला ठेवणें असें सामान्यत: संयुक्त राज्यपद्धतीचें स्वरूप असतें. याच तत्त्वाचा येथें स्वीकार केला आहे. एकसंघी राज्यांत सर्व प्रदेश सर्व बाबतींत एकसत्तेखालीं असतो. उलट संयुक्त राज्यपद्धतींत राज्यकारभाराचें क्षेत्र सोयीसाठीं विभागून घटकांना कांहीं क्षेत्र, कांहीं केंद्रीय सत्तेला व सर्वसामान्य अधिराज्य व अधिकार केंद्रीय सत्तेचा, असें असतें. अधिकारविभागणी घटनेंतच केलेली असते. नवीन घटनेंत, ज्या परंपरेनें आजपर्यंत या देशाचा कारभार चालतो, त्याला धरूनच व्यवस्था केलेली आहे. प्रांत, संस्थानें अगर त्यांचे गट मध्यभारत, सौराष्ट्र वगैरे यांना स्थानिक व प्रांतिक बाबींत स्वायत्तता व कायदे करण्याची मुभा राहील; मात्र संघराज्यविषयक व मध्यवर्ती

स्वरूपाच्या बाबतींत त्यांना प्रतिबंध राहील. हिंदी या नांवावरून प्रादेशिक दृष्ट्या अर्थबोध होतो. हें राज्य कोणा एका जातीचें अगर धर्माचें नाहीं; तर हिंदुस्थान या नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांत जे कायद्यान्वयें नागरिक असतील, त्यांचें हें राज्य आहे. धर्मावर राष्ट्र अगर राज्य आधारलेलें नसून निवास व निष्ठा यांवर आधारलेलें आहे. नागरिकत्व धर्मानें अगर जातीनें मिळणार नसून या देशांत जन्म, निवास, निष्ठा इत्यादि लौकिक गोष्टींनीं मिळणार आहे. हें राज्य धर्मनिष्ठ नाहीं, हें ऐहिक (Secular) राज्य आहे.

**नवीन घटक व प्रवेश**

२. योग्य शर्तींवर नवीन घटक निर्माण करून त्यांना संघराज्यांत सामील करण्यासाठीं मध्यवर्ती विधिमंडळाला वेळोवेळीं कायदा करण्याचा अधिकार आहे. तसेंच विद्यमान घटकांतून वेगळा भाग काढून अगर विद्यमान घटकांना एकत्र करून अगर त्यांच्या भागांना एकत्र करून नवीन घटक निर्माण करण्याचा हक्क मध्यवर्ती विधिमंडळाला आहे.

**नवीन घटक, क्षेत्र व सीमा**

३–४. एखाद्या घटकाचें क्षेत्र वाढविणें, कमी करणें, त्याच्या सरहद्दींत बदल करणें, घटकाचें नांव बदलणें हे सर्व हक्क सदर्हू विधिमंडळाला आहेत. मात्र या बाबतींत बिल फक्त मध्यवर्ती सरकारच आणूं शकेल व तें विधिमंडळांत सादर करण्यापूर्वी संबंधित घटकांतील विधिमंडळांतील प्रतिनिधींनीं मागणी केलेली असावी अगर संबंधित घटकाच्या कायदेमंडळांत तसा ठराव पास झालेला असावा. तसेंच कांहीं संस्थानांबाबत त्या संस्थानाची संमति पण असावी, एतद्विषयक कायद्यांत सर्व आनुषंगिक बाबीही असाव्यात व त्या घालण्याचा मध्यवर्ती विधिमंडळाला पूर्ण अधिकार आहे.

या देशांत १५ ऑगस्ट १९४७ ला सुमारें ६०० संस्थानें होतीं व त्यांना ब्रिटिश सत्तेनें जातांना संपूर्ण स्वातंत्र्य बहाल केलें होतें. एका अर्थानें त्यांना प्रभुत्व मिळालें होतें. आधुनिक जगांत प्रभुत्व मिळून सुद्धां तें टिकविण्यासाठीं मोठें सामर्थ्य पदरीं असावें लागतें. एवढें सामर्थ्य येण्यासाठीं मोठा प्रदेश, मुबलक मनुष्यबळ, व

अगणित संपत्ति व सरंजाम असावा लागतो. या गोष्टी या संस्थानांच्या बाबतींत शक्य नव्हत्या. १५ ऑगस्टपूर्वी हीं सर्व संस्थानें मांडलिक होतीं. त्यांच्यावर अधिराज्य हिंदुस्थान सरकारचें होतें. त्यांना परराष्ट्रीय संबंध, संरक्षण व वाहतुक इत्यादि बाबतींत स्वातंत्र्य नव्हतें. अंतर्गत कारभारांत कायदा व सुव्यवस्था ठेवण्याकरितां अधिराज्याला हस्तक्षेप करण्याचा पूर्ण अधिकार होता. हीं लहानमोठीं संस्थानें भौगोलिक दृष्ट्या अशीं वसलीं आहेत कीं, तीं स्वतंत्र राहणें शक्य नाहीं व त्यांना पाकिस्तान अगर हिंदुस्थान यांत सामील होणें उभयतांच्या दृष्टीनें हितावह होतें. या दृष्टीनें एकदोन खेरीज करून हिंदुस्थानच्या भौगोलिक चतुस्सीमेंत असलेलीं सर्व संस्थानें सामील झालीं आहेत; बाकीच्यांनीं सुद्धा वरील तीन बाबतींत हिंदुस्थान सरकारचें अधिराज्य मान्य केलें आहे. आधुनिक जगांत राज्यकारभार लोकशाही तंत्रानेंच चालला पाहिजे. तसेंच, कांहीं तरी राज्यकारभाराचें काम मान्य नमुन्याप्रमाणें चाललें पाहिजे. या दृष्टीनें विचार करतां क्षेत्रफळ, लोकसंख्या व उत्पन्न या कसोटींना लावून बहुतेक संस्थानांनीं एक तर विलीन होणें अगर आपसांतील सरहद्दी मोडून मोठा एकसंघी गट करणें याशिवाय अन्य मार्ग परिस्थितीनें ठेवला नाहीं. कांहीं संस्थानें संघराज्यांत विलीन झालीं, कांहींनीं व्यापक गट करून एकसंघी घटक निर्माण केले व कांहीं जे वरील कसोटीला थोडे तरी उतरतील, अशांनीं स्वतंत्र अस्तित्व ठेवलें. मात्र संघराज्यांत सामील होऊनच संस्थानी राजकारण एकदम बदललें; क्रांतिच त्यांत झाली, म्हणून या देशाचा नकाशा पुनः काढला जात आहे. भूप्रदेश जरी कायम असला, तरी स्वामित्वांत बदल झाल्यानें सरहद्दी बदलाव्या लागतात, तसेंच होत आहे व हें सुलभ व्हावें म्हणून घटना-कायद्यांत नवीन घटक-ज्यांत प्रांत व संस्थानें यांचा समावेश होतो-बनविण्याचा, विद्यमानाच्या सरहद्दी व क्षेत्र कमीजास्त करण्याचा, तत्संबंधीं सर्व गोष्टी करण्याचा हक्क मध्यवर्ती सत्तेला दिला आहे व तो कायदा करून तिनें बजावयाचा आहे.

## भाग २

# नागरिकत्व

राज्य या कल्पनेंत सत्ता, प्रदेश व नागरिक या तीन गोष्टींचा समावेश होतो. सत्ता प्रभुत्वपूर्ण पाहिजे, प्रदेश निश्चित पाहिजे व नागरिकत्व कोणाला व कसें प्राप्त होतें अगर मिळवितां येतें यासंबंधीं व्यवस्था असावी लागते. राज्याची सत्ता निश्चित प्रदेशांत राहणाऱ्या नागरिकांवर चालते. राज्याच्या चतुस्सीमेंत नागरिकांवर तर चालतेच, पण जे नागरिक नसतील, अशा परकीयांवरही कांहीं मर्यादा ठेऊन चालते. परकीय राष्ट्रांचे वकील वगैरेवर राज्याची सत्ता कांहीं बाबतींत आंतरराष्ट्रीय संकेतानें मर्यादित केलेली असते. परदेशांत म्हणजे राज्याच्या क्षेत्राबाहेरही नागरिकांवर राज्याची सत्ता चालते. म्हणजे नागरिकानें परदेशांत केलेलें एखादें कृत्य तद्देशीय कायद्यानें जरी गुन्हा नसलें, तरी स्वदेशांतील कायद्यानें गुन्हा असलें तर स्वदेशांत परततांच त्यास राज्य शिक्षा देऊं शकतें. त्याच्या उलट परदेशांत जरी नागरिक गेला, तरी त्याला आंतरराष्ट्रीय संकेतानुसार त्याचें राज्य त्याला संरक्षण देत असतें. त्याच्या मालमत्तेसंबंधीं, जीवितासंबंधीं दक्ष असतें. राज्याचें नागरिकत्व हें भूषण, संरक्षण व कर्तव्य पण आहे. संधि देतें तसेंच सेवाही घेतें. एवंगुणविशिष्ट प्रतिष्ठा कशी प्राप्त होते हें घटनेंत स्पष्ट पाहिजे. नवीन घटना होत असली म्हणजे ती ज्या दिवशीं अमलांत येईल, त्या दिवशीं कोण नागरिक आहेत हेंही स्पष्ट पाहिजे.

**प्रारंभींचें नागरिकत्व**

**५. घटना ज्या दिवशीं अमलांत येईल, त्या दिवशीं, ज्याचा जन्म घटनेंत वर्णन केलेल्या हिंदुस्थानांत झाला असेल, अगर ज्याच्या आई-बापांपैकीं एकाचा अगर आजी-आज्यांपैकीं एकाचा तरी जन्म हिंदुस्थानांत झाला असेल, आणि ज्यानें १।४।४७ नंतर परराज्यांत कायम निवासस्थान केलें नसेल, तसेंच ज्याचा अगर ज्याच्या आई-बापांपैकीं एकाचा अगर आजी-आज्यापैकीं एकाचा जन्म १९३५ च्या कायद्यांत वर्णन केलेल्या हिंदुस्थानांत, अगर ब्रह्मदेशांत अगर सिलोन अगर मलायामध्यें झाला असेल व ज्यानें**

**या घटनेंत वर्णन केलेल्या हिंदुस्थानांत कायम वास्तव्य केलें असेल, तो प्रत्येक इसम जर त्यानें घटना अमलांत येणाऱ्या दिवसापूर्वी परराज्याचें नागरिकत्व मिळविलें नसेल, तर नागरिक होईल.**

**१९२५ चा वारसा कायदा ज्यांना लागू होता अगर घटना प्रारंभ होण्यापूर्वी ज्यानें एक महिना हिंदुस्थानांत राहून जिल्हा मॅजिस्ट्रेटपुढें हिंदुस्थानांत कायम वास्तव्य करून राहण्याचा उद्देश जाहीर केला असेल, असा इसम हिंदुस्थानांत वास्तव्य करीत आहे असें मानलें जाईल.**

आरंभींचें नागरिकत्व वरीलप्रमाणें प्राप्त होतें. फाळणीपूर्वीचा हिंदुस्थान व फाळणीनंतरचा हिंदुस्थान हे निराळे आहेत. फाळणीपूर्वीचा हिंदुस्थान १९३५ च्या कायद्यांत वर्णन केला आहे. फाळणीनंतरचा हिंदुस्थान प्रस्तुत घटनेंत वर्णन केला आहे. आणि यालाच आतां हिंदुस्थान अगर हिंदुस्थानचा प्रदेश म्हणण्यांत येतें. या हिंदुस्थानांत ज्याचा जन्म झाला असेल, अगर ज्याचे आईबाप, आजा-आजी यांपैकीं एकाचा जन्म झाला असेल व ज्यानें हिंदुस्थानबाहेर कायम वास्तव्य १।४।४७ नंतर केलें नसेल, असे सर्व इसम नागरिक आहेत. जन्म परदेशांत, पण आईबाप अगर आजा-आजीपैकीं एक जरी हिंदुस्थानांत जन्मला असेल, तरी त्याला नागरिकत्व बहाल केलें आहे. व्यापारासाठीं, व्यवसायासाठीं अगर प्रवासासाठीं माणसें परदेशांत जातात, तेथें मुलें जन्मतात. एवढयानें त्यांचें नागरिकत्व जाऊं नये म्हणून ही व्यवस्था आहे. १।४।४७ नंतर जर एखाद्यानें परराज्यांत कायम निवासस्थान केलें असेल, तर मात्र त्याला नागरिकत्व मिळणार नाहीं. कायम परराज्यांत राहणाराला नागरिकत्व न देणें उचित आहे.

फाळणीपूर्वीच्या हिंदुस्थानांत अगर ब्रह्मदेश, सिलोन, मलाया यांमध्यें ज्यांचा जन्म झाला असेल अगर ज्यांचे आईबाप, आजी-आजा यांपैकीं एकाचा जन्म तेथें झाला असेल व जो फाळणीनंतरच्या हिंदुस्थानांत कायम वास्तव्य करून असेल अशा इसमासही नागरिकत्व आहे. म्हणजे ज्याचा जन्म पश्चिम पंजाबांत अगर पूर्व बंगाल अगर पाकिस्तानांत कोठेंही झाला असेल अगर ब्रह्मदेश, सिलोन, मलाया यांत झाला असेल, तर केवळ जन्म फाळणीनंतरच्या हिंदुस्थानांत नाहीं, म्हणून नागरिकत्व जाऊं नये यासाठीं ही व्यवस्था आहे. जन्म जरी आजच्या हिंदुस्थानबाहेर झाला, तरी वास्तव्य मात्र येथें पाहिजे. तसेंच परराज्यांत नागरिकत्व मिळालें नसावें. एक इसम दोन प्रभुत्वपूर्ण राज्यांचा नागरिक होऊं शकत नाहीं. पतिव्रतेइतकें

पावित्र्य व कडकपणा नागरिकांत अपेक्षिला जातो. निष्ठा ही द्विधा असणें राज्याला धोक्याचें आहे.

**कायद्यानें प्राप्त होणारें नागरिकत्व**

नागरिकत्व हें मुख्यत: जन्मानें प्राप्त होतें. सामान्यपणें ज्या राज्यांत इसम जन्मला, त्या राज्याचा तो नागरिक हा सिद्धांत आहे. राज्य ही संपत्ति व साधना दोन्हीं आहेत. त्यावरील मालकी व हुकुमत जनतेची, जनता अगर समाज ही नित्य व अखंड वस्तु आहे. आज आहे व उद्यां नाहीं असें येथें नाहीं. माणसें जन्मतात व मृत्यु पावतात, पण समाज अखंड, नित्य व प्रवाही आहे. यांत समावेश व प्रवेश जन्मानेंच असणार. जन्मानें येणारी प्रतिष्ठा व प्राप्त होणारें स्थान एक अस्मिता, एक क्षम्य अहंकार उत्पन्न करते. हीच भावना अतुल स्वार्थत्यागाला चेतना देते. ज्या देशांत मागील पिढ्या राहिल्या व पुढच्या राहणार तो देश आपला, हा विचार विद्यमान पिढीच्या राष्ट्रभक्तीचा गाभा आहे. औरस मुलगा जेवढी कुळाची प्रतिष्ठा संभाळील, तेवढी दत्तक संभाळणार नाहीं. म्हणून माणसाला औरस संततीची हांव असते. हाच न्याय नागरिकत्वाच्या बाबतींत आहे. तथापि अनेक कारणांमुळें अन्यत्र जन्मलेले लोक विशिष्ट राज्याचे नागरिक होऊं इच्छितात. व याबाबतींत पण कांहीं सिद्धांत ठरले आहेत. जन्माव्यतिरिक्त रीतीनें प्राप्त होणारें नागरिकत्व त्या त्या राज्यांतील कायद्यानें प्राप्त होतें. तसे कायदे सर्व राष्ट्रांतून आहेत.

**६. नागरिकत्व प्राप्त करण्याबाबत, तें रद्द होण्याबाबत व तत्संबंधीं सर्व गोष्टी ठरविण्याबाबत विधिमंडळाला कायदा करतां येईल.**

आरंभींचे नागरिक कोण हें सांगितलें व नंतर कोण होऊं शकतात याबाबत विधिमंडळ कायदा करील, असें घटनेंत आहे. नागरिकत्व मिळविणें याबाबत अनेक गोष्टींचा विचार करावा लागेल. वास्तव्यानें मिळावयाचें तर किती काळ त्यासाठीं वास्तव्य पाहिजे, हें ठरविलें पाहिजे. परका इसम येणार, तर त्याची निष्ठा पण तपासली पाहिजे. मुलगा दत्तक घ्यावयाचा झाला म्हणजे कुळ पाहतात, पत्रिका पाहतात, स्वरूप पाहतात. औरस मुलगा जन्माला येतो व पुत्रपद त्याला मिळतेंच; तेथें या गोष्टीचा विचार अप्रस्तुत असतो. अन्यदेशीय इसम नागरिक करण्याबाबत दक्षता घेणें अत्यंत इष्ट आहे. तसेंच नागरिक झाला व योग्य वर्तन केलें नाहीं अगर वास्तव्य संपविलें तर नागरिकत्व ठेवावयाचें का रद्द करावयाचें ? तसेंच नागरिकत्व अशा इसमाला दिलें, तर तें वंशपरंपरा अगर व्यक्तीपुरतें ? तात्पर्य, हे सर्व प्रश्न उपस्थित होतात व या सर्व गोष्टींचा प्रपंच घटनाकायद्यांत न करतां तत्संबंधीं सामान्य कायदा करूनच करणें इष्ट आहे. हीच विचारसरणी मान्य करून घटनेंत फक्त विधिमंडळाला तसा कायदा करण्याचा अधिकार दिला आहे.

# भाग ३

# मूलभूत हक्क

लेखनिष्ठ घटनेंत मूलभूत हक्क स्पष्ट केलेले असतात. कायद्यानें हक्क दिले असल्यामुळें त्यांत निश्चितपणा असतो. न्यायाधीशाच्या मर्जीवर नागरिक स्वातंत्र्य मग अवलंबून नसतें. संकेत हेही नागरिक हक्कांचे आधार असूं शकतात. पण संकेत म्हणजे कायदा नव्हे. सामान्यतः ते दूर सारले जात नाहींत; पण न्यायाधीशानें अगर कार्यकारी सत्तेनें (Executive) दूर सारले, तर नागरिक अगतिक होतो. उलट कायद्यांत हक्क बहाल केला असल्यास कार्यकारी सत्तेला अगर न्यायाधीशाला तो नाकारतां येत नाहीं. संकेत कायद्याला धरून असतील, त्यांतील अभिप्राय अधिक स्पष्ट करणारे असतील, अगर कायद्याला मुरड घालणारे असतील. फार काळ संकेत प्रभावी असले म्हणजे लोकमत त्याप्रमाणें प्रबल होतें व मग संकेताचें रूपांतर कायद्यांतही होतें. तथापि या गोष्टीला वेळ लागतो. लोकमत व कायदा यांची पाठशिवणीच्या खेळासारखी स्थिति असते. लोकमत प्रवाही व पुढें जाणारें, तर कायदा मंदगति व भटकत भटकत जात असतो. कारण कायद्यांत बसलें म्हणजे तें तत्त्व अगर तो विचार स्थिर होतो व समाजजीवनाचा एक भाग होतो. लोकव्यवहार त्याप्रमाणें स्वरूप घेतो. या दृष्टीनें विचार करतां समाजाची रचना अगर पुनर्रचना यांत कायदा हें एक मोठें साधन आहे. विशिष्ट तऱ्हेचा समाज असावा, व्यक्तीचें जीवन विशिष्ट तऱ्हेचें असावें, हें साध्य करण्याच्या दृष्टीनें व्यक्तींचे हक्क, नागरिकांचे हक्क कायद्यांत समाविष्ट करणें आधुनिक जगांत इष्ट मानलें जातें. दीर्घ दृष्टीचे लोक लोकमतापुढें जाऊन आदर्श कार्यान्वित करण्याच्या दृष्टीनें कायद्याची उभारणी करीत असतात. विद्यमान अन्याय व विषमता जशी कायदा दूर करूं शकतो, तद्वत् भावी समता व न्याय कायद्यानें प्रस्थापित करणेंही शक्य आहे. अस्पृश्यता कायद्यानें गुन्हा ठरविला, म्हणजे समाजाच्या व्यवहाराला तसें स्वरूप लागतें, सामाजिक न्यूनता नाहींशी होते. त्याचप्रमाणें नागरिकत्व व राज्यसत्ता यांच्यांत मतभिन्नता उत्पन्न झाल्यास किमान नागरिक हक्क अबाधित राहतील अशी व्यवस्था असणें इष्ट आहे. राज्य सर्वांचें, पण राज्यसत्ता कांहीं थोडयांची, अगर थोडयांचें हित पाहणारी असूं शकेल. तसें झालें तर विद्यमान राज्यसत्तेच्या हातांत राज्य हें एक जुलुमाचें व स्वार्थ साधण्याचें साधन

ठरतें. या परिस्थितींत राज्याचे खरे मालक म्हणजे नागरिक यांना संरक्षण आवश्यक ठरतें. हें संरक्षण मूलभूत हक्कामुळें मिळतें. ते हक्क विहित असावेत, विद्यमान राज्यसत्तेला त्यांवर आक्रमण करतां येऊं नये म्हणून ते घटना-कायद्यांत असणें योग्य आहे. हीच विचारसरणी स्वीकारून घटनेंत व्यवस्था केली आहे.

व्याख्या व व्याप

७. या भागांत जेथें राज्य शब्द आला आहे, त्यांत हिंदुस्थान सरकार व विधिमंडळ, तसेंच सर्व संघराज्यांतील घटक व त्यांचीं विधिमंडळें, तसेंच स्थानिक व अन्य अधिकारी यांचा समावेश होतो.

८. घटनारंभापूर्वी जे कायदे झाले असतील, त्यांत व या भागांत दिलेल्या व्यवस्थेंत विरोध असेल, तर जेवढ्या प्रमाणांत त्या कायद्यांचा विरोध आहे, तेवढ्या प्रमाणांत ते कायदे रद्द व निष्प्रभावी समजावे.

जे हक्क या भागांतील व्यवस्थेंत बहाल करण्यांत आले आहेत, त्या बाबतींत कुठल्याही राज्याला त्यांत कांहीं कमी करण्याचा अगर नाहींसें करण्याचा हक्क नाहीं व तसा कांहीं कायदा केल्यास तेवढ्यापुरता तो कायदा रद्द व निष्प्रभावी होईल.

विषमतेला बंदी

तथापि विद्यमान कायद्यांत कोठें विषमता, पंक्तिप्रपंच वगैरे असल्यास ते दूर करण्यासाठीं कायदा करण्यास मनाई नाहीं.

कायदा या शब्दांत वटहुकुम, नियम, कानून, हुकुम, प्रथा, रिवाज कीं, जे कायद्याइतके हिंदुस्थानांत प्रभावी मानले जातात, या सर्वांचा समावेश होतो.

यांत मुख्य गोष्ट म्हणजे जे हक्क बहाल करण्यांत आले आहेत ते कमी करण्याचा अगर रद्द करण्याचा हक्क घटनेंत कोणत्याही विधिमंडळाला ठेवलेला नाहीं. अशा तऱ्हेची व्यवस्था .बहुतेक लेखनिष्ठ घटनेंत आहे. ही मौलिक बाब कुणालाही बदलतां येऊं नये हें इष्ट आहे. नागरिक हक्क हा निष्ठेचा आधार आहे. घराचा पाया बदलणें म्हणजे घर मोडणें आहे. यांत बदल झाला तर जें भावबंधन नागरिक

व राज्य यांना एकत्र ठेवतें, त्यांचें जीवन समरस करतें, तें तोडणें होय. नागरिक हक्काशिवाय जीवन व्यर्थ आहे. त्या हक्कांच्या योगानें व्यक्ति आपलें जीवन सार्थ व पूर्ण करूं शकते, तिच्या विकासाचें हें एक मोठें साधन आहे. हक्काविना नागरिक म्हणजे गुलाम होय. म्हणून हे हक्क कोणालाही हिरावतां येणार नाहींत अशी व्यवस्था असावी.

# समानता

**धर्म, वंश, जात, लिंग याबाबतच्या भेदभावाला बंदी**

१. धर्म, वंश, जात अगर लिंग या कारणांसाठीं केवळ अगर यांपैकीं एकाहीसाठींसुद्धां राज्य कोणाही नागरिकाबाबत पंक्तिप्रपंच करणार नाहीं; विशेषतः या कारणांसाठीं केवळ अगर त्यांपैकीं एकासाठींसुद्धां कोणाही नागरिकावर न्यूनता, जबाबदारी, प्रतिरोध, अगर अन्य शर्त, दुकानें, उपाहारगृहें, भोजनालयें, सार्वजनिक करमणुकीचीं स्थानें यांच्या प्रवेशाबाबत, तसेंच विहिरी, तळीं, रस्ते, आणि अन्य सार्वजनिक ठिकाणें कीं, जीं सर्व लोकांसाठीं आहेत अगर ज्यांच्या व्यवस्थेसाठीं राज्य सर्वस्वी अगर अंशतः खर्च करतें, यांच्या उपयोगाबाबत लादली जाणार नाहीं.

स्त्रिया व मुलें यांसाठीं मात्र खास व्यवस्था राज्याला करतां येईल.

अमुक धर्माचा अगर वंशाचा, जातीचा अगर लिंगाचा म्हणून त्याला अधिक अगर कमी हक्क असें यापुढें राज्यांत राहणार नाहीं. कायद्यांत सर्व सारखे; स्त्रीपुरुष सुद्धां सर्व सारखे. सार्वजनिक जागा व सोयी यांबाबत सर्वांना सारखें वागविलें जाईल. कुठलाही प्रतिरोध अगर शर्त केवळ धर्म, जात, वंश व लिंग या कारणासाठीं याबाबत लादली जाणार नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतींत समानता, स्वातंत्र्य व भ्रातृभाव यांची घोषणा केली. तिला अनुसरून गेल्या दीड शतकांत जगांत घटना झाल्या, राजकीय परिवर्तनें झालीं. आज या देशांत नवीन घटना तयार झाली आहे व त्यांत या तीन्ही गोष्टींचा समावेश केला आहे. मानव हे सर्व सारखे आहेत. राज्य सर्वांचें म्हणून राज्याचे कायदे सर्वांना सारखे पाहिजेत. नागरिक हीच एक जात व मानवता हाच एक धर्म यापुढें राहील हें उघड आहे. सामाजिक समता या व्यवस्थेनें उपलब्ध केली जात आहे. ज्या सोयी सर्वांसाठीं अगर ज्यावर सरकार खर्च करते, त्यांचा

उपभोग सर्वांना मिळाला पाहिजे हें समानतेचें एक महान् तत्त्व आहे. यापुढें मंदिरप्रवेशासाठीं सत्याग्रह करण्याची अगर हृदयपालट करण्याचा प्रयत्न करण्याची जरूर पडणार नाहीं. लोकव्यवहाराला समानतेचें वळण निश्चित लागेल.

सरकारी नोकरींत संधिसमता

**१०. सरकारी नोकरीबाबत सर्व नागरिकांना सारखी संधि मिळेल. धर्म, वंश, लिंग, जात, जन्मस्थान अगर कुळ याच कारणासाठीं म्हणून कोणाही नागरिकाला सरकारी अंमलाखालील कोणत्याही नोकरीबाबत नालायकी असणार नाहीं. मात्र मागासलेल्या वर्गांसाठीं, ज्यांना सरकारी रोजगारांत पुरेसा प्रवेश मिळाला नाहीं, त्यांना कांहीं जागा, कांहीं नोकऱ्या राखीव म्हणून ठेवतां येतील.**

**तसेंच एखाद्या कायद्यानें एखाद्या धार्मिक अगर पंथविषयक संस्थेच्या कारभारांत एखादी जागा अगर अधिकारपद विशिष्ट धर्म अगर पंथाच्या अनुयायासच मिळावें असें असेल, तर या व्यवस्थेस बाध येणार नाहीं.**

केवळ लायकीवर नोकरी मिळणें हा समानतेच्या सिद्धांताचा एक भाग आहे. नोकरी लायकीनें अगर पुरस्कारानें मिळते. पुरस्कार म्हणजे वशिला व ज्यांत सर्व तऱ्हा येतात; म्हणून जेवढ्या बाबी मनुष्याच्या हातांत नाहींत, त्या बाबीमुळें नालायकी येऊं नये एवढी व्यवस्था येथें आहे. वंश, लिंग, जात, कुळ वगैरे गोष्टी मनुष्य जन्मतः घेऊन येतो. म्हणून या अडचणी दूर करणें इष्ट आहे. केवळ नोकरी लायकीनें मिळेल यासंबंधीं व्यवस्था पुढें केली आहे. या देशांतील विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेतां दोन अपवाद केले आहेत. मागासलेल्या वर्गांबाबत व कांहीं धार्मिक संस्थांबाबत. उदाहरणार्थ, धार्मिक संस्था व देवस्थानें यांबाबत अनेक कायदे आहेत. हिंदु देवळाचे व्यवस्थापक मुसलमान नेमणें अगर दर्ग्याचा मुतवली हिंदु नेमणें इष्ट नाहीं. या दृष्टीनें हाही अपवाद आक्षेपार्ह नाहीं. मागासलेल्या वर्गांत आज जो असंतोष आहे व जो सामाजिक न्यूनपणा त्यांत आहे, तो घालविण्यासाठीं वैयक्तिक समानतेबरोबर विद्यमान परिस्थितींत वर्ग आहेत, म्हणून वर्गसमानता आणली पाहिजे. अर्थात् शिक्षण सर्वत्र झालें म्हणजे हाही अपवाद जाईल.

अस्पृश्यता नष्ट

**११. कुठल्याही स्वरूपांत अस्पृश्यता पाळणें हें मना केलें असून ती नष्ट केली आहे. अस्पृश्यतेच्या कारणासाठीं म्हणून जर एखादी गोष्ट करण्यांत येईल, तर ती गुन्हा समजली जाईल व ती करणारास कायद्यानें शिक्षा होईल.**

अस्पृश्यता नष्ट केली आहे; ती मानून जर एखाद्याविरुद्ध कांहीं गोष्ट करण्यांत आली तर तो गुन्हा होईल. या व्यवस्थेनें समाजांत व लोकव्यवहारांत अस्पृश्यता राहणार नाहीं. अस्पृश्य म्हणून उपाहारगृहांत शेजारीं न बसणें ही गोष्ट गुन्हा होऊं शकेल. तात्पर्य, हिंदु संस्कृतीवर कलंक म्हणून मानलेली शतकांपासून चालत आलेली अस्पृश्यता या व्यवस्थेनें नष्ट होत आहे व मनुष्यमात्र समान हें तत्त्व प्रस्थापित होत आहे.

पदव्या नष्ट

**१२. राज्य पदव्या बहाल करणार नाहीं. तसेंच हिंदुस्थानच्या कोणाही नागरिकाला परराज्याकडून पदवी स्वीकारण्यास मनाई आहे. तसेंच राज्याची नोकरी करणारा अगर ज्या जागेपासून कांहीं प्राप्ति आहे अशा जागेवर काम करणारा, अगर विश्वस्त अशा कोणत्याही इसमास अध्यक्षाच्या संमति-शिवाय परराज्यापासून पदवी अगर बक्षिस अगर मेहनताना अगर कोणतेंही अधिकारपद अगर जागा घेण्यास मनाई आहे.**

पदव्या लायकीमुळें मिळतात असा अनुभव नाहीं. शिवाय राज्यसत्ता हातीं असलेल्यांच्या हातांत पदव्या हें एक पुरस्काराचें साधन ठरतें व त्या कामीं वशिले व विक्री पण होण्याचा संभव असतो. लोकशाही युगांत पदव्या विषमता दर्शविणाऱ्या मानल्या जातात. जे सरकारी नोकर आहेत, त्यांना अन्य राज्यापासून पदवी वगैरे घ्यावयाची झाल्यास अध्यक्षाची संमति पाहिजे. पुष्कळ वेळां परराष्ट्रांत चांगली कामगिरी बजावली, तर त्या राष्ट्राचें सरकार कांहीं पुरस्कार करूं इच्छितें. योग्य स्थितींत हा पुरस्कार स्वीकारणें इष्ट असतें. त्यासाठीं संमतीची योजना आहे. सामान्य नागरिकांना मात्र पूर्ण मनाई आहे. पदव्या बंद केल्या, याचा अर्थ राज्य गुणग्रहणाची व्यवस्था करणार नाहीं असें मात्र नाहीं. राजकारण, देशसेवा, युद्धांत पराक्रम, समाजसेवा, साहित्यसेवा वगैरेंत प्रावीण्य दाखविल्यास त्याचा पुरस्कार पदव्या न देतां करण्याची पूर्ण मुभा आहे. पदवी म्हणजे नांवापुढें अगर मागें जोडलें जाणारें विशेष

अभिधान. अन्य पुरस्कार म्हणजे पारितोषिक देणें अगर पदक देणें अगर कांहीं तैनात देणें; या प्रकारचें देणें हें पदवी देणें असें होत नाहीं. 'व्हिक्टोरिया क्रास' ही पदवी नाहीं, हें पदक आहे. उलट 'रावसाहेब' ही पदवी आहे. कारण ती नांवापुढें अगर मागें जोडलीच पाहिजे असें असतें. गुणग्रहणाची व्यवस्था ठेवून पुरस्काराचा दुरुपयोग न होईल अशी तजवीज येथें आहे.

**नागरिक स्वातंत्र्यें व त्यांचें संरक्षण**

१३. पुढें नमूद केलेल्या मर्यादा संभाळून सर्व नागरिकांना— (१) भाषणस्वातंत्र्य व मतप्रदर्शन, (२) शांततेनें व शस्त्ररहित एकत्र जमणें, (३) संघ अगर संस्था स्थापणें, (४) हिंदुस्थानांत कोठेंही मोकळिकीनें फिरणें, (५) हिंदुस्थानांत कोठेंही राहणें अगर कायम वास्तव्य करणें, (६) मिळकत मिळविणें, ताब्यांत ठेवणें अगर तिची वासलात लावणें, (७) कोठलाही धंदा करणें अगर कोणताही रोजगार, उद्योग अगर व्यापार करणें, यांबाबत हक्क आहे.

वर (१) यांत सांगितलेल्या हक्कामुळें, निंदा, बदनामी, बेअब्रू, राज्यद्रोह याबाबत, अगर सार्वजनिक सभ्यता अगर नीतिमत्ता यांना कमीपणा आणणाऱ्या गोष्टींबाबत अगर राज्याचा अधिकार अगर आधार यावर प्रहार करणाऱ्या गोष्टींबाबत दखल घेणाऱ्या विद्यमान कायद्याला बाध येणार नाहीं; तसेंच या बाबींसंबंधांत एखादा नवीन कायदा करण्यास राज्यास प्रतिबंध असणार नाहीं.

वर (२) यांत सांगितलेल्या हक्कामुळें, सार्वजनिक सुव्यवस्थेच्या दृष्टीनें कांहीं बंधनें विद्यमान कायद्यानें घातलीं असल्यास त्यांस बाध येणार नाहीं, अगर त्या दृष्टीनें नवीन कायदा करण्यास पण प्रतिबंध असणार नाहीं.

वर (३) यांत सांगितलेल्या हक्कामुळें, सार्वजनिक हितार्थ विद्यमान कायद्यानें त्याबाबत कांहीं बंधनें घातलीं असल्यास त्यांस

बाध येणार नाहीं; तसेंच त्या दृष्टीनें नवीन कायदा करण्यास पण प्रतिबंध असणार नाहीं.

वर ( ४, ५, ६ ) यांत सांगितलेल्या हक्कांमुळें सार्वजनिक हितार्थ अगर जंगली जमातीच्या हितार्थ कांहीं बंधनें विद्यमान कायद्यांत असल्यास त्यांस बाध येणार नाहीं; तसेंच त्या दृष्टीनें नवीन कायदा करण्यास पण प्रतिबंध असणार नाहीं.

वर ( ७ ) यांत सांगितलेल्या हक्कांमुळें, सार्वजनिक सुव्यवस्था, नीतिमत्ता व स्वास्थ्य यांच्या हितार्थ कांहीं विद्यमान कायद्यांत कांहीं बंधनें असल्यास त्यांस बाध येणार नाहीं; तसेंच त्या दृष्टीनें नवीन कायदा करण्यास पण प्रतिबंध असणार नाहीं. तसेंच व्यवसाय, धंदा अगर व्यापार करण्यास व्यवसायविषयक अगर कारागिरीविषयक काय पात्रता असावी हें ठरविण्याचा अगर न ठरविण्याचा अधिकार देण्याची जी कांहीं व्यवस्था विद्यमान कायद्यांत असेल, तिला बाध येणार नाहीं, अगर त्या दृष्टीनें नवीन कायदा करण्यास प्रतिबंध असणार नाहीं.

नागरिक स्वातंत्र्यें या घटना-व्यवस्थेंत सर्व नागरिकांना मिळावयाचीं आहेत. भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य, निवासस्वातंत्र्य, व्यवसायस्वातंत्र्य इत्यादि गोष्टी स्पष्टपणें या कलमांत नमूद करण्यांत आल्या आहेत. कांहीं मर्यादा या सर्व बाबतींत सर्व देशांत आहेत. या मर्यादा कोणी ठरवावयाच्या हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. कार्यकारी सत्तेनें, का विधिमंडळानें, का न्यायाधिशानें ? व्यक्तीच्या स्वातंत्र्यानें राज्याला केव्हां धोका येतो ? कोणत्या परिस्थितींत राज्यावर आघात झाला असें म्हणायचें ? निदान हें ठरविणें सामान्यपणें कार्यकारी सत्तेच्या हातांत नसावें. तसेंच न्यायाधिशाच्या हातांत हा अधिकार ठेवल्यास दोनचार लोकांच्या हातांत राज्याचें जीवित दिल्यासारखें होतें. या घटनेंत स्वातंत्र्याच्या मर्यादा ठरविण्याचें काम विधिमंडळावर सोंपविलें आहे. कायदा करून या मर्यादा घालावयाच्या आहेत. तसेंच ‘ त्रिकट परिस्थिति ’ जाहीर झाल्यास कांहीं कालपर्यंत हीं नागरिक स्वातंत्र्यें स्थगित राहतील. युद्धमान परिस्थितींत अगर अन्य आणीबाणीची परिस्थिति उत्पन्न झाल्यास पूर्णतया सर्व हक्क चालू ठेवणें म्हणजे राज्याला धोक्यांत आणणें आहे व जें राज्य सर्व हक्कांचा आधार व जामीन आहे त्यालाच खच्ची करणें

आहे. केवळ मर्यादा घातल्या म्हणून मूलभूत हक्कच नाहींत ही विचारसरणी चुकीची आहे. अधिकार व स्वातंत्र्य यांत स्वभावतः विरोध नाहीं. भाषा व व्याकरण यांत विरोध नाहीं. किंबहुना व्याकरणानें भाषा सुदृढ होते, सुडौल होते. स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे. प्रत्यक्ष दंगा होईपर्यंत सभा बंद करूं नये असाच कायदा ठेवल्यास दंगा झाल्यानंतर काय परिस्थिति उत्पन्न होईल हें कोण सांगणार? कोणत्या क्षणाला मर्यादा घातली पाहिजे हें कार्यकारी सत्तेवर सोंपविलें पाहिजे. अफवा दूर करण्यास प्रचार हें साधन खरें. पण बिकट परिस्थितींत प्रचार प्रभावी होण्याच्या आधींच शांतता धोक्यांत येईल. प्रतिबंधात्मक योजना करण्याची सत्ता राज्य-सत्तेला असलीच पाहिजे. सार्वजनिक सुरक्षितता व हित याकरतांच मर्यादा आहेत. मर्यादा या विद्यमान राज्यकर्त्यांना न्याय्य व रास्त टीकेपासून वांचविण्यासाठीं नाहींत हें यांतील मुख्य सूत्र आहे. वैयक्तिक कार्यावरील टीका अगर पक्षविषयक टीका ही राज्यविषयक टीका होतां कामा नये. मर्यादा जेव्हां धोका नजीक व स्पष्ट आहे तेव्हांच अंमलांत आल्या पाहिजेत. मर्यादा हें पथ्य आहे. म्हणजे रोगग्रस्त स्थितींत तें घ्यावयाचें असतें. दररोजचें अन्न तें होऊं शकत नाहीं. तसेंच आणीबाणीची स्थिति नित्य स्थिति होऊं शकत नाहीं. राज्याचें संरक्षण व व्यक्तीचे हक्क यांत नित्य विरोध नाहीं. व्यक्तीच्या विकासासाठीं राज्य आहे म्हणून राज्याची, या साधनाची अधिक काळजी व्यक्तीनें घेतली पाहिजे. घोडें चांगलें राहावें म्हणून स्वाराला खरारा करावा लागतोच कीं नाहीं? तात्पर्य, नागरिकस्वातंत्र्यावर घातलेल्या मर्यादा आवश्यक व सर्वसामान्य अशाच आहेत.

**गुन्ह्याबाबत संरक्षण**

**१४. कोणाही मनुष्याला त्यानें केलेलें कृत्य विद्यमान कायद्याविरुद्ध असून तें गुन्हा ठरविलें असेल तरच शिक्षा होईल व तीही गुन्हा घडला असेल त्या वेळीं कायद्यांत जी शिक्षा सांगितली असेल त्यापेक्षां अधिक असणार नाहीं; तसेंच एकाच गुन्ह्याबद्दल दोनदां शिक्षा होणार नाहीं. स्वतःच्या विरुद्ध साक्ष देण्यासही कोणावर सक्ति केली जाणार नाहीं.**

वरील योजना सर्वमान्य न्यायदानाच्या सिद्धांताला धरून आहे. ज्या वेळीं एखादें कृत्य घडेल, त्या वेळीं कायद्याप्रमाणें तें गुन्हा असलें पाहिजे. म्हणजे मागाहून कायदा करून, जें होऊन गेलें आहे, त्याबाबत गुन्हा ठरविण्याचा अधिकार नाहीं. तसेंच मागाहून कायदा करून एखाद्या गुन्ह्याला अधिक शिक्षा देण्याचाही अधिकार नाहीं. फौजदारी कायद्याचा अंमल कायदा अंमलांत आल्यापासून होतो. त्याचा

प्रभाव गत घटनांवर होऊं शकत नाहीं. या योजनेनें विद्यमान राज्यकर्त्यांना सूड घेतां येणार नाहीं. कायदा हा निश्चित स्वरूपाचा असला पाहिजे. त्यांतील परिणामही स्पष्ट व निश्चित पाहिजेत. कायद्याविरुद्ध जाणारांना काय प्रायश्चित्त आहे हें कायदा मोडतांना समजलें पाहिजे व आज काय कायद्याविरुद्ध आहे, हेंही स्पष्ट पाहिजे. सगोत्र विवाह आज गुन्हा नाहीं, या भरंवशावर लग्न केलें व उद्यां असा विवाह गुन्हा ठरविला व झालेलीं लग्नें गुन्हा ठरविलीं, तर बिकट प्रसंग येईल. समाज-व्यवहार कायद्याच्या निश्चितपणावर चालतो. कायदा, होणाऱ्या व्यवहारावर परिणाम करणारा पाहिजे.

साक्ष ही शपथेवर द्यावयाची असते. अपराधी माणसांना त्याच्याविरुद्ध साक्ष देण्यास भाग पाडणें म्हणजे अन्याय आहे. त्याचा आणखी नैतिक अध:पात करण्याची ही व्यवस्था ठरते. खरें बोलावें तर न्यायाधिशाची शिक्षा, व खोटें सांगावें व शपथेवर सांगावें तर मनाची बोचणीं. असल्या पेंचप्रसंगांत निदान अपराधी इसमास टाकणें योग्य नाहीं. त्याला वाटेल तर त्यानें आपण होऊन शपथेवर सांगावें व तशी योजना कांहीं देशांतील कायद्यांत आहे. येथेंही लांचलुचपतीबाबतच्या कायद्यांत आहे. या कामी सक्ति नसावी हें योग्य आहे.

**जीवित व व्यक्ति-स्वातंत्र्यसंरक्षण व कायद्यापुढील समता**

**१५. कोणाही इसमास देहांताची शिक्षा देणें अगर कोणाही मनुष्याला अटकेंत ठेवणें हें कायद्यानें सांगितलेल्या कामकाजाच्या पद्धतीला सोडून होणार नाहीं. तसेंच हिंदुस्थानांत कोणाही इसमाला कायद्याचें संरक्षण अगर कायद्यापुढील समता नाकारली जाणार नाहीं.**

या व्यवस्थेंत कायद्याचें राज्य राहील हें स्पष्ट केलें आहे. आत्यंतिक शिक्षा म्हणजे देहदंड; तसेंच स्वातंत्र्य-अपहार म्हणजे अटक ही कायद्याप्रमाणें ठरलेल्या पद्धतीनें होईल. अपराध सांगितला जाईल, चौकशी होईल, आरोपीचें म्हणणें मांडण्यास संधि मिळेल, वगैरे गोष्टी होऊनच अपराध शाबीत झाल्यास व देहांताची शिक्षा न्यायाधिशाला योग्य वाटल्यास दिली जाईल व ही शिक्षा अमलांत आणण्याच्या नियमाप्रमाणें फांशी दिलें जाईल. विनाचौकशी हें होणार नाहीं. तसेंच अटकेबाबत जे कानून असतील, त्यांना अनुसरून नागरिकास अटक होईल, चौकशी होईल. कोणा अधिकाऱ्याच्या मर्जीवर ही गोष्ट राहणार नाहीं. या बाबतींत विद्यमान कानून-प्रमाणें सर्व कांहीं होईल. झोटिंगपणा यांत असणार नाहीं. तसेंच कायद्यांत जें संरक्षण नागरिकाला मिळण्याचा हक्क आहे, तें मिळेल व व्यक्तिव्यक्ति अगर वर्गावर्गासाठीं

निराळा कायदा असणार नाहीं. श्रीमान व गरीब, विद्वान् व निरक्षर, अधिकारी व नागरिक या सर्वांना सारखाच कायदा लागू पडेल. अधिकारी म्हणून निराळा कायदा अगर निराळीं न्यायालयें असें असणार नाहीं. कांहीं देशांत सरकारी अधिकाऱ्यांसाठीं निराळा कायदा व निराळीं न्यायालयें असतात. तसें येथें नाहीं. कायद्यापुढें सर्व सारखे राहतील व सर्वांना कायद्याचें संरक्षण मिळेल.

**अंतर्गत व्यापार-स्वातंत्र्य**

**१६. कलम २४४ मध्यें ज्या कांहीं मर्यादा सांगितल्या आहेत त्यांना अनुसरून व विधिमंडळाच्या कायद्याला अनुसरून हिंदुस्थानभर व्यापार, उदीम व व्यवहार यांना पूर्ण मोकळीक राहील.**

घटनेप्रमाणें घटकांना स्वायत्तता आहे व अन्य घटक-प्रांतांतून येणाऱ्या मालावर जकात बसविण्याचा हक्क आहे. मात्र त्या घटकांतील त्याच्या मालाच्या उत्पादनाला या योगें फायदा मिळतां कामा नये. ही योजना कलम २४४ मध्यें आहे. तसेंच सार्वजनिक हितार्थ योग्य बंधन या हक्कावर घालतां येईल. ३०६ कलमामध्यें सांगितलेल्या कांहीं बाबतींत तर पांच वर्षेंपर्यंत हेंही करतां येणार नाहीं. या कलमांत, कपडा, लोकर, धान्य, तेल, पेट्रोल, पोलाद, कोळसा वगैरेंचा उल्लेख आहे. वरील मर्यादा लक्षांत घेऊन या कलमांत सांगितल्याप्रमाणें व्यापारादि गोष्टींस पूर्ण मोकळीक आहे. राज्यातील घटका-घटकांत औद्योगिक व व्यापारविषयक एकता आहे व असली पाहिजे. तसें न झालें तर मुंबईनें बंगालमधून येण्याऱ्या मालावर जकात बसवावी व त्याच्या उलट बंगालनें तेंच करावें, असें झालें म्हणजे हे प्रांत दोन राष्ट्रे होतात. जकातीचा उद्देश उत्पन्न वाढविणें व देशांतील उद्योगधंद्यांना संरक्षण देणें हे असतात. संरक्षणासाठीं प्रांताप्रांत हें प्रमाण धरल्यास संघराज्य हें अर्थशून्य होईल. त्याची घडी विसकटेल. म्हणून संरक्षणासाठीं संघराज्य, हें प्रमाण योग्य आहे. जसें राजकीयदृष्ट्या संघराज्य हें प्रमाण. परराष्ट्राशीं घटक बोलणार नाहींत, तर संघराज्य बोलेल. तसेंच आर्थिक संघटनाही घटकविषयक ठेवल्यास अनर्थ होईल. ती संघराज्यविषयक असली पाहिजे. म्हणून आर्थिक व्यवहार, व्यापार, दळणवळण यांना देशभर मोकळीक पाहिजे. प्रांतांतील अगर घटकांतील आर्थिक हितसंबंध हे परस्परविसंगत न राहतां, एकाच महान् देशव्यापी योजनेंतील परस्पर साहाय्यकारी भाग म्हणून राहिले पाहिजेत. संघराज्याच्या अस्तित्वाची ही मोठी शर्त आहे, हा पाया आहे. म्हणून कलमांत लिहिल्याप्रमाणें स्वातंत्र्य असलें पाहिजे.

**१७.** **मनुष्यांचा क्रय, विक्रय, बेगार अगर तत्सम जबरीनें माणसांचे श्रम घेणें या सर्व गोष्टींना बंदी आहे. याविरुद्ध कांहीं कृत्य झाल्यास तें गुन्हा असून शिक्षेस पात्र होईल.**

**मनुष्यांच्या क्रय-विक्रयास बंदी**

**तथापि राज्याला सार्वजनिक कामाकरितां सक्तीची नोकरी नागरिकांवर लादण्याला या कलमानें प्रतिबंध असणार नाहीं; मात्र अशी नोकरी लादतांना धर्म, वंश, जात अगर वर्ग या दृष्टीनें पंक्तिप्रपंच करतां येणार नाहीं.**

गुलामीची प्रथा जगभर कायद्यानें बंद झाली आहे. तथापि या देशांत कांहीं ठिकाणीं नोकरांची खरेदीविक्री चालू आहे. ती बंद करण्याचा हेतु या कलमांत स्पष्ट आहे. तसेंच परंपरेनें जमीनदार, जहागिरदार, राजेरजवाडे यांच्याकडे फुकट श्रम घेतले जातात, उदाहरणार्थ पाणी भरून घेणें, लांकडें फोडून घेणें, शिकारीच्या वेळीं रानांत काम करावयास लावणें, या गोष्टी या युगांत चालू ठेवणें अयोग्य आहे. मानवाची प्रतिष्ठा राखणें हा राज्याचा एक हेतु मानला जातो. समाजांतील व्यवहार व वर्तन हें सक्तीवर आधारलेलें नसावें. संतोष व संमति ही लोकव्यवहाराची धारणा अधिक प्रभावी रीतीनें करितात. विनामूल्य श्रम सक्तीनें घेतां कामा नये. किंबहुना सक्तीनें कुणालाही श्रम करणें भाग पडतां कामा नये. ती एक गुलामगिरीच आहे.

सक्तीनें नोकरी घेण्याचा हक्क फक्त राज्याला आहे. कारण तें सर्वांचें आहे. कोणा एका व्यक्तीचें नाहीं. या परिस्थितींत नोकरी केल्यास ती सर्वांसाठीं असें होतें. राज्याला हीही सक्ति सार्वजनिक कामासाठींच करतां येईल. व्यक्तीच्या अगर वर्गाच्या हितासाठीं करतां येणार नाहीं. तसेंच ही सक्ति लादतांना धर्म, जात वगैरे दृष्टीनें पंक्तिप्रपंच करतां येणार नाहीं. ही व्यवस्था समतेच्या दृष्टीनें योग्य आहे. समाजासाठीं सर्वांनीं श्रमलें पाहिजे, खपलें पाहिजे, हा यांतील मौलिक सिद्धांत आहे.

**१८.** **१४ वर्षांखालील मुलांस कारखान्यांत, खाणींत अगर ज्यांत धोका आहे, अशा कोणत्याही रोजगारांत कामास ठेवण्यास मनाई आहे.**

**मुलांना कामास लावण्यास बंदी**

आधुनिक जगांत बालकांचे श्रम घेऊं नयेत हें मान्य झालें असून त्याप्रमाणें सर्वत्र कायदे आहेत. आंतरराष्ट्रीय मजूर संघटन ( I. L. O. ) या संस्थेनें अनेक

ठराव या दृष्टीनें पास केले आहेत. लहान मुलांचे श्रम घेऊन त्यांची शारीरिक वाढ खुंटविणें अगर तिला धोका येईल असें करणें राष्ट्राच्या दृष्टीनेंही अयोग्य आहे. शिवाय बालवयांत श्रम म्हणजे शिक्षण संपलेंच. या दृष्टीनें १४ वर्षें वय होईपर्यंत श्रमबंदी झाली म्हणजे शिक्षणाला वाव मिळतोच. कांहीं कायद्यानें कांहीं व्यवसायांत ही वयोमर्यादा वाढविली आहे. आधुनिक मत ही मर्यादा निदान १६ वर्षांची सर्व बाबतींत असावी असें आहे. तथापि या देशांतील हवापाणी व जीवन लक्षांत घेतां १४ वर्षें ही मर्यादा तूर्त ठीक दिसते.

## धर्मविषयक हक्क

धार्मिक स्वातंत्र्य

१९. सार्वजनिक सुव्यवस्था, नीतिमत्ता व स्वास्थ्य तसेंच पुढें दिलेल्या मर्यादा यांना अनुसरून सर्व इसमांना आपआपल्या सदसद्विवेकबुद्धीला पटेल त्याप्रमाणें वागण्याचा सारखा हक्क आहे. तसेंच मोकळेपणें आपला धर्म मानण्यास, त्याप्रमाणें वागण्यास व प्रचार करण्यास हक्क आहे.

कृपाण धारण करणें व बरोबर नेणें ही शिखांच्या बाबतींत धार्मिक बाब मानली जाईल.

तथापि या कलमामुळें,

( १ ) आर्थिक, पैशासंबंधीं, राजकीय, अगर अन्य लौकिक (Secular) व्यवहार कीं ज्यांचा संबंध धर्माचरणाशीं येतो, या बाबतींत नियमन अगर नियंत्रण करणें,

( २ ) सामाजिक सुधारणा अगर सामाजिक सुखसंवर्धन, तसेंच सार्वजनिक स्वरूपाच्या हिंदु धर्म संस्था हिंदु धर्मांतील कुठल्याही वर्गाला अगर भागाला खुल्या ठेवणें.

याबाबत विद्यमान कायद्यांत जी व्यवस्था असेल तिला बाध येणार नाहीं अगर या दृष्टीनें नवीन कायदा करण्यास प्रतिबंध असणार नाहीं.

प्रत्येक व्यक्तीस आपली श्रद्धा जी असेल ती मानण्यास पूर्ण वाव असला पाहिजे. त्यास धर्मप्रचार करण्यास, धर्माचें पालन करण्यास वाव असला पाहिजे. राज्याचा खास असा धर्म असणार नाहीं. व्यक्तीचा धर्म असेल. राज्याचा धर्म झाल्यास त्या धर्माव्यतिरिक्त अन्य धर्माच्या नागरिकांना साहजिकच प्रतिबंधनें उत्पन्न होतात. म्हणून धार्मिक स्वातंत्र्य हें सर्व नागरिकांना सारखें असलें पाहिजे. मात्र धर्मप्रचाराच्या अगर पालनाच्या योगानें सार्वजनिक शांतता, सुव्यवस्था, नीतिमत्ता व स्वास्थ्य यांना बाध येतां कामा नये. प्रत्येक धर्मांत मुख्य सिद्धांत व कर्मकांड अगर आचारधर्म सांगितलेला असतो. जेथें धर्माचें पालन सार्वजनिक क्षेत्रांशीं संलग्न होतें, तेथें जी सामाजिक व्यवस्था राज्याच्या दृष्टीनें योग्य असेल ती पाळलीच पाहिजे.कुरबानी करणें धार्मिक असें मानलें, तर सार्वजनिक जागीं ती झाल्यास शांतताभंग होईल म्हणून राज्य ती होऊं देणार नाहीं. यांत धार्मिक स्वातंत्र्य वस्तुतः मर्यादित होत नाहीं. तथापि तें झालें, तरी राज्याच्या हितार्थ तें इष्ट आहे. सती जाणें, बालविवाह हे सार्वजनिक नीतिमत्तेच्या दृष्टीनें अयोग्य म्हणून ते कायद्यानें बंद अगर मर्यादित झाले. यांत धर्मांत हस्तक्षेप झाला असें म्हणतां येणार नाहीं. धर्मविषयक प्रवचनें अगर प्रचार यांनीं जर शांतता बिघडणार असेल तर तीं बंद अगर मर्यादित करणें अवश्य ठरतें, यांतही वावगें कांहीं नाहीं. स्वधर्माचा प्रचार म्हणजे परधर्मनिंदा ठरल्यास सार्वजनिक शांततेस धोका नक्कीच निर्माण होतो. असला प्रचार बंद करणें ही योग्य मर्यादा आहे. केवळ एकादा अमुक धर्म मानतो, म्हणून त्याचा छळ होणार नाहीं अगर त्याच्याविरुद्ध पंक्तिप्रपंच होणार नाहीं.

कृपाण वापरणें ही शिखांच्या बाबतींत धार्मिक बाब मानली आहे. तथापि हीही गोष्ट वरील मर्यादांना अनुसरूनच राहील. कृपाणांच्या लांबीरुंदीवर मर्यादा घालतां येईल. तसेंच तें कृपाण उघड दिसूं नये अशीही मर्यादा घालतां येईल. तसेंच धोक्याची परिस्थिति वाटल्यास कृपाण घेऊन सार्वजनिक ठिकाणीं जाण्यास कांहीं काल बंदी करणेंही उचित होईल. कुठलीही धार्मिक बाब राज्याचें स्थैर्य अगर समाजांतील शांति यांच्यावर आक्रमण करणारी असेल, तर ती बंद अगर मर्यादित झाली पाहिजे, हें यामागील मुख्य तत्त्व आहे. तप हें शापासाठीं नसावें, वरासाठीं तें असावें. तीच तऱ्हा कुठल्याही धार्मिक साधनाची, मग तें कृपाण कां असेना. कृपाण अन्य नागरिकांवर आक्रमण करण्यासाठीं असल्यास अगर झाल्यास त्यास बंदी घालणें न्याय्य आहे.

तसेंच धर्मविषयक गोष्टींत जर पैशांचा, अगर राजकीय अगर अन्य लौकिक संबंध येत असेल तर राज्य त्यांत जरूर तेव्हां हस्तक्षेप करील. थोडक्यांत म्हणजे केवळ धर्मविषयक क्षेत्र सोडून अन्य क्षेत्राशीं धर्मपालनानें संबंध येत असेल तर त्यावर नियंत्रणें अगर बंधनें घालणें यांत धार्मिक स्वातंत्र्यावर आक्रमण होत नाहीं.

धर्माच्या नांवाखालीं अन्य व्यवहार केल्यास अन्य व्यवहारांत हस्तक्षेप करण्याचे जे हक्क राज्याला आहेत ते येथेंही असणें अयोग्य कसें ठरेल ?

त्याचप्रमाणें हिंदूंच्या ज्या धार्मिक संस्था सार्वजनिक स्वरूपाच्या असतील, त्यांत सुधारणा करण्यासाठीं राज्याला पूर्ण हक्क असणें योग्य आहे. नाहीं तर संस्था सार्वजनिक व फायदा व सत्ता व्यक्तींची असें व्हावयाचें ! तसेंच देवस्थानाला उत्पन्न सार्वजनिक पैशांतून होत आहे, पण प्रवेश मात्र विशिष्ट जातीला अगर वर्गाला, हा अन्याय दूर करण्याचा हक्क राज्याला खास असला पाहिजे. सामाजिक सुखसंवर्धनासाठीं देखील याच दृष्टीनें हक्क असणें जरूर आहे. देवस्थानाचें उत्पन्न गाभाऱ्यांतील देव कांहीं उपभोगित नाहींत. मग त्या उत्पन्नांतून सार्वजनिक कार्यासाठीं खर्च करणें अयोग्य नाहीं. तात्पर्य, या संस्था आधुनिक कल्पनांप्रमाणें सुधारणें हा हक्क राज्याचा आहे. सर्वसामान्य लोकमताप्रमाणें या कलमाची आंखणी आहे.

**धार्मिक बाबी व मिळकत**

**२०. कुठल्या धर्मपंथाला अगर त्यांतील कुठल्याही भागाला**

**(१) धार्मिक अगर दान-धर्म करणाऱ्या संस्था स्थापणें अगर चालविणें,**

**(२) धार्मिक बाबतींत आपला व्यवहार पाहणें,**

**(३) स्थावर जंगम मिळकत मिळविणें, स्वामित्व संपादणें,**

**(४) सदहू मिळकतीची व्यवस्था कायद्यानुरूप करणें,**

**यांबाबत हक्क राहील.**

धार्मिक स्वातंत्र्याचा एक भाग म्हणजे अनाथालयें, शिक्षणसंस्था, पांजरपोळ इत्यादींसारख्या धर्मविषयक संस्था स्थापणें हा होय. या संस्था काढल्या, म्हणजे फंड आला, मिळकत आली, तिची व्यवस्था व वासलात करण्याची जबाबदारी आली. या सर्व गोष्टी करण्याचा हक्क या कलमांत दिला आहे. मिळकतीबाबतची व्यवस्था कायद्याप्रमाणें झाली पाहिजे. कायद्याप्रमाणें हिशोब ठेवले पाहिजेत. विश्वस्त अगर व्यवस्थापक निवडले पाहिजेत. परवानगीनें मिळकतीची विक्री अगर अन्य व्यवहार केला पाहिजे. एतद्विषयक जे कायदे असतील, त्याप्रमाणें व्यवस्था झाली पाहिजे. यामुळें धार्मिक स्वातंत्र्य कमी झालें असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. किंबहुना अशी व्यवस्था असणें इष्टच आहे.

धर्म व कर

२१. ज्या कराचें उत्पन्न एखाद्या विशिष्ट धर्मासाठीं अगर धर्मपंथासाठीं, म्हणून खास खर्चिलें जाणार असेल असा कोणताही कर देण्याची सक्ति कोणावरही होणार नाहीं.

फायदा अगर उपयोग एखाद्या विशिष्ट धर्मासाठीं होण्याच्या उद्देशानें बसविलेला कर कोणावर सक्तीनें बसविला जाणार नाहीं. मुसलमानांच्या दर्ग्यासाठीं म्हणून कर बसविला अगर हिंदु देवळासाठीं कर बसविला, तर प्रत्येकानें तो दिला पाहिजे अशी सक्ति होणार नाहीं. अशी सक्ति केल्यानें धार्मिक स्वातंत्र्याला बाध येतो, हें उघड आहे. म्हणून ह्या कलमाची योजना आहे. कराचें उत्पन्न विशिष्ट पंथासाठीं खर्च करण्यांत येणार आहे; अशी व्यवस्था नसल्यास मात्र तो सर्वांना देणें भाग आहे. कारण कांहीं संस्थांना सरकार मदत करीत असतें, ती मदत सर्वसामान्यपणें सरकारी वटउत्पन्नांतून होते. केवळ ही मदत होते म्हणून कुठलाही कर देण्याचें नाकारणें व धार्मिक स्वातंत्र्यावर हल्ला होतो हें कारण देणें अयोग्य आहे.

धर्मपंथांमार्फत काढलेल्या शिक्षणसंस्था व धर्मशिक्षण

२२. (१) ज्या शिक्षणसंस्था सर्वस्वी सरकारीं उत्पन्नांतून चालविल्या जातात, त्यांत धर्मशिक्षणाची व्यवस्था असणार नाहीं. मात्र एखादी संस्था देणगीनें अगर ट्रस्ट करून स्थापन झाली असेल व त्यांत धर्मशिक्षण द्यावें अशी अट असेल व अशी संस्था चालविण्याचें काम सरकारकडे आलें असेल, तर तेथें धर्मशिक्षणाची जी व्यवस्था असेल तिला बाध येणार नाहीं.

(२) ज्या शिक्षणसंस्थेस राज्यानें मान्यता दिली असेल, अगर तिला सरकारी पैशांतून मदत मिळत असेल अशा संस्थेंत जें धार्मिक शिक्षण देण्यांत येत असेल, अगर जी प्रार्थना अगर पूजाविषयक व्यवस्था असेल, तींत भाग घेण्याची सक्ति, तींत शिक्षण घेणाऱ्या कोणाही इसमावर होणार नाहीं. मात्र अशा इसमाची खुषी असेल अगर शिक्षण घेणारा अज्ञान असून त्याचे पालकानें संमति दिली असेल, तर सदहू इसमास भाग घेण्यास हरकत नाहीं.

**(३) या कलमामुळें कुठल्याही समाजाला अगर पंथाला नेहमीच्या शिक्षणाची वेळ सोडून आपल्या समाजांतील अगर पंथांतील विद्यार्थ्यांसाठीं धर्मशिक्षणाची सोय करण्यास प्रतिबंध असणार नाहीं.**

राज्य हें लौकिक ( Secular ) आहे. कुठल्याही धर्माचें नाहीं; म्हणून आपण होऊन धर्मशिक्षण देणार नाहीं. व्यवस्थापक या नात्यानें कांहीं शिक्षणसंस्था चालविणें झाल्यास ज्या शर्तीवर देणगी दिली असेल त्या शर्तीप्रमाणें त्या चालविणें इष्ट आहे. तसेंच मान्यता दिलेल्या संस्थांतून अगर मदत मिळणाऱ्या संस्थांतून धर्म-शिक्षणाबाबत अगर प्रार्थनेबाबत सक्ति ठेवणें राज्य धार्मिक स्वातंत्र्याच्या दृष्टीनें चालूं देणार नाहीं. ख्रिश्चन शिक्षणसंस्थांतून आतां वरील परिस्थितींत बायबलाच्या वर्गांत हजर राहणें भाग पडणार नाहीं. तात्पर्य, शिक्षणाचें आमिष दाखवून त्या ठिकाणी धर्मप्रचार होऊं देण्यास वाव राहणार नाहीं. खुषीनें कोणीही हजर राहावें. शाळेच्या वेळेबाहेर अर्थात् अनुयायांसाठीं व्यवस्था केल्यास तिला प्रतिबंध नाहीं.

# शिक्षण व संस्कृतिविषयक हक्क

**अल्पसंख्यांकांचें संरक्षण**

२३. ( १ ) हिंदुस्थानांत कोठेंही राहणाऱ्या कोणत्याही नागरिक समूहाला अगर भागाला त्याची स्वतंत्र अशी भाषा, लिपि आणि संस्कृति असल्यास तीं राखण्याचा हक्क राहील.

( २ ) धर्म, जात अगर भाषा यांवर आधारलेल्या अल्पसंख्यांक जमातीच्या इसमाच्या बाबतींत सरकारनें चालविलेल्या कुठल्याही शिक्षण-संस्थेंत पंक्तिप्रपंच होणार नाहीं.

( ३ ) धर्म, जात अगर भाषा यांवर आधारलेल्या अल्पसंख्यांक जमातीला इच्छेप्रमाणें शिक्षणसंस्था काढण्यास व चालविण्यास हक्क आहे.

केवळ शिक्षणसंस्था अशा अल्पसंख्यांक जमातीच्या देखरेखीखालीं आहे म्हणून सरकारी मदत देण्याच्या बाबतींत राज्य पंक्तिप्रपंच करणार नाहीं.

धर्म, जात, अगर भाषा या दृष्टीनें जेथें जेथें अल्पसंख्यांक म्हणून एखादा समूह राहील, तेथें तेथें त्यांना त्यांची अशी स्वतंत्र व स्पष्ट भाषा, लिपि अगर संस्कृति असल्यास ती राखण्याचा हक्क आहे. शिक्षण संस्थांतून वर सांगितलेल्या परिस्थितींत त्यांच्यावर अन्याय होणार नाहीं. तसेंच शिक्षणसंस्था काढण्यास त्यांना वाव राहील व सरकारी मदत केवळ त्यांच्या संस्था आहेत म्हणून नाकारली जाणार नाहीं. आंतरराष्ट्रीय सिद्धांत व परंपरेप्रमाणें अल्पसंख्यांक जमातीचे जे हक्क जोपासिले पाहिजेत, त्या सर्वांची व्यवस्था येथें लाविली आहे. भाषाविषयक दृष्टीनें प्रदेशाची वांटणी झाली, तरी कांहीं भागांतून भाषाविषयक अल्पसंख्यांक असा समूह राहील. त्या समूहाला या कलमानें भाषा, लिपि, संस्कृति या बाबतींत संरक्षण दिलेलें आहे.

# मिळकतीबाबत हक्क

२४. (१) कायद्यांत सांगितलेल्या अधिकाराव्यतिरिक्त कोणाही इसमाला त्याच्या मिळकतीपासून वंचित केलें जाणार नाहीं.

**सक्तीनें मिळकत घेणें**

(२) कसलीही स्थावर अगर जंगम मिळकत—यांत उद्योग अगर व्यापार अगर तें काम करणाऱ्या कंपनींतील असलेला हितसंबंधही समाविष्ट आहे,—सार्वजनिक कामासाठीं जेव्हां कायद्यानें घेण्याचा अगर ताब्यांत घेण्याचा अधिकार दिला असेल, तेव्हां सदरहू कायद्यांत नुकसानभरपाईची व्यवस्था असेल, अगर नुकसानभरपाई कशी देण्यांत येईल व कोणत्या तत्त्वावर ती मिळेल, हें सांगितलें असेल, तरच ती घेण्यांत येईल अगर तिचा ताबा घेण्यांत येईल.

(३) तथापि वर (२) यांत सांगितलेल्या व्यवस्थेनें

(१) कुठल्याही विद्यमान कायद्यांतील व्यवस्थेस अगर

(२) जीवित अगर वित्त यांच्यावरील धोका टाळण्यासाठीं, सार्वजनिक स्वास्थ्य वाढावें म्हणून अगर एखादा कर बसविण्यासाठीं कायदा करून व्यवस्था करण्यास प्रतिबंध नाहीं.

ज्याप्रमाणें नागरिकांच्या शरीराबाबत हक्कव्यवस्था आहे व जसें कायद्याशिवाय त्याला अटकेंत ठेवतां येणार नाहीं अगर चौकशीशिवाय शिक्षा होणार नाहीं, तसेंच त्याच्या मिळकतीबाबत येथें व्यवस्था आहे. कायद्याच्या अधिकारानेंच त्याची संपत्ति घेण्यांत येईल. नुकसानभरपाईची व्यवस्था नसेल, तर त्या कायद्यानें ती मिळकत घेतां येणार नाहीं. कांहींही न देतां नागरिकाची मिळकत सार्वजनिक कार्याची सबब सांगून घेतां येणार नाहीं. विद्यमान कायद्यांतील व्यवस्थेस यामुळें बाध येणार नाहीं. तसेच वर ( ३ ) यांत सांगितलेल्या कारणाकरितां नवीन कायदादेखील करतां येईल. कर बसविणें म्हणजे कायद्यानें तें होणार. कर देणें म्हणजे मिळकतीवर आक्रमण आहे हें खरें, पण कर हे राज्याच्या व्यवस्थेसाठीं आहेत आणि राज्य हें सार्वजनिक आहे. अर्थात् एवढ्यापुरती नुकसानभरपाई मालकाला मिळणार नाहीं. कारण कराच्या मोबदल्यांत नागरिकाला जीवित व वित्त यांबाबत संरक्षण मिळत असतें. नाना सुखसोयी त्याला मिळत असतात. अमुक कराबद्दल अमुक मोबदला असें असत नाहीं. सर्वसामान्य गोष्टीसाठीं कर, हा यांतील सिद्धांत आहे. कर यासाठीं असल्यामुळें वर ( २ ) यांत दिलेल्या हक्कानें तो बसविण्याच्या राज्याच्या हक्कास बाध येणार नाहीं. कराचा अप्रत्यक्ष मोबदला मिळत असतो व त्या दृष्टीनें नुकसानभरपाई मागण्याचा हक्क तेवढ्यापुरता मर्यादित होणें योग्य आहे.

जीवित व वित्त यांबाबत समाजांत शाश्वति असणें जरूर आहे. यासंबंधांत सरकार जें कांहीं करील, तें कायद्यान्वयें करील. उचल कीं, घाल तुरुंगांत, घे जबरदस्तीनें मिळकत, असें झालें तर ती लोकशाही नव्हे. तेथें स्वातंत्र्य नांदू शकत नाहीं. या घटनेंत या दोन्हींबाबत मूलभूत हक्क समाविष्ट करून योग्य अशी व्यवस्था केली आहे. सर्वत्र कायद्याचें प्रभुत्व राहील.

## घटनांतर्गत उपाययोजनेबाबत हक्क

**२५. ( १ ) या भागांत जे हक्क बहाल करण्यांत आले आहेत, ते अमलांत आणण्यासाठीं सर्वश्रेष्ठ न्यायालयापुढें विहित पद्धतीनें काम चालविण्याच्या हक्कांची ग्वाही दिली आहे.**

**हक्कांबाबत उपाययोजना**

**( २ ) या भागांत जे हक्क बहाल करण्यांत आले आहेत, ते अमलांत आणण्यासाठीं, अनुरूप अशा स्वरूपांचे,—मनाई, बंदी,**

उपस्थिति वगैरे, हुकुम अगर आदेश देण्याचा अधिकार सर्वश्रेष्ठ न्यायालयाला आहे.

( ३ ) वर ( २ ) यांत सर्वश्रेष्ठ न्यायालयाला दिलेला अधिकार अन्य न्यायालयांना आपापल्या स्थानिक क्षेत्रांत अंशतः अगर पूर्णपणें चालविण्याची सत्ता मध्यवर्ती विधिमंडळाला कायदा करून देतां येईल.

( ४ ) या कलमांत दिलेले हक्क प्रस्तुत घटनेंत त्यासंबंधीं कांहीं व्यवस्था असेल तरच स्थगित होतील.

घटनेंत नुसते हक्क देऊन उपयोगी नाहीं. ते अमलांत आणण्याची, नागरिकांना त्यांचा उपभोग मिळेल अशी व्यवस्था असली पाहिजे. हक्कांचा उपभोग मिळेल अशी परिस्थिति कार्यकारी राज्यसत्तेनें निर्माण करावयाची असते. कार्यकारी सत्ता जर त्यांत अडचणी उत्पन्न करूं लागली, अगर हक्कांच्या उपभोगास विरोध करूं लागली तर नागरिकानें कोणाकडे दाद मागावी असा प्रश्न उपस्थित होतो. चौकशीशिवाय तुरुंगांत ठेवलें तर कोठें जावें, कवडी न देतां मिळकत राज्यसत्तेनें घेतली तर काय करावें, अल्पसंख्यांक म्हणून अन्याय झाला तर काय उपाय, हे प्रश्न प्रस्तुत आहेत. या दृष्टीनें या कलमांत उपाययोजना सांगितली आहे. सर्वश्रेष्ठ न्यायालयांत अगर स्थानिक न्यायालयांत जाऊन योग्य ती दाद मागण्याचा हक्क या कलमानें नागरिकांस दिला आहे. बेकायदेशीर अटक असेल तर न्यायालय कार्यकारी सत्तेला सदहू इसमास कोर्टापुढें हजर करण्याचा–उपस्थितीचा हुकुम देईल. बेकायदेशीर ताबा घेण्यांत येत असेल तर कोर्ट मनाई हुकुम देईल. तात्पर्य, जो अनुरूप हुकुम वाटेल तो कोर्ट देईल. हक्क अमलांत आणण्याचा उपाय नसेल, तर तो अर्थशून्य आहे. हक्क सार्थ असेल, तर त्याबाबत उपाय असलाच पाहिजे. या कलमांतील उपाययोजना अबाधित आहे. ती स्थगित करण्याबाबत घटनेंत कांहीं व्यवस्था असेल, तरच ती स्थगित होईल. अत्यंत आणीबाणीची परिस्थिति देशांत उत्पन्न झाल्यास ही व्यवस्था अगर हक्क स्थगित करणें योग्य ठरतें, व सर्वत्र अशीच स्थिति आहे.

**सैनिक व हक्क**

२६. या भागांत ज्या हक्कांची ग्वाही दिली आहे, ते हक्क, सैन्यांतील सैनिकाबाबतींत, अगर ज्यांच्यावर देशांत सुव्यवस्था ठेवण्याची जबाबदारी टाकण्यांत आली आहे, त्या सैन्यांतील सैनिकाबाबतींत कर्तव्यकर्में योग्य रीतीनें बजा-

विण्याच्या दृष्टीनें आणि शिस्तपालनाच्या दृष्टीनें, किती कमीजास्त करावेत अगर रद्द करावेत हें मध्यवर्ती विधिमंडळ कायदा करून ठरवील.

सर्वसामान्यपणें सर्व नागरिकांना मूलभूत हक्क उपभोगितां आले पाहिजेत. तथापि देशांतील संरक्षणाची व सुव्यवस्था ठेवण्याची जबाबदारी ज्यांच्यावर आहे, त्यांना ही व्यवस्था जशीच्या तशी लाभावी असें झालें, तर अनर्थ व अनवस्था उत्पन्न होईल. प्रत्येक इसमास रात्रीं आठ तास विश्रांति मिळाली पाहिजे असा दंडक झाला तर रात्रीं पाहारा कोण करणार? मग त्यांच्या बाबतींत नियमाला अपवाद असला पाहिजे. एकत्र येणें व भाषण-स्वातंत्र्याचा हक्क विनाबंधन चालविणें ही गोष्ट सैन्य व पोलिस यांच्या बाबतींत चालूं दिल्यास राज्याचा नाश होईल. परचक्र आलें असतां, सैनिकांनीं पगारवाढ केली तरच लढूं असा ठराव केला, अगर संपावर जाण्याचें ठरविलें, तर कठीण प्रसंग येईल. असली गोष्ट कोणतेंही सरकार चालूं देणार नाहीं. राज्याचें अगदीं प्राथमिक व सर्वश्रेष्ठ कर्तव्य म्हणजे संरक्षण व सुव्यवस्था होय व हें काम ज्यांच्यामार्फत व्हावयाचें, त्यांच्या बाबतींत सर्वसामान्य हक्क कमीजास्त प्रमाणांत मर्यादित होणें अपरिहार्य आहे. सर्वत्र सैनिक व पोलिस यासाठीं खास कायदा असून त्याप्रमाणें त्यांच्या हक्कांवर निर्बंध घातले जातात. ते नोकरींत आहेत तोंपर्यंतचें त्यांचें वर्तन खास कायद्यानें नियमित केलें जातें.

**हक्क व त्याबाबत कायदे**

२७. या घटनेंत अन्यत्र कांहींही असलें, तरी कोणत्याही घटकाच्या विधिमंडळाला—मग तो प्रांत असो अगर संस्थान असो—खालील बाबतींत कायदे करण्याची सत्ता नाहीं. मध्यवर्ती विधिमंडळालाच खालील बाबतींत कायदे करण्याची सत्ता राहील.

(१) या भागांत ज्या बाबींचा उल्लेख आहे त्या बाबतींत कायदा करून व्यवस्था करावयाची असेल व

(२) जीं कृत्यें या भागाखालीं गुन्हा म्हणून सांगितलीं असतील त्याबाबत शिक्षा ठरविणें;

आणि ही घटना अमलांत आल्यानंतर शक्य तितक्या लवकर मध्यवर्ती विधिमंडळानें अगर पार्लमेंटनें वरील बाबतींत कायदे करावेत व शिक्षेची व्यवस्था करावी.

मात्र हिंदुस्थानांत कोठेंही वर ( १ ) यांतील बाबतींत अगर या भागांत गुन्हा सांगितलें आहे अशा एकाद्या कृत्याच्या शिक्षेसंबंधीं विद्यमान कायद्यानें कांहीं व्यवस्था केली असेल, तर ती व्यवस्था पार्लमेंटनें अगर अन्य अधिकार असलेल्याकडून रद्द अगर तींत बदल अगर दुरुस्ती होईपर्यंत चालू राहील.

मूलभूत हक्क ठरविण्याचें कार्य मध्यवर्ती विधिमंडळाचें अगर पार्लमेंटचें आहे; म्हणून त्याबाबत कायदे करणें व शिक्षा निश्चित करणें हें कार्य घटकांच्या विधिमंडळांना करतां येणार नाहीं. ही बाब प्रांतिक स्वरूपाची नाहीं. मुख्य व मध्यवर्ती अशा स्वरूपाची ती आहे, म्हणून मध्यवर्ती सत्तेमार्फतच ही गोष्ट व्हावयास पाहिजे. घटना सुरू झाल्याबरोबर पार्लमेंट कायदे करील, पण तोंपर्यंत जर कांहीं विहित अशी विद्यमान व्यवस्था असेल, तर तिला बाध येणार नाहीं.

# भाग ४

# राज्याच्या धोरणाबाबत आदेश

व्याख्या

**२८. या भागांत* राज्य हा शब्द भाग ३ यांत ज्या अर्थानें वापरला आहे त्याच अर्थाचा समजावा.**

म्हणजे हिंदुस्थानांतील सर्व प्रांत व संस्थानें म्हणजे सर्व घटक यांचा समावेश यांत आहे. म्हणजेच यांत सांगितलेली व्यवस्था सर्व हिंदुस्थानला लागू होईल.

आदेश व अंमलबजावणी

**२९. या भागांत जे सिद्धांत आदेशरूपानें सांगितले आहेत, ते कायदे म्हणून न्यायालयामार्फत अंमलांत आणले जाणार नाहींत. परंतु हे आदेश या देशाच्या राज्यकारभाराच्या दृष्टीनें मूलभूत असून राज्यानें कायदे करतांना त्यांना धरून ते करावेत.**

आदेश म्हणजे आज्ञा नव्हेत. सर्वसामान्य सिद्धांत असें त्यांचें स्वरूप आहे. कायदा म्हणजे विधि व निषेध असें त्याचें द्विविध स्वरूप असतें. अमुक करावें व न केल्यास प्रायश्चित्त, अमुक करूं नये व केल्यास प्रायश्चित्त, हें कायद्याचें मुख्य लक्षण; म्हणजे कायद्यामार्फत राज्य आज्ञा करीत असतें व आज्ञापालन न केल्यास प्रायश्चित्त म्हणजे शिक्षा देतें व तो कार्यकारी सत्ता अमलांत आणते. आदेश म्हणजे मार्गदर्शन करणारे सिद्धांत. सर्व स्त्रीपुरुषांना योग्य रीतीनें जीवन जगण्याइतकें मिळण्याचा हक्क आहे, हा सिद्धांत झाला. सामाजिक व्यवहार याला धरून असावेत. मग हें घडवून आणण्यासाठीं कायदा करणें भाग आहे. कारण नुसता सिद्धांत कोणी मालक मानणार नाहीं. त्यासाठीं किमान वेतनाचा कायदा करून किमान वेतन व्यवसायविषयक अगर प्रादेशिक ठरविण्याची व्यवस्था केली पाहिजे व तें मजुरांना अगर काम करणारांना मालकानें न दिल्यास त्याला दंड अगर शिक्षा व्हावयाची, असें जेव्हां होईल, तेव्हांच तो तसें वेतन देईल. तात्पर्य, राज्याचे आदर्श अगर

हेतु हे सामान्य सिद्धांतांतच सांगून त्याचे आदेश दिले जातात व त्या आदेशांना अनुसरून कायदे करून आदर्श हे अमलांत आणावयाचे असतात, हेतु सफल करावयाचे असतात. आदेशांचें हें असें स्वरूप असल्यामुळें त्यांत समाविष्ट झालेले हक्क न्यायालयांमार्फत अमलांत येण्यासारखे नसतात (Non-Justiciable). न्याय अगर अन्याय हा कायद्यानें निश्चित होतो, म्हणजे कोर्ट त्याची दखल घेतें. नीति ही मार्गदर्शक होय, चांगलें अगर वाईट काय हें ठरवितें. तिला धरून कायदा असावा. पण तो होईपर्यंत केवळ नीतितत्त्वाचा स्वीकार करून कोर्ट कांहींही हुकुम देणार नाहीं हें उघड आहे.

**लोकांच्या सुखासाठीं समाजव्यवस्था व राज्याचें कर्तव्य**

**३०. ज्या व्यवस्थेंत सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय राष्ट्रांतील सर्व संस्थांतून व्यापून राहील, अशी समाजव्यवस्था घडवून आणून व तिचें परिणामकारक संरक्षण करून राज्य जनतेच्या सुखासाठीं झटण्याचा प्रयत्न करील.**

राज्य हें निरनिराळ्या संस्थामार्फत कार्य करतें. कायदे, कायदे मंडळामार्फत करते. न्यायदान न्यायालयामार्फत, अंमलबजावणी कार्यकारी सत्तेमार्फत करते. या राज्याच्या अंमलाखालील संस्था झाल्या. याशिवाय राज्यांत नाना तऱ्हेच्या संस्था असतात कीं, ज्यांमार्फत लोकव्यवहार चालत असतो. या संस्था समाजाच्या जीवनकार्यात मोठा भाग घेत असतात. त्यांचें स्वरूप आर्थिक असेल, धार्मिक असेल, राजकीय असेल. या संस्थांमार्फत विचारकार्य तसेंच प्रचारकार्यही होतें. जीवनावर त्यांची छाप पडते. समाजव्यवस्थेंत त्यांना स्थान प्राप्त झालेलें असतें. म्हणून समाजव्यवस्थेंत सर्वत्र न्याय राहावा या दृष्टीनें सर्व सरकारी व खाजगी संस्थांतून तसें वातावरण उत्पन्न झालें पाहिजे. ज्या व्यवस्थेंत कलमांत उल्लेखिलेला न्याय राहील, अशी समाजव्यवस्था घडवून आणावयाचा प्रयत्न राज्यानें केला पाहिजे. न्यायावर आधारलेल्या समाजव्यवस्थेनेंच जनतेला सुख मिळणार हें उघड आहे. विषमता हें दुःखाचें कारण असतें. उलट समता हें सुखवर्धन करणारें ठरतें. म्हणून या दृष्टीनें समाजांत समतेचें व न्यायाचें वातावरण उत्पन्न होईल असें राज्यानें करावयास पाहिजे. हा आदेश आहे. अनुरूप कायदे, कर व तसेंच वेतन, वारसा व दान, लग्न व शिक्षण, मतदान व उमेदवारी वगैरे बाबत कायदे करून सर्व क्षेत्रांत सर्वांना न्याय मिळेल असें वातावरण उत्पन्न केल्यास इष्ट अशी समाजव्यवस्था निर्माण होईल.

३१. विशेषतः खालील गोष्टी घडून याव्यात या दृष्टीनें राज्य आपलें धोरण ठेवील.

**धोरणविषयक कांहीं सिद्धांत**

( १ ) जीवनाला पुरेसें मिळण्याचा सर्व नागरिकांना— स्त्री-पुरुष दोघांनाही सारखा हक्क असणें.

( २ ) समाजांतील भौतिक साधनांची मालकी व नियंत्रण अशा रीतीनें विभागलें जाईल कीं, त्यापासून समाजाचें ज्यास्तींत ज्यास्त कल्याण व्हावें.

( ३ ) आर्थिक व्यवस्था अशी राहील कीं, संपत्ति व उत्पादनाची साधनें यांचें केंद्रीकरण झाल्यामुळें घडणारें सामाजिक अनहित होणार नाहीं.

( ४ ) स्त्री व पुरुष दोघांनाही सारख्या कामाबद्दल सारखें वेतन मिळेल.

( ५ ) स्त्री व पुरुष कामगार, तसेंच लहान वयाचीं मुलें यांचा ताकद व स्वास्थ्य यांबाबत दुरुपयोग होणार नाहीं व तसेंच आर्थिक परिस्थितीमुळें वय व ताकद या दृष्टीनें अयोग्य असणाऱ्या व्यवसायांत काम करणें कोणालाही भाग पडणार नाहीं.

( ६ ) बालकें व तरुण यांचे श्रम लुबाडले जाणार नाहींत व नैतिक व ऐहिक दृष्ट्या त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें जाणार नाहीं.

मनुष्य जन्माला येतो त्या वेळीं कोणी त्याला विचारीत नाहीं. जन्म घेणें ही बाब मतावर अवलंबून नाहीं. तथापि तो जन्मल्यानंतर जन्मापासून मृत्यूपर्यंत त्याची व्यवस्था करणें हें समाजाचें म्हणजे राज्याचें काम आहे. त्या जन्मलेल्या व्यक्तीचा पहिला हक्क जगण्याचा आहे आणि जगणें म्हणजे कावळ्याप्रमाणें पिंड खाऊन जगणें नव्हे. ज्यानें त्यानें श्रमावें व जगावें, त्याच्या कर्तृत्वास पूर्ण मोकळीक आहे, हा सिद्धांत भांडवलशाही विचारप्रणालीचा आहे. पण तशी मोकळीक मात्र तेथें नसते. मनुष्य श्रम करण्यास तयार असून त्यास काम मिळत नाहीं. मिळाल्यास प्राप्ति कमी असते. शिवाय काम राहील याची शाश्वति नाहीं. आधुनिक राज्य

म्हणजे केवळ पहारेकरी स्वरूपाचें नाहीं. संरक्षणाबरोबर त्यानें प्रजेचें पालन केलें पाहिजे. आक्रमणाच्या बाबतींतील संरक्षणाबरोबर भुकेपासूनही नागरिकांचें संरक्षण केलें पाहिजे. म्हणजेच जीवनाला पुरेसें मिळालें पाहिजे. पुरेसें म्हणजे केवळ तुरुंगांत मिळतें एवढें अन्न, अगर तेवढा कपडा अगर तेवढी जागा असें नव्हे. अन्नवस्त्र व निवास या प्राथमिक गरजा योग्य रीतीनें भागवतां येऊन कांहीं अधिक असलें पाहिजे. या अधिकांतून व्यक्तीला विकास करण्याची, कांहीं आनंद उपलब्ध करून घेण्याची शक्यता असली पाहिजे. म्हणजे इतकी निदान प्राप्ति व्यक्तीला मिळाली पाहिजे कीं, त्यांतून हें सर्व त्यास करतां येईल. व या बाबतींत स्त्री व पुरुष यांना समान न्याय असला पाहिजे.

सर्वांना पुरेसें मिळावयाचें म्हणजे आज ज्यांना अधिक मिळतें त्यांचें कमी होईल व कमी मिळत आहे त्यांना अधिक मिळून एक समपातळी उत्पन्न होईल. यासाठीं समाजांतील भौतिक साधनें व संपत्ति आज ज्यांच्याकडे आहे, अगर ज्यांच्या नियंत्रणाखालीं आहे, अगर जशी त्यांची आज वांटणी होत आहे, ती सर्व व्यवस्था बदलली पाहिजे. त्याशिवाय सर्वांना पुरेसें मिळणें अशक्य आहे. व्यक्तीची मालकी व नियंत्रण व्यक्तीला नफा मिळावा या दृष्टीनें कार्य करतात. म्हणून मालकी व नियंत्रण व्यक्तीच्या सुखापेक्षां सामाजिक सुख अधिकाधिक निर्माण करतील अशा स्वरूपाचीं असलीं पाहिजेत, म्हणजे मालकी व नियंत्रण हीं सामाजिक असलीं पाहिजेत, राज्याच्या अधिकारांत हीं दोन्हीं आलीं पाहिजेत.

तसेंच एकंदर आर्थिक व्यवहारही मग असा असला पाहिजे कीं, संपत्ति अगर ती उत्पादन करण्याचीं साधनें थोडया व्यक्तींच्या हातांत केंद्रित होणार नाहींत. संपत्तीचें व्यक्तींच्या हातांत केंद्रीकरण म्हणजे समाजांतील बहुसंख्यांक नागरिकांचें मरण, हें अनुभवसिद्ध आहे. ज्यांच्या हातांत संपत्ति, त्यांच्या हातांत सत्ता व सुखनिर्मिति हें उघडच आहे. पण सामाजिक दृष्टया हें अनहितकारक व अयोग्य आहे. म्हणून केंद्रीकरण अशक्य अगर मर्यादित केलें पाहिजे. तें करावयाचें म्हणजे वाढत्या प्रमाण-पद्धतीनें उत्पन्नावर, संपत्तीवर कर बसवावयाचे. जशी अधिक प्राप्ति, तसें कराचें मान अधिक. शेवटीं तर मर्यादेपलीकडे प्राप्ति झाल्यास ती मर्यादेपलीकडील सर्वच प्राप्ति राज्य घेईल. तसेंच वारसा कर. मनुष्य मेला म्हणजे त्याची संपत्ति फुकटांत त्याच्या वारसांना मिळते. वास्तविक सामाजिक परिस्थितीमुळें समाजांतील कायदा व संस्था यांयोगें ती मिळकत त्यानें मिळविलेली असते. या मिळविण्यांत समाज भागीदार असतो. हयातींत समाज आपला हिस्सा कररूपानें घेतो. मृत्यूनंतरही त्याला त्याचा

हिस्सा मिळाला पाहिजे. याही बाबतींत वाढत्या प्रमाणावर वारसा कर बसवून संपत्तीचें केंद्रीकरण बंद केलें पाहिजे. विशिष्ट मर्यादेपलीकडील सर्व संपत्ति राज्याला मिळाली पाहिजे. त्या मर्यादेच्या आंतील जी असेल, त्यावर योग्य वारसा कर बसविला पाहिजे. या रीतीनें करपद्धत अमलांत आणून केंद्रीकरण बंद करणें हें काम राज्याचें आहे; तसें झालें तरच राज्याचे हेतु सफल होतील.

स्त्री व पुरुष यांना सारख्या कामाबद्दल सारखें वेतन मिळालें पाहिजे. ही योजना कायदे करून वेतनबोर्डें नेमून करावयाची असते. सारखें काम याची व्याख्या केली पाहिजे. कारागिरी मोजावयाची योजना असली पाहिजे. हें तत्त्व अमलांत आणण्यांत फार अडचणी येतात. तथापि अन्य देशांतील अनुभव लक्षांत घेऊन निदान आजची डोळ्यांत भरणारी म्हणून डोळ्यांत सलणारी विषमता मोठ्या प्रमाणावर दूर करतां येईल.

कुणाचेही श्रम घेतांना त्याची ताकद व स्वास्थ्य बिघडतां कामा नये, कुणाच्याही श्रमांचा गैरफायदा घेतला जाऊं नये अगर नाइलाज म्हणून वयाला अयोग्य असणारा अगर ताकदीला न झेपणारा धंदा करणें कोणालाही भाग पडूं नये. याचा अर्थ वय व ताकद पाहून सर्वांना रोजगार मिळाला पाहिजे. म्हणजे रोजगार मिळवून देण्याची जबाबदारी राज्यावर येते व ती पार पाडावयाची, तर सर्व उत्पादनावर राज्याचा अधिकार असला पाहिजे. खाजगी मालकी व सर्वांना रोजगार हें अशक्य होय, असा अनुभव आहे. खाजगी मालकी व बेकारी ही परंपरा आहे. ही मोडावयाची आहे. ती मोडल्याशिवाय राज्याला आपले हेतु, आपले आदर्श सफल करतां येणार नाहींत.

सर्वांना योग्य रोजगार मिळाला पाहिजे. त्याचप्रमाणें बालकें व तरुण यांचे श्रम पण अयोग्य रीतीनें राज्यानें सुद्धां घेऊं नयेत, म्हणून कांहीं व्यवसायांत बालक, अगर विशिष्ट वयापर्यंत कोणालाही काम करण्यास बंदी ठेवली आहे. तसेंच कामगारांची शारीरिक तपासणी करूनच त्यांना अनुरूप तें काम देण्याची व्यवस्था असली पाहिजे.

या कलमांत जे आदेश सांगितले आहेत, त्या तऱ्हेचे कायदे करून अगर त्यांना धरून कायदे करून राज्यानें आपले हेतु सफल करावयाचे आहेत. या कलमांत सांगितलेले सिद्धांत सर्वमान्य आहेत. त्यांचा संपूर्ण अर्थ स्पष्ट करून घेतला म्हणजे असें आढळून येईल कीं, जगांतील कुठल्याही प्रागतिक राष्ट्रापेक्षां कांहीं

कमी असें या व्यवस्थेंत नाहीं. साम्यवादी अगर समाजसत्तावादी विचारसरणींतील मुख्य व महत्त्वाचीं तत्त्वें येथें ग्रथित केलीं आहेत.

**शिक्षण, रोजगार व मदत मिळण्याचा हक्क**

**३२. आर्थिक ताकद व वाढ लक्षांत घेऊन राज्यानें रोजगार, शिक्षण, बेकारी, वार्धक्य, आजारीपण, पंगुत्व आणि स्वतःची चूक नसतां प्राप्त झालेली हलाखीची परिस्थिति, यांबाबत मदत मिळण्याचा हक्क अमलांत आणण्याची जरूर ती व्यवस्था केली पाहिजे.**

प्रत्येक इसमास रोजगार, शिक्षण, काम न मिळाल्यास बेकारी भत्ता, तसेंच म्हातारपणीं, आजारीपणांत अपंगत्व प्राप्त झालें तर व स्वतःची चूक नसतां हलाखी प्राप्त झाली तर सरकारकडून मदत मिळण्याचा हक्क आहे. रोजगार पाहिजे, नाहीं तर जगावयाचें कसें ? मागील कलमांत याबाबत विचार आलाच आहे. प्रत्येक नागरिक जर राज्याचा स्वामी, तर तो अशिक्षित असतां कामा नये. त्याला योग्य शिक्षण राज्यानें दिलें पाहिजे. काम करण्यास तयार, पण रोजगार नाहीं, या स्थितींत भत्ता मिळाला पाहिजे. बेकारी ही समाजरचनेनें उत्पन्न होते. त्यांत व्यक्तीचा दोष नाहीं. म्हणून जी आपत्ति आर्थिक रचनेनें आली, ती निवारण्याचें कार्य राज्याचें आहे. तसेंच तरुणपणीं जर नागरिकानें देशाचें काम केलें, तर म्हातारपणीं त्याला पेन्शन अगर अन्य मदत मिळून नीट जगतां आलें पाहिजे. आजारीपणांत प्राप्ति बंद व खर्च वाढतो. या वेळीं वैद्यकीय व पैशाची पण मदत प्रत्येक व्यक्तीला मिळाली पाहिजे. तसेंच हात मोडला अगर अन्य रीतीनें पंगुपण आलें, तर समाजानें त्यास मदत करून पोसलें पाहिजे. माणसें म्हणजे यंत्रें नव्हत, कीं निरुपयोगीं झालीं कीं फेकून दिलीं. यंत्रावर खर्च करण्यांत येतो, तर माणसांवर कां नको ? तात्पर्य, नागरिकांस योग्य रीतीनें जीवन जगण्यास आवश्यक तेवढी मदत मिळाली पाहिजे व राज्यानें त्या दृष्टीनें कायदे करून समाजांतील उत्पादन व विभागणी यांची अनुरूप व्यवस्था ठरवून हें घडवून आणलें पाहिजे. सरळ मदत देऊन, अगर पेन्शन देऊन अगर विमायोजना करून या गोष्टी करण्यांत येतात. कसें करावें, हें परिस्थितीवर अवलंबून राहील. मर्यादा फक्त देशाची आर्थिक स्थिति व तिची वाढ या दृष्टीनेंच फक्त राहावी.

**कामाच्या शर्ती**

**३३. कारखान्यांतून व कचेऱ्यांतून कामाच्या शर्ती न्याय्य व माणुसकीला धरून अशा असतील व स्त्रियांना प्रसूतीच्या कालांत मदत देण्याची व्यवस्था असेल.**

कामाचे तास, तसेंच आठवड्यांत किती तास काम व किती दिवस विश्रांति, हें सर्व योग्य व न्याय्य असें ठेवण्यांत यावें, ही मागणी येथें मान्य केलेली असून त्याप्रमाणें कायद्यानें याचें नियमन होईल. सवेतन विश्रांति म्हणजे बिनपगारी रजा नव्हे, तर विश्रांति मिळून त्या कामांत पूर्ण अगर अंशतः वेतन मिळेल. विश्रांति ही कार्यक्षमतेसाठीं जरूर आहे. श्रम व विश्रांति हीं समतोल पाहिजेत म्हणजे मनाला हुरूप येतो व काम अधिक चांगलें होतें. तसेंच कारखान्यांची व कचेऱ्यांची रचना या बाबतींत योग्य दक्षता घेतली जाईल. हवा, उजेड यांबाबतची सोय, जेवणाची जागा, वेळ व कामगारांसाठीं कामाच्या जागेवर उपाहारगृह याही गोष्टी यांत येतात. तसेंच गर्भार स्त्रियांना प्रसूतीपूर्वी सवेतन रजा व प्रसूतीनंतर कांहीं काळ तशीच रजा व प्रसूतीची सोय या बाबतींत योग्य व्यवस्था राज्यानें करावयाची आहे. तान्ह्या मुलांची व्यवस्था त्यांच्या माता कामावर असतांना करणें जरूर असतें, याही गोष्टीचा समावेश यांत आहे.

**कामगार व जीवनवेतन**

**३४. राज्य योग्य कायदे करून अगर अनुरूप आर्थिक संघटन निर्माण करून अगर अन्य रीतीनें, औद्योगिक अगर अन्य अशा सर्व कामगारांना काम व जीवनवेतन मिळण्याची सोय, तसेंच ज्यायोगें त्यांना योग्य राहणीचें मान, विश्रांतीचा पूर्ण उपभोग, सामाजिक व सांस्कृतिक बाबतींतील संधींचा उपयोग करण्याची सोय हीं सर्व मिळूं शकतील अशी परिस्थिति उपलब्ध करून देईल.**

जीवनवेतनाबाबत कायदा करून अगर उत्पादनव्यवस्था अनुरूप करून कामगारांना जीवनवेतन मिळेल हें पाहणें राज्याचें काम होय. जीवनवेतन प्रादेशिक दृष्ट्या ठरलें जाणें जरूर असतें. त्या दृष्टीनें जीवनवेतन ठरविणारीं बोर्डें अगर अन्य संघटनें राहतील. सहकारी तत्त्वावर उत्पादन करून प्राप्तीवर पहिला बोजा म्हणजे कामगारांना योग्य वेतन देणें हें करतां येईल. हें कसें घडवून आणावयाचें हें परिस्थितीवर अवलंबून राहील; पण जीवनवेतन मिळेल याची हमी राज्यानें घेतली आहे. हें जीवनवेतन सर्व कामगारांना मिळेल. हातानें म्हणजे शारीरिक श्रम करणारे, तसेंच मानसिक श्रम करणारे अशा सर्वांना मिळेल. कामगार व कारकून या दोहोंचाही समावेश यांत आहे. सामान्यपणें हलाखी नाहीं, पण चैनही नाहीं, अशा रीतीनें जगण्यास जें आवश्यक लागेल तें प्रत्येकास मिळालें पाहिजे. म्हणजे तेवढें वेतन त्यास मिळालें पाहिजे. हें जीवनमान सर्वांना एकसारखें असें असणार नाहीं. जीवनवेतन

म्हणजे जगण्यास सामान्यपणें जितकें जरूर लागेल तेवढें वेतन, योग्य राहणीचें मान राहील एवढें वेतन म्हणजे त्यांत कांहीं अधिक गोष्टींचा समावेश होतो. या अधिक गोष्टी सर्वांच्या बाबतींत त्याच अगर सारख्या राहणार नाहींत. योग्य या कल्पनेंत व्यक्तिगत व्यवसायाच्या कल्पनेचा समावेश होतो. कामगारांचें योग्य जीवनमान हें एक असेल, मुकादमाचें निराळें असेल, कारकुनाचें निराळें व मॅनेजराचें निराळें. हे फरक ध्यानांत घेऊन योग्य राहणीचें मान ठरविलें पाहिजे हें उघड आहे. हेंही ठरविण्याचें काम राज्यानें करावयाचें आहे. कामगाराला जी विश्रांति मिळेल, तिचा उपभोग तेव्हांच त्याला घेतां येईल कीं, ज्या वेळीं त्याच्या मनांत विवंचना असणार नाहीं. म्हणजे त्याला सवेतन विश्रांति मिळाली पाहिजे. तसेंच त्याला अधिक शिक्षण घेऊन आपली लायकी वाढविण्यास संधि असावी. मनोरंजन व ज्ञानसाधनें त्याला उपलब्ध असावींत, क्लब अगर संघ संमेलनें वगैरे सामाजिक बाबतींत त्याला स्थापतां येऊन जीवनांत आनंद व सुख मिळेल अशी परिस्थिति निर्माण व्हावी. तात्पर्य, मरमर श्रम करावे, यंत्राप्रमाणें जीवन जगावें, विवंचना व काळजी यांच्या तडाख्यांतच जगावें, हें यापुढें अशक्य करावयाचें तर सरकारनें पुढाकार घेऊन तें केलें पाहिजे. हें कार्य राज्याचें आहे. हें या कलमांत सांगितलें असून तें कायदे करून अगर आर्थिक व्यवस्था अगर संघटन करून अथवा अन्य रीतीनें घडवून आणण्यासाठीं राज्य प्रयत्न करील अशी ग्वाही येथें आहे.

## ३५. अखिल हिंदुस्थानभर एकच मुलकी कायदा राहील अशी व्यवस्था करण्याचा राज्य प्रयत्न करील.

**मुलकी कायदा सर्वांना सारखा**

प्रांत अगर घटकपरत्वें कायदा बदलूं लागला तर कठीण अवस्था उत्पन्न होईल. कायदा तफावत करणारा व अनिश्चित असूं नये. तसें झालें म्हणजे, लोक-व्यवहार व व्यापार यांत अडथळा उत्पन्न होतो. कायद्याचें मुख्य लक्षण म्हणजे त्यांतील निश्चितपणा, सारखेपणा. स्थानिक महात्म्यानें कांहीं नाममात्र बदल होणें शक्य असतें. पण सामान्यपणें सर्व देशभर एकसारखा कायदा असावा. एक देश तर त्या देशांत एक कायदा. म्हणजे स्थानपरत्वें अगर व्यक्तिपरत्वें त्यांत फरक असूं नये हें इष्ट आहे. मुलकी कामकाज चालविण्याचा कायदा प्रांतागणिक निराळा असेल तर दाद मागणारांना अडचणी उत्पन्न होतात. नागरिकाला कळलें पाहिजे कीं, दाद कोठें मागावयाची आणि या बाबतींत सर्व देशभर एकसारखेपणा असेल तर ती उत्तम सोय समजली पाहिजे. सर्वांना कायदा सारखा, सर्वत्र सारखा ही अत्यंत इष्ट

अशी परिस्थिति असते. ही घडवून आणण्याचा प्रयत्न राज्य करील. तसें त्याचें धोरण आहे हें येथें स्पष्ट केलें आहे.

**३६. प्रत्येक नागरिकाला प्राथमिक शिक्षण मोफत मिळण्याचा हक्क आहे, आणि घटना अंमलांत आल्यापासून १० वर्षांच्या आंत, मूल १४ वर्षांचे होईपर्यंत त्यास मोफत व सक्तीचें शिक्षण देण्याची व्यवस्था करण्याचा प्रयत्न राज्य करील.**

**प्राथमिक शिक्षण मोफत**

जीवनवेतन मिळण्याचा हक्क तसाच किमान शिक्षणाचाही हक्क प्रत्येक नागरिकाला मिळाला पाहिजे. आजच्या स्थितींत प्राथमिक शिक्षण त्याला फुकट मिळेल. पण तें मोफत मिळतें एवढ्यानें सर्व मुलें शाळेंत जातात असें होत नाहीं. तें सक्तीचें झालें पाहिजे. म्हणजे विशिष्ट वयोमर्यादेपर्यंत मुलांना शाळेंत धाडण्याची सक्ति पालकांवर असली पाहिजे व त्या दृष्टीनें कायदे व्हावेत. आजच सक्तीचें शिक्षण सर्वत्र केलें तर तें घडवून आणण्यांत अनेक अडचणी आहेत. शिक्षक, उपकरणें, हीं पुरेशीं नसतील. पण १० वर्षांत ही सर्व व्यवस्था राज्यानें करावयाची असून नुसतें प्राथमिक शिक्षणच नव्हे, तर मूल १४ वर्षांचें वय पुरें करीपर्यंत शिक्षण घेत राहील अशी व्यवस्था झाली पाहिजे. हें शिक्षण मोफत व सक्तीचें राहील. किमान शिक्षण हें इतकें असलेंच पाहिजे. अज्ञान हा लोकशाहीचा महान् शत्रु आहे. राजकारणाचे प्रश्न काय हें समजण्याची पात्रता नागरिकांत असली पाहिजे. यासाठीं किमान शिक्षण मिळणें अवश्य आहे. तें मिळालें म्हणजे नागरिक त्याच्या साहाय्यानें अधिक शिक्षण घेऊं शकतो. वाचनानें तो आपल्या ज्ञानांत भर घालील. विवेकी, ज्ञानी, विचारवंत नागरिक ही महान् शक्ति आहे. असे जास्तींत जास्त नागरिक राज्यांत असल्यानें राज्याला स्थैर्य व प्रतिष्ठा लाभून तें प्रगतिपर बनतें. लोकशाहींत नागरिकांवर सर्वांत अधिक जबाबदारी असते. ते राज्याचे मालक म्हणून राज्यकारभार करण्यासाठीं योग्य माणसांची निवड त्यांना ठराविक वेळां म्हणजे निवडणुकीचे वेळीं करावी लागते. कोणता पक्ष चांगला, कोणता कार्यक्रम श्रेष्ठ, हें समजण्यासाठीं नागरिक राजकीय दृष्ट्या अधिक जाणता व जागृत पाहिजे. हें शिक्षणानेंच साध्य आहे. म्हणून राज्याच्या स्थैर्यासाठीं व प्रगतीसाठीं शिक्षण सर्वत्र मिळालें पाहिजे. हें कर्तव्य राज्याचें आहे असें या कलमांत स्पष्ट आहे.

मागसलेल्या वर्गांचें शिक्षण

३७. जनतेंतील कमताकद वर्गांच्या बाबत, आणि विशेषतः अस्पृश्य मानलेला वर्ग, (scheduled castes) रानटी जाती (scheduled tribes) यांचे आर्थिक व शिक्षणविषयक हितसंबंध संरक्षण करण्याच्या कामीं राज्य खास काळजी घेईल व सामाजिक अन्याय व अन्य सर्व लुबाडणुकीच्या प्रकारांपासून त्यांचें संरक्षण करील.

जे अस्पृश्य म्हणून समजले जातात व जे जंगलांत राहतात, अशा वर्गातील लोक शिक्षणानें व आर्थिक दृष्टीनें मागासलेले आहेत. त्यांच्या बाबतींत सरकारनें अधिक काळजी घ्यावी हें न्याय्य आहे. यापुढें अस्पृश्यता मानणें हा गुन्हा आहे. तथापि 'परिशिष्टांत घातलेले वर्ग' असे आज त्यांना कायद्यानें संबोधिलें आहे. तसेंच जंगली जातींनाही आजच्या स्थितींत अधिक सवलती देणें इष्ट आहे. म्हणून त्यांनाही 'परिशिष्टांत घातलेले वर्ग' म्हणून संबोधून त्यांच्या बाबतींत अधिक काळजी घ्यावी, असें सांगितलें आहे. आज कित्येक ठिकाणीं त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांना लुबाडण्यांत येतें. त्याचे श्रम जवळ जवळ फुकटांत घेतले जातात. या सर्व पिळवणुकीपासून त्यांचें संरक्षण झालें पाहिजे. अधू मुलाबद्दल जसे आईबाप अधिक दक्षता घेतात, त्याची अधिक काळजी करतात, त्यावर त्यांचें अधिक प्रेम असतें, त्याचप्रमाणें या जाती अगर वर्ग आहेत, म्हणून राज्यानें त्यांच्याबाबत अधिक काळजी घ्यावी. त्यांना शिष्यवृत्या द्याव्यात, धंद्यासाठीं अगर शेतीसाठीं भांडवल द्यावें व त्यांना आर्थिक दास्यांतून मुक्त करण्याचे प्रयत्न करून शक्य तितक्या लवकर या मागासलेल्या जातींना व वर्गांना इतरांबरोबर सामाजिक व आर्थिक दृष्ट्या आणावें हा या कलमाचा हेतु आहे.

राज्य व आहार, जीवनमान, स्वास्थ्य यांबाबतचें कर्तव्य

३८. सार्वजनिक स्वास्थ्य सुधारणें, राहणीचें मान वाढविणें व आहार अधिक पौष्टिक करणें या गोष्टींचा राज्याच्या प्राथमिक कर्तव्यांत समावेश आहे, असें राज्य मानील.

राज्याचीं प्राथमिक कर्तव्यें, संरक्षण, सुव्यवस्था वगैरे जीं सांगितलीं आहेत, त्यामध्यें वरील गोष्टींचा समावेश या कलमानें करण्यांत आला आहे. आज क्षय वगैरे रोग व सांथींचे रोग, यांनीं लक्षावधि लोक या देशांत मरतात. देशांत वैद्य व दवाखाने यांचें प्रमाण आज कितीतरी कमी आहे. पाण्याचा पुरवठा,

स्वच्छ घरें, मलेरियादिक गोष्टींचा प्रतिबंध करणें या सर्व गोष्टी महत्त्वाच्या आहेत. या दृष्टीनें त्यांचें महत्त्व ओळखून राज्यानें व्यवस्था केली पाहिजे. वैद्यकीय व्यवस्था, योग्य पाणीपुरवठा, सांथींपासून बचाव या स्वास्थ्यविषयक बाबींबाबत विशेष लक्ष दिलें पाहिजे. तसेंच आज जी राहणी आहे, ती इतकी हीन आहे, कीं तिला तोड नाहीं. अन्न पुरेसें व चांगलें मिळत नाहीं, कपडा योग्य तितका मिळत नाहीं, निवासाबाबत सुद्धां वाईट परिस्थिति आहे, इतर गोष्टींतही तीच अवस्था आहे. म्हणून राहणी सुधारणें हें कर्तव्य ठरवून त्याची जबाबदारी राज्यावर टाकली आहे. केवळ व्यक्ति स्वतःच्या प्रयत्नानें कितीसें करूं शकेल? राहणी सुधारावयाची म्हणजे राष्ट्रांतील एकंदर उत्पादन वाढलें पाहिजे, रोजगार वाढला पाहिजे, मुबलक पदार्थ निर्माण झाले पाहिजेत व ते विकत घेण्याची क्रयशक्ति, योग्य वेतन देऊन, अगर योग्य प्राप्ति मिळेल अशी व्यवस्था करून नागरिकांना उपलब्ध झाली पाहिजे. ही गोष्ट प्राथमिक कर्तव्य ठरली, म्हणजे त्याकडे राज्य प्रथम लक्ष देईल. परचक्र आलें म्हणजे खर्चाचा विचार न करतां राज्य वागतें, तसेंच याही क्षेत्रांत व्हावयास पाहिजे. जीवनमान सुधारावयाचें म्हणजे उत्पादनक्षेत्र नियंत्रणाखालीं येणें आवश्यक आहे; म्हणून तेंही केलें पाहिजे.

जनतेला योग्य आहार आज मिळत नाहीं. पौष्टिक अन्न तर दुर्मिळ होत आहे. याही बाबतींत, शेती व अन्य रीतीनें उत्पन्न होणारे खाद्यपदार्थ, तसेंच पशूपालन व संवर्धन यांकडे लक्ष देणें जरूर आहे. आहार अधिक चांगला करणें हें प्राथमिक कर्तव्य ठरलें म्हणजे त्याकडे प्रथम लक्ष दिलें जाईल. या कलमांतील व्यवस्था या दृष्टीनें केली आहे.

**राष्ट्रीय महत्त्वाच्या स्मारकांचें संरक्षण**

**४९. कलेच्या दृष्टीनें अथवा ऐतिहासिक दृष्टीनें महत्त्व असलेलें जें स्मारक अगर जी वस्तु पार्लमेंट कायदा करून राष्ट्रीय महत्त्वाची ठरवील त्या सर्वांचें, नाश, मोडतोड, विकृति, वासलात अगर निर्यात यांपासून संरक्षण करून त्याबाबत केलेल्या कायद्याप्रमाणें तीं स्मारकें, स्थळें अथवा वस्तु जतन करण्याची व जोपासण्याची जबाबदारी राज्याची राहील.**

महत्त्वाचीं सर्व स्थळें, स्मारकें, शिल्पविषयक वस्तु त्यांतील कलासौंदर्य अगर ऐतिहासिक स्मृति यांमुळें देशाच्या जीवनांत एक महत्त्वाचें स्थान व्यापतात; त्यांचें संरक्षण करणें व त्यांची योग्य रीतीनें निगा राखणें हें कार्य राज्याचें आहे. ताजमहाल, सोमनाथ मंदिर अगर पुण्यपुरुषांची समाधि, ज्यांचा संबंध इतिहास-प्रसिद्ध पुण्यपुरुषाशीं आला असेल, अशा प्राचीन वस्तु या सर्वांचें संरक्षण केलें

पाहिजे. त्या नाश पावणार नाहींत अगर विकल्या जाऊन परदेशीं जाणार नाहींत अशी व्यवस्था केली पाहिजे. अनेक प्राचीन दुर्मिळ हस्तलिखितें व महत्त्वाच्या वस्तु परदेशांतील लोक या देशांत येऊन विकत घेऊन जातात. राज्यानें कायदा करून हें बंद केलें पाहिजे. पुराणवस्तुसंरक्षणाचें एक खातें असतें. त्या खात्यामार्फत ही व्यवस्था घडते. जुन्या ऐतिहासिक वास्तु योग्य स्थितींत ठेवल्या पाहिजेत. किंबहुना त्यांवर जर व्यक्तीची मालकी असेल, तर ती काढून राज्यानें ती आपली करावी व ती वस्तु आपल्या ताब्यांत घ्यावी. हीं सर्व स्थानें व वस्तु स्फूर्ति देणारीं, ऐतिहासिक अभिमान जागृत करणारीं असतात. यांत देशाचा अभिमान, पराक्रम व प्रतिष्ठा सांठवलेली असते, म्हणून त्यांबाबत जबाबदारी राज्याचीच असली पाहिजे.

**आंतरराष्ट्रीय शांतता व निर्भयता**

**४०. योग्य, उघड व सन्माननीय स्नेहसंबंध राष्ट्राराष्ट्रांत असावेत या तत्त्वाचा स्वीकार करून, आंतरराष्ट्रीय कायद्यांतील संकेतानुसार सर्व सरकारें प्रत्यक्ष आचरणांत वागतील ही गोष्ट प्रभावी व प्रस्थापित झाली आहे असें मानून, त्याचप्रमाणें संघटित झालेल्या निरनिराळ्या लोकांमध्यें जे तहनामे झाले असतील, त्यांत नमूद केलेल्या जबाबदाऱ्या न्यायानें व आदरानें पाळून राज्यानें आंतरराष्ट्रीय शांतता व निर्भयता वाढवावी.**

राष्ट्राराष्ट्रांतील सरकारी व्यवहार हा उघड, रास्त व सन्माननीय असा राहील. गुप्तता अगर गुप्त संघटना असें असणार नाहीं, अन्याय अगर अपमान हे त्यांत असणार नाहींत, अशा पद्धतीनें राज्याचें कार्य चालेल. तसेंच जे संकेत आंतरराष्ट्रीय कायद्यांत आहेत ते आचरणांत आणून त्याप्रमाणें वागण्याची प्रथा सर्व राष्ट्रांच्या बाबतींत प्रस्थापित झाली आहे असें समजून राज्याची वागणूक होईल; म्हणजे आंतरराष्ट्रीय कायद्याप्रमाणें वागण्याची जबाबदारी स्वीकारली जाईल. त्याचप्रमाणें संघटित लोकांमध्यें म्हणजे ज्या प्रदेशांतील लोक सुस्थित राज्यामार्फत संघटित झाले आहेत, अशांमध्यें, म्हणजेच निरनिराळ्या राज्यांतील जे तहनामे झाले असतील, त्यांतील जबाबदाऱ्या पार पाडण्याची जबाबदारी स्वीकारून राज्य वागेल. तहनामा म्हणजे चिटोरें नव्हे. त्याबद्दल आदर व त्याबाबत न्यायपूर्ण वागणूक यांची कदर केली जाईल. आंतरराष्ट्रीय जगांत या राज्याचें वर्तन कसें राहील, त्याचा व्यवहार कसा चालेल हें या कलमांत सांगितलें असून या रीतीनें राज्य वागून जगांत शांतता व निर्भयता अगर संरक्षण वाढविण्याची तजवीज करील. म्हणजे राज्य आक्रमक नसून देशांत समर्थ व प्रगतिपर, व जगांत शांततावादी, न्याय व नीतीप्रमाणें चालणारें असें राहील.

# भाग ५

# संघ

हिंदुस्थानची राज्यघटना संयुक्त स्वरूपाची राहील. संयुक्त स्वरूपाच्या घटनेंत घटकांना मर्यादेपर्यंत स्वायत्तता राहून मुख्य व मध्यवर्ती राज्यसत्तेला अखिल देशाच्या दृष्टीनें निर्णायक अधिकार राहतो. सैन्य, वाहतुक, व्यापार, चलन इत्यादि क्षेत्रांत मध्यवर्ती सरकार हें श्रेष्ठ सत्ताधारी राहतें. देश मोठा, त्यामुळें, सर्व देशभर एकसंघी ( unitory ) राज्य ठेवणें शक्य असलें, तरी सोयीस्कर नाहीं. एकसंघी राज्यांत सर्व प्रदेशासाठीं एकच विधिमंडळ, एकच कार्यकारी सरकार, सत्ता एकेच ठिकाणीं पूर्णपणें केंद्रित झालेली अशी स्थिति असते. हिंदुस्थानांतील राजकीय प्रगति आतांपर्यंत या विचारप्रवाहाविरुद्ध आहे. आज निरनिराळे प्रांत स्वायत्त आहेत. लोकांच्या जीवनावर या गोष्टींचा परिणाम झालेला आहे. लोकांचे विचार, आशा व महत्त्वाकांक्षा या दृष्टीनें घडत आल्या आहेत. परंपरा लक्षांत घेतां, लोक-व्यवहार लक्षांत घेतां, कार्यक्षमता लक्षांत घेतां, संयुक्त घटनाच या देशाला अनुरूप आहे. घटकांचें विशिष्टत्व कायम ठेऊन त्यांच्या खास संस्कृतीला, अस्मितेला, व व्यक्तिमत्वाला पूर्ण वाव देऊन त्या सर्वांना संघटित करणाऱ्या सर्वव्यापी घटनेंत गोवून घेऊन एक सुदृढ व सामर्थ्यवान् मध्यवर्ती सरकार निर्माण करण्याचा येथें प्रयत्न केला आहे. घटकांत जें न्यून असेल, तें पूर्ण करून, सरतें तें पुरतें करून घेण्यासाठीं मध्यवर्ती सरकार आहे. संयुक्त घटना ही सूर्यमालेप्रमाणें आहे. प्रत्येक ग्रह स्वतःभोवतीं फिरतो व सर्व सूर्याभोवतीं फिरतात. मध्यवर्ती सरकार हें साह्यकारी, मार्गदर्शन करणारें व मुख्य व मध्यवर्ती बाबींत नियंत्रक व निर्णयात्मक सत्ता वापरणारें होय. घटक व मध्यवर्ती सत्ता यांत हितविरोध नाहीं. कार्यक्षेत्रें वांटून देऊन, विकेंद्रीकरण करून सत्ता दुर्बल न करतां अधिक कार्यक्षम करण्याचा हा एक प्रकार आहे. घटक कसे ठरवावे, कोणत्या तत्त्वावर ठरवावे, त्याचें प्रादेशिक प्रमाण काय असावें हा दुय्यम प्रश्न आहे.

भाषावार प्रांत असावे हें तत्त्व मान्य झालें आहे. भाषा ही संस्कृतीची जननीच म्हटली पाहिजे. निदान तिला या बाबतींत सर्वांत मोठें स्थान आहे. आर्थिक अनुरूपता, कारभाराची सोय याही गोष्टी कमी महत्त्वाच्या नाहींत. तथापि हा दुय्यम प्रश्न आहे. घटक स्वायत्त राहील. त्याचें विधिमंडळ, कार्यकारी सत्ता, न्यायालय हीं

सर्व लक्षणें राहतील. घटक स्वायत्त असले, म्हणजे जनतासंबंध अधिक येतो, जनतेचा दृष्टिकोण प्रभावी होतो. स्थानिक गरजांना तोंड फुटतें, त्यांकडे लक्ष दिलें जातें. एकच विधिमंडळ सर्व देशासाठीं असेल तर राज्याचें काम कठीण होईल. तीच अवस्था कार्यकारी सत्तेबाबत होईल. दळणवळणाचीं साधनें जरी वाढलीं आहेत, द्रुतगति झालीं आहेत, तरी कारभाराचें क्षेत्र एवढें अवाढव्य आहे कीं, तें एकाच केंद्रावरून नीटपणें चालविणें अशक्य आहे. सर्व दृष्टींनीं विचार करतां संयुक्त घटना हीच या देशाला योग्य ठरते. त्याप्रमाणेंच या घटनेची रचना आहे.

राज्याचें क्षेत्र तीन दृष्टींनीं विभागिलें जातें. जें कार्य राज्य करतें, त्याचे तीन प्रकार अगर भाग असतात. पहिला देशासाठीं कायदे करणें (Legislative) हा होय. राज्य हें आपले आदेश अगर आज्ञा कायदा करून स्पष्ट करतें. अमुक करणें अगर न करणें म्हणजे कायदा. डाव्या बाजूनें चाललें पाहिजे, येथपासून वारसा कुणाला जातो येथपर्यंत लोकांचें वर्तन व व्यवहार कायद्यानें नियमित केला जातो. राज्याचें प्रत्येक कृत्य कुठल्या तरी कायद्यान्वयें, अगर कायद्यानें अमलांत आणलेल्या नियमान्वयें केलें जातें. त्याचा संदर्भ कायद्यांतील असतो व असला पाहिजे. राज्याचें कार्य करण्याचें माध्यम म्हणजे कायदा होय असें म्हटलें तरी चालेल. म्हणून कायदा ही महत्त्वाची बाब आहे. सर्वांना नियमन करणारा, चालना देणारा, सर्वसमर्थ असें कायद्याचें स्वरूप आहे. राज्य कायद्यावर आधारलेलें, त्याचें नियमन कायदा करणार; राज्य कार्यान्वित पण कायद्यानेंच होणार; म्हणून कायदा करण्याची सत्ता महत्त्वाची बाब आहे. हें कार्य कोणी करावें हा नंतरचा प्रश्न आहे. राज्यकार्याचा दुसरा भाग किंवा दुसरें अंग म्हणजे कार्यकारित्व. जे आदेश अगर आज्ञा राज्य कायदा करून अगर नियमान्वयें देईल, त्यांची अंमलबजावणी करणें म्हणजे ते प्रत्यक्ष घडवून आणणें हें कार्यकारी सत्तेचें (Executive) काम होय. कायदे मंडळ कायदा करतें व तो कार्यकारी सत्तेनें अंमलांत आणावयाचा असतो; म्हणून राज्यांतील मोठी सत्ता कार्यकारीच्या हातांत असते. विधिमंडळ चालू नसेल तेव्हां, तसेंच अकल्पित व आणीबाणीच्या प्रसंगीं कार्यकारी हीच प्रभावी असते. किंबहुना, राज्यसत्ता म्हणजे कार्यकारी असेंच मानलें जातें. या दृष्टीनें कार्यकारीचें स्वरूप व संघटन कसें असावें, तिचा व विधिमंडळाचा संबंध काय असावा हें महत्त्वाचें असतें. राज्यकार्याचा तिसरा भाग म्हणजे न्यायदान ( Judicial ) हा होय. कायदा केला, तो अमलांत आला, पण जें झालें अगर होत आहे अगर होणार आहे, हें कायद्याप्रमाणें आहे कीं नाहीं, हें पाहणें जरूर आहे. म्हणून स्वतंत्र अशी एक व्यवस्था या कार्यासाठीं असली पाहिजे. हें कार्य करणारे निर्भीड, निःस्वार्थी व निःस्पृह असावेत; त्या दृष्टीनें कोणाला न्यायाधीश नेमावें, त्याबाबत काय शर्ती

असाव्यात, त्यांचे अधिकार काय असावेत, हे सर्व प्रश्न महत्त्वाचे आहेत. या तिन्ही कार्यांसाठीं, घटनेमध्यें व्यवस्था असावी लागते. प्रस्तुत भागांत हें सर्व दिलें आहे. प्रथम मध्यवर्ती सत्तेसंबंधीं व नंतर घटकांबाबत असा यांतील निर्देशाचा क्रम राखला आहे. संघ अगर संघराज्य यांतील कार्यकारीचा (Executive) प्रथम प्रपंच केला आहे.

# प्रकरण १ लें—कार्यकारी

## अध्यक्ष आणि उपाध्यक्ष

### ४१. हिंदुस्थानचा ( प्रमुख म्हणून ) अध्यक्ष राहील.

**राष्ट्राध्यक्ष**

हिंदी घटनेंत कार्यकारी सत्तेचा मुख्य अध्यक्ष हा राहावयाचा आहे. प्रत्येक घटनेंत राज्यप्रमुख असावा लागतो. कोठें पिढीजाद राजा असेल, कोठें अध्यक्ष असेल. त्याचे अधिकारही घटनेनें व परंपरेनें ठरविलेले असतात. त्याच्या नांवानें राज्यकारभार चालतो. राज्यकारभार मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें तो चालवील अगर आपल्या इच्छेप्रमाणें चालवील. राज्याची द्वाही त्याच्या नांवानें, डंका त्याच्या नांवानें, कोठें तो केवळ उत्सवमूर्ति असेल, कोठें प्रभावी असेल. हें सर्व घटनेवर अवलंबून आहे. प्रस्तुत कलमांत अध्यक्ष हा मुख्य असेल एवढेंच सांगितलें आहे. तो राजा असणार नाहीं; कारण कीं राज्य प्रजातंत्र आहे. तसेंच हें अध्यक्षपद जन्मानें प्राप्त होणारें नाहीं. तें निवडणुकीनेंच मिळणारें आहे.

**संघराज्याची कार्यकारी सत्ता**

**४२. ( १ ) संघाची कार्यकारी सत्ता अध्यक्षाला असून त्यानें ती घटनेला व कायद्याला अनुसरून चालवावयाची आहे.**

**( २ ) वरील गोष्टीस सामान्यपणें बाध न येतां हिंदुस्थानी फौजेवर अध्यक्षाचीच हुकुमत राहील व तिचें नियमन कायद्यानें केलें जाईल.**

**( ३ ) विद्यमान कायद्यानें एखाद्या घटक सरकारला अगर अन्य अधिकाऱ्याला कांहीं अधिकार दिले असल्यास ते या कलमानें अध्यक्षाला आले असें समजलें जाणार नाहीं अगर पार्लमेंटला कायदा करून अध्यक्षाव्यतिरिक्त इतर अधिकाऱ्याला कांहीं अधिकार देण्यास प्रतिबंध असणार नाहीं.**

या कलमानें कार्यकारी सत्ता अध्यक्षाला दिली असून त्यानें ती घटनेला व कायद्याला अनुसरून चालवावयाची आहे. पुढें त्यानें ती कशी चालवावी, यासंबंधीं व्यवस्था आहे. शिवाय कायदे करून पण व्यवस्था करतां येईल, तींत फरक करतां येईल ही गोष्ट येथें अभिप्रेत आहे. मुख्य म्हणजे कार्यकारी सत्तेचें अधिष्ठान अध्यक्ष आहे. ती सत्ता विखुरलेली नाहीं. एके ठिकाणीं आहे. मात्र घटनेप्रमाणें, कायद्याप्रमाणें ती चालवावयाची आहे. लष्करावर मात्र अध्यक्षाची हुकुमत अधिक प्रभावीपणें ठेवली आहे. ही योजना राजशास्त्रांतील सिद्धांतांना अनुसरून आहे. वाटेल त्यानें सैन्यावर हुकुमत गाजविणें म्हणजे राज्याचा नाश करणें आहे. कार्यकारी सत्तेचा प्रमुख हाच सैन्यावर हुकुमत चालविणारा असला पाहिजे. ती कशी चालवावयाची हें कायद्यानें ठरेल. देशांतील शांततासंरक्षण व त्याचप्रमाणें परचक्रापासून संरक्षण करण्याची जबाबदारी कार्यकारीच्या मुख्यावर आहे, म्हणून सैन्यावर त्याची हुकुमत असणें योग्य आहे. अमेरिकेंत असेंच आहे. विद्यमान कायद्यांत जी याबाबत व्यवस्था असेल, तींत आपोआपच बदल या कलमानें होणार नाहीं. तसेंच पार्लमेंटला कांहीं अन्य व्यवस्था करून या बाबतींतील कांहीं काम अन्य अधिकाऱ्यांना देतां येईल. मात्र त्या कामीं कायदा करावा लागेल.

**अध्यक्षाची निवडणूक**

**४३. अध्यक्षाची निवड खास मतदारसंघ करील; या मतदार संघांत**

**( १ ) मध्यवर्ती विधिमंडळाच्या दोन्ही सभांतील सभासद व**

**( २ ) घटक-कायदेमंडळांतील निवडून आलेले सभासद यांचा समावेश असेल.**

कांहीं देशांत अध्यक्ष हा देशांतील आम मतदार संघानें निवडावयाचा असतो. म्हणजे अध्यक्षाच्या निवडणुकींत सर्व देश प्रत्यक्षपणें भाग घेतो. कांहीं देशांत

अध्यक्षाच्या निवडणुकीसाठीं मतदार संघ निवडला जातो. म्हणजे अध्यक्षाच्या निवडणुकींत कुणी मत द्यावयाचें हें निवडणुकीनें ठरतें. म्हणजे ह्या निवडून आलेल्या लोकांचा एक मतदारसंघ बनतो व या संघानें अध्यक्ष निवडावयाचा असतो. या संघाचें एवढेंच कार्य असतें. अध्यक्षाची निवडणूक झाली कीं, याचें अस्तित्व संपतें. कांहीं ठिकाणीं कायदेमंडळांतील सभासद जे निवडून आलेले असतात, ते अध्यक्षाला निवडतात. मात्र ही निवडणूक केल्यानंतर त्यांचें अस्तित्व अगर कार्य संपत नाहीं. कारण, कायदेमंडळाचे ते सभासद असतात. या कलमांत मध्यवर्ती व घटक या दोन्हीकडील कायदेमंडळांतील सभासदांनीं अध्यक्ष निवडावयाचा अशी व्यवस्था आहे. या कामासाठीं त्यांचा एक मतदारसंघ समजला जाईल. ही व्यवस्था फार अवाढव्यही नाहीं व अगदीं आकुंचित पण नाहीं. सर्व जनतेनें अध्यक्ष निवडावयाचा म्हणजे त्यासाठीं भयंकर खटाटोप करावा लागेल. केवळ मध्यवर्ती कायदेमंडळानें निवडावयाचा, तर फार संकुचित मतदार संघ होतो. कलमांतील व्यवस्थेनें जनमत योग्य तऱ्हेनें जाहीर होईल, अशी व्यवस्था केली आहे. सर्व कायदेमंडळांतील सभासद जनतेनें निवडून दिलेले व त्यांनींच अध्यक्ष निवडलेला असणार. शिवाय हे संख्येनें पुष्कळ असल्यामुळें लांचलुचपत अगर अन्य वाममार्गी प्रकार होण्याचा संभव कमी आहे.

**निवडणुकीची पद्धत**

४४. (१) शक्य तोंपर्यंत, निरनिराळया घटकांना अध्यक्षाच्या निवडणुकीबाबत जें प्रतिनिधित्वाचें प्रमाण राहील, त्यांत सारखेपणा राहील.

(२) सारखेपणा यावा या दृष्टीनें, पार्लमेंटच्या (मध्यवर्ती विधिमंडळ) तसेंच घटक कायदेमंडळाच्या प्रत्येक लोकनियुक्त सभासदास किती मतें देण्याचा अधिकार आहे तें खालीं दिलेल्या पद्धतीप्रमाणें ठरविलें जाईल.

(अ) प्रत्येक घटकाची लोकसंख्या घेऊन तिला त्या घटकाच्या कायदेमंडळांतील निवडून आलेल्या सभासदांच्या संख्येनें भागावयाचें व जो भागाकार येईल त्याला १००० नें भागून जी संख्या येईल तितकीं मतें देण्याचा अधिकार त्या घटकाच्या कायदेमंडळांतील निवडून आलेल्या सभासदाला राहील.

(ब) जर १००० नें भागून बाकी ५०० पेक्षां अधिक असेल तर वर (अ) यांत मतांची संख्या सांगितली असेल त्यांत एकानें भर पडेल.

(क) (अ) व (ब) यांत सांगितल्याप्रमाणें घटक कायदेमंडळांतील सभासदांना जीं मतें देण्याचा अधिकार मिळाला असेल, अशा एकंदर मतांची बेरीज करून त्या संख्येस मध्यवर्ती विधिमंडळांतील निवडून आलेल्या सभासदांच्या संख्येनें भागून जी संख्या येईल तेवढी मतें देण्याचा या विधिमंडळांतील दोन्हीं सभागृहांतील प्रत्येक लोकनियुक्त सभासदास अधिकार आहे. निम्म्यांपेक्षां अधिक अपूर्णांक आल्यास तें १ मत धरलें जाईल. कमी असल्यास तो विचारांत घेतला जाणारा नाहीं.

(३) अध्यक्षाची निवडणूक क्रमदेय मतदान पद्धतीनें होऊन तींत गुप्त मतदान राहील.

या कलमांत 'घटक कायदेमंडळ' म्हणजे, जेथें दोन सभागृहें असतील, तेथें कनिष्ठ सभागृह असें समजावें. तसेंच 'लोकसंख्या' म्हणजे मागील खानेसुमारींत जी दर्शविली असेल ती.

या कलमांत अध्यक्ष कसा निवडावयाचा हें सांगितलें आहे. निरनिराळ्या घटक कायदेमंडळांतील निवडून आलेल्या सभासदांनीं तो निवडावयाचा हें खरें. पण निरनिराळ्या घटक कायदेमंडळांत निवडून येणारे सभासद हे एकाच पद्धतीनें येत नाहींत. कायदेमंडळांतील सभासदांची संख्या लोकसंख्येवर आधारलेली असणार; पण कांहीं ठिकाणीं १ लाख लोकांमागें एक प्रतिनिधि, तर कांहीं ठिकाणीं १० हजारांमागें एक असेंही होईल. तसें झालें म्हणजे अशा दोघांही सभासदांची अध्यक्षाच्या निवडणुकींत मतांची किंमत अगर महत्त्व सारखें ठेवलें तर अन्याय होईल. त्यांत विषमता येईल. म्हणून सारखेपणा आणण्याच्या या दृष्टीनें कलमांत व्यवस्था सुचविली आहे.

पुढील उदाहरणानें ही गोष्ट स्पष्ट होईल.

मुंबई प्रांताची लोकसंख्या २,०८,४९,८४० आहे. समजा, एक लाखामागें एक प्रतिनिधि मुंबईच्या कायदेमंडळांत निवडून यावयाचा. तर २०८ सभासद या

कायदेमंडळांत असतील. लोकसंख्येला म्हणजे २,०८,४९,८४० ला २०८ नें भागलें म्हणजे १,००,२३९ ही संख्या येते. या संख्येस १००० नें भागलें म्हणजे १०० ही संख्या येते. बाकी २३९ ही ५०० पेक्षां कमी असल्यामुळें ती सोडून दिली म्हणजे १०० ही संख्या मुंबई कायदेमंडळांतील निवडून आलेल्या प्रत्येक सभासदाला अधिकार असलेल्या मतांची संख्या होईल.

बिकानेरची लोकसंख्या १२,९२,९३२ आहे व १० हजारामागें एक प्रतिनिधि याप्रमाणें बिकानेर कायदेमंडळांत प्रतिनिधि निवडून द्यावयाचे आहेत असें धरलें, तर प्रतिनिधि–संख्या १३० होते. लोकसंख्येला म्हणजे १२,९२,९३२ ला १३० नें भागलें म्हणजे ९,९४५ ही संख्या येते. या संख्येस १००० नें भागलें म्हणजे ९ $\frac{९४५}{१०००}$ ही संख्या येते. ९४५ ही बाकी ५०० पेक्षां अधिक असल्यामुळें ९+१ म्हणजे १० ही संख्या या कायदेमंडळांतील निवडून आलेल्या प्रत्येक सभासदास अधिकार असलेल्या मतांची संख्या होय.

वरील उदाहरणावरून मुंबईच्या सभासदाला १०० मतें देण्याचा अधिकार व बिकानेरच्या सभासदाला १० मतें देण्याचा अधिकार आहे असें दिसून येईल. यांतील न्याय व सारखेपणा उघड आहे.

आतां ( क ) बद्दल म्हणजे पार्लमेंटच्या सभासदाला किती मतें देण्याचा अधिकार आहे हें पाहूं. प्रथम घटक कायदेमंडळांतील ज्या सभासदांना मतें देण्याचा अधिकार आहे, त्यांच्या मतांची बेरीज करावयाची आहे. समजा, ही बेरीज ७४,९४० येते. मग दोन्हीं सभागृहांतील निवडून आलेल्या सभासदांची संख्या ७५० आहे असें धरलें, तर या ७५० संख्येनें ७४,९४० ला भागावयाचें. म्हणजे $\frac{७४९४०}{७५०}$ = ९९ $\frac{२३}{२५}$ म्हणजे १०० ( अपूर्ण अंक $\frac{२३}{२५}$ हा $\frac{१}{२}$ पेक्षां अधिक म्हणून तो १ समजला आहे. ) ही प्रत्येक निवडून आलेल्या सभासदांची मतसंख्या असेल. मध्यवर्ती विधिमंडळांत सुद्धां निरनिराळ्या लोकसंख्येच्या प्रमाणावर सभासद निवडून येणें हें अपरिहार्य आहे. म्हणून कलमांत सुचविलेल्या व्यवस्थेनें सारखेपणा यांत आला आहे. कारण ( अ ) व ( ब ) यांतील पद्धतीनें प्रथम घटक कायदेमंडळांतील सभासदांच्या मताधिकारांत सारखेपणा आणण्यांत आला असून त्यांच्या मतांच्या संख्येवर मध्यवर्ती विधिमंडळांतील सभासदांची मतसंख्या ठरविली आहे.

अध्यक्षाची निवडणूक क्रमदेय मतदान पद्धतीनें होईल. म्हणजे मतदारानें आपल्या मतानें पसंतिक्रम दर्शवावयाचा असतो. पहिली पसंती, दुसरी पसंती याप्रमाणें. दुसऱ्या पसंतीच्या उमेदवारास निवडून येण्यासाठीं अवश्य असलेलीं मतें न मिळालीं तर मतदाराच्या इच्छेप्रमाणें तीं दुसऱ्या उमेदवारास जातात. त्यालाही

अवश्य तेवढीं मतें न मिळाल्यास तिसऱ्या पसंतीच्या उमेदवारास जातात. या पद्धतीनें मतें वायां जात नाहींत व प्रतिनिधित्व अधिक प्रतिबिंबित होतें. ही पद्धत किचकट व समजण्यास कठीण आहे. मतदार शहाणा असेल तर ठीक. तथापि आतां ही पद्धत विश्वविद्यालयें, कॉंग्रेस वगैरे ठिकाणीं मान्य झालेली आहे. एक लहान व सोपें उदाहरण येथें देऊं. समजा, १०० मतदार आहेत. १ जागा निवडावयाची आहे, व उमेदवार ४ आहेत. अ, ब, क, ड यांना अनुक्रमें ४०,२०,२२,१८ याप्रमाणें मतें पडलीं. साधारण निवडणुकीच्या पद्धतीनें पाहतां अ निवडून आला पाहिजे. कारण त्यास सर्वांत अधिक मतें पडलीं आहेत. पण यांत त्याला निर्विकल्पपणें बहुमत नाहीं; कारण ५१ मतें नाहींत. क्रमदेय मतदान पद्धतींत प्रथम किती मतें उमेदवार निवडून येण्यास अवश्य आहेत हें ठरविलें जातें. तें असें. $\frac{\text{मतदानसंख्या}}{\text{निवडावयाच्या जागा}} + १ = \text{अवश्य मतें}$ येथें $\frac{१००}{१+१} + १ = ५१$ ही संख्या येते. म्हणजे ५१ मतें ज्याला मिळतील, तो निवडून आला. पुन्हा प्रत्येक मतदारानें मतपत्रिकेंत पसंतिक्रम १, २, ३, असे आंकडे घालून दाखवावयाचा असतो. वरील उदाहरणांत ४०, २०, २२, १८ अशीं मतें पडलीं आहेत. मग ज्याला सर्वांत कमी पहिल्या पसंतीचीं पडलीं असतील, त्याला रद्द करावयाचें. तसेंच ज्याला अवश्य संख्येपेक्षां अधिक पडलीं असतील तो निवडून आला असें धरून त्याच्या मतपत्रिकांतून दुसऱ्या पसंतीची वांटणी करावयाची. येथें जागा एकच आहे. व ५१ मतें कुणालाही नाहींत. तेव्हां 'ड' गेला; कारण त्याला सर्वांत कमी अशीं पहिल्या पसंतीचीं मतें पडलीं. मग १८ मतदान पत्रिकेंतून दुसऱ्या पसंतीची वांटणी करावयाची. समजा या १८ मध्यें ९ अ, ६ ब व ३ क अशी दुसरी पसंती दर्शविली असेल, तर तीं मतें त्या त्या उमेदवाराच्या मतांत घालावयाचीं. मग अ ला ४९, ब ला २६ व क ला २५ अशी त्यांच्या मतांची संख्या होते. आतां ५१ कुणालाच नाहींत व सर्वांत कमीं क म्हणून क रद्द. त्याच्या मतांचें पुडकें घेऊन त्यांत दुसऱ्या पसंतीचीं किती मतें आहेत हें पाहावयाचें. त्याला प्रथम २२ मतें पहिल्या पसंतीचीं होतीं. समजा, त्यांत दुसऱ्या पसंतीचीं अ ला ८, ब ला १० व ड ला ४ अशीं मतें असतील तर ड रद्द म्हणून तीं मतें बाद. राहिलेलीं त्या त्या उमेदवारांच्या मतांत घालावयाचीं, म्हणजे अ ला ४९+८ व ब ला २६+१० म्हणजे अ ५७ व ब ३६ झालीं. अला अवश्य म्हणजे ५१ पेक्षां अधिक मिळालीं व जागा एकच म्हणून अ निवडून आला. हें साधें उदाहरण आहे. यापेक्षां अधिक गुंतागुंत जर एकापेक्षां अधिक उमेदवार असतील तर होते. या पद्धतींत लोकमत अधिक प्रतिबिंबित होतें व अल्पसंख्यांकांना न्याय मिळतो. निव्वळ बहुमतानें ठरवावयाचें झाल्यास अल्पमत

निकालांत लागतें. समजा ४ जागा आहेत व ७ उमेदवार असून मतदान १०० मतदारांनीं केलें आहे. केवळ बहुमतानें निवड ठरवावयाची झाल्यास कसा अन्याय होतो तें पाहा. अ, ब, क, ड, द, ध, न, हे ७ उमेदवार आहेत व त्यांना अनुक्रमें १८,१९, १७, १५, ११, १०, १० अशीं मतें पडलीं. पहिल्या चार जणांना अधिक मतें पडलेलीं असल्यामुळें ते निवडून आले आणि ज्यांनीं त्यांना मतें दिलीं, त्यांना प्रतिनिधित्व मिळालें. ज्या ३१ जणांनीं द, ध, न यांना मतें दिलीं, त्यांना कांहींही प्रतिनिधित्व नाहीं. मतदारांपैकीं ६९ जणांना संपूर्ण म्हणजे १०० टक्के प्रतिनिधित्व मिळालें. उलट क्रमदेय पद्धतीनें प्रथम उमेदवार निवडून येण्यास अवश्य ती संख्या ठरेल. म्हणजे $\frac{१००}{४+१}+१=२१$ ही संख्या, समजा, ध, व न यांत दुसऱ्या पसंतीचीं सर्व मतें 'द'ला मिळाल्यास 'द' हा एक निवडून येईल. बाकीचे तीन अ, ब, क, ड यांतून असतील. अलीकडे ही पद्धत मान्यता पावत आहे.

अध्यक्षाच्या निवडणुकींत गुप्त मतदान असेल म्हणजे निवडणुकीच्या अधिकाऱ्यांसमोर मतदान होणार नाहीं. मतदार मतपत्रिका घेऊन एकटा खोलींत जाईल, तेथें खुणा अगर आंकडे घालून ती पत्रिका घडी करून सीलबंद पेटींत टाकील. या पद्धतीनें सामान्यतः मतदान कोणी कुणाला केलें, हें कळत नाहीं. धाकदपटशा दिला असला तरी खोलींत मतदार हा एकटाच असतो. त्याला त्याच्या मताप्रमाणें वागण्यास पूर्ण मुभा असते. गुप्तता असल्यामुळें पुढें कांहीं आपला सूड घेतला जाईल ही भीति नसते. मतदान झाल्यानंतर कांहीं काल मतपत्रिका ठेऊन त्यांचा नंतर नाश करण्यांत येतो.

**अध्यक्षाची मुदत**

**४५. अधिकारस्वीकार केल्यापासून अध्यक्ष हा पांच वर्षे अध्यक्षपदावर राहील.**

**तथापि—**

**( १ ) वरिष्ठ सभागृहाचे अध्यक्ष व कनिष्ठ सभागृहाचे अध्यक्ष यांना स्वदस्तुरींचें पत्र लिहून अध्यक्षास राजीनामा देतां येईल;**

**( २ ) घटनेविरुद्ध वर्तन केल्यास कलम ५० यांत दर्शविल्याप्रमाणें काम चालवून अध्यक्षास कामावरून दूर करतां येईल.**

**( ३ ) अध्यक्षाची मुदत संपली असली तरी, दुसरा अध्यक्ष अधिकार स्वीकारीपर्यंत त्यास काम करावें लागेल.**

अध्यक्षाची मुदत पांच वर्षें ही ठरविण्यांत आली आहे. या मुदतींत त्याला (१) यांत सांगितल्याप्रमाणें केव्हांही राजीनामा देतां येईल. तसेंच त्यानें घटनेविरुद्ध वर्तन केल्यास कलम ५० यांत सांगितल्याप्रमाणें मध्यवर्ती विधिमंडळांपैकीं कुठल्याही सभागृहाला त्याच्याविरुद्ध ठराव करून काम चालवून व नंतर पुन्हा ठराव करून त्यानें घटनेविरुद्ध वर्तन केलें, असें जाहीर करून त्यास दूर करतां येईल. दुसरा अध्यक्ष निवडून येऊन अधिकारस्वीकार करीपर्यंत, पांच वर्षांची मुदत संपली असली, तरी त्यास अध्यक्षाचें काम चालवावें लागेल. या व्यवस्थेनें कामांत खंड पडत नाहीं व अध्यक्ष कोणीच नाहीं अशी परिस्थिति उत्पन्न होत नाहीं.

फेरनिवडणूक

**४६. जो अध्यक्षपदावर आहे अगर होता, अशा इसमाला फेरनिवडणुकीस एकदां—मात्र फक्त एकदांच उभें राहतां येईल.**

अनेक घटनांत या बाबतींत निरनिराळी व्यवस्था आहे. कांहीं ठिकाणीं फेरनिवडणुकीस घटनेंत प्रतिबंध नाहीं. पण संकेतानुसार कांहीं मर्यादा मानल्या जातात. अमेरिकेंत १९४० पर्यंत राष्ट्राध्यक्ष लागोपाठ दोनदा निवडून येण्याची परंपरा होती. तसा संकेत सर्व पक्ष मानीत असत. अमेरिकन घटनेंत अशी मर्यादा सांगितलेली नाहीं. तथापि वरील संकेत स्वयंप्रभावी होता. १९४० सालीं प्रे. फ्रँकलिन रूझवेल्ट हे तिसऱ्या खेपेस व १९४४ सालीं पुन्हां चवथ्या खेपेस निवडून आले. कांहींच मर्यादा नसेल, तर संकेतसुद्धां निर्बल ठरतात हें यावरून उघड होतें. या बाबतींतील मर्यादा घटनेंतच समाविष्ट असावी हें अधिक इष्ट. ही मर्यादा किती असावी, हें ठरविणें सोपें नाहीं. तोच तोच इसम सारखा निवडून येऊं लागला, तर अधिकाराबाबत एक प्रकारची मिरास उत्पन्न होते. अध्यक्ष निवडून आला म्हणजे त्याच्याबरोबर त्याचें तारामंडळ आलेंच, त्याच्या पक्षांतील लोकही आले. जनतेनें ही निवड केली म्हणून सर्व प्रसंगीं ही निवड निर्दोष अगर निःस्पृह असेलच, असें नाहीं. प्रजातंत्र समाजांत समतेचें वातावरण असावें हें साहजिकच आहे. तथापि तें नीट ठेवण्याची जबाबदारी राजकीय व सामाजिक संस्थांची आहे. या दृष्टीनें अधिकारी पुरुषांत बदल होणें इष्ट आहे. व्यक्तिमत्व ही एक प्रभावी शक्ति आहे. पण तिलासुद्धां कुठेंतरी मर्यादा हवी. शिवाय देशांतील कार्य अगर नेतृत्व एकाच व्यक्तीवर सारखें सोंपविल्यास कार्यकर्त्यांचा अगर नेतृत्वाचा पुरवठा सतत राहत नाहीं. अनेक कार्यकर्ते तयार असावेत, त्यांना काम करण्यास वाव असावा. असें असलें म्हणजे कुठल्याही संकटकालीं राष्ट्र नेतृत्वहीन होत नाहीं. एकाच व्यक्तीवर राष्ट्र विसंबिलें म्हणजे राष्ट्र पंगु होतें, परावलंबी होतें. स्वतः विचार करण्याचें व जबाबदारी घेण्याचें काम तें

अंगाबाहेर टाकतें. उलट, दर पांच वर्षांनीं नेतृत्व मिळण्याची सोय असली, म्हणजे महत्त्वाकांक्षा अनेकांना प्रयत्न करण्यास चालना देते. प्रसंग आला म्हणजे गुणविकास होतो. म्हणून देशांतील सर्वश्रेष्ठ पद प्राप्त करून घेण्याच्या कामीं जास्तींत जास्त संधि सर्व नागरिकांना असावी, या दृष्टीनें कलमांतील मर्यादा इष्ट अशीच आहे. एकदां निवडून आलेल्या अध्यक्षाला एकदांच फेरनिवडणुकीला उभें राहाण्याची मुभा दिली आहे; म्हणजे कुणाही इसमास फक्त दोनदांच लागोपाठ अगर अन्य रीतीनें अध्यक्ष होतां येईल.

**अध्यक्षाची पात्रता**

४७. (१) अध्यक्षाच्या निवडणुकीसाठीं कोणाही इसमास पात्रता येण्याकरितां तो

(अ) हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे.

(ब) त्याच्या वयाचीं ३५ वर्षें पूर्ण झालीं असलीं पाहिजेत.

(क) मध्यवर्ती विधिमंडळांतील लोकसभेच्या निवडणुकीसाठीं तो पात्र असला पाहिजे.

(२) हिंदुस्थान सरकार अगर घटक सरकार अगर यांपैकी कोणाही सरकारी नियंत्रणाखालीं असलेले कुठलेही स्थानिक अधिकारी यांच्या अधिकाराखालीं असलेल्या व ज्यापासून प्राप्ति अगर वेतन मिळत आहे अशा कुठल्याही जागेवर असणाऱ्या इसमास अध्यक्षाच्या निवडणुकीस उभें राहतां येणार नाहीं.

(अ) मात्र केवळ एखादा इसम हिंदुस्थान सरकारांतील मंत्री आहे अगर घटक संरकारांतील मंत्री आहे यासाठीं अगर

(ब) ज्या संस्थानांचा उल्लेख परिशिष्ट १ भाग ३ यांत केला आहे, त्या संस्थानांत तो मंत्री असून संस्थानच्या कायदेमंडळाला अगर जेथें दोन सभागृहें आहेत, तेथें कनिष्ठ सभागृहाला तो जबाबदार असेल,

**व अशा कायदेमंडळांतील अगर कनिष्ठ सभागृहांतील तीन चतुर्थांश सभासद लोकनियुक्त असतील, तर तो निवडणुकीस उभा राहण्यास अपात्र ठरणार नाहीं व ज्या जागेवर तो आहे ती जागा वर उल्लेखिल्या प्रकारची जागा समजली जाणार नाहीं.**

या कलमांत निवडणुकीस उभे राहणाऱ्या उमेदवाराची पात्रता सांगितली आहे. तो नागरिक असला पाहिजे. नागरिक कोण होऊं शकतो, हें पूर्वी भाग २ मध्यें आलेंच आहे. उमेदवाराच्या वयास ३५ वर्षें पूर्ण झालीं असलीं पाहिजेत. म्हणजे तो अगदीं पोरसवदा असूं नये. ३५ वर्षांचें वय म्हणजे थोडाफार जगाचा अनुभव प्राप्त झालेलें वय असें समजलें जातें. तसेंच पार्लमेंटच्या कनिष्ठ अगर लोकसभेंत निवडून येण्याला जी पात्रता लागते, ती उमेदवाराजवळ असली पाहिजे. ही पात्रता पुढें कलम ६७ व ८३ मध्यें सांगितली आहे. त्यांत इसम वयांत आलेला नागरिक पाहिजे. म्हणजे २१ वर्षें पुरीं झालेला तो असावा, वेडा नसावा, गुन्हा अगर लांच-लुचपतीचे प्रकाराबद्दलच्या दोषापासून व दिवाळखोरीपासून तो मुक्त असावा, इत्यादि. तात्पर्य, जो पार्लमेंटचा उमेदवार होऊं शकतो, त्याला अध्यक्षपदासाठींही निवडणुकीस उभें राहतां येईल. अधिक पात्रता फक्त ३५ वर्षें वयाची आहे. सामान्यतः बहुतेक घटनांतून अशीच व्यवस्था आहे. सरकारी नोकरींत अगर सरकारकडून उमेदवारास वेतनवजा प्राप्ति मिळत असेल तर तो अपात्र ठरेल. मात्र ज्यांचा उल्लेख २ (अ) व (ब) मध्यें केला आहे, ते मंत्री या कलमापुरते सरकारी नोकर होत नाहींत अगर त्यांची जागा प्राप्तीची अगर वेतनाची मानली जाणार नाहीं. कारण हे मंत्री सामान्यतः निवडून आलेल्या सभासदांपैकीं लोकमंत्री असणार व ते लोकांना जबाबदार असणार हें उघड आहे. या दृष्टीनें ते अपात्र नसणेंच इष्ट आहे. शिवाय त्यांना कोणी कायम नोकरही समजत नाहीं. (ब) मधील परिस्थितिही फार दिवस राहणार नाहीं. सर्वत्र जबाबदार राज्यपद्धति स्थापन होत आहे. सरकारी नोकरीचे सर्व नियम राजकीय कारणासाठीं मंत्र्यांना लागू पडत नाहींत व हें योग्य आहे. सरकारी नोकर हे धोरण अमलांत आणणारे असतात; निर्णयांना ते कार्यान्वित करतात, तर मंत्री धोरण ठरवितात, त्याबाबत निर्णय घेतात. ही त्यांची भूमिका लक्षांत घेऊन या कलमांत व्यवस्था केली आहे.

अध्यक्षस्थानाबाबत कांहीं शर्ती

४८. (१) अध्यक्ष हा पार्लमेंटचा अगर कुठल्याही घटक कायदेमंडळाचा सभासद असतां कामा नये आणि जर कोणी अशा तऱ्हेचा सभासद असतांना निवडून आला, तर अध्यक्षपद घेतांच त्यानें सदहू सभासदत्वाचा त्याग केला आहे असें समजलें जाईल.

(२) अध्यक्षानें दुसरीकडे कोठेंही नोकरी करतां कामा नये, अगर प्राप्तीची जागा स्वीकारतां कामा नये.

(३) अध्यक्षाला सरकारी निवासस्थान राहण्यास मिळेल; तसेंच पार्लमेंट कायदा करून त्याचें वेतन व अन्य भत्ते ठरवील व ही व्यवस्था होईपर्यंत परिशिष्ट २ मध्यें सांगितल्याप्रमाणें व्यवस्था राहील.

(४) अध्यक्षाचें वेतन व भत्ते हे तो अध्यक्षस्थानावर असेपर्यंत कमी केले जाणार नाहींत.

अध्यक्षपद व कुठल्याही कायदेमंडळाचें सभासदत्व हीं एका वेळीं एका व्यक्तीकडे असूं नयेत. त्यामुळें अनेक पेंचप्रसंग निर्माण होतात. सामान्यतः सभासद हा कुठल्या तरी पक्षाचा असतो. अध्यक्षपद हें पक्षातीत असलें पाहिजे. अध्यक्ष हा अखिल राष्ट्राचा आहे. सभासदाबाबत ही भूमिका असूं शकत नाहीं. अध्यक्षाची निष्ठा अखंड देशाचीच असली पाहिजे, म्हणून त्याला पक्षनिष्ठेपासून मुक्त ठेवलें पाहिजे. या दृष्टीनें (१) यांत व्यवस्था आहे. तसेंच तो अन्यत्र नोकरींत नसावा. अर्थात् खाजगी नोकरींतही असा अर्थ येथें अभिप्रेत आहे. तसेंच ज्या जागेपासून कांहींही प्राप्ति आहे, अशी जागा पण त्यानें घेऊं नये अगर तीवर राहूं नये. म्हणजे कुठल्याही व्यक्तीचा, अगर संस्थेचा अगर कंपनीचा सवेतन सल्लागार अगर संचालक त्याला राहतां येणार नाहीं. स्वार्थ व कर्तव्य यांत ज्यामुळें विरोध उत्पन्न होईल, अशा कोठल्याही जागेवर तो राहणें इष्ट नाहीं.

त्याला आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावतां यावें म्हणून सरकारी निवासस्थान मिळेल, व इतमामानें राहतां येईल एवढें वेतन व अन्य भत्ते पार्लमेंट कायदा करून ठरवील. राष्ट्रप्रमुख म्हणून प्रतिष्ठापूर्वक त्याला राहतां आलें पाहिजे. कायदा होईपर्यंत परिशिष्ट २ मधील व्यवस्था चालू राहील.

४९. अध्यक्ष अगर जो कोणी अध्यक्षाच्या जागीं असेल, अगर अध्यक्षाचें काम संभाळीत असेल, त्यानें अध्यक्षाच्या जागेचा स्वीकार करण्यापूर्वी हिंदुस्थानच्या सरन्यायाधीशासमोर खालीलप्रमाणें प्रतिज्ञा अगर शपथ घेतली पाहिजे.

अध्यक्षाचा शपथविधि

मी अ ब, अशी प्रतिज्ञा (अगर शपथ) घेतों कीं, अध्यक्षपदाचें काम (अगर अध्यक्षाचें काम) प्रामाणिकपणें चालवीन, व माझ्या शक्तीला अनुसरून घटना व कायदा यांना राखीन, त्यांचें संरक्षण करीन आणि लोकांची सेवा व हित करण्यासाठीं स्वतःला वाहून घेईन.

ज्याचा देवावर विश्वास नसेल त्याच्यासाठीं प्रतिज्ञा आहे. ज्याचा विश्वास आहे, त्याच्यासाठीं शपथ आहे. मजकूर तोच आहे. अध्यक्षावर अगर त्या स्थानीं जो असेल अगर अध्यक्षाचें काम तात्पुरतें जो करीत असेल, त्या प्रत्येकानें ही प्रतिज्ञा घ्यावयाची आहे.

५०. (१) अध्यक्षावर घटनेविरुद्ध वर्तन केल्याबद्दल काम चालविण्यासाठीं पार्लमेंटच्या कोणत्या तरी सभागृहानें आरोपपत्र सादर केलें पाहिजे.

अध्यक्षाची चौकशी

(२) (अ) सभागृहाच्या निदान तीस सभासदांच्या सह्यांनिशीं नोटिस देऊन आरोप करण्याची सूचना ठरावानें सभागृहापुढें आली पाहिजे आणि,–

(ब) सभागृहाच्या एकंदर सभासदांच्या संख्येच्या $\frac{2}{3}$ इतक्या सभासदांनीं त्या ठरावास पाठिंबा दिला पाहिजे. याप्रमाणें न झाल्यास आरोपपत्र दाखल करतां येणार नाहीं.

(३) याप्रमाणें आरोपपत्र दाखल झालें म्हणजे ज्या सभागृहानें तें दाखल केलें असेल त्याव्यतिरिक्त सभागृहानें सदहू आरोपाची

चौकशी करावी अगर करवावी, व या चौकशीच्या कामीं अध्यक्षास हजर राहण्यास अगर स्वतःतर्फे दुसऱ्या कोणास हजर ठेवण्यास पूर्ण हक्क आहे.

( ४ ) चौकशीअंतीं, आरोप शाबीत झाला आहे अशा अर्थाचा ठराव, ज्या सभागृहानें चौकशी केली अगर करविली, त्या सभागृहानें एकंदर सभागृहाच्या संख्येपैकीं ⅔ संख्येनें पास केला, म्हणजे ठराव पास झाला त्या दिवसापासून अध्यक्षास अध्यक्षपदापासून दूर केलें आहे, असा त्याचा परिणाम होईल.

घटनेविरुद्ध अध्यक्ष वागला असेल तर त्याच्याविरुद्ध कसें काम चालवावें हें या कलमांत सांगितलें आहे. किमान ३० सभासदांच्या सह्यांनिशीं ठरावाची सूचना देऊन ठराव कुठल्याही सभागृहापुढें आणतां येईल. नंतर त्या सभागृहाच्या एकंदर, हजर असलेल्या नव्हे, सभासदसंख्येपैकीं ⅔ संख्येनें तो पास झाला पाहिजे. यामुळें केवळ तात्कालिक भावनेनें काम होणार नाहीं, शिवाय नुसत्या बहुमतानेंही होणार नाहीं. राष्ट्राध्यक्षावर आरोप करणें ही सहज गोष्ट असूं नये. तसेंच ज्या सभागृहांत आरोप दाखल केला असेल त्याव्यतिरिक्त सभागृहानें त्याची चौकशी करावी, अशी व्यवस्था असल्यामुळें न्याय मिळण्यास मदत होईल. नाहीं तर आरोप करणारें व चौकशी करणारें सभागृह एकच होईल, हें न्यायाच्या मूळ सिद्धांतासही विसंगत आहे. तेव्हां अन्य सभागृहानें ही चौकशी करावी हें इष्ट आहे. शिवाय आरोप शाबीत झाला हें सांगणारा ठराव एकंदर संख्येच्या–हजर असणाऱ्या संख्येच्या नव्हे–⅔ संख्येनें पास झाला म्हणजेच अध्यक्ष आपल्या अधिकारापासून दूर होतो. हीही व्यवस्था शांत व समतोल वृत्तीनें चौकशी होऊन आरोपिताचें म्हणणें ऐकून घेऊन निकाल देणारी असल्यामुळें अगदीं योग्य आहे. न्यायाच्या व नीतीच्या दृष्टीनें योग्यच आहे.

**जागा रिकामी पडेल तेव्हांची व्यवस्था**

५१. ( १ ) मुदत संपल्यानें रिकामी होणारी अध्यक्षाची जागा मुदत संपण्यापूर्वी निवडणूक करून भरली जाईल.

( २ ) राजीनामा, मृत्यु अगर जागेवरून दूर केल्या-मुळें अगर अन्य रीतीनें अध्यक्षाची जागा रिकामी

**झाल्यास शक्य तितक्या लवकर पण केव्हांही रिकामी झाल्यापासून सहा महिन्यांच्या आंत निवडणूक करून ती भरून काढली पाहिजे आणि, अशा निवडणुकींत निवडून आलेला अध्यक्ष कलम ४५ मध्यें दर्शविल्याप्रमाणें पुरीं पांच वर्षें अध्यक्ष राहील.**

सामान्यतः मुदत संपण्यापूर्वी निवडणूक होऊन नवा अध्यक्ष कामावर आला पाहिजे. अन्य रीतीनें जागा खालीं झाल्यास म्हणजे मुदत भरण्यापूर्वी खालीं झाल्यास निदान ६ महिन्यांच्या आंत निवडणूक झाली पाहिजे. मात्र ही निवडणूक राहिलेल्या मुदतीपुरती होणार नसून पुरी पांच वर्षांपुरती होईल. समजा १९५० सालीं निवडणूक झाली व १९५४ मध्यें कांहीं कारणामुळें जागा रिकामी झाली, अशा प्रसंगीं निवडणूक करावयाची ती राहिलेल्या १ वर्षासाठीं नसून ५ वर्षांसाठीं होईल. या व्यवस्थेंत एक फायदा व एक तोटा आहे. फायदा असा कीं, वर्षांत दोनदां निवडणूक करावी लागणार नाहीं. कारण वर्षापुरती निवडणूक झाल्यास त्या मुदती-अखेर पुन्हा निवडणूक करण्याचा प्रसंग येऊं शकेल. प्रस्तुत व्यवस्थेंत निवडणूक जेव्हां जेव्हां होईल तेव्हां ५ वर्षांसाठीं होईल; पण समजा, एखादा पक्ष तूर्त बहुसंख्यांक असला व सर्वसाधारण कायदेमंडळांच्या निवडणुकींत यशाची त्याला खात्री नसल्यास अध्यक्षाचा राजीनामा घेऊन त्याच मतदारसंघाकडून म्हणजे विद्यमान कायदेमंडळांच्या सभासदांकडून निवडणूक करून घेऊन ५ वर्षांसाठीं आपलाच अध्यक्ष त्याला आणतां येईल. मग एक पक्षाचा अध्यक्ष व दुसरा पक्ष अधिकारारूढ असा प्रसंग अपरिहार्य आहे व या स्थितींत संघर्षही होईल. या दृष्टीनें एक तर निवडणूक ठराविक मुदतीनें व मध्यंतरीं निवडणूक झाल्यास राहिलेल्या मुदतीसाठीं ती व्हावी. अगर उपाध्यक्ष हा सदहू मुदतीपुरतां अध्यक्ष व्हावा, अगर जेव्हां सर्वसाधारण निवडणूक होते, तेव्हांच अध्यक्षाची निवड व्हावी. उलट-पक्षीं जर ठराविक मुदतीपूर्वी कायदेमंडळ बरखास्त करून नवीन निवडणूक करण्याची व्यवस्था घटनेंत ठेवली, तर तेंही ठीक होणार नाहीं. कारण मग अध्यक्ष स्वतःची निवडणूक टाळावी म्हणून बरखास्तीचा हुकुम देशाच्या हिताचा असूनही काढणार नाहीं. एकंदर विचार करतां मुदतींत अध्यक्षाची जागा रिकामी झाल्यास राहिलेल्या मुदतींत उपाध्यक्षानें काम करावें, अगर तेवढ्या मुदतीची निवडणूक सर्व कायदे-मंडळांतील सभासदांनीं न करतां केवळ पार्लमेंटच्या सभासदांनीं करावी, ही व्यवस्था अधिक चांगली ठरेल.

५२. हिंदुस्थानचा एक उपाध्यक्ष राहील.

उपाध्यक्ष

५३. उपाध्यक्ष हा वरिष्ठ सभागृहाचा पदसिद्ध सभापति अगर अध्यक्ष राहील. उपाध्यक्षानें कोणतीही अन्य नोकरी अगर प्राप्तीची जागा स्वीकारतां कामा नये.

उपाध्यक्ष वरिष्ठ सभागृहाचा पदसिद्ध सभापति

मात्र कलम ५४ यांत सांगितल्याप्रमाणें अध्यक्षाच्या जागीं अगर अध्यक्षाचें काम तो जेव्हां करीत असेल तेव्हां वरिष्ठ सभागृहाचें सभापतित्व तो करणार नाहीं.

पदसिद्ध म्हणजे उपाध्यक्ष म्हणून अधिकारपरत्वें वरिष्ठ सभागृहाचा सभापति म्हणून तो राहील. मात्र अध्यक्षाचें काम जर व जेव्हांपर्यंत तो करील, त्या वेळीं त्याला सदहू सभागृहाचा सभापति राहतां येणार नाहीं. अध्यक्षत्व व सभासदत्व अथवा सभागृहाचें सभापतित्व हीं दोन्ही एका वेळीं असणार नाहींत. त्या काळांत सभापतित्व स्थगित राहील. तें रद्द होत नाहीं.

५४. (१) मृत्यु, राजीनामा अगर पदभ्रष्टता अगर अन्य रीतीनें अध्यक्षाची जागा रिकामी झाल्यास ही जागा भरण्यासाठीं निवडणूक होऊन निवडून आलेला अध्यक्ष अधिकार–स्वीकार करीपर्यंत उपाध्यक्ष हा अध्यक्ष म्हणून काम पाहील.

अध्यक्षाच्या गैरहजेरींत उपाध्यक्ष काम पाहील

(२) गैरहजेरी, आजारीपण अगर अन्य कारणामुळें अध्यक्ष काम पाहूं शकत नसेल तेव्हां त्याचीं कामें पुन्हा तो काम पाहूं लागेपर्यंत उपाध्यक्षानें करावींत.

(३) वर (१) व (२) यांत लिहिल्याप्रमाणें उपाध्यक्ष हा अध्यक्ष म्हणून काम पाहत असेल अगर अध्यक्षाचीं कामें पाहत असेल, त्या वेळीं त्याला अध्यक्षाचे सर्व अधिकार व सर्व हक्क प्राप्त होतील.

दुसरा अध्यक्ष येईपर्यंत उपाध्यक्ष हा काम पाहील. तसेंच अध्यक्षाचें काम पाहत असतांना अध्यक्षाचे अधिकार त्याला असतील व ज्या सवलती अध्यक्षाला असतील, त्या सर्व त्याला मिळतील.

उपाध्यक्षाची निवडणूक

५५. (१) पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांतील सभासद संयुक्त बैठकींत एकत्र येऊन क्रमदेय मतदान पद्धतीनें गुप्त मतदान करून उपाध्यक्ष निवडतील.

(२) उपाध्यक्ष हा पार्लमेंटचा अगर कुठल्याही घटक कायदे-मंडळाचा सभासद असतां कामा नये आणि जर असा सभासद उपाध्यक्ष म्हणून निवडून आला, तर उपाध्यक्षाची जागा घेतांक्षणींच सदहू सभासदत्व त्यानें सोडलें असें समजलें जाईल.

(३) उपाध्यक्षाचे निवडणुकीस उभा राहणारा इसम

(१) हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे.

(२) त्याच्या वयाचीं ३५ वर्षें पूर्ण झालीं असलीं पाहिजेत.

(३) वरिष्ठ सभागृहाच्या सभासदत्वास तो पात्र असला पाहिजे.

(४) हिंदुस्थान सरकार अगर अन्य घटक सरकार अगर त्याच्या अधिकाराखालील स्थानिक अगर अन्य अधिकाऱ्याच्या अमलाखालील कोठलीही जागा अगर स्थान, ज्यापासून कांहीं प्राप्ति आहे अशा जागेवर असणारा इसम उपाध्यक्ष होण्यास लायक असणार नाहीं.

(अ) हिंदुस्थान सरकारांत अगर पहिल्या परिशिष्टांतील विभाग १ मध्यें नमूद केलेल्या अन्य घटक सरकारांत तो मंत्री असेल अगर

(ब) एखाद्या संस्थानांत जर तो मंत्री असून कायदेमंडळाला जबाबदार असेल, अगर जेथें

दोन सभागृहें आहेत त्या ठिकाणीं कनिष्ठ सभागृहाला जबाबदार असेल, आणि जर अशा कायदेमंडळाचे ३/४ सभासद निवडलेले असतील तर या मंत्रीपदामुळें तो निवडणुकीस अपात्र ठरणार नाहीं व ती जागा वर दर्शविलेल्या जागेच्या स्वरूपाची मानली जाणार नाहीं.

(५) मुदत भरल्यामुळें होणारी उपाध्यक्षाची निवडणूक मुदत भरण्यापूर्वी झाली पाहिजे.

(६) मृत्यु, राजीनामा, पदभ्रष्टता, अगर अन्य कारणासाठीं जागा रिकामी पडल्यास शक्य तितक्या लवकर निवडणूक केली जाईल आणि ही निवडणूक कलम ५६ प्रमाणें पांच वर्षांसाठीं असेल.

कलम ४७ व ५० यांत अध्यक्षाच्या बाबतींत ज्या मर्यादा घातल्या व जी व्यवस्था आहे तीच या कलमानें उपाध्यक्षाच्या बाबतींत आहे. वरील कलमांवर जें भाष्य केलें आहे, तेंच तारतम्यानें येथें लागू आहे.

**उपाध्यक्षाची मुदत**

५६. पदग्रहण केल्यापासून उपाध्यक्षाची मुदत पांच वर्षें राहील.

तथापि

(१) स्वदस्तुरीनें त्याला अध्यक्षाजवळ लेखी राजीनामा केव्हांही देतां येईल.

(२) वरिष्ठ सभागृहांत १४ दिवसांची नोटिस देऊन व त्या सभागृहाच्या त्या वेळीं असलेल्या एकंदर सभासदांच्या संख्येपैकीं बहुसंख्यांक सभासदांच्या मतांनीं ठराव पास करून व लोकसभेची त्याला संमति घेऊन उपाध्यक्षाला तो काम करण्यास नालायक आहे अगर त्यावर विश्वास नाहीं म्हणून वरिष्ठ सभागृहाला दूर करतां येईल.

**( ३ ) मुदत भरल्यानंतरही दुसरा उपाध्यक्ष निवडून येऊन पद-स्वीकार करीपर्यंत त्याला काम चालवितां येईल.**

या कलमांत व कलम ४५ मध्यें बराच फरक आहे. येथें नोटिस १४ दिवसांची असून केवळ बहुमत असलें म्हणजे झालें. एकंदर सभासदांच्या संख्येपैकीं ५१ टक्के यांनीं ठरावाला पाठिंबा दिला म्हणजे पुरे. अध्यक्षाला दूर करणें झाल्यास कलम ५० मध्यें जशी व्यवस्था आहे, तशी उपाध्यक्षाबाबत नाहीं. उपाध्यक्षाला दूर करणें वरिष्ठ सभागृहाला सोपें आहे. ५१ टक्के सभासद ठरावाला पाठिंबा देणारे असले, म्हणजे पुरे आहे.

**अध्यक्षाचीं कामें करण्याबाबत कायदा**

**५७. या प्रकरणांत सांगितलेल्या परिस्थितिव्यतिरिक्त परिस्थिति उत्पन्न झाल्यास अध्यक्षाची कामें कशीं व्हावींत याबाबतची व्यवस्था पार्लमेंट कायदा करून ठरवील.**

सर्वसामान्यपणें व्यवस्था वरील कलमांतून सांगितली आहे. तथापि अकल्पित असें कांहीं घडलें तर त्या दृष्टीनें सर्वसामान्य असा अधिकार कायद्यानें कुणाला तरी दिलेला असतो. पार्लमेंट जरूर तर या दृष्टीनें कायदा करील. मृत्यु, राजीनामा, आजारीपण, अन्य कारणानें गैरहजेरी हीं सर्व अनुमानून व्यवस्था केलीच आहे. तथापि, सर्वसंकल्पी असा अधिकार असावा व तो कोणाला तरी असावा या दृष्टीनें हें कलम आहे व त्याला अनुसरून पार्लमेंट कायदा करूं शकेल.

**अध्यक्ष व उपाध्यक्षाच्या निवडणुकीबाबत**

**५८. ( १ ) अध्यक्ष अगर उपाध्यक्षाच्या निवडणुकीबाबत कांहीं शंका अगर तंटा उपस्थित झाल्यास त्याचा निकाल प्रमुख न्यायालयानें करावा व तो निकाल अखेरचा राहील.**

**( २ ) घटनेंतील व्यवस्थेला अनुसरून अध्यक्ष वा उपाध्यक्ष याच्या निवडणुकीसंबंधींच्या बाबतींत पार्लमेंट कायद्यानें जरूर तर नियमन करील.**

निवडणुकीसंबंधीं सर्व विवाद्य प्रश्नांचा अखेरीचा निकाल करण्याचा अधिकार प्रमुख न्यायालयाला दिला आहे. योग्य प्रकारें उमेदवार दाखल केला कीं नाहीं,

मतदान योग्य झालें कीं नाहीं, मोजणी योग्य झाली कीं नाहीं इत्यादी प्रश्न हे न्यायालय चौकशी करून निकालांत काढील. तसेंच निवडणुकीबाबत नियमन करण्याचाही अधिकार पार्लमेंटला आहे, व कायदा करून हें होईल.

**शिक्षेंत फेरफार करण्याचा अध्यक्षाचा अधिकार**

५९. (१) माफी देणें, शिक्षा तहकूब करणें, ती कमी करणें अगर तिची अंमलबजावणी तहकूब करणें हे अधिकार पुढील गुन्ह्यांसाठीं शिक्षा झालेल्या माणसाबाबत अध्यक्षाला आहेत—

(अ) लष्करी कोर्टानें शिक्षा अगर दोष दिलेल्या सर्व खटल्यांत; तसेंच,

(ब) पार्लमेंटला ज्याबाबत कायदा करतां येतो, अशा कायद्याखालीं शिक्षा झाली असेल, पण ज्या घटकराज्यांत गुन्हा घडला, त्याच्या कायदेमंडळाला ज्याबाबत कायदा करतां येत नाहीं अशा सर्व खटल्यांत; तसेंच,

(क) जेथें फांशीची शिक्षा दिली असेल, अशा सर्व खटल्यांत हे अधिकार त्याला चालवितां येतील.

(२) वर १ (अ) यानें, कायद्यानें एकाद्या लष्करी अंमलदाराला लष्करी कोर्टाची शिक्षा तहकूब करण्याचा, रद्द करण्याचा अगर कमी करण्याचा जर अधिकार दिला असेल तर त्याला बाध येणार नाहीं.

(३) वर १ (क) यानें, विद्यमान कायद्यानें घटक प्रांताच्या प्रमुखास (गव्हर्नर) अगर घटक संस्थानाच्या अधिपतीस फांशीची शिक्षा तहकूब करणें, अगर तीऐवजीं दुसरी देणें याबाबत कांहीं अधिकार असल्यास त्यास बाध येणार नाहीं.

राष्ट्रप्रमुखास वरील कलमांत दिलेले अधिकार असणें जरूर आहे. राज्यांत दया दाखविण्याचा अखेरचा अधिकार राजाला असतो. इंग्लंडच्या घटनेंत राजाला

दयेचा झरा मानलें आहे. राष्ट्राध्यक्ष अगर राष्ट्रपति याला पण तसेंच मानून असे सर्व अधिकार असणें श्रेयस्कर आहे. न्यायालयानें न्याय दिला, शिक्षा सांगितली, कायद्यानें आपली प्रतिष्ठा सांभाळली, समाजानें व्यक्तीला समाजाच्या संरक्षणार्थ अवश्य दोष दिला, तरी मानव्याच्या दृष्टीनें राज्याला कांहीं कर्तव्य उरतेंच व उचित परिस्थितींत तें करण्यासाठीं हा कलमांतील अधिकार आहे. शिक्षा दिली म्हणजे ती सर्व व पूर्णपणें अमलांत आणलीच पाहिजे असें नाहीं. शिक्षा सूडभावनेची नसावी. न्यायाला दयेची झालर असावी. कायदा कठोर झाला म्हणून समाजानें कांहीं दयार्द्रता दाखविणें अंतिम दृष्टीनें श्रेयस्कर असतें. पुष्कळ वेळां न्याय होतोच असेंही नाहीं. नकळत भावनामय वातावरण न्यायालयास पण गुरफटून घेतें. अशा वेळीं विवेकानें अपराध व शिक्षा यांत समतोलपणा आणण्याचें काम राजाचें असतें. येथें तें अध्यक्षानें करावयाचें आहे. लष्करी अधिकाऱ्यासही कायद्यानें हक्क दिला असल्यास त्याला या कलमानें बाध येणार नाहीं. तसेंच विद्यमान कायद्यानें, तसा अधिकार कोणास दिला असल्यास त्यासही बाध येणार नाहीं. हा अधिकार अध्यक्षाला सर्व लष्करी कोर्टांतील खटल्यांबाबत व तसेंच हिंदुस्थानांतील पार्लमेंटनें केलेल्या कायद्याखालील सर्व खटल्यांबाबत चालवितां येईल. मात्र घटक कायदेमंडळाला आपल्या क्षेत्रांत ज्याबाबत कायदा करण्याचा हक्क आहे त्या कायद्याप्रमाणें शिक्षा झाल्यास ती माफ करण्याचा अधिकार मात्र येथें वगळला आहे. तो हक्क पुढें प्रांतपति अगर प्रांतप्रमुख यांना दिला आहे. ज्या क्षेत्रांत घटक कायदेमंडळाला कायदा करण्याचा अधिकार नाहीं, व जेथें तो अधिकार पार्लमेंटला आहे, त्या ठिकाणीं कायद्यानें शिक्षा झाली असेल, तर तेथेंही हा अधिकार अध्यक्षाला आहे.

संघाची कार्यकारी सत्ता

**६०. (१) घटनेंतील व्यवस्थेला अनुसरून संघराज्याची कार्यकारी सत्ता खालील क्षेत्रांत राहील:**

**(अ) ज्या बाबतींत पार्लमेंटला कायदे करण्याची सत्ता आहे आणि**

**(ब) कुठल्याही करारान्वयें अगर तहनाम्यान्वयें जे अधिकार, हक्क अगर क्षेत्र हिंदी सरकारला मिळाले असतील, त्यांच्या अंमलबजावणीबाबत.**

**तथापि वर ( अ ) यांत सांगितलेल्या क्षेत्राबाबत मात्र जेथें घटक राज्याला कायदे करण्याची सत्ता आहे, अशा बाबतींत घटनेंत स्पष्टपणें अधिकार दिला नसेल, अगर पार्लमेंटनें कायदा करून त्या बाबतींत अधिकार दिला नसेल तर तेथें कार्यकारी सत्ता संघराज्याला चालवितां येणार नाहीं.**

**( २ ) पार्लमेंटनें अन्य व्यवस्था करीपर्यंत, ही घटना अमलांत येण्यापूर्वी एखादा घटक ( State ) अगर अधिकारी अगर अधिकार-संस्था ( Authority ), ज्याबाबत पार्लमेंटला कायदा करण्याचा अधिकार आहे अशाबाबत जर कांहीं कार्यकारी सत्ता चालवीत अगर कार्य करीत असेल, तर या कलमांत कांहीं असलें तरी तें तसेंच करीत राहण्यास त्यांना अधिकार राहील.**

संघराज्याच्या कार्यकारी सत्तेचें ( Executive Power ) क्षेत्र या कलमांत सांगितलें आहे. ज्या बाबतींत कायदे करण्याची ( Legislative Power ) सत्ता पार्लमेंटला आहे तें सर्व क्षेत्र यांत येतें. शिवाय करारानें अगर तहनाम्यानें जें कांहीं क्षेत्र मिळालें असेल तेंही येतें. उदाहरणार्थ, संस्थानांनीं अगर प्रांतांनीं कांहीं बाबी ज्या त्यांच्याच आहेत अशा, स्वखुषीनें सोयीच्या अगर कार्यक्षमतेच्या दृष्टीनें मध्यवर्ती सरकारला दिल्यास, त्या क्षेत्रांत मग मध्यवर्ती सरकारची कार्यकारी सत्ता चालेल. अर्थात् हें करारानें होईल. तसेंच तहनाम्यानेंही कांहीं क्षेत्र, हक्क अगर अधिकार मिळाल्यास तेथेंही मध्यवर्ती सरकारची कार्यकारी सत्ता चालेल. उदाहरणार्थ, परदेशांत हिंदी नागरिकांबाबत कांहीं तहनामा होऊन कांहीं बाबी जर हिंदी सरकारकडे आल्या, तर त्या बाबतींत कार्यकारी सत्ता हिंदी सरकारची राहील.

सत्तेच्या बाबींचें वर्गीकरण घटनेंत पुढीलप्रमाणें केलें आहे. सर्वस्वीं मध्यवर्ती, सर्वस्वीं घटकांच्या, व उभयान्वयी अगर सामान्य. सर्वस्वीं मध्यवर्तींत सर्व अधिकार संघ-सरकारचा, सर्वस्वीं घटकांच्या बाबतींत सर्व अधिकार घटकांचा, उभयान्वयी अगर सामान्य यांत अधिकार दोघांचाही. जेथें अधिकार दोघांचाही आहे, तेथें मात्र प्रत्यक्ष घटनेंत व्यवस्था असेल, अगर तसा स्पष्ट कायदा पार्लमेंटनें केला असेल तरच संघराज्याची कार्यकारी सत्ता तेथें चालेल. याचा अर्थ सामान्य बाबींत प्राथमिक अधिकार कार्यकारित्वाच्या दृष्टीनें घटकांचा. घटनेंत अन्य व्यवस्था केल्यास अगर पार्लमेंटनें कायदा केल्यास मात्र तो संघराज्याला मिळेल. सामान्य क्षेत्रांत

दोघांनाही कायदे करतां येतात. मात्र संघराज्याचा कायदा प्रभावी मानला जातो. त्याला विसंगत असें जेवढें घटक राज्याच्या कायद्यांत असेल, तें रद्दबातल समजलें जातें.

घटनेच्या सुरुवातीस जेथें कुठें कार्यकारी सत्ता घटक राज्याकडे अगर अधिकाऱ्याकडे, ती बाब पार्लमेंटच्या क्षेत्रांत असून सुद्धां, जर चालू असेल तर पार्लमेंट कायदा करीपर्यंत ती चालू राहील. म्हणजे संक्रमण काळांत अव्यवस्था नको. एकूण ( २ ) यांतील व्यवस्था आहे.

## मंत्रिमंडळ

**मंत्रिमंडळ व अध्यक्षांस सल्लामसलत**

**६१. ( १ ) मुख्य प्रधानाच्या नेतृत्वाखालीं एक मंत्रिमंडळ असेल व या मंत्रिमंडळाचें काम अध्यक्षास त्याचीं कामें करण्याबाबत सल्लामसलत देण्याचें राहील.**

**( २ ) मंत्रिमंडळानें अध्यक्षास सल्ला दिला किंवा, नाहीं अगर तो काय दिला, याबाबत न्यायालयाला चौकशी करण्याचा अधिकार नाहीं.**

अध्यक्ष हा कार्यकारी सत्तेचा प्रमुख समजला असून त्याला सल्लामसलत देणारें मंत्रिमंडळ राहील. या मंत्रिमंडळाचें प्रमुखपद मुख्य प्रधानाचें राहील. मंत्रिमंडळानें सल्ला दिला किंवा नाहीं अगर काय दिला या गोष्टी न्यायालयाच्या कक्षेंत येणार नाहींत. लोकशाही ही एक राज्यकारभाराची पद्धत आहे. लोकशाही जबाबदार राज्यपद्धतीच्या स्वरूपाची असूं शकेल अगर बिनजबाबदार पद्धतीची पण असूं शकेल. पहिल्या प्रकारांत राज्यप्रमुख जो असेल, त्याला मंत्रिमंडळाच्या सल्लामसलतीनेंच काम चालवावें लागतें. मंत्रिमंडळ हें लोकसभेला किंवा विधिमंडळाला जबाबदार असतें. विधिमंडळाचा मंत्रिमंडळावर विश्वास नसेल तर तें मंत्रिमंडळ राजिनामा देईल. अगर मंत्रिमंडळ राज्यप्रमुखाला विधिमंडळाची नवीन निवडणूक करण्याची, घटनेंत त्याप्रमाणें व्यवस्था असल्यास सल्लामसलत देईल. घटनेंत नवीन निवडणूक मुदतीपूर्वी करण्याची व्यवस्था नसेल, तर राज्यप्रमुख ज्या सभासदामागें बहुमत असेल, अगर तसें होईल असें वाटत असेल, त्याला मंत्रिमंडळ बनविण्यास आज्ञा करील. मुख्य मुद्दा असा कीं विधिमंडळानें अविश्वासाचा ठराव केल्यानंतर तें मंत्रिमंडळ ठेवलें जाणार नाहीं. कारण तें लोकमताविरुद्ध होईल. राज्यप्रमुख राजा असो अगर निवडून आलेला अध्यक्ष असो, तो सनदशीर प्रमुख असून वरीलप्रमाणें त्याला वागावें लागतें. दुसऱ्या प्रकारांत राज्यप्रमुख हा निवडून आलेला अध्यक्ष असतो व त्याला वाटेल ते मंत्री तो घेतो. हे मंत्री विधिमंडळाचे सभासद नसतात. तेव्हां त्यांच्यावर अविश्वासाचा ठराव

येण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. शिवाय मंत्री हा आपल्या खात्यापुरता कारभार पाहतो, व तेवढ्यापुरता अध्यक्षाला तो जबाबदार असतो. एकाला बडतर्फ केलें तरी बाकीचे राहतात. कारण तेथें संयुक्त जबाबदारीचें तत्त्व नाहीं. उलट पहिल्या प्रकारांत संयुक्त जबाबदारीचें तत्त्व असून एका मंत्र्याविरुद्ध जरी अविश्वासाचा ठराव पास झाला, तरी सर्व मंत्रिमंडळाला राजिनामा द्यावा लागतो. जबाबदारी ही जथीमथी असते. पहिल्या प्रकाराला विधिमंडळाधीन लोकशाही ( Parliamentary Democracy ) म्हणतात. दुसऱ्याला अध्यक्षीय ( Presidential ) लोकशाही म्हणतात. या घटनेंत पहिल्या प्रकारची पद्धति आहे.

अध्यक्षाला दिलेला सल्ला हा गुप्त राहिला पाहिजे. त्याबाबत न्यायालयाला चौकशी करण्याचा अधिकार दिला, तर कठीण प्रसंग येईल व दर वेळेला दिलेला सल्ला योग्य कीं अयोग्य ठरवून दोष अगर शिक्षा देणें पडलें तर राज्यकारभार चालणार नाहीं. अयोग्य सल्ला दिला व लोकांना नापसंत पडला, तर साहजिक लोकांचे प्रतिनिधि पार्लमेंटमध्यें अविश्वासाचा ठराव आणून मंत्रिमंडळाला कामावरून दूर करतील. अध्यक्षानें सल्ला ऐकला पाहिजे. त्यानें न ऐकला व मंत्रिमंडळाला पार्लमेंटमध्यें पाठिंबा असेल तर अध्यक्षाचें वर्तन घटनेविरुद्ध ठरेल व योग्य तो इलाज पार्लमेंट करील. लोकमताला मंत्रिमंडळ अगर अध्यक्ष दोघांनाही या रीतीनें जबाबदार राहावें लागतें. वाईट सल्ल्याचें प्रायश्चित्त, तसेंच चांगला सल्ला न ऐकल्याचे परिणाम वरीलप्रमाणें आहेत. पण या बाबतींत न्यायालयाला अधिकार नाहीं. प्रसिद्धि ही शाप आणि वर दोन्ही आहे. चौकशी म्हणजे प्रसिद्धि आहे. या राजकारणांत चौकशीला स्थान नसणेंच योग्य आहे.

**मंत्र्यांबाबत अन्य व्यवस्था**

**६२. ( १ ) मुख्य प्रधान अगर पंतप्रधान याची नेमणूक अध्यक्ष करील व अन्य मंत्री अध्यक्ष पंतप्रधानाचे सल्लामसलतीनें नेमील.**

**( २ ) अध्यक्षाची मर्जी असेपर्यंत मंत्री हे कामावर राहतील.**

**( ३ ) मंत्रिमंडळ हें संयुक्त रीतीनें पार्लमेंटच्या लोकसभेला जबाबदार राहील.**

**( ४ ) अधिकारस्वीकार करण्यापूर्वी पदग्रहणाबाबत व गुप्तते-संबंधीं प्रत्येक मंत्र्याला अध्यक्ष शपथ देईल. सदहू शपथेचा नमुना परिशिष्ट ३ मध्यें दिला आहे.**

(५) जर एखादा मंत्री सारखा सहा महिनेपर्यंत पार्लमेंटच्या कुठल्याही सभागृहाचा सभासद नसेल, तर त्याचें मंत्रीपद आपोआप रद्द होईल.

(६) मंत्र्याचें वेतन व अन्य प्राप्ति हीं पार्लमेंट कायदा करून ठरवील व तोंपर्यंत परिशिष्ट २ मध्यें सांगितलेली व्यवस्था अमलांत राहील.

या कलमांत मंत्रिमंडळ हें संयुक्त जबाबदारीचें असेल व तें लोकसभेला जबाबदार असें राहील हें स्पष्ट सांगितलें आहे. लोकसभा ही लोकप्रतिनिधींची सभा; या सभेंत ज्या नेत्याला अगर ज्या पक्षाला बहुमत असेल, तोच पक्ष मंत्रिमंडळ बनवूं शकेल हें उघड आहे. अल्पमत असून एखादा पक्ष अगर त्याचा नेता फार काळ मंत्रिमंडळ टेऊं शकणार नाहीं. लोकसभेचा विश्वास हा या योजनेचा मुख्य गाभा आहे. विश्वास हा बहुमतानें कळणार म्हणून ज्या पक्षाला बहुमत, त्याच्या नेत्याला अध्यक्ष पंतप्रधान नेमून मंत्रिमंडळ बनविण्याची आज्ञा करील. हा बहुमतवाला पक्ष एकसंघी असेल, अगर अनेक पक्षांचें अगर गटांचें तात्पुरतें अगर मर्यादित कामापुरतें एकत्र झालेलें व जुळलेलें मंडळ, असेंही त्याचें स्वरूप असेल. सार्वत्रिक निवडणुकींत उघड उघड बहुमत मिळून आलेला पक्ष असल्यास त्याचें मंत्रिमंडळ दीर्घकाल टिकणें शक्य असतें. किंबहुना अशी लोकशाही यशस्वी होण्याकरितां राष्ट्रांत दोन पक्ष अवश्य आहेत. पक्ष अधिक झाल्यास व कोणालाही निर्भेळ बहुमत नसल्यास राज्यकारभारांत अस्थिरता व अविश्वास उत्पन्न होतो. जसे दोन पक्ष पाहिजेत, तसेंच बहुमतवाल्या पक्षानें आपला नेता निवडून त्यावर विश्वास ठेवला पाहिजे. त्याला त्याचे सहकारी मंत्री निवडण्यास पूर्ण मुभा पाहिजे. निवडणुकींत त्याचेंच व्यक्तिमत्व प्रभावी ठरतें हा अनुभव आहे. पक्षानें मंत्री निवडल्यास पक्षनेत्याची कदर राहत नाहीं व त्याचें नेतृत्व हें ठिसूळ ठरतें. म्हणून हा अधिकार त्याला पक्षानें द्यावा. मंत्री निवडतांना तो अर्थात् पक्षाचा सल्ला घेईल. पण त्यावर बंधन नसावें. असें झालें तरच लोकशाही यशस्वी होईल. नाहीं तर त्याचें नेतृत्व अस्थिर होतें व गटबाजी म्हणजे यशस्वी राजकारण असा सिद्धांत बसतो. अर्थात् या कलमांत पक्षानें काय करावें याचा उल्लेख नाहीं. पण अन्य मंत्री पंतप्रधानाचे सल्ल्यानें अध्यक्ष नेमील हें स्पष्ट केलें आहे. ज्याच्या मागें बहुमत नाहीं, त्याला पंतप्रधान नेमण्यास कायदेशीर अडचण नाहीं; पण लोकसभेचा विश्वास त्यावर पाहिजे, याचाच अर्थ बहुमतवाल्या नेत्यालाच पंतप्रधान नेमलें पाहिजे, हाच होतो.

तसेंच मंत्रिमंडळ संयुक्त रीतीनें लोकसभेला जबाबदार, याचा अर्थ मंत्रिमंडळाचा प्रत्येक निर्णय अगर कृत्य–मग तें कोणत्याही खात्यासंबधीं असो–सर्व मंत्र्यांचें समजलें जाईल. त्याबद्दल वैयक्तिकपणें कोणी मंत्री जबाबदार न राहतां सामुदायिकपणें सर्व मंत्रिमंडळ जबाबदार राहील. संयुक्त जबाबदारी याचा अर्थ, अध्यक्षाला व्यक्तिशः कोणाही मंत्र्याला पंतप्रधानाच्या सल्ल्याशिवाय काढतां येणार नाहीं. पंतप्रधान अध्यक्षाला एका दृष्टीनें जबाबदार व बाकीचे मंत्री पंतप्रधानाला जबाबदार व मंत्रिमंडळ कायद्यानें लोकसभेला जबाबदार. लोकसभेंत कुठल्याही खात्यावर अगर खात्याबाबत अविश्वासाचा ठराव आला, अगर महत्त्वाच्या बाबतींत सभागृहानें अविश्वास दाखविला, तर त्याचा परिणाम मागें सांगितल्याप्रमाणें त्या खात्यावरच न होतां सर्व मंत्रिमंडळ रद्द होतें. ही जबाबदारी जथीमथी आहे. तसेंच कोणाही मंत्र्याला वैयक्तिक मत सांगतां येणार नाहीं. मंत्रिमंडळांत चर्चा होईल, निर्णय बहुमतानें घेतला जाईल व मग झालेला निर्णय मंत्रिमंडळाचा म्हणून सर्वांनीं तो आपला समजून अमलांत आणावयाचा असतो; त्याचा पाठपुरावा करावयाचा असतो. निकाल विरुद्ध गेल्यास वाटेल तर त्या मंत्र्यानें आपला राजिनामा पंतप्रधानाकडे द्यावा. पण कामावर राहावयाचें असेल तर मंत्रिमंडळाचा निर्णय अमलांत आणलाच पाहिजे. हें मुख्य सूत्र आहे. यानेंच मंत्रिमंडळांत एकता राहते, एकसंघीपणा उत्पन्न होतो. मंत्रिमंडळाचें काम कसें चालतें हें जाणणें महत्वाचें आहे. प्रत्येक मंत्र्याला संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वामुळें प्रत्येक क्षेत्रांतील बाबीबद्दल मत देण्याचा अधिकार असतो. खात्याचा मंत्री माहिती पुरवतो; आपलें मत मंडळांत मांडतो. नंतर चर्चा होऊन बहुमतानें निर्णय होतो. जेथें संयुक्त जबाबदारी नाहीं, तेथें खातेंप्रमुख व राज्यप्रमुख हे चर्चा करून निर्णय घेतात. बाकीच्या मंत्र्यांचा संबंध नसतो. वाटल्यास त्यांना विचारविनिमयांत घेण्यांत येतें. उलट संयुक्त जबाबदारींत प्रत्येक मंत्र्याला दुसऱ्या मंत्र्याच्या खात्यांतील धोरणाबाबत माहिती दिली जाते व मागतां येते. एखादें प्रकरण निर्णयासाठीं मंडळापुढें यावें असें सांगतां येतें. जबाबदारी येणार म्हणून माहिती मिळणें व पूर्ण विचारविनिमय होणें हे कायदेशीर हक्क सर्व मंत्र्यांना संयुक्त जबाबदारींत प्राप्त होतात. संयुक्त जबाबदारींत अधिक लोकशाही आहे, अधिक लोकमत प्रतिबिंबित होतें.

मंत्रिमंडळ हें अध्यक्षाच्या मर्जीवर अवलंबून आहे; म्हणजे अध्यक्षाला वाटेल त्या वेळेस त्याला तें काढतां येईल. हा कायदा झाला. पण याच कलमांत मंत्रिमंडळ हें लोकसभेला जबाबदार आहे असें म्हटलें आहे; याचा अर्थ जोंपर्यंत सदहू मंत्रिमंडळाला लोकसभेचा बहुमताचा पाठिंबा आहे, तोंपर्यंत अध्यक्षाला तें नको असलें तरी काढतां येणार नाहीं. अगर त्यांतील कोणाही मंत्र्याला पंतप्रधानाच्या सल्ल्याशिवाय

काढतां येणार नाहीं. समजा, अध्यक्षानें मंत्रिमंडळ बडतर्फ केलें व दुसरें नेमलें, तर दुसऱ्या मंत्रिमंडळाला बहुमत मिळून तें जिवंत राहिलें पाहिजे. तें न झालें, तर मंत्रिमंडळ जाईल. ‘आणीबाणीची परिस्थिति’ जाहीर करून अध्यक्ष फार तर थोडा काळ मंत्रिमंडळाशिवाय अगर बहुमत नसलेल्या मंत्रिमंडळाच्या साहाय्यानें कारभार चालवूं शकेल. पण हेंही थोडा वेळ; नाहीं तर देश विरुद्ध अध्यक्ष असें होऊन अध्यक्षासच जावें लागेल. तात्पर्य, कायद्यांत जरी मंत्रिमंडळ हें अध्यक्षाची मर्जी असेपर्यंत राहील असें असलें, तरी प्रत्यक्ष वर लिहिल्याप्रमाणें घडून येईल व इतर देशांतील अनुभवही असाच आहे.

मंत्रिपद स्वीकारण्यापूर्वी अध्यक्ष अधिकाराबाबतची व गुप्तता ठेवण्याबाबतची शपथ प्रत्येक मंत्र्याला देईल. अधिकारावर असतांना, मत्सर, शत्रुत्व, मोहब्बत वगैरे न धरतां केवळ देशाचें हित डोळ्यांपुढें ठेऊन काम केलें पाहिजे हें उघड आहे. निदान तशी प्रतिज्ञा अगर शपथ घेऊन मंत्रिपद स्वीकारावयाचें असतें; तसेंच घटनेशीं निष्ठावंत राहीन अशीही प्रतिज्ञा घ्यावी लागते. पक्षबाजी, गटबाजी होऊं नये, राज्यकारभार निःस्पृह व निःपक्षपातीपणें चालावा हा उद्देश शपथ घेण्यांत आहे. शपथेप्रमाणें मंत्री वागेल हा विश्वास आहे, म्हणून ही व्यवस्था आहे. गुप्तता राखणें ह्याही बाबतींत मंत्र्याला शपथ घ्यावी लागेल. राज्यकारभार लोकशाहीचा झाला, तरी प्रत्येक गोष्ट जाहीर झाली तर कठीण प्रसंग येईल. युद्ध, कर, वगैरे अनेक गोष्टी अशा आहेत कीं, ज्याबाबत कांहीं काळ तरी गुप्तता ठेवणें इष्ट आहे. म्हणून मंत्री या नात्यानें ज्या गोष्टी मंत्र्यापुढें येतील, अगर कळतील, त्याबाबत त्यानें गुप्तता राखिली पाहिजे. राज्यकारभाराच्या कार्यक्षमतेच्या दृष्टीनें हें अगदीं योग्य आहे.

( ५ ) यांत मंत्री हा सहा महिन्यांच्या अवधीनंतरही पार्लमेंटचा सभासद जास्त दिवस नसेल तर त्याचें मंत्रीपद जाईल. याचा अर्थ असा आहे कीं, मंत्री हा सामान्यतः पार्लमेंटचा सभासद पाहिजे. तो लोकप्रतिनिधि पाहिजे. लोकांशीं त्याचा संबंध आला असला पाहिजे. लोकांनीं त्याला विश्वासानें निवडून दिला असावा. अपवाद प्रसंगीं एखादा उत्कृष्ट कार्यकर्ता निवडून येत नाहीं; पण त्याच्या कर्तृत्वाची देशाला जरूरी असते, म्हणून त्याला मंत्री म्हणून घेतां येईल. मात्र ६ महिन्यांच्या आंत त्यानें पार्लमेंटचे सभासद म्हणून निवडून आलें पाहिजे. अशी व्यवस्था सर्वत्र आहे व असणें अगदीं योग्य आहे.

( ६ ) यांत वेतन व अन्य प्राप्ति याबाबत पार्लमेंट कायदा करील व तोंपर्यंत २ ऱ्या परिशिष्टांतील व्यवस्था अमलांत राहील. कायद्यानें वेतन मुक्रर झालें म्हणजे दरसाल ती बाब पार्लमेंटपुढें येण्याचें कारण नाहीं. अविश्वासाचा ठराव आणून मंत्रिमंडळ दूर करणें हा सनदशीर मार्ग आहे. त्याबद्दल उल्लेख पुढें येईल.

## हिंदुस्थानचा कायद्याचा प्रमुख सल्लागार

कायद्याचा सल्लागार

६३. (१) प्रमुख न्यायालयांत न्यायाधीश होण्याच्या लायकीच्या इसमाला अध्यक्ष हिंदुस्थानचा कायद्याचा प्रमुख सलागार म्हणून नेमील.

(२) कायद्यासंबंधीं सर्व बाबतींत हिंदुस्थान सरकारला सल्ला देणें, तसेंच कायदेविषयक सर्व कामें करणें, तसेंच घटनेप्रमाणें अगर अन्य कायद्याप्रमाणें जीं कामें करणें आहे, तीं सर्व या कायद्याच्या प्रमुख सलागारानें करावयाचीं आहेत.

(३) वर लिहिलेलीं कामें करण्यासाठीं हिंदुस्थानांतील कुठल्याही कोर्टांत हजर राहून काम चालविण्याचा त्याला अधिकार आहे.

(४) अध्यक्षाची मर्जी असेपर्यंत कायद्याचा प्रमुख सलागार अधिकारावर असेल व त्याला अध्यक्ष ठरवील तें वेतन मिळेल.

हिंदुस्थानचा एक कायद्याचा प्रमुख सल्लागार राहील. त्याची लायकी प्रमुख न्यायालयांत न्यायाधीश होण्याइतकी असेल. त्याचीं कामें (२) मध्यें सांगितलीं आहेत. तो सरकारचा व अध्यक्षाचाही सल्लागार राहील. कायद्याचा प्रमुख सल्लागार म्हणून प्रत्येक कोर्टांत तो कामासाठीं गेला म्हणजे त्याचें म्हणणें त्या कोर्टानें ऐकून घेतलें पाहिजे. एका प्रांताचा वकील दुसऱ्या प्रांताच्या कोर्टांत हक्कानें काम करूं शकत नाहीं. म्हणून प्रमुख कायद्याच्या सल्लागाराला हा हक्क दिला आहे. कारण तो हिंदुस्थान सरकारचा सल्लागार आहे.

## सरकारी कामकाजाची पद्धत

हिंदुस्थानसरकारच्या कामकाजाबाबत

६४. (१) सर्व कार्यकारी काम अध्यक्षाच्या नांवानें केलें जाईल.

(२) सर्व तऱ्हेचे हुकुम व अन्य आदेश जे अध्यक्ष काढील ते खरे आहेत हें समजण्याच्या दृष्टीनें ते कसे काढले

**जावेत, हें अध्यक्ष नियम करून ठरवील व त्याप्रमाणें ते निघाल्यानंतर सदहू हुकुम अगर आदेश हे अध्यक्षानें काढले नाहींत असा आक्षेप कुणालाही घेतां येणार नाहीं.**

कार्यकारी सत्तेचा प्रमुख हा अध्यक्ष आहे म्हणून सर्व गोष्टी, सर्व राज्यकारभार त्याच्या नांवानें होईल. सर्व हुकुम व निवेदनें त्याच्या नांवानें जाहीर होतील. इंग्लंडमध्यें राजाच्या नांवानें कारभार चालतो. वास्तविक सर्व निर्णय मंत्रिमंडळाचे असतात. फक्त राजमुखानें ते बाहेर पडतात. राज्यांत द्वाही राजाची, पण कारभार मंत्रिमंडळाचा; तेंच येथें आहे. तह करावा कीं नाहीं, युद्धाची घोषणा, तसेंच अंतर्गत कारभारासंबंधीं साधे हुकुम, वटहुकुम सर्व कांहीं मंत्रिमंडळ ठरवील; मात्र जाहीर जें होईल तें अध्यक्षाच्या नांवानें. सर्व देशांत असेंच असतें. राज्यप्रमुखाच्या नांवानें कारभार चालतो, पण प्रत्यक्ष सत्ता मंत्रिमंडळाची असते. राज्यप्रमुख हा लोकशाहींत सामान्य परिस्थितींत सांगकाम्या म्हणजे मंत्रिमंडळ सांगेल त्याप्रमाणें वागणारा सनदशीर अधिकारी पुरुष होय. म्हणून कागदोपत्रीं व्यवहार त्याच्या नांवानें होतात. त्यानें केलेले हुकुम कसे छापावे, त्यावर कोणता शिक्का असावा व ते खरे केव्हां मानावे यासंबंधीं नियम करण्याचा अधिकार अध्यक्षाला आहे. त्या नियमाप्रमाणें जे आदेश अगर हुकुम निघतील ते तसे आहेत असें मानलें जाईल. त्यांच्या सत्यत्वाबद्दल कोणालाही शंका घेतां येणार नाहीं.

**६५. पंतप्रधान याचीं खालीलप्रमाणें कर्तव्यें राहतील.**

**पंतप्रधान व अध्यक्ष यांबाबत**

**(अ) मंत्रिमंडळाचे संघाच्या राज्यकारभाराबाबतचे सर्व निर्णय, तसेंच नवीन कायद्यांबाबत सूचना अध्यक्षास कळविणें;**

**(ब) तसेंच संघराज्याच्या कारभाराबाबत आणि नवीन होणाऱ्या कायद्याबाबत अध्यक्ष जी माहिती मागेल ती पुरविणें;**

**(क) तसेंच एखाद्या मंत्र्यानें मंत्रिमंडळापुढें न ठेवतां घेतलेला निर्णय मंत्रिमंडळापुढें विचारासाठीं ठेवा असा आदेश अध्यक्षानें दिल्यास त्याप्रमाणें तो ठेवणें.**

राज्यकारभारासंबंधींची सर्व माहिती व मंत्रिमंडळाचे निर्णय हे अध्यक्षाच्या कानावर गेले पाहिजेत. प्रत्येक मंत्री जर अध्यक्षास विलग भेटून सांगूं लागला तर ती गोष्ट संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वाला सोडून होईल. संयुक्त जबाबदारीच्या पद्धतींत मंत्र्याची सरकारी कामासंबंधीं गांठ घेणें झाल्यास अध्यक्षानें पंतप्रधान याच्या संमतीनें ती घेतली पाहिजे. मंत्रिमंडळ व अध्यक्ष यांतील दुवा पंतप्रधान आहे. म्हणून सर्व माहिती व निर्णय पंतप्रधानानें अध्यक्षास कळविले पाहिजेत. अध्यक्षास राज्यकारभाराबाबत संपूर्ण ज्ञान असलें पाहिजे. अध्यक्षास ही माहिती मागण्याचा अधिकार आहे. तसेंच एखादा निर्णय खात्याच्या प्रधानानें घेतला व जर त्यानें त्या बाबतींत मंत्रिमंडळापुढें तें प्रकरण ठेऊन निर्णय घेतला नसेल, तर तो निर्णय मंत्रिमंडळापुढें विचारासाठीं ठेवावा हें सांगण्याचा अध्यक्षाला अधिकार आहे व तसें त्यानें सांगितलें म्हणजे पंतप्रधानानें तें प्रकरण मंत्रिमंडळापुढें ठेवलें पाहिजे. अध्यक्षास निर्णय मंत्रिमंडळाचा आहे असें समजलें म्हणजे त्यांत हस्तक्षेप करणें कठीण असतें. तसेंच मंत्रिमंडळाचा निर्णय मागितला म्हणजे तो जबाबदार रीतीनें घेतला जाईल अशी खात्री असते. अध्यक्ष हा राज्यप्रमुख, व कार्यकारी सत्ता त्याच्या नांवानें चालते, म्हणून त्याला कलमांत सांगितल्याप्रमाणें सर्व माहिती असणें इष्ट आहे व ती पंतप्रधानानें द्यावी हेंही जबाबदार राज्यपद्धतीला धरून आहे.

# प्रकरण २ रें—पार्लमेंट

## सामान्य

**पार्लमेंटची घटना**

**६६. हिंदुस्थानच्या संघराज्यासाठीं पार्लमेंट ( मध्यवर्ती विधिमंडळ ) राहील व त्यांत अध्यक्ष व दोन सभागृहें, वरिष्ठ कायदेमंडळ ( Council of States घटक राज्यांचें मंडळ ) व लोकसभा ( House of the People ) यांचा समावेश असेल.**

अध्यक्ष व दोन्ही सभागृहें मिळून पार्लमेंट होणार. पार्लमेंट म्हणजे मध्यवर्ती विधिमंडळ अधिक अध्यक्ष. एका सभागृहाला वरिष्ठ कायदेमंडळ अथवा घटक राज्यांचें मंडळ हें नामाभिधान दिलें आहे. या सभागृहांतील सभासद हे सर्वसामान्य जनतेमार्फत

निवडले न जातां, घटक प्रांत अगर संस्थानें त्यांना निवडणार आहेत. म्हणजे हे सभासद प्रादेशिक दृष्टिकोणानें निवडले जातील. अमुक लोकांमागें अमुक प्रतिनिधि असें नसून अमुक घटक प्रांत अगर संस्थान याला अमुक प्रतिनिधि, व ते या वरिष्ठ कायदेमंडळांत बसतील. ते प्रदेशांच्या दृष्टीनें हित पाहतील, कारण ते प्रदेशांचें प्रतिनिधित्व करतात. दुसरें सभागृह म्हणजे लोकसभा होय. यांतील सभासद लोक निवडून देतील. पार्लमेंटचीं अशीं हीं दोन सभागृहें राहतील. घटनेंत एक सभागृह असावें का दोन, यांवर अनेकांचे अनेक विचार आहेत. सामान्यतः लहान देश व एकसंघी ( Unitary ) राज्य असूनही अनेक ठिकाणीं दोन सभागृहें आहेत. या देशाचें क्षेत्रफळ, लोकसंख्या, संस्कृतिविषयक वैचित्र्य, विविध भाषा लक्षांत घेऊन घटना संयुक्त पद्धतीवर आधारलेली आहे. हें संयुक्त राज्य अनेक घटक राज्यें एकत्र येऊन तयार होतें. म्हणून एकत्र येणाऱ्या घटकराज्यांना घटकराज्य या भूमिकेवरून प्रतिनिधित्व असणें जरूर आहे. लोकसभेंत सर्व देशांतील जनता सभासद निवडून देईल हें खरें; तथापि लोकांचे सर्वसामान्य हितसंबंध व प्रांत अगर घटकविषयक हितसंबंध सर्वशः एकच अगर मिळणारे जुळणारे असतात असें नाहीं. नागरिक म्हणून एक दृष्टि व विशिष्ट प्रांताचा नागरिक म्हणून दुसरी दृष्टि असूं शकेल. एकच मनुष्य पिता व बंधु असेल व दोन्ही भूमिकांच्या दृष्टीनें त्याचे हितसंबंध प्रसंगीं निरनिराळे असतील. म्हणून दोन सभागृहांची आवश्यकता आहे. वरिष्ठ सभागृह हें मर्यादित निर्वाचन क्षेत्रांत निवडून आलेल्या सभासदांचें सामान्यतः असतें. वरिष्ठ अगर दुसरें सभागृह निवडणुकीच्या बाबतींत भिन्न स्वरूपाचें असणें इष्ट आहे. एकाच चरवींतून दूध लहान अगर मोठ्या मापानें घेतलें तर फरक कांहींच नाहीं. उलट कांहीं दूध व बासुंदी अशी घेतली, तर दोन्हीचें स्वरूप व चव पण निराळी असणार. कांहीं टीकाकार कामाच्या दृष्टीनें या दोन सभागृहांत फरक करतात. कांहीं अधिकार केवळ लोकसभेलाच असतात व वरिष्ठ सभेला फक्त काम लांबविण्याचा अगर फरक सूचविण्याचा अधिकार असतो. कांहीं घटनांत बजेट व कराबाबत चालकत्व ( Initiative ) फक्त लोकसभेलाच असतें. निवडणुकीची पद्धत, प्रतिनिधींचें स्वरूप व कार्यक्षेत्र या तीन्ही बाबतींत दोन्ही सभागृहांत भिन्नता असते व असली पाहिजे. कांहीं टीकाकार असा आक्षेप घेतात कीं, जर वरिष्ठ सभागृह लोकसभेप्रमाणेंच होला हो म्हणणार असेल, तर त्याची जरुरी नाहीं, तें व्यर्थ आहे, व जर लोकसभेला विरोध करणारें असेल, तर कामांत व्यत्यय आणणारें म्हणून अनिष्ट आहे. परंतु दुसरें सभागृह असणें अनेक दृष्टींनीं इष्ट आहे. घाईंत, भावनेंत, रागाच्या भरांत, अस्थिर परिस्थितींत लोकसभा चुकीचा निर्णय घेणें शक्य आहे. तोच निर्णय विचारासाठीं वरिष्ठ सभेपुढें आल्यास तेथील सभासदांचें वय, विचार, व्यवसाय व प्रतिनिधित्व

लक्षांत घेतां शांत व समतोलपणें सारासार विचार करून निर्णय होण्याचा अधिक संभव असतो. मर्यादेबाहेर विलंब न लागेल अशी योजना घटनेंत असली म्हणजे झालें. साधारणपणें सर्वत्र दोन सभागृहांची पद्धत आहे. निवडणुकींत फरक आहेत; पण दोन सभागृहांची इष्टता सर्वमान्य झाली आहे. हीच दृष्टि ठेऊन या घटनेंत दोन सभागृहांची व्यवस्था केली आहे.

पार्लमेंटच्या सभागृहासंबंधीं

६७. (१) वरिष्ठ कायदेमंडळाचे २५० सभासद असतील व त्यापैकीं,

(अ) पंधरा सभासद अध्यक्ष या कलमाचें पोटकलम (२) यांत सांगितल्याप्रमाणें नेमील; आणि

(ब) बाकीचे हे घटक राज्यांचे प्रतिनिधि असतील.

मात्र परिशिष्ट १ भाग ३ यांत सांगितलेल्या संस्थानांचे प्रतिनिधि (ब) यांत सांगितलेल्या बाकीच्या प्रतिनिधिसंख्येच्या ४० टक्क्यांपेक्षां अधिक असणार नाहींत.

(२) पोटकलम १ (अ) या अन्वयें जे इसम अध्यक्ष नेमील ते खालील बाबींबाबत तज्ज्ञ अगर अनुभवी असतील.

(अ) साहित्य, कला, शास्त्र, शिक्षण;
(ब) शेती, मच्छीमारी व तत्सम विषय;
(क) वास्तुशास्त्र व शिल्प;
(ड) राज्यकारभार व सामाजिक सेवा;

(३) पहिल्या परिशिष्टांतील भाग १ अगर ३ यांत नमूद केलेल्या संस्थानांच्या प्रतिनिधींना

(अ) जेथें दोन सभागृहें आहेत तेथें कनिष्ठ सभागृहांतील निवडून आलेले सभासद निवडून देतील;

(ब) जेथें एकच सभागृह आहे, तेथें त्या सभागृहांतील निवडून आलेले सभासद निवडून देतील;

(क) ज्या संस्थानांत सभागृहच नसेल, तेथें पार्लमेंट कायद्यानें जसें ठरवील त्याप्रमाणें त्यांना निवडून दिलें जाईल.

(४) परिशिष्ट पहिलें भाग २ यांत नमूद केलेल्या संस्थानांचे प्रतिनिधि पार्लमेंट कायद्यानें जसें ठरवील त्याप्रमाणें निवडून दिले जातील.

(५) कलम २९२ व २९३ याला बाध न येतां

(अ) लोकसभा ही ५०० पेक्षां अधिक सभासदांची असणार नाहीं व हे सभासद घटक राज्यांतील प्रदेशांतील जनता प्रत्यक्ष निवडून देईल व

(ब) वर पोटकलम (अ) साठीं देशांतील प्रदेश निरनिराळ्या प्रादेशिक मतदार संघासाठीं विभागले जातील, एकत्र केले जातील आणि ते अशा रीतीनें कीं, ५,००,००० लोकांना एकापेक्षां अधिक प्रतिनिधि मिळूं नये व ७,५०,००० लोकांना निदान एक तरी प्रतिनिधि मिळावा.

मात्र परिशिष्ट एक भाग ३ यांतील संस्थानांच्या प्रतिनिधींची वटसंख्या जी असेल, तिचें त्या संस्थानांच्या लोकसंख्येशीं जें प्रमाण असेल तें, परिशिष्ट १ यांतील भाग १ व २ यांत सांगितलेल्या संस्थानांच्या प्रतिनिधींचें त्या संस्थानांतील कुललोकसंख्येशीं जें प्रमाण असेल, त्यापेक्षां अधिक असणार नाहीं.

(क) प्रत्येक प्रादेशिक मतदार संघामार्फत जे प्रतिनिधि ज्या क्षणाला निवडून दिले जातील, त्यांचें त्या मतदार संघांतील लोकसंख्येशीं जें

प्रमाण असेल, तें सामान्यतः सर्व देशभर त्या क्षणाला सारखेंच राहील. लोकसंख्या आधीं झालेल्या खानेसुमारींतील धरली जाईल.

( ६ ) लोकसभेची निवडणूक प्रौढ मतदान तत्त्वावर होईल; म्हणजे ज्याचीं वयाचीं २१ वर्षें पुरीं झालीं असतील व ज्याला घटनेनें अगर अन्य कायद्यानें, वास्तव्य नाहीं म्हणून, वेडा आहे म्हणून, गुन्हेगार अगर लांचलुचपत अगर गैरकायदा वर्तनाबद्दल नालायक ठरविलें नसेल, अशा प्रत्येक नागरिकास मतदारांच्या यादींत नांव प्रविष्ट करून निवडणुकींत मत देण्याचा हक्क राहील.

( ७ ) पार्लमेंट घटक राज्यांव्यतिरिक्त प्रदेशांत राहणाऱ्या नागरिकांसाठीं कायदा करून लोकसभेंतील त्यांच्या प्रतिनिधित्वाबाबत व्यवस्था करील.

( ८ ) प्रत्येक खानेसुमारी पुरी झाल्यानंतर कलम २८९ ला बाध न येतां वरिष्ठ कायदेमंडळांतील घटकांच्या बाबतींत तसेंच लोकसभेच्या मतदार संघांबाबत अवश्य ते फेरफार करण्याबाबत पार्लमेंट कायदा करील व त्यांत सांगितल्याप्रमाणें ते फेरफार अमलांत येतील.

( ९ ) जर परिशिष्ट १ भाग ३ यांतील कांहीं संस्थानांचा गट झालेला असेल व त्या गटामार्फत वरिष्ठ कायदेमंडळांत प्रतिनिधि जात असेल, तर तो गट या कलमापुरता एक घटकराज्य मानला जाईल.

या कलमांत दोन्ही सभागृहें कशी बनतील हें सांगितलें आहे. वरिष्ठ कायदेमंडळांत एकंदर २५० सभासद व त्यांपैकीं, १५ अध्यक्ष नेमील, बाकीचे निवडून येतील. जे १५ नेमले जातील, ते सामान्यतः पोटकलम २ यांत जे विषय सांगितले आहेत, त्यांत तज्ज्ञ अगर अनुभवी असतील. निवडणूक ही एक दगदग आहे व पुष्कळ वेळां कांहीं लोकांना ती नकोशी वाटते; पण हे लोक देशाच्या दृष्टीनें योग्य मार्गदर्शक व सल्लागार असतात. या दृष्टीनें सभागृहांत बुद्धिमान, तज्ज्ञ व अनुभवी लोक किमान कांहीं तरी असावेत या दृष्टीनें ही योजना आहे. जे निवडून येणारे आहेत ते तज्ज्ञ

असतील अगर नसतील. कारण मतदार संघ हे कांहीं कार्यपरत्वें ( functional ) आखलेले नाहींत. वकिलांचा मतदार संघ, वैद्यांचा, शास्त्रज्ञांचा, मुरब्बी सेवकांचा अशी कांहीं व्यवस्था असेल, तर हे लोक निवडून येतात. पण तसें नसेल, तर जे लोकप्रिय व पैसेवाले व ज्यांच्या मागें पक्षसंघटना आहे, असेच निवडून येतील. या कलमानुसार निदान १५ तरी सभासद तज्ज्ञ व अनुभवी असे राहतील; कारण त्यांना अध्यक्ष नेमील. २५० निवडलेल्यांमध्यें १५ नेमलेले हें कांहीं मोठें प्रमाण नाहीं. पण नेमलेल्या सभासदांविषयींचा वाईट अनुभव आला आहे, हेंही विसरतां कामा नये. निरनिराळ्या घटनांत वरिष्ठ सभागृहाच्या निवडीबाबत निरनिराळे प्रकार आहेत. कांहीं ठिकाणीं त्याचे सभासद हयातभर नेमले जातात; कांहीं ठिकाणीं त्याचे मतदार संघ कार्यपरत्वें असतात, तर कांहीं ठिकाणीं मतदारसंघ घटकराज्य हाच असतो; कांहीं ठिकाणीं वंशपरंपरागत सभासदत्व असतें. या कलमांतील व्यवस्था आदर्श नाहीं, पण तूर्त म्हणून ठीक आहे. तसें पाहिलें, तर वरिष्ठ सभागृहाबाबतचा अनुभव कोठेंही विशेष चांगला नाहीं. पण वरिष्ठ सभागृह असणेंही तितकेंच इष्ट आहे.

जे सभासद या वरिष्ठ कायदेमंडळांत निवडून यावयाचे आहेत, त्यांबाबत पोट कलम ३ व ४ यांत व्यवस्था सांगितली आहे. परिशिष्ट १ भाग ३ यांत जीं संस्थानें नमूद आहेत, त्यांचे प्रतिनिधि एकंदर निवडून येणाऱ्या प्रतिनिधींच्या ४० टक्क्यांपेक्षां अधिक असणार नाहींत. एकंदर २३५ सभासद निवडून येतील; त्यांपैकीं ९४ पेक्षां अधिक सभासद निवडून देण्याचा या संस्थानांना अधिकार नाहीं. तसेंच जेथें दोन सभागृहें आहेत, तेथें कनिष्ठ सभागृहानें व त्यांतील निवडून आलेल्या सभासदांनीं हे प्रतिनिधि निवडून द्यावयाचे आहेत. या एकंदर निवड योजनेंत निवड करणारे मतदार हे लोकप्रतिनिधि हवेत. जेथें सभागृहच नसेल, तेथें पार्लमेंट याबाबत कायदा करील.

कनिष्ठ सभागृह अथवा लोकसभा ५०० सभासदांपेक्षां अधिकांची असणार नाहीं. हे सभासद प्रादेशिक मतदार संघांतून निवडून येतील. लोक त्यांना निवडतील व लोकांचे ते प्रतिनिधि असतील. वरिष्ठ सभागृहांतील प्रतिनिधि घटकराज्यांचे व निवडून दिलेल्या प्रतिनिधींनीं निवडून दिलेले असतात. लोकसभेंतील सभासद प्रत्यक्ष लोकांचे प्रतिनिधि असणार. कलम २९२ व २९३ यांत मुसलमान व अन्य अल्पसंख्यांकांना कांहीं काल प्रतिनिधित्व दिलें आहे, तें लक्षांत घेऊन ही सभासदांची संख्या ठरविली जाईल. लोकसभेच्या प्रादेशिक निवडणुकीसाठीं मतदार-संघ बनविले जातील व त्यासाठीं देशाचे जरूर ते व जरूर तसे विभाग करून ७,५०,००० लोकसंख्येला निदान एक तरी प्रतिनिधि मिळेल व ५,००,००० लोकसंख्येला एकाहून अधिक मिळणार नाहीं, अशी व्यवस्था होईल. म्हणजे ५ लाख

लोकसंख्येला एक मिळेलच; ५ लाखांपेक्षां जास्त पण ७॥ लाखांपेक्षां कमी असेल तरी एकच; पण ७॥ लाखांपेक्षां जास्त झाल्यास दोन मिळणें शक्य आहे. १० लाख असल्यास दोन मिळतीलच. तात्पर्य, मतदारसंघाचा व्याप व क्षेत्रफळ ठरवितांना लोकसंख्या हें आधारादाखलचें मुख्य तत्त्व राहील. प्रतिनिधित्व प्रदेशाच्या विस्तारावर अवलंबून नसून लोकसंख्येवर आधारलेलें आहे. तीच गोष्ट परिशिष्ट १ भाग ३ यांत नमुद केलेल्या संस्थानांबाबत लागू पडेल. सामान्यतः मतदारसंघ सारखेच असतील. म्हणजे प्रतिनिधिसंख्या व लोकसंख्या यांचें प्रमाण सर्व देशभर मतदारसंघांतून सारखें ठेवलें जाईल. म्हणजे कांहीं मतदार संघांतून अधिक प्रतिनिधि व कांहींतून कमी असें होणार नाहीं. तीच गोष्ट लोकसंख्या व प्रतिनिधींचें प्रमाण यांबाबत लागू पडेल.

मतदानाचा हक्क प्रत्येक प्रौढ नागरिकाला राहील. प्रौढ म्हणजे २१ वर्षें पुरीं झालेला इसम, स्त्री अगर पुरुष. याच पोटकलम (६) यांत वर्णन केलेली नालायकी त्याच्यांत नसावी. वेडा, गुन्हेगार, वास्तव्य नसलेला इत्यादि बाबी नालायकीच्या सर्वत्र समजल्या जातात. तीच व्यवस्था या घटनेंत आहे. जेथें घटक राज्याचा प्रदेश नसेल अशा ठिकाणीं म्हणजे नुसताच संघराज्यांत असलेला अगर अन्य अशा ठिकाणीं मतदार संघ कसे असावेत, तेथील लोकांना कसें प्रतिनिधित्व मिळावें हें पार्लमेंट कायदा करून ठरवील. अपवादप्रसंगीं व अकल्पित प्रसंगीं अशी सत्ता पार्लमेंटला असणें इष्ट आहे. प्रत्येक खानेसुमारी झाल्यानंतर वरिष्ठ कायदेमंडळ व लोकसभा यांच्या प्रतिनिधिसंख्येबाबत व मतदारसंघांबाबत जरूर ते फेरफार कसे करावे हें ठरविण्याचा कायदा पार्लमेंट करील. एका प्रदेशांतील लोक दुसऱ्या प्रदेशांत जात असल्यामुळें लोकसंख्या कमीजास्त होते. शिवाय प्रादेशिक घटकांच्या क्षेत्रांत अनेक कारणांकरितां बदल होणें शक्य असतें. प्रत्येक खानेसुमारी झाली कीं असा फेरफार करणें लोकप्रतिनिधित्वाच्या दृष्टीनें इष्टच आहे. वर कलमांत दिलेल्या तत्त्वाला अनुसरून हें काम व्हावयाचें आहे. शहरांची लोकसंख्या वाढत आहे; अर्थात् त्यांच्या प्रतिनिधित्वाचें प्रमाणही त्याप्रमाणें वाढवावें लागेल हें उघड आहे. याबाबत अवश्य त्या सर्व गोष्टी करण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे. ही व्यवस्था पार्लमेंट कायदा करून करील. कायम व्यवस्था ही कलम २८९ मध्यें सांगितली आहे. सामान्यपणें निवडणुकीची सर्व देखरेख एका मंडळानें (commission) करावयाची आहे. याबाबत अधिक विवरण पुढें २८९ कलमाच्या ठिकाणीं केलें आहे.

**६८. (१) वरिष्ठ कायदेमंडळ हें बरखास्त होणार नाहीं. परंतु एकंदर सभासदांच्या संख्येपैकीं $\frac{1}{3}$ संख्येइतके सभासद दर दोन वर्षांनंतर निवृत्त होतील व ही व्यवस्था कशी व्हावी हें पार्लमेंट कायदा करून ठरवील.**

**सभागृहांची मुदत**

(२) लोकसभा ही, तिची पहिली बैठक भरेल त्या दिवसापासून पांच वर्षांपेक्षां अधिक काळ राहणार नाहीं; मात्र याही काळांत ती बरखास्त करतां येईल. पांच वर्षांची मुदत संपतांच लोकसभा बरखास्त झाली असें मानलें जाईल.

तथापि आणीबाणीची परिस्थिति जाहीर करण्यासाठीं जारी झालेला हुकुम अमलांत असेपर्यंत वरील पांच वर्षांची मुदत एका वेळीं एक वर्षानें वाढवितां येईल; मात्र आणीबाणीची परिस्थिति संपल्याचें जाहीर झाल्यापासून सहा महिन्यापेक्षां केव्हांही ही मुदत वाढवितां येणार नाहीं.

वरिष्ठ कायदेमंडळ हें बहुतेक देशांतून बरखास्त न होणारें असें आहे. म्हणजे एकदम सर्व सभासद निवडून देण्याचा प्रसंग टाळलेला असतो. उद्देश असा कीं, अनुभवी, जुने व जाणते सभासद हे कांहीं संख्येनें तरी अधिक काळ कायम असावेत. सातत्य व धोरणविषयक सुसज्जता यामुळें शक्य होते. सर्वच सभासद हयातीपर्यंत राहतील तर ती एक प्रतिगामी संस्था होईल. सर्वच सर्व एकाच वेळीं निवडून यावे अशी व्यवस्था असेल तर निवडणुकींत जुन्यांना पुनर्जन्म म्हणजे यश मिळेल हेंही कठीण; म्हणून अनेक घटनांतून एका ठराविक संख्येइतके सभासद निवृत्त होतात व तेवढे पुन: निवडणुकीनें भरले जातात; जे राहतात ते पुढें पाळीपाळीनें निवृत्त होतात. या योगानें वरिष्ठ कायदेमंडळांत अनुभवी माणसांची वाण पडत नाहीं. या कलमांत (१) दर दोन वर्षांनीं ⅓ सभासद निवृत्त होण्याची व्यवस्था आहे. या थोड्या सभासदांच्या अशा निवडणुकीमुळें लोकमतही अजमावलें जातें. पांच पांच वर्षें जर निवडणूक लांबली, तर जनतेला तात्काल आपलें मत सांगतां येत नाहीं. लवकर लवकर निवडणुका केल्या, तर राज्ययंत्र खिळखिळें होण्याचा संभव आहे. वरिष्ठ कायदेमंडळ भागाभागानें दोन वर्षांनीं निवडून यावें व लोकसभा ५ वर्षांनीं निवडून यावी ही व्यवस्था योग्य अशीच आहे. वरिष्ठ कायदेमंडळ अनुभव प्रतिबिंबित करील व लोकसभा लोकप्रियता दर्शवील. पांच वर्षांच्या आंतही लोकसभा बरखास्त करतां येईल. त्याबाबत पुढें उल्लेख येईलच. लोकमत व लोकसभा यांतील विरोध या पांच वर्षांच्या मुदतींतच स्पष्ट व असह्य झाला व पंतप्रधानानें तसा सल्ला दिल्यास लोकसभा मुदतीपूर्वी बरखास्त करतां येईल. आणीबाणीची परिस्थिति असेल, तर त्या वेळीं मुदत संपली म्हणून निवडणूक करणें हें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें इष्ट नाहीं, म्हणून एका

वेळीं एक वर्ष मुदत वाढवितां येईल. मात्र ही वाढ आणीबाणीची परिस्थिति संपल्यानंतर ६ महिन्यांपेक्षां अधिक असणार नाहीं. उद्देश एवढाच कीं, निवडणुकी मुदत संपतांच व्हाव्यात. अपवादप्रसंगींच त्या लांबवितां येतील.

**पार्लमेंटचीं अधिवेशनें, स्थगिति व बरखास्ती**

**६९. (१) पार्लमेंटच्या दोन्हीं सभागृहांचीं अधिवेशनें निदान वर्षांतून दोनदां होतील आणि कोणत्याही लागोपाठ भरणाऱ्या त्या त्या सभागृहाच्या अधिवेशनांत मागील अधिवेशनांतील शेवटली सभा व पुढील अधिवेशनांतील पहिल्या सभेची तारीख यांत ६ महिन्यांपेक्षां अधिक काळ अंतर असणार नाहीं.**

**(२) या कलमांतील व्यवस्थेला अनुसरून अध्यक्षाला वेळोवेळीं**

**(अ) पार्लमेंटचीं दोन्हीं अगर एका सभागृहाचें अधिवेशन त्याच्या मर्जीप्रमाणें ज्या काळीं व ज्या ठिकाणीं त्याला वाटेल, तेथें बोलावितां येईल,**

**(ब) सभागृह स्थगित करतां येईल;**

**(क) लोकसभा बरखास्त करतां येईल.**

सभागृहाचीं अधिवेशनें अध्यक्षानें बोलवावयाचीं आहेत. कलमांत जरी त्याच्या मर्जीवर ही गोष्ट ठेवली असली, तरी त्याची ही मर्जी ही प्रधानमंडळाच्या सांगण्याप्रमाणें चालणारी आहे. वर्षांतून किमान दोन अधिवेशनें भरलींच पाहिजेत. उद्देश हा कीं, जनतेच्या प्रतिनिधींना राज्यकारभाराबाबत माहिती मिळविणें, रास्त टीका करणें, दोषस्थलें दाखविणें, विधायक सूचना करणें, अन्यायाची चौकशी करण्यास भाग पाडणें, याबाबत संधि मिळाली पाहिजे. मंत्रिमंडळाला सुद्धां आपल्यावर जनतेचा विश्वास आहे, हें दाखविण्याची संधि असली पाहिजे. प्रतिनिधिसभा भरल्याशिवाय हें होऊं शकत नाहीं. म्हणून किमान अधिवेशनें किती भरावींत याची व्यवस्था या कलमांत आहे. दोन अधिवेशनांत अंतर ६ महिन्यांपेक्षां अधिक असणार नाहीं. याचाही उद्देश लोकमत वारंवार लोकसभेंतून, विधिमंडळांतून गर्जलें पाहिजे, हा आहे.

अध्यक्ष सभेची जागा व काल ठरवील असें कलमांत सांगितलें आहे. पण हेंही केवळ औपचारिक आहे. सर्व कार्यक्रम मंत्रिमंडळ तयार करतें व त्याप्रमाणें अध्यक्ष तो जाहीर करतो. सभागृहाबाबत तीन अवस्था असतात. (१) तहकुबी

(२) स्थगिति (३) बरखास्ती. अधिवेशन अगर बैठक ही अनेक सभा मिळून होते. दैनंदिन सभा वेळ संपतांच तहकूब होते. पुष्कळ वेळां अनेक दिवसासाठींही तहकूब (adjourn) होते. पण सबंध अधिवेशनचा असाही कार्यक्रम असतो. बजेटचें अधिवेशन सुमारें दोन महिने चालणार; या दोन महिन्यांत अर्थात् अनेक वेळां वेळ संपली म्हणून अगर सुट्टी आली म्हणून सभागृहाची सभा तहकूब होते. या तहकुबीनें कार्यक्रम रद्द होत नाहीं. जेव्हां कार्यक्रम संपतो अगर पुरा न करतां अधिवेशन अगर बैठक संपावयाची असें ठरतें, त्या वेळीं सभागृह स्थगित (Prorogue) करण्यांत येतें. जेव्हां सभागृह स्थगित होतें, त्या वेळीं सर्व कार्यक्रम रद्द होतो. पुढील अधिवेशनांत पुन्हा नोटिस, पुन्हा प्रश्न द्यावे लागतात. फक्त चालू बिलें चालू राहतात. सभागृह बरखास्त (dissolution) करावयाचें याचा अर्थ पुन्हा निवडणूक करावयाची; म्हणजे सर्व सभासदांचें सभासदत्व संपतें व नवीन सभागृह निवडून येतें. तहकुबी म्हणजे पुस्तकांतील पॅरिग्राफ संपला, स्थगित म्हणजे प्रकरण संपलें व बरखास्त म्हणजे ग्रंथस...मे. अध्यक्षाला सभागृह स्थगित व बरखास्त करण्याचा अधिकार आहे. अर्थात् हेंही त्यानें मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें करावयाचें असतें. मुदत संपतांच सभागृह बरखास्त होतें; पण त्याहीपूर्वी मंत्रिमंडळानें सल्ला दिल्यास त्याला लोकसभा बरखास्त करतां येईल. हें केव्हां होईल? जेव्हां जनता व विद्यमान सभासद यांच्यांत विश्वासाचें वातावरण नसेल व तें लोकमत प्रभावी रीतीनें मंत्रिमंडळापुढें येईल, तेव्हां मंत्रिमंडळाला या गोष्टीचा विचार करावा लागेल. प्रतिनिधींना पांच वर्षेपर्यंत निवडून दिलें, याचा अर्थ या मुदतींत लोकमत जुमानावयाचें नाहीं, असा नव्हे. सभागृहाचा मंत्रिमंडळावर विश्वास असेल, पण जनतेचा नसेल तर? केवळ सभागृह अगर त्यांतील बहुसंख्यांक सभासद यांच्या विश्वासानें भागणार नाहीं. या बहुसंख्यांक सभासदांवर आम जनतेचाही विश्वास पाहिजे. मंत्रिमंडळ हें प्रत्यक्ष जनतेच्या विश्वासाला पात्र पाहिजे. हा विश्वास सभागृहांत व्यक्त होईल अगर अन्य रीतीनेंही व्यक्त होऊं शकेल. सभागृहांत मंत्रिमंडळाविरुद्ध अविश्वासाचा ठराव पास झाला, पण मंत्रिमंडळाला वाटलें कीं, जनता त्याच्या मागें आहे, तर मंत्रिमंडळ अध्यक्षाला सभागृह बरखास्त करण्याचा सल्ला देईल. प्रसंगीं मंत्रिमंडळांत फेरफार करूनही विश्वास संपादन करतां येईल. पण मंत्रिमंडळाला वाटलें कीं, जनता त्यांच्यामागें आहे तर अध्यक्ष तो सल्ला मानील व सभागृह बरखास्त करील. प्रसंगीं अध्यक्षाला असें वाटलें कीं, सभागृहाचा जरी मंत्रिमंडळावर विश्वास असला, तरी जनतेचा नाहीं, तर अध्यक्षाला कलमाप्रमाणें लोकसभा बरखास्त करण्याचा अधिकार आहे. अर्थात् मंत्रिमंडळाच्या सल्ल्याविरुद्ध त्यानें हा अधिकार चालवावा, कीं नाहीं हा निराळा प्रश्न आहे.

७०. (१) अध्यक्षाला प्रत्येक सभागृहापुढें अगर संयुक्तपणें दोन्ही सभागृहांपुढें हजर राहून भाषण करतां येईल व त्यासाठीं सभासदांना हजर राहण्यास हुकुम देतां येईल.

**अध्यक्षाचा सभागृहांना संदेश देण्याचा व त्यांपुढें भाषण करण्याचा हक्क**

(२) पार्लमेंटपैकीं कोणाही सभागृहापुढें विचारार्थ असलेल्या बिलाबद्दल अगर अन्य बाबींबद्दल अध्यक्षाला सभागृहाला संदेश धाडतां येतील व असा संदेश आला म्हणजे शक्य तितक्या त्वरेनें, ज्याचा विचार व्हावा म्हणून संदेश आला असेल, त्या गोष्टींचा विचार सभागृहाकडून होईल.

अध्यक्षाला कोणत्याही सभागृहापुढें पृथक्पणें अगर संयुक्त बैठकींत जाऊन भाषण करतां येईल. सामान्यत: असले प्रसंग क्वचित् येतात. शोभेचे प्रसंग सोडले तर राज्यप्रमुख प्रधानमंडळाच्या सल्ल्यानें चालत असल्यामुळें त्याला करावयाचें भाषण सुद्धां प्रधानमंडळानें पसंत केलें पाहिजे. किंबहुना जेथें सनदशीर राज्यप्रमुख आहे, तेथें राज्यप्रमुखाचें भाषण म्हणजे मंत्रिमंडळाचें निवेदन व त्याचाच कार्यक्रम असें मानण्यांत येतें. जबाबदार राज्यपद्धतींत अध्यक्षाचें अगर राज्यप्रमुखाचें भाषण मंत्रिमंडळाविरुद्ध असूं शकत नाहीं. पार्लमेंटच्या सुरुवातीस राज्यप्रमुख भाषण करतो व त्यांत मंत्रिमंडळाचा भावी कार्यक्रम सांगितलेला असतो. अध्यक्षाला संयुक्त बैठकींतही भाषण करतां येईल. अध्यक्षाच्या भाषणास हजर राहण्याबद्दल आदेश देण्याचाही हक्क त्याला दिला आहे. अशा रीतीनें अध्यक्ष व लोकप्रतिनिधि एकत्र येतात. अध्यक्षाला पार्लमेंटपुढें असलेल्या बिलाबद्दल अगर अन्य बाबीबद्दल संदेश धाडून ती गोष्ट सभागृहानें विचारांत घ्यावी असें सांगतां येतें. सभागृह त्याप्रमाणें विचार करण्यास बांधलें आहे. पुष्कळ वेळां अध्यक्षास देशहितार्थ एखादी दुरुस्ती अगर एखादी अन्य योजना चालू बिलांत असावी असें वाटलें अगर एखादा ठराव अगर बिल यांत बदल व्हावा असें वाटलें, तर तसे संदेश देऊन सभागृहाला सांगतां येतें. सभागृह शक्य तेवढें लवकर मग त्याचा विचार करील. या व्यवस्थेनें छोटे मतभेदाचे प्रश्न सुटतात. जेथें सभागृह व सरकार यांत अगर सभागृह व अध्यक्ष यांत मोठा मतभेद आहे, तेथें पुन्हा निवडणूक अगर सभागृहाचें ऐकणें हेंच शिल्लक राहतें. हा संघर्ष कसा टळतो अगर त्याचा परिहार कसा होतो, हें त्या

त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून राहील. पण किरकोळ मतभेद टळावे या दृष्टीनें कलमांतील योजना योग्य अशीच आहे.

**अध्यक्षाचें खास भाषण**

**७१. (१) पार्लमेंटच्या प्रत्येक अधिवेशनाच्या अगर बैठकीच्या (Session) सुरुवातीस अध्यक्ष पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांच्या संयुक्त सभेंत भाषण करील व त्यांत अधिवेशन भरविण्याचीं कारणें सांगेल.**

**(२) प्रत्येक सभागृहाच्या कामकाजी नियमांत अध्यक्षाच्या भाषणांतील विषयांवर सभागृहानें चर्चा करण्याची व्यवस्था असेल व ह्या चर्चेला इतर बाबी बाजूला सारून अग्रक्रम दिला जाईल.**

प्रत्येक अधिवेशन कशासाठीं बोलाविलें आहे हें अध्यक्षानें सुरुवातीसच आपल्या भाषणांत सांगावें ही गोष्ट या कलमांत अवश्य केली आहे. हें भाषण मंत्रिमंडळाच्या पसंतीनेंच व्हावयाचें असल्यामुळें त्यांत मंत्रिमंडळाचा कार्यक्रम असलाच पाहिजे. जे विषय त्यांत येतील, त्यांबाबत सभागृहाला पृथक्पणें चर्चा करण्यास संधि मिळणें अवश्य आहे. भाषण जरी संयुक्त बैठकींत झालें, तरी चर्चा पृथक्पणें प्रत्येक सभागृहाला करावयास मिळणें जरूर आहे व तशी ती नियमानें मिळावी, अशी आज्ञा या कलमांत आहे. चर्चेला संधि मिळाली म्हणजे प्रतिनिधींना, विशेषतः विरोधी पक्षाच्या प्रतिनिधींना लोकमत प्रदर्शित करण्याची संधि मिळते. नाना विषय या भाषणांत असतात व सर्व राज्यकारभारावर सामान्य व संकीर्ण टीका करण्यास ही संधि उपयोगी पडते. चर्चेंत उपसूचना सुचवून भाषणाला विधायक जोडही देतां येते अगर त्याला निराळेंच वळण देऊन मंत्रिमंडळाचा बोजवाराही उडवितां येतो. तात्पर्य, लोकशाही म्हणजे जर वादविवाद, चर्चा, विचारविनिमय, तर येथें लोकशाहीस पूर्ण वाव दिला आहे. भाषणावरील चर्चेस अग्रस्थान मिळालें पाहिजे, अशी व्यवस्था नियमांत राहील. इंग्लंडमध्यें राजाचें भाषण अधिवेशनाच्या सुरुवातीस होतें व त्या भाषणांत मंत्रिमंडळाचा भावी कार्यक्रम सांगितलेला असतो. मग त्या भाषणावर विरोधी पक्ष उपसूचना देऊन चर्चा करतो. ही चर्चा कित्येक दिवस चालते. चर्चा संपून भाषण सभागृहाच्या पसंतीस पडलें म्हणजे मंत्रिमंडळ सदरहू कार्यक्रम अमलांत आणण्याच्या दृष्टीनें कामास सुरुवात करतें. हाच उद्देश या कलमांत आहे. भाषणपसंती याचा अर्थ मंत्रिमंडळ अधिक विश्वासानें कामास सुरुवात करतें.

**मंत्री व कायद्याचा सल्लागार व सभागृह**

७२. प्रत्येक मंत्र्यास व हिंदुस्थानच्या कायद्याचे सल्लागार यास दोन्ही सभागृहांत बोलण्याचा अगर अन्य रीतीनें भाग घेण्याचा हक्क आहे. तसेंच सभागृहाच्या संयुक्त सभेंत अगर पार्लमेंटच्या कुठल्याही समितींत, कीं ज्यांत त्याला घेतलें आहे, तेथें हजर राहून त्याला बोलतां येईल, भाग घेतां येईल. मात्र केवळ या कलमाच्या आधारावर त्याला तेथें मत देतां येणार नाहीं.

मंत्री हा सहा महिन्यापेक्षां अधिक काळ विधिमंडळाच्या सभासदत्वाशिवाय राहूं शकत नाहीं. जर मंत्रिमंडळांत एखादा बिनसभासद इसम मंत्री म्हणून घेतला असेल, तर त्याला सहा महिन्यांच्या आंत निवडून आलें पाहिजे, अगर ही मुदत संपतांच कामावरून दूर झालें पाहिजे. किंबहुना तो आपोआपच दूर होतो. मात्र या मुदतींत त्याला या कलमानें, निवडून आलेल्या सभासद–मंत्र्याप्रमाणें सभागृहांत बोलतां येईल, भाग घेतां येईल. कमिटींत तसेंच करतां येईल; मात्र मत देतां येणार नाहीं. हाच नियम कायद्याचा सल्लागार याला लागू आहे.

## पार्लमेंटचे अधिकारी

**वरिष्ठ कायदेमंडळाचे सभापति व उपसभापति**

७३. (१) हिंदुस्थानचा उपाध्यक्ष हा वरिष्ठ कायदेमंडळाचा पदसिद्ध सभापति राहील.

(२) वरिष्ठ कायदेमंडळ शक्य तितक्या लवकर सभासदांतून एकाला उपसभापति निवडील, तसेंच जेव्हां जेव्हां ही जागा खालीं पडेल, तेव्हां तेव्हां याचप्रमाणें सदहू कायदेमंडळ उपसभापतीची निवड करील.

हिंदुस्थानचा उपाध्यक्ष हा पदसिद्ध म्हणजे अधिकारान्वयें वरिष्ठ कायदे मंडळाचा सभापति राहील. उपसभापति वरिष्ठ कायदेमंडळानें निवडून द्यावयाचा आहे. सामान्यपणें उपाध्यक्ष हा सेनेट अगर वरिष्ठ कायदेमंडळाचा पदसिद्ध सभापति असतो. या योजनेनें त्याचा लोकप्रतिनिधींशीं अधिक संबंध येतो. सदहू मंडळाच्या सभेचें कामकाज त्याच्या सभापतित्वाखालीं चालतें.

### ७४. वरिष्ठ कायदेमंडळाचा उपसभापति

उपसभापति व त्याचा राजीनामा वगैरेबाबत

(अ) जर त्याचें सभासदत्व संपलें तर त्या जागेचा राजीनामा देईल.

(ब) सभापतीला स्वदस्तुरीनें पत्र लिहून केव्हांही राजीनामा देऊं शकेल;

(क) वरिष्ठ कायदेमंडळांतील त्या वेळेस जी सभासदांची संख्या असेल, त्यांतील बहुमतानें त्याजविरुद्ध अविश्वासनिदर्शक अगर नालायकीबद्दल ठराव पास करून त्याला दूर करतां येईल. मात्र (क) यांत सांगितलेल्या ठरावाची नोटिस किमान १४ दिवस आधीं दिलेली असावी.

यांत उपसभापति केव्हां पदच्युत होईल हें सांगितलें आहे. ठराव करून त्याला दूर करावयाचें असेल तर साधारण बहुमतानें ठराव पास झाला म्हणजे चालेल.

उपसभापतीचे अधिकार

७५. (१) सभापतीची जागा खालीं असेल तेव्हां, अगर उपाध्यक्ष अध्यक्षाच्या बदलीं अगर त्याचें काम करीत असेल तेव्हां सभापतीचीं सर्व कामें उपसभापति यानें करावयाचीं आहेत आणि जर उपसभापति याचीही जागा खाली असेल तर तीं कामें, वरिष्ठ कायदेमंडळांतील ज्या सभासदानें तीं करावींत असें अध्यक्षानें ठरविलें असेल, त्या सभासदानें तीं करावींत.

(२) वरिष्ठ कायदेमंडळाच्या सभेवेळीं सभापति गैरहजर असेल, तर उपसभापतीनें व तोही गैरहजर असेल तर कामकाजी नियमाप्रमाणें ज्याला अधिकार असेल त्यानें अगर तोही इसम गैरहजर असेल तर सदहू कायदेमंडळ ठरवील त्या इसमानें सभापतीचें काम करावें.

या कलमानुसार सभापतीची जागा खाली असेल अगर उपाध्यक्ष म्हणजे जो पदसिद्ध सभापति आहे तो कलम ५४ प्रमाणें अध्यक्षाचें काम करीत असेल, तेव्हां उपसभापति यानें सभापतीचीं कामें करावयाचीं आहेत. त्याच्या गैरहजेरींत काय व्यवस्था राहील हेंही सांगितलें आहे. ( २ ) यांत वरिष्ठ कायदेमंडळाच्या सभेचें सभापतित्व गैरहजेरींत क्रमशः कोणीं करावें हें सांगितलें आहे.

**लोकसभेचा सभानायक व उपसभानायक**

७६. लोकसभा शक्य तेवढ्या लवकर सभानायक व उपसभानायक आपल्या सभासदांतून निवडील व जेव्हां जेव्हां यांतील जागा खाली पडेल, त्या त्या वेळीं त्या जागीं दुसऱ्याची निवड करील.

वरिष्ठ कायदेमंडळाच्या सभाप्रमुखास सभापति ( Chairman ) म्हटलें आहे व लोकसभेच्या सभाप्रमुखास सभानायक ( Speaker ) म्हटलें आहे. सभानायक व उपसभानायक हे दोन्हीही लोकसभेनें आपल्या सभासदांतून निवडावयाचे आहेत.

**सभानायक व उपसभानायक यांचा राजीनामा, नालायकीबाबत**

७७. सभानायक अगर उपसभानायक असणाऱ्या सभासदाला जर

( अ ) त्याचें लोकसभेचें सभासदत्व संपुष्टांत आलें तर राजीनामा द्यावा लागेल.

( ब ) सभानायकाला केव्हांही उपसभानायकाला लेखी कळवून आपल्या जागेचा राजीनामा देतां येईल; तसेंच उपसभानायकाला सभानायकाला लेखी कळवून आपल्या जागेचा राजीनामा देतां येईल.

( क ) तसेंच लोकसभेच्या त्यावेळच्या बहुसंख्यांक सभासदांनीं अविश्वासाचा ठराव केल्यास अगर नालायकीबद्दल त्याला जागेवरून दूर करतां येईल.

मात्र सदरहू ठरावाची नोटिस निदान १४ दिवस आधीं दिली असली पाहिजे. तसें नसेल, तर ठराव मांडतां येणार नाहीं.

मात्र ज्या वेळीं लोकसभा बरखास्त झाली असेल, त्या वेळीं विद्यमान सभानायक नव्यानें निवडून येणाऱ्या सभागृहाच्या पहिल्या सभेपर्यंत आपल्या जागेवर कायम राहील.

सर्वसामान्यपणें सभानायक अगर उपसभानायक पदच्युत केव्हां होईल हें या कलमांत सांगितलें आहे. मात्र सभागृह बरखास्त झालें तर नवीन निवडणूक होऊन त्या सभासदांची पहिली सभा भरेपर्यंत सभानायक आपल्या जागीं राहतो.

उपसभानायकाची सभानायकाच्या जागीं योजना

७८. (१) सभानायकाची जागा रिकामी पडल्यास त्याचीं कामें उपसभानायकानें पाहावीं, तसेंच उपसभानायकाची जागा खाली पडल्यास अध्यक्ष नेमील त्या लोकसभेच्या सभासदानें तीं पाहावींत.

(२) ज्या वेळीं लोकसभेच्या सभेंत सभानायक गैरहजर असेल, त्या वेळीं उपसभानायक यानें त्याचें काम करावें; तोही गैरहजर असेल, तर कामकाजी नियमांप्रमाणें ज्याचा अधिकार असेल, त्यानें तें पाहावें; जर तोही गैरहजर असेल, तर सभानायक यानें जो मनुष्य नेमला असेल त्यानें तें काम पाहावें.

सभानायक व उपसभानायक यांची जागा जेव्हां खाली होईल, तेव्हां तीवर दुसरा निवडून येईपर्यंतच्या काळांत कोणी काम करावें हें (१) यांत सांगितलें आहे. प्रत्यक्ष सभेंतील कामें त्यांच्या गैरहजेरींत क्रमशः कोणीं करावीं हेंही सांगितलें आहे.

सभापति वगैरेंचा पगार

७९. वरिष्ठ कायदेमंडळाचे सभापति, उपसभापति व लोक-सभेचे सभानायक व उपसभानायक यांचे पगार व अन्य प्राप्ति पार्लमेंट कायदा करून ठरवील व तोंपर्यंत दुसऱ्या परिशिष्टामधील व्यवस्था अमलांत राहील.

## सभासंचालन

**गणसंख्या, मतदान वगैरे**

८० (१) घटनेंत केलेली विशिष्ट व्यवस्था सोडल्यास सर्व प्रश्नांचा निर्णय सभागृहाच्या कोणत्याही पृथक् अगर संयुक्त सभेंत हजर असलेल्या सभासदांच्या बहुमतानें लागेल; मात्र सभापति अगर सभानायक अगर जो इसम त्यांच्या जागीं असेल त्याला प्रथम मत देतां येणार नाहीं. मात्र समान मतें पडल्यास त्याला निर्णायक मत (Casting Vote) देतां येईल.

(२) कोणत्याही सभागृहांत सभासदाची एखादी जागा रिकामी आहे, एवढ्यानें कामास अडथळा येणार नाहीं; तसेंच एखादा इसम गैरहक्कानें सभासद म्हणून मत देता झाला अगर सभेच्या कामांत भाग घेता झाला एवढ्यानें सभागृहाचें कार्य विधियुक्त नाहीं असें ठरणार नाहीं.

(३) सभागृहाच्या कुठल्याही सभेंत एकंदर सभासदांच्या संख्ये-पैकीं १/६ पेक्षां कमी सभासद हजर आहेत असें केव्हांही आढळून आलें, तर सभापति अगर सभानायक अगर जो इसम त्या जागीं असेल, त्यानें १/६ सभासद हजर असेपर्यंत सभा तहकूब केली पाहिजे.

घटनेंत विशिष्ट बहुमत केव्हां पाहिजे, हें इतरत्र सांगितलें आहे. त्याव्यतिरिक्त प्रसंगीं दोन्हीही सभागृहांच्या पृथक् अगर संयुक्त सभेंत सर्व निर्णय हजर असलेल्या सभासदांच्या साधारण बहुमतानें होईल. जो सभाप्रमुख त्या वेळीं असेल त्याला, जेव्हां समान मतें पडतील, तेव्हांच मत देतां येईल; एरवीं नाहीं. एखाद्या सभासदाची जागा खाली आहे एवढ्या कारणामुळें सभा काम चालविण्यास अनधिकारी नाहीं. तसेंच एकाद्या अनधिकारी माणसानें सभेच्या कामांत भाग घेतला अगर मत दिलें असें आढळून आलें तरी तेवढ्यानें झालेलें काम विधियुक्त नाहीं असें होणार नाहीं.

सभागृहाची जी एकंदर संख्या असेल, तिच्या १/६ संख्येइतके सभासद सभेचें काम चालू राहण्यास हजर असलेच पाहिजेत; तेवढे नसतील, तर सभा विधियुक्त ठरणार नाहीं. कलमानें ठरविलेली ही गणसंख्या योग्य आहे. बहुमतानें कारभार करावयाचा म्हणजे निदान एकंदर संख्येच्या १/२ पेक्षां अधिक लोकांनीं कामकाजांत भाग घ्यावा हें योग्य व इष्ट आहे. तथापि निवडणुकीच्या वेळचें औत्सुक्य दर

सभेला टिकत नाहीं. म्हणून अनुभवानें कमी प्रमाणानें गणसंख्या सर्वत्र ठरविलेली आहे. हें प्रमाण योग्य आहे. जेव्हां हीही संख्या सभेंत हजर नसेल तेव्हां सभा-प्रमुखानें सभा तहकूब केली पाहिजे, हें त्याचें कर्तव्य आहे, असें या कलमांत सांगितलें आहे.

## सभासद् व अपात्रता

प्रतिज्ञा

८१. तिसऱ्या परिशिष्टांत नमूद केलेली प्रतिज्ञा पार्लमेंटच्या प्रत्येक सभासदानें सभासद्त्वाचें स्थान घेण्यापूर्वी अध्यक्षापुढें घेतली पाहिजे.

ही प्रतिज्ञा अगर शपथ, देशाच्या घटनेशीं निष्ठावंत राहून काम करीन, या अर्थाची आहे. ही प्रतिज्ञा घेतल्याशिवाय सभासद ही पदवी अगर अधिकार कोणालाही प्राप्त होत नाहीं. प्रतिज्ञा घेतली म्हणजे सभासदत्व पूर्ण व विधियुक्त झालें; मगच सभेंत भाग घेतां येईल व मत देतां येईल.

जागा खाली केव्हां होते ?

८२. (१) पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांचा सभासद् कोणालाही होतां येणार नाहीं आणि याबाबत पार्लमेंट कायदा करून दोन्ही सभागृहांतील सभासद असलेल्या सभासदानें कोणत्या सभागृहांतील सभासद्त्वाची त्याची जागा खाली केली पाहिजे हें ठरवील.

(२) (अ) कोणत्याही सभागृहाचा सभासद् कलम ८३ (१) यांत वर्णन केलेल्या कोणत्याही एका नालायकीस पात्र झाला असेल तर अगर

(ब) सभापति अगर सभानायक,--जसें असेल तसें--यांजकडे आपल्या सभासद्त्वाचा राजीनामा लेखी देईल तर त्याची जागा रिकामी झाली असें समजलें जाईल.

(३) कोणत्याही सभागृहाचा सभासद ६० दिवसपर्यंत सर्व सभांना सभागृहाच्या परवानगीशिवाय गैरहजर राहील, तर सभागृह त्याची जागा खाली झाली असें जाहीर करूं शकेल. मात्र ही ६० दिवसांची मुदत मोजतांना जर सभागृह सरळ चार दिवसांपेक्षां अधिक काळ तहकूब अगर स्थगित झालें असेल, तर ती गोष्ट विचारांत घेतली जाणार नाहीं.

एकाच माणसास एकाच वेळीं दोन्ही सभागृहांचे सभासद होतां येणार नाहीं. म्हणजे तो दोन्ही सभागृहांमध्यें निवडून येऊं शकेल, पण त्यानंतर कोणत्या तरी एका सभागृहाचा त्यानें राजीनामा दिला पाहिजे व त्यानें तसें न केल्यास कायद्यानें तो कोणत्या सभागृहाचा सभासद राहील हें ठरविलें जाईल. एकाच वेळीं दोन्ही सभागृहांचें सभासदत्व जर विधियुक्त मानलें, तर तेच सभासद दोन्हीकडे बहुसंख्येनें येतील व दुसऱ्या सभागृहाची योजनाच व्यर्थ ठरेल.

सभासद नालायकीस पात्र झाला तर अगर त्यानें राजीनामा दिला तर त्याची जागा खाली होईल. एका अधिवेशनांत तो ६० दिवसांपेक्षां अधिक दिवस परवानगी-शिवाय गैरजहर राहिल्यास सभागृह त्याची जागा खाली झाली, असें जाहीर करूं शकेल. हे ६० दिवस कसे मोजावयाचे हेंही कलमांत दिलें आहे. जर सभागृह चार दिवसांपेक्षां अधिक काल तहकूब झालें, अगर स्थगित झालें, तर हा काळ मोजावयाचा नाहीं.

८३. (१) कोणत्याही सभागृहाच्या सभासदाच्या निवडणुकी-साठीं व तसेंच सभासद राहण्यास खालील गोष्टींमुळें अपात्रता येते.

(अ) जर सदहू इसम हिंदुस्थान सरकारच्या अधिकाराखालील, अगर अन्य घटक राज्याच्या अधिकाराखालील प्राप्ति असणाऱ्या जागेवर असेल, व सदहू जागा अगर अधिकारपद हें पार्लमेंटनें कायद्यानें अपात्रता आणणारें नाहीं असें ठरविलें नसेल तर,

(ब) जर तो वेडा ( Unsound mind ) असेल व योग्य कोर्टानें तसा त्याला ठरविला असेल तर,

(क) जर तो मुक्त न केलेला नादार असेल तर,

(ड) जर तो परराज्याशीं निष्ठेनें बांधला असेल अगर परराज्याचा नागरिक अगर तशा परकी नागरिकत्वाचे हक्क आहेत असा असेल तर,

(इ) जर पार्लमेंटनें पास केलेल्या एखाद्या कायद्यानें अपात्र ठरविला असेल तर,

यापैकीं कांहीं असेल तर अपात्रता येते.

(२) या कलमासाठीं ' प्राप्ती असणारी अधिकाराची जागा ' यांत

(अ) हिंदुस्थानचे मंत्री, तसेंच घटक राज्याचे मंत्री यांचा अगर

(ब) पहिल्या परिशिष्टांतील भाग ३ यांत वर्णन केलेल्या संस्थानांतील मंत्री, जर तो कायदे मंडळाला जबाबदार असेल, अगर जर दोन सभागृहें असतील, तर कनिष्ठ सभागृहाला जबाबदार असेल आणि जर अशा कायदेमंडळांतील निदान ¾ सभासद निवडून आलेले असतील, तर त्याचा समावेश होणार नाहीं.

या कलमांत निवडणुकीस कोणाला उभें राहतां येणार नाहीं; तसेंच निवडून आल्यावर कोणाला सभासद म्हणून राहतां येणार नाहीं याचा विचार केला आहे. सरकारी नोकर, वेडा, कोर्टानें नादार ठरविलेला पण ज्याला अद्याप मुक्त केलें नाहीं, तसेंच परराज्यांतील नागरिक अगर नागरिकत्वाचे हक्क असलेला अगर परराज्यांशीं कांहीं का कारणानें होईना, निष्ठा ठेवण्यास बांधलेला, अगर कायद्यानें अपात्र ठरविलेला असा इसम निवडणुकीस उभा राहूं शकत नाहीं. निवडून आल्यानंतर वरीलपैकीं कोणतीही अपात्रता आली, तर तो सभासद राहूं शकत नाहीं. कोणती सरकारी नोकरी अपात्रता आणते याचा विचार (२) यांत केला आहे. वेडा कोर्टानें ठरविलेला असला पाहिजे. तसेंच जे लोक परदेशाशीं करारानें तात्पुरते निष्ठेनें बांधलेले असतात, तेही सभासदत्वास अपात्र आहेत. जो नादार नाहीं, वेडा

नाहीं व ज्याची निष्ठा द्विविधा नाहीं, व जो सरकारी नोकरींत नाहीं अशा नागरिकांस निवडणुकीस उभें राहतां येईल. सभासदत्व राखण्यासाठींही या गोष्टींची जरूरी आहे. सभासद झाल्यानंतर नोकरी पत्करली, अगर वेडा ठरला, नादार ठरला अगर परराज्याचा नागरिक वगैरे झाला तर सभासदत्व रद्द होईल. सभासदत्वाची ही लायकी निवडणुकीपूर्वी व सभासद असेपर्यंत राहिली पाहिजे.

**सभागृहांत गैरकायदा बसणें व मत देणें यांबाबत शिक्षा**

८४. जेव्हां कोणी इसम सभागृहांत सभासद या नात्यानें बसेल अगर मत देईल आणि जर त्यानें कलम ८१ प्रमाणें प्रतिज्ञा घेतली नसेल, तर अगर अपात्रतेची जाणीव असून अगर अपात्र ठरल्यानंतर अगर सभागृहांत सभासद म्हणून राहण्यास एखाद्या कायद्याखालीं त्याला बंदी असेल, तर त्या इसमास दररोज सभागृहांत बसण्याबद्दल अगर मत देण्याबद्दल प्रत्येक दिवसामागें रु. ५०० दंड द्यावा लागेल व ही रक्कम हिंदुस्थान सरकारचें कर्ज म्हणून त्याजकडून वसूल करण्यांत येईल.

कलम ८१ प्रमाणें प्रतिज्ञा घेतल्याशिवाय सभासदत्व पूर्ण होत नाहीं. म्हणून त्यापूर्वी कोणी सभासद म्हणून सभागृहांत बसेल अगर मत देईल, तर ती अयोग्य गोष्ट होईल. तसेंच अधिकार नसतां, अपात्रता आहे हें जाणून, अगर ती जाहीर झाल्यानंतर अगर प्रतिबंध असतांना जर कोणी सभासद म्हणून बसेल अगर मत देईल, तर दररोज त्याला रु. ५०० दंड होईल व हा दंड सरकारी कर्ज समजून इतर कर्जाआधीं वसूल केला जाईल; याचा बोजा पहिला राहील.

## सभासदांचे हक्क व सवलती

**सभासदांचे हक्क, भाषणस्वातंत्र्य वगैरे**

८५. (१) कामकाजी नियम व आज्ञा यांना अनुसरून पार्लमेंटमध्यें सभासदांना भाषणस्वातंत्र्य राहील.

(२) केलेल्या भाषणाबद्दल अगर दिलेल्या मताबद्दल पार्लमेंटच्या कोणाही सभासदाला कोर्टांत जाब विचारतां येणार नाहीं. तसेंच पार्लमेंटच्या समितीच्या कामा-

बाबतही त्याचसंबंधांत जाब विचारतां येणार नाहीं; तसेंच पार्लमेंटच्या कोणत्याही सभागृहांतील वृत्तांत, मतदान, इतिवृत्त अगर अन्य कांहीं पार्लमेंटनें अगर पार्लमेंटच्या हुकुमानें प्रसिद्ध झालें असेल, तर त्याबाबतही कोणाही इसमाला जबाबदार धरलें जाणार नाहीं.

( ३ ) अन्य बाबतींतील हक्क व सवलती पार्लमेंट कायदा करून ठरवील व तोंपर्यंत इंग्लंडमधील पार्लमेंटच्या सभासदांचे जे हक्क असतील, तेवढे सभासदांना राहतील.

( ४ ) वर ( १ ), ( २ ), ( ३ ) यांत दिलेले हक्क ज्या प्रमाणांत पार्लमेंटच्या सभासदांना मिळणार असतील, त्याच प्रमाणांत ते ज्यांना या घटनेनें पार्लमेंटपुढें भाषण करण्याचा अधिकार दिला आहे, त्यांनाही पण मिळतील.

सभागृहाच्या कामकाजासंबंधीं नियम करण्यांत येतील. त्यांत कालमर्यादा, विषयमर्यादा, सभ्यतेच्या मर्यादा यांबाबत नियम राहतील. त्यांना अनुसरून प्रत्येक सभासदाला भाषणस्वातंत्र्य आहे. ठराविक वेळांत भाषण संपविलें पाहिजे, तसेंच तें प्रस्तुत पाहिजे, त्यांत पुनरुक्ति नसावी, तें राज्यद्रोही नसावें, अपमानकारक अगर बदनामीकारक नसावें, इत्यादि मर्यादा नियमांत असतात; त्यांना बाध न येतां हें भाषणस्वातंत्र्य मिळावयाचें आहे. तसेंच पार्लमेंटमध्यें जें भाषण होईल अगर मत दिलें जाईल, त्याबाबत चौकशी करण्याचा कोणत्याही कोर्टाला अधिकार नाहीं. हें भाषण पूर्णतया संरक्षित आहे. सभासदावर जर कोर्टांत आपल्या भाषणाबद्दल जाब देण्याची पाळी येऊं लागली, तर त्याजकडून सत्य व निर्भीड टीका होणार नाहीं. प्रामाणिक मतभेद सांगणें दुरापास्त होईल. दुष्कृत्यें उघड होणार नाहींत, पापांना वाचा फोडतां येणार नाहीं. राज्यकारभार निर्दोष व्हावा यासाठीं हा हक्क अत्यंत अवश्य आहे. तोच नियम पार्लमेंटच्या समितीच्या कामाबाबत आहे. तेथेंही सभासदाला भाषण-स्वातंत्र्य आहे. पार्लमेंटमार्फत जे अधिकृत वृत्तांत छापले जातील, त्यांतील मजकुराबद्दलही कोणाही सभासदास जबाबदार धरलें जाणार नाहीं. कारण प्रत्यक्ष भाषण थोडे ऐकतात, पण वाचतात पुष्कळजण; म्हणून ह्याही स्वातंत्र्याबद्दलचा हक्क सभासदाला असणें इष्ट आहे. येथें फक्त अधिकृत मुद्रणाबाबत ही सवलत आहे. सभासदानें भाषण केलें व तें जर सरकारनें म्हणजे पार्लमेंटमार्फत छापलें गेलें, तर

त्या मजकुराबद्दल सभासदाविरुद्ध कोर्टाला कांहींही करतां येणार नाहीं. पण सभासदानें आपण छापून प्रसिद्ध केलें तर मात्र कोर्टाला त्याची दखल घेतां येईल. तें गुन्हा ठरत असेल, तर शिक्षा देतां येईल. पार्लमेंटमधील भाषणांचा रिपोर्ट वर्तमानपत्रांत आला आणि जर तो ' वाजवी व बरोबर ' ( fair and accurate ) असेल तर वर्तमानपत्रकारावर कांहीं दोष येणार नाहीं. कारण पार्लमेंटमध्यें जें झालें, तें लोकांना कळणें इष्ट आहे व तें कळविण्याचें कर्तव्य वर्तमानपत्रकार करीत असतात. या दृष्टीनें त्यांना योग्य तें संरक्षण मिळणें इष्ट आहे.

पार्लमेंट कायदा करून अन्य हक्क व सवलती ठरवील; तोंपर्यंत सभासदांना इंग्लंडमधील पार्लमेंटच्या सभासदांइतके हक्क राहतील. जे सभासद नाहींत, पण ज्यांना सभागृहांत जाऊन भाषण करण्याचा हक्क आहे ( अध्यक्ष, कायद्याचा सल्लागार ) त्यांनाही या कलमानें सभासदांना दिलेले हक्क मिळतील.

**सभासदांचा पगार व भत्ता**

८६. पार्लमेंटच्या सभासदांचें वेतन व भत्ता यांबाबत वेळोवेळीं पार्लमेंट कायदा करून जें ठरवील, त्याप्रमाणें व्यवस्था होईल. तोंपर्यंत हिंदुस्थानच्या सध्याच्या मध्यवर्ती कायदेमंडळाच्या सभासदांना जें वेतन व भत्ता मिळतो तितकें मिळेल.

पार्लमेंट कायदा करून वेतन वगैरे ठरवील. सध्या रु. ३० उपस्थितीबद्दल व रु. १५ वाहनाबद्दल मिळतात.

## सभागृहांतील कामाची रीत

**बिलाबाबत प्रवेश व पसार**

८७. ( १ ) कलम ८९ व ९७ यांत पैशाबाबत व अर्थव्यवस्थेबाबत असणाऱ्या बिलांसंबंधीं जी व्यवस्था केली आहे, ती मान्य करून, कोणतेंही बिल कोणत्याही सभागृहांत प्रविष्ट करतां येईल.

( २ ) कलम ८८ व ८९ यांतील व्यवस्था मान्य करून, कोणतेंही बिल दोन्ही सभागृहांनीं उपसूचनेशिवाय अगर दोघांची संमति असलेल्या उपसूचनांसह पास केल्याखेरीज पास झालें, असें मानलें जाणार नाहीं.

**( ३ ) पार्लमेंटपुढें चालू असलेलें बिल पार्लमेंट जरी स्थगित झालें तरी बारगळलें जाणार नाहीं.**

**( ४ ) लोकसभेनें पास न केलेलें बिल वरिष्ठ कायदेमंडळापुढें चालू असेल तर लोकसभा बरखास्त झाली म्हणून बारगळलें जाणार नाहीं.**

**( ५ ) जें बिल लोकसभेपुढें चालू आहे अगर जें लोकसभेनें पास केलें आहे, पण वरिष्ठ कायदेमंडळांत चालू आहे, तें कलम ८८ मधील व्यवस्था मान्य करून, लोकसभा बरखास्त झाल्यास बारगळलें जाईल.**

ज्या बिलांत पैशासंबंधीं उल्लेख अगर व्यवस्था आहे असें बिल, तसेंच कर-योजनेचें बिल अगर अर्थव्यवस्थेसंबंधींचें बिल लोकसभेंतच प्रथम आलें पाहिजे. अशा बिलाशिवाय दुसरें कोणतेंही बिल वाटेल त्या सभागृहांत प्रथम आणतां येईल. कनिष्ठ अथवा लोकांची सभा हिला हा खास अधिकार बहुतेक घटनांतून दिला आहे. कारण लोकसभा ही पूर्णांशीं लोकांच्या प्रतिनिधींचीच सभा असते. आधीं दुःखनिवेदन व निवारण मग करग्रहण हा मोठा सिद्धांत आहे. लोकांचीं सरकारविरुद्ध गाऱ्हाणीं असल्या अर्थबिलांच्या वेळींच येणें इष्ट आहे. कर लोक भरणार म्हणून एतद्विषयक सर्व बिलें लोकसभेंत प्रथम आलीं पाहिजेत. वरिष्ठ सभेंत अशीं बिलें आणणें योग्य नाहीं. याव्यतिरिक्त कोणतेंही बिल कोणत्याही सभागृहांत प्रविष्ट करतां येईल. कलम ९० मध्यें 'पैशाच्या संबंधीं बिल' याची व्याख्या दिली आहे. ८८, ८९ कलमांत त्याबाबत कामकाजाची रीत सांगितली आहे.

कोणतेंही बिल दोन्ही सभागृहांनीं उपसूचनेशिवाय म्हणजे जसें प्रविष्ट केलें तसें, अगर उभय सभागृहांनीं पसंत केलेल्या उपसूचनांसुद्धां पास केलें, तर तें पास झालें असें समजावयाचें आहे. तात्पर्य, दोन्ही सभागृहांनीं याप्रमाणें बिल पास केल्याशिवाय तें पास झालें असें मानण्यांत येणार नाहीं. तसेंच पार्लमेंट स्थगित झालें म्हणून चालू बिल, म्हणजे जें प्रविष्ट केलें गेलें आहे, अगर ज्यावर चर्चा चालू आहे, अगर जें चिकित्सा ( Select ) समितीकडे सोंपविलें आहे, अगर जें लोकमत अजमाविण्यासाठीं प्रसिद्धिलें आहे, असें बिल बारगळत नाहीं. बारगळत नाहीं याचा अर्थ तें ज्या स्थितींत होतें, त्या स्थितींत पुढील अधिवेशनासाठीं राहतें.

बिलाची प्रथम अवस्था तें सभागृहांत प्रविष्ट करणें व दुसरी अवस्था, त्यावर विचार करणें ही होय. या दुसऱ्या अवस्थेपूर्वी तें चिकित्सा समितीकडे धाडतां येतें अगर लोकमताचा अंदाज घेण्यासाठीं प्रसिद्ध करतां येतें. या वेळीं बिलांतील सामान्य

तत्त्वांवर विचार होतो. त्यानंतर मग कलमवार विचार होतो. ही दुसरी अवस्था. तिसरी म्हणजे कलमवार विचार झाल्यानंतर वटबिल जसें बनलें असेल, ज्या उपसूचना त्यांत दाखल करून घेण्यांत आल्या असतील, त्यावर सर्वसाधारण विचार करून तें पसार करणें. प्रत्यक्ष पसार होईपर्यंतच्या अवस्थेंत असलेलीं बिलें म्हणजे चालू बिलें होत. तीं पार्लमेंट स्थगित झालें म्हणून बारगळत नाहींत. नवीन अधिवेशन सुरू झालें म्हणजे नियमानुसार चालू बिलाची कारवाई पुढील अवस्थेसाठीं चालू होते. पार्लमेंट स्थगित झालें म्हणजे विचारलेले पण उत्तर न दिलेले प्रश्न, तसेंच नोटिस दिलेलीं पण प्रत्यक्ष प्रविष्ट न केलेलीं बिलें, व मांडावयाचे ठराव बारगळतात, म्हणजे त्यांच्याबाबत पुन्हा नोटिस द्यावी लागते. बिलें चालू असतील तर तीं बारगळत नाहींत. तसेंच लोकसभेनें पास न केलेलें पण वरिष्ठ कायदेमंडळांत ज्याचा विचार चालू आहे, असें बिल, लोकसभा बरखास्त झाली तरी बारगळणार नाहीं. कारण वरिष्ठ कायदेमंडळ हें बरखास्त होत नाहीं. त्याच्यापुढें असलेलें चालू बिल हें चालूच राहील. त्याचा निकाल वरिष्ठ कायदेमंडळ करील. केवळ लोकसभा बरखास्त झाली म्हणून अशा बिलांवर त्याचा परिणाम होणार नाहीं. पण जें बिल लोकसभेपुढें चालू आहे अगर तेथें पास होऊन वरिष्ठ कायदेमंडळापुढें चालू आहे, तें लोकसभा बरखास्त झाल्याबरोबर बारगळेल. कारण हें बिल लोकसभेचें बिल आहे व लोकसभा बरखास्त झाली नसती तर तें तींत पास झालें असतें. असें बिल वरिष्ठ कायदेमंडळा-पुढें चालू असलें तरी बारगळेल. नवीन निवडणुकीनंतर येणारी लोकसभा त्या बिलाला जबाबदार असणार नाहीं. यासाठीं तें रद्द समजणेंच इष्ट आहे. नवीन सभागृहास तसेंच बिल पुन्हा आणतां येईल.

**दोन्ही सभागृहांच्या संयुक्त सभा**

८८. (१) एकादें बिल एका सभागृहांत पास होऊन दुसऱ्या सभागृहाकडे गेलें असतां—

(अ) त्या सभागृहानें तें मान्य केलें नसेल; अगर

(ब) दोन्ही सभागृहांत सदर्हू बिलांत करावयाच्या उपसूचनांबाबत मतभेद मिटत नसेल तर; अगर

(क) दुसऱ्या सभागृहाकडे तें बिल येऊन सहा महिने होऊनही बिल त्या सभागृहानें पास केलें नसेल, तर अध्यक्षाला वाटल्यास व दरम्यान लोकसभा बरखास्त होऊन बिल बारगळलें

नसल्यास दोन्ही सभागृहांना संदेश धाडून अगर सभागृहें चालू नसल्यास निवेदन काढून संयुक्त सभा बोलावण्याचा आपला विचार त्यांना कळवितां येईल व या संयुक्त सभेंत सदहू बिलावर विचार करून मतप्रदर्शन करण्यास सांगतां येईल. मात्र या कलमांतील व्यवस्था पैशाच्या बाबतींतील बिलाला लागू नाहीं.

( २ ) वर ( १ ) यांत सांगितलेल्या सहा महिन्यांच्या मुदतीचा विचार करतांना, जर दोन्हीं सभागृहें चार दिवसांपेक्षां अधिक काळ तहकूब राहिलीं अगर स्थगित झालीं, तर तो काळ विचारांत घेतला जाणार नाहीं.

( ३ ) वर ( १ ) यांत सांगितल्याप्रमाणें अध्यक्षानें संयुक्त सभा बोलावण्याचा उद्देश जाहीर करतांच कोणत्याही सभागृहानें सदहू बिलाबाबत पुढील कारवाई करूं नये. मात्र अध्यक्ष अशा सूचनेच्या तारखेनंतर संयुक्त सभेची बैठक केव्हांही भरवूं शकेल व त्या वेळीं दोन्हीं सभागृहांची संयुक्त बैठक भरेल.

( ४ ) संयुक्त सभेंत संमत झालेल्या उपसूचनांसह सदहू बिल हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांच्या बहुमतानें पास झालें, तर तें बिल प्रस्तुत घटनेप्रमाणें पास झालें असें मानलें जाईल.

( अ ) मात्र जर तें एका सभागृहानें पास केलें असून दुसऱ्या सभागृहानें उपसूचनांसह पास न करतां मूळ ज्या सभागृहांत सदहू बिल प्रविष्ट झालें असेल, त्याकडे परत पाठविलेलें असेल, तर सदहू बिलाच्या मंजुरीला लागलेल्या विलंबामुळें केवळ जेवढ्या उपसूचना अवश्य झाल्या असतील,

त्यांव्यतिरिक्त अन्य उपसूचना या संयुक्त सभेमध्यें सुचवितां येणार नाहींत. तसेंच—

(ब) जर बिल अशा रीतीनें पास होऊन परत आलें असेल, तर वर सांगितल्याप्रमाणें उपसूचना संयुक्त सभेंत मांडतां येतील; तसेंच ज्या बाबतींत दोन्ही सभागृहांत मतैक्य झालें नसेल, त्या बाबतींत उपसूचना मांडतां येतील.

कोणत्या उपसूचना या कलमाखालीं येतात हें ठरविण्याचा निर्णयात्मक अधिकार संयुक्त सभेच्या सभाप्रमुखाला राहील.

(५) अध्यक्षानें संयुक्त सभा जाहीर केल्यापासून व ती प्रत्यक्ष भरावयाच्या तारखेपर्यंत जर लोकसभा बरखास्त झाली असेल, तरीसुद्धां संयुक्त सभा भरून बिल पास होऊं शकेल.

या कलमांत संयुक्त सभेसंबंधीं विचार आहे. जेव्हां दोन सभागृहांत मतभेद होतो व संमतीनें बिल पास होणें अशक्य होतें, अगर सहा महिन्यांचा काळ जाऊन सुद्धां दुसरें सभागृह त्याचा विचार करीत नाहीं, तेव्हां अध्यक्ष आपला संयुक्त सभा बोलावण्याचा उद्देश जाहीर करूं शकेल. मात्र पैशासंबंधींच्या बिलाबाबत अशी संयुक्त बैठक बोलावतां येणार नाहीं. अशा बिलाबाबतची व्यवस्था ८९ कलमांत दिली आहे. संयुक्त सभा बोलावण्याचा संकल्प अध्यक्षानें जाहीर केल्यानंतर ज्या बिलासाठीं ही सभा बोलाविली असेल, त्याबद्दल कांहींही पुढें कारवाई कोणत्याही पृथक् सभागृहांत होणार नाहीं. मग त्या बिलाबद्दल जें कांहीं व्हावयाचें तें संयुक्त सभेंत होईल.

सहा महिने मुदत कशी मोजावयाची हें (२) मध्यें सांगितलें आहे. मुख्य मुद्दा लांब मुदतीच्या तहकुबी नसतील अगर लांब मुदतपर्यंत सभागृह तहकूब झालें नसेल, तर सहा महिने ही बिलाचा विचार करण्यास पुरेशी मुदत आहे.

संयुक्त सभेंत वाटेल त्या उपसूचना मांडतां येणार नाहींत. ज्या उपसूचना विलंबामुळें जरूर झाल्या असतील, तेवढ्याच मांडतां येतील. बिल एका सभागृहांत प्रविष्ट केल्यानंतर तें पास झाल्यावर दुसऱ्या सभागृहाकडे जातें, तेथें उपसूचनांसह पास न करतां तें त्या सभागृहानें परत केलें असेल, तर वर सांगितल्याप्रमाणें विलंबामुळें अवश्य झालेल्या उपसूचनाच फक्त मांडतां येतील.

उदाहरणार्थ, बिल केव्हां अमलांत येईल याबद्दलची उपसूचना मांडतां येईल. तसेंच दोन सभागृहांत ज्याबाबत तंटा आहे, त्याबाबतही उपसूचना मांडतां येतील. मुख्य उद्देश हा कीं वाटेल ती उपसूचना संयुक्त सभेंत मांडतां येणार नाहीं अगर बिलांतील सर्व बाबी विचारासाठीं घेतां येणार नाहींत. कोणत्या घेतां येतील याबद्दलचा निर्णय संयुक्त सभेच्या सभाप्रमुखानें करावयाचा आहे. संयुक्त सभेंत हजर असलेल्या व ज्यांनीं मत दिलें आहे अशा सभासदांच्या बहुमतानें बिल पास झालें, तर तें विधियुक्त पास झालें असें मानण्यांत येईल.

**पैशाबाबत बिलासंबंधीं रीत**

८९. (१) पैशाबाबतचें बिल वरिष्ठ कायदेमंडळांत प्रविष्ट करतां येणार नाहीं.

(२) पैशाबाबतचें बिल लोकसभेंत पास झाल्याबरोबर वरिष्ठ कायदेमंडळाकडे धाडण्यांत येईल. तें मिळाल्यापासून ३० दिवसांच्या आंत सदहू कायदेमंडळ आपल्या शिफारसींसह लोकसभेकडे तें परत करील; लोकसभा त्या शिफारसी स्वीकारील, अगर नामंजूर करील अगर कांहींचा स्वीकार करील.

(३) लोकसभेनें कांहीं शिफारसी स्वीकारल्यास त्या उपसूचना धरून त्यासुद्धां बिल दोन्ही सभागृहांनीं पास केलें असें मानलें जाईल.

(४) लोकसभेनें कांहींही शिफारसी स्वीकारल्या नाहींत, तर वरिष्ठ कायदेमंडळांत ज्या स्वरूपांत बिल धाडलें गेलें असेल, त्या स्वरूपांत दोन्ही सभागृहांनीं तें पास केलें असें मानलें जाईल.

(५) तसेंच पैशाबाबतचें बिल ३० दिवसांत वरिष्ठ कायदेमंडळाकडून शिफारसींसह परत आलें नाहीं, तर जसें तें धाडलें गेलें होतें, त्या स्वरूपांत दोन्ही सभागृहांनीं पास केलें असें मानलें जाईल.

पैशाचें बिल फक्त लोकसभेंतच प्रविष्ट होईल. तें तेथें पास झाल्यानंतर वरिष्ठ कायदेमंडळाकडे जाईल. तेथें सदहू मंडळ शिफारसी करील. लोकसभा त्या शिफारसी वाटल्यास स्वीकारील. जर व जितक्या स्वीकारल्या, तर त्या उपसूचना समजून त्यांसुद्धां बिल पास झालें असें मानलें जाईल. तिजोरीवरील अधिकार ( Power of the purse ) हा लोकसभेचा. त्यांत वरिष्ठ कायदेमंडळाला ढवळाढवळ करण्याचा

हक्क नाहीं. सदहू मंडळ पैशाबाबतच्या बिलावर चर्चा करूं शकेल, पण सदहू कायदेमंडळाचे याबाबतचे निर्णय हे केवळ शिफारसीवजा आहेत. पैशावरील सर्व व निर्णायक ताबा लोकसभेचा आहे. म्हणजे वस्तुतः सर्व कारभार लोकसभेच्या नियंत्रणाखालीं आला असें होतें. इतर बिलें दोन्ही सभागृहांनीं पास करावयाचीं असतात. पैशाचीं बिलें मात्र सर्वस्वीं लोकसभेचीं व तिच्या अधिकारांतील आहेत. साधारणपणें सर्व घटनांतून अशीच व्यवस्था आहे. सरकारचा कारभार पैशाशिवाय चालत नाहीं व पैसा करानें अगर कर्जानें उभा करण्याची सत्ता सरकारला असली पाहिजे हें ठीक, पण त्याबाबत लोकांच्या प्रतिनिधींना निर्णायक निकाल देण्याचा अधिकार असणें हेंही तितकेंच जरूरीचें आहे. या दृष्टीनें लोकसभा कीं, जींत लोकांचे प्रतिनिधि आहेत, तिनें या बाबतींत अखेरचा शब्द सांगितला पाहिजे. म्हणजे खरी लोकशाही अमलांत राहते.

**पैशाबाबत बिलाची व्याख्या**

९०. (१) ज्या बिलांत खालील सर्व अगर एकाही बाबीचा संबंध येत असेल, तें प्रस्तुत प्रकरणापुरतें पैशाबाबतचें बिल मानण्यांत येईलः—

(अ) कर बसविणें, रद्द करणें, कमी करणें, त्यांत बदल करणें, नियमन करणें;

(ब) कर्ज उभारण्याबाबत नियमन करणें अगर पैशाबाबत हिंदुस्थान सरकारनें एकादी ग्वाही देणें अगर हिंदुस्थान सरकारनें स्वीकारलेल्या अगर स्वीकारावयाच्या पैशासंबंधींच्या जबाबदाऱ्या ज्या कायद्यानें ठरविल्या आहेत, त्यांत उपसूचना सुचविणें;

(क) पैशाचा पुरवठा

(ड) हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नाबाबत व्यवस्था.

(ई) हिंदुस्थान सरकारचा खर्च वाढविणें अगर एखादा खर्च हिंदुस्थानच्या उत्पन्नावरचा बोजा म्हणून ठरविणें;

(फ) हिंदुस्थान सरकारचें उत्पन्न जमा करणें अगर सदर्हू उत्पन्नाच्या ठेवीसंबंधीं अगर हिंदुस्थान सरकारच्या हिशोबतपासणीबाबत;

(ग) अगर वर अ ते फ या बाबींशीं ज्यांचा संबंध येतो, अशा अनुषंगिक बाबी.

(२) एखाद्या बिलांत दंड अगर तत्सम शिक्षा सांगितली आहे, एवढ्यानें अगर परवाना–फी घेण्याची व्यवस्था त्यांत आहे अगर सुख-सोईचा मोबदला त्यांत ठरविला आहे अगर स्थानिक स्वराज्यसंस्थांनीं बसविण्याच्या कराबाबत तो बसविणें, कमी करणें, त्यांत बदल करणें इत्यादि गोष्टी त्यांत आहेत, म्हणून तें बिल पैशांबाबतचें बिल मानलें जाणार नाहीं.

(३) एखादें बिल पैशाबाबत बिल आहे कीं नाहीं, हें ठरविण्याचा अधिकार लोकसभेच्या सभानायकाला आहे व तो निर्णायक आहे.

(४) जेव्हां पैशाबाबतचें बिल वरिष्ठ कायदेमंडळाकडे धाडलें जाईल त्या वेळीं व जेव्हां तें अध्यक्षाकडे मंजुरीला धाडलें जाईल, त्या वेळीं त्या बिलावर सदर्हू बिल हें पैशाबाबत बिल आहे, असा शेरा लोकसभेचा सभानायक देईल व नंतरच तें धाडण्यांत येईल.

या कलमांत पैशाबाबतच्या बिलाची (Money Bill) व्याख्या दिली आहे. हिंदुस्थान सरकारचे कर व कर्ज यांबाबत जेथें कांहीं संबंध येईल तें बिल म्हणजे पैशाबाबतचें बिल होय. तसेंच हिंदुस्थानच्या उत्पन्नासंबंधीं, त्याच्या विनिमयासंबंधीं, तसेंच हिंदुस्थान सरकारनें एखादा खर्च हा उत्पन्नावर पहिला बोजा राहील असें जाहीर केलें असेल, अगर असल्या खर्चांत वाढ जाहीर केली असेल, तर तत्संबंधींचें बिल पण याच स्वरूपाचें मानलें जाईल. हिंदुस्थान सरकारचें उत्पन्न वसूल करणें, त्याची व्यवस्था ठेवणें, त्याच्या हिशोबाची तपासणी करणें, यासंबंधींचें बिलही

याच स्वरूपाचें समजलें जाईल. केवळ स्थानिक कराबद्दलचें बिल तसें मानलें जाणार नाहीं. दंड अगर परवाना-फी अगर सार्वजनिक सोय केल्याबद्दल मोबदला नमूद आहे, एवढ्याकरितां तें बिल पैशाबाबतचें बिल मानलें जाणार नाहीं. तात्पर्य, हिंदुस्थान सरकारचा कारभार ज्या करांतून अगर उत्पन्नाच्या बाबींतून चालतो, त्याचा संबंध जेथें असेल, तेथें तें बिल पैशाबाबत बिल मानलें जाईल. केवळ बिलांत वाहतुकीचा दर दिला असेल, अगर परवाना-फी सांगितली असेल, एवढ्यानें एकादें बिल पैशा-बाबतचें बिल होत नाहीं. बिल पैशाबाबतचें असलें म्हणजे सर्व अधिकार लोकसभेला येतात. म्हणून अशा बिलाची व्याख्या स्पष्ट असली पाहिजे. तसेंच कोणतें बिल तसें आहे हें ठरलें पाहिजे. हा अधिकार लोकसभेच्या सभानायकाला दिला आहे. त्याचा निर्णय हा अखेरचा. तसेंच बिलावर त्याचा शेरा असल्याशिवाय वरिष्ठ कायदेमंडळ तें बिल पैशाबाबतचें बिल मानणार नाहीं. अध्यक्षाकडे मंजुरीसाठीं जातांना देखील असा शेरा अवश्य पाहिजे.

**बिलांस मान्यता**

९१. प्रत्येक बिल दोन्ही सभागृहांनीं पास केल्यानंतर मंजुरी-साठीं अध्यक्षापुढें ठेवण्यांत येईल. अध्यक्ष त्याला मान्यता दिल्याचें जाहीर करील अगर मान्यता राखून ठेवली असल्याचें जाहीर करील.

मात्र बिल मान्यतेसाठीं आल्यापासून, सहा आठवड्याच्या आंत, जर तें पैशाबाबत बिल नसेल, तर तें अध्यक्षाला पुन्हा विचार करण्यासाठीं सभागृहांकडे संदेश देऊन धाडतां येईल. या संदेशांत सर्व बिल अगर कांहीं कलमें यांचा फेरविचार करावा व कांहीं उपसूचना समाविष्ट कराव्यात, असें त्याला सांगतां येईल व त्याप्रमाणें सभागृह त्या बाबींचा विचार करील.

बिल दोन्ही सभागृहांत पास झालें, म्हणजे त्याला अध्यक्षाची मंजुरी मागण्यांत येते. मंजुरी मिळाली म्हणजे बिलाला कायद्याचें स्वरूप प्राप्त होतें. अध्यक्षाला सदहू बिलांत कमी जास्त व्हावें असें वाटत असेल, तर सहा आठवड्याच्या आंत तशी सूचना संदेशानें देऊन सदहू बिल पुन्हा विचार करण्यासाठीं सभागृहाकडे त्याला धाडतां येतें. अध्यक्षाला मंजुरी द्यावयाची नसेल, तर त्याला तसें जाहीर करावें लागतें.

## अर्थविषयक बाबतींतील कामकाजाची रीत

वार्षिक अंदाजपत्रक

९२. (१) अध्यक्ष प्रत्येक हिशोबाच्या वर्षासाठीं हिंदुस्थान सरकारची अंदाजी जमा व खर्च यांबाबतचें पत्रक तयार करवून तें पार्लमेंटपुढें ठेववील, या पत्रकाला घटनेच्या प्रस्तुत भागांत वार्षिक अंदाजपत्रक म्हणून संबोधलें आहे.

(२) या अंदाजपत्रकांत खर्चाच्या खालील बाबी पृथक्पणें दाखविल्या जातील—

(अ) जो खर्च हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा म्हणून या घटनेंत ठरविला आहे, त्याच्या रकमा, आणि

(ब) इतर खर्च जो हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून करावयाचा ठरविला असेल त्याच्या रकमा,

आणि उत्पन्नांतून करावयाचा खर्च इतर खर्चापासून पृथक्पणें दाखविला जाईल.

(३) खालील बाबींवरील खर्च हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा आहे असें मानलें जाईल.

(अ) अध्यक्षाचा पगार व अन्य प्राप्ति आणि त्याच्या कचेरीबाबतचा खर्च;

(ब) वरिष्ठ कायदेमंडळाचा सभापति व उपसभापति तसेंच लोकसभेचा सभानायक अगर उपसभानायक यांचा पगार व अन्य प्राप्ति;

(क) हिंदुस्थान सरकार ज्या कर्जांना जबाबदार आहे त्याबाबत व्याज, फेड फंड, फेडीचा बोजा, तसेंच कर्ज उभारणें, फेडणें अगर त्यासंबंधींच्या व्यवस्थेचा खर्च;

(ड) (१) प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशांचे पगार, भत्ते, पेन्शनें;

(२) संयुक्त संघाच्या न्यायालयाच्या न्यायाधिशांचीं पेन्शनें;

(३) ही घटना सुरू होण्यापूर्वीं परिशिष्ट १ यांतील भाग १ व २ यांतील निर्दिष्ट केलेल्या राज्यांच्या अगर घटकांच्या क्षेत्रांत जीं मुख्य न्यायालयें अधिकार चालवीत होतीं, त्या मुख्य न्यायालयाच्या न्यायाधिशांचीं पेन्शनें;

(इ) हुकुमनामा अगर लवादनामा, कुठल्याही कोर्टाचा असो, अगर लवादाचा असो, तो भरपाई करण्याकरतां लागणारी रक्कम;

(फ) पार्लमेंटनें कायद्यानें अगर घटनेनें जो खर्च उत्पन्नावर बोजा आहे असें जाहीर केलें असेल, तो इतर खर्च.

अध्यक्ष, सभापति, उपसभापति, सभानायक, उपसभानायक, निरनिराळ्या न्यायालयांचे न्यायाधीश यांना मिळणारे पगार, भत्ते, पेन्शनें, तसेंच सरकारविरुद्ध झालेले हुकुमनामे अगर लवादनामे यांची भरपाई करण्याकरतां लागणारा खर्च या सर्व बाबी उत्पन्नावरील बोजा असणारा खर्च असें मानलें जाईल. याशिवाय या घटनेनें अगर पार्लमेंटनें कायद्यानें एखादी बाब त्या स्वरूपाची आहे असें सांगितलें असेल, तर ती सुद्धां तशी मानली जाईल.

**पार्लमेंट व अंदाजपत्रक**

९३. (१) खर्चाच्या अंदाजापैकीं जेवढा भाग हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा म्हणून असेल, त्याबाबत पार्लमेंटच्या सभागृहांना चर्चा करतां येईल; पण तो त्यांजपुढें मतासाठीं ठेवण्यांत येणार नाहीं.

**( २ ) खर्चाच्या अंदाजापैकीं जो भाग वर ( १ ) यांत वर्णन केलेल्या खर्चाव्यतिरिक्त आहे, तो निरनिराळया मागण्यांच्या स्वरूपांत दाखवून त्या मागण्या लोकसभेपुढें मांडण्यांत येतील आणि त्यांना मान्यता देणें अगर न देणें अगर त्यांत काट करून मान्यता देणें, असे सर्व अधिकार लोकसभेला आहेत.**

**( ३ ) अध्यक्षाच्या शिफारशीशिवाय कोठलीही मागणी सभागृहापुढें ठेवली जाणार नाहीं.**

उत्पन्नावर ज्या बाबींचा बोजा आहे, त्याबाबत मतदान नाहीं. त्यावर मतदान करण्याचें ठरविलें तर सरकारचा कारभार चालणार नाहीं; निःपक्षपाती व निर्भय न्याय मिळणार नाहीं; तसेंच सरकारची बाजारांत पत राहणार नाहीं. लोकमताप्रमाणें कारभार याचा अर्थ बिनभरंवशाचा कारभार नव्हे. राज्याचा प्रमुख याचाच पगार दरसाल मान्यतेसाठीं लोकसभेपुढें येऊं लागला, तर जो भक्कमपणा राज्यप्रमुखांत असावयास पाहिजे, तो राहणार नाहीं. त्याला सभासदाची मनधरणी करावी लागेल. न्यायाधिशाचा पगार दरसाल असा अधांत्री ठेवला, तर त्यांना निःस्पृहपणें न्याय देणें कठीण होईल. तसेंच राज्यानें कर्ज काढणें व देणें अगर न देणें अगर त्याच्या परतफेडीची व्यवस्था हीं सर्व जर मतदानावर ठेवलीं तर बाजारांत सरकारला कर्ज मिळणार नाहीं. सामान्यपणें सर्व घटनांतून अंदाजपत्रकाबाबत अशीच व्यवस्था असते. कांहीं खर्चाबाबत मतदान होत नाहीं व असला खर्च म्हणजे या कलमांत नमूद केलेल्याच स्वरूपाचा असतो. सर्वच खर्च लोकसभेच्या मतावर ठेवला, तर कारभार चालणार नाहीं. सरकारी नोकरांबाबतच्या पगारांबद्दल कांहीं स्थैर्य अवश्य हवें. लोकसभेच्या अधिकाराला अशी मर्यादा घातल्यानें अधिकार कमी होत नाहीं. उलट कारभार कार्यक्षम होतो, अधिक निःस्पृह होतो.

बोजा नसलेला खर्च पृथक् पृथक् मागण्यांच्या रूपानें लोकसभेपुढें आणला जाईल. उदाहरणार्थ, शिक्षणाबाबत मागणी, शेतकी खात्याबाबत मागणी इत्यादि. प्रत्येक मागणीबाबत अध्यक्षाच्या शिफारसीची जरूरी आहे. तशी शिफारस नसेल तर मागणी मतासाठीं ठेवतां येणार नाहीं. कार्यकारी सत्तेचा प्रमुख जो बाह्यतः कारभाराचा प्रमुख आहे, त्यानें ती मागणी परीक्षावी व नंतर शिफारस करावी, त्याची शिफारस म्हणजे सामान्यतः ती मागणी योग्य आहे असा सल्ला त्याला मिळाला व त्याला तो मान्य आहे, असा यांतील अर्थ आहे. अर्थात् अध्यक्ष हा सनदशीर प्रमुख आहे. म्हणजे मंत्रिमंडळ जसा सल्ला देईल, तसा चालणारा आहे. क्वचितच तो

सल्ला अमान्य करील हें खरें. तथापि अध्यक्षाच्या शिफारसीनें मागणी आली, तरी ती मंत्रिमंडळाचीच होय, हें लोकसभा जाणतेच. लोकसभेला ही मागणी नाकारतां येते. तींत काट करतां येते अगर ती जशीच्या तशी मंजूर करतां येते. सभागृहाच्या नियमानें एखादी मागणी कमी करण्याची उपसूचना सभासद देऊं शकतो. पण खर्चाची बाब अधिक वाढवावी, अशी उपसूचना आणतां येत नाहीं. मंत्रिमंडळानें जी योजना केली असेल, तिची जबाबदारी त्याजवर म्हणून सामान्यपणें हें तत्त्व ठरलें आहे, कीं खर्च कमी करण्यास सांगतां येतें, पण अंदाजपत्रकांतील एखाद्या बाबीवर खर्च वाढवावा, असें सांगणारी उपसूचना देतां येत नाहीं. वाढता खर्च कसा करावा, हें सांगणें सोपें नाहीं. तसेंच करयोजनेंत दर कमी करावा अशी सूचना मांडतां येईल: पण दर वाढवावा अशी आणतां येणार नाहीं. तसें करूं दिलें तर मंत्रिमंडळ खऱ्या अर्थानें जबाबदार राहत नाहीं. खर्चाची व करव्यवस्थेची योजना मंत्रिमंडळाची असते, म्हणून ती पार पाडण्याची जबाबदारी त्यावरच टाकणें ठीक. या दृष्टीनें खर्च अगर कराचा दर वाढवणारी उपसूचना आणूं देणें योग्य नाहीं व असा नियम अगर संकेत बहुतेक घटनांतून आहे.

मंजूर झालेल्या खर्चाबाबत

९४. ( १ ) अध्यक्ष आपल्या सहीनें, मंजूर केलेल्या मागण्यांचें परिशिष्ट विधियुक्त करील व त्यांत खालील गोष्टींचा स्पष्ट उल्लेख असेल:—

( अ ) मागील कलमाप्रमाणें लोकसभेनें मान्य केलेल्या मागण्या ( Grants ),

( ब ) हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा असलेल्या खर्चाच्या निरनिराळ्या रकमा; मात्र पूर्वीच्या अंदाजपत्रकांत असेल त्यापेक्षां यापैकीं कोणतीही रक्कम अधिक असतां कामा नये.

( २ ) याप्रमाणें अध्यक्षानें स्वाक्षरीनें विधियुक्त केलेलें परिशिष्ट लोकसभेपुढें ठेवण्यांत येईल; पण त्याबाबत चर्चा अगर मतदान होणार नाहीं.

( ३ ) पुढील दोन कलमांतील व्यवस्थेला बाध न आणतां, हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा असलेला कोणताही खर्च वर लिहिल्याप्रमाणें

**परिशिष्टांत स्पष्ट उल्लेखिलेला नसेल, तर त्याला विधियुक्त मान्यता मिळाली आहे असें मानलें जाणार नाहीं.**

मागण्या मान्य झाल्या म्हणजे त्यांना Grants म्हणतात. या मान्य मागण्या व बोजा असलेला खर्च तपशीलवार असा एका परिशिष्टांत नमूद करून अध्यक्षानें त्यावर सही केली, म्हणजे त्याला पूर्णता येते, तो खर्च मान्य केला आहे असें समजलें जातें. सर्व व्यवस्था मग विधियुक्त होते. बोजा असलेल्या रकमा मागील अंदाजपत्रकांतील रकमांपेक्षां अधिक असतां कामा नये. जर त्यांत भर घालावयाची असेल, तर ती मंजूर करून घ्यावी लागेल. ती मागणी स्वरूपांत येते व मंजूर झाली म्हणजे प्रथम मान्य मागणींत धरली जाते व पुढील खेपेस ती बोजा असलेल्या खर्चाची रक्कम म्हणून लोकसभेपुढें मतदानाला येत नाहीं. एकदां मंजूर झाली म्हणजे ती बाब त्या मंजूर रकमेच्या मर्यादेपुरती असेपर्यंत मतदानाला येणार नाहीं. म्हणून तेवढ्या मर्यादेपर्यंत ती असल्यास ( ब ) प्रमाणें परिशिष्टांत ती घातली जाईल व अध्यक्ष ती विधियुक्त करील. ती रक्कम परिशिष्टांत समाविष्ट असल्याशिवाय विधियुक्त होणार नाहीं. अध्यक्षानें सही केल्यानंतर तें परिशिष्ट माहितीसाठीं लोकसभेपुढें ठेवलें जाईल. या वेळीं त्यावर चर्चा अगर मतदानही होत नाहीं. कारण सर्व चर्चा होऊन लोकसभेचा अखेरचा निर्णय परिशिष्टांत समाविष्ट असतो व त्या खरेपणाची ग्वाही म्हणून अध्यक्षाची सही त्यावर असते.

**खर्चाचें पुरवणी अंदाजपत्रक**

**९५. हिशोबाच्या वर्षांत मंजूर झालेल्या खर्चापेक्षां अधिक खर्च करणें अवश्य झालें, तर अध्यक्ष सदहू अधिक खर्चाबाबत अंदाजपत्रक तयार करवून तें पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांपुढें ठेवील व त्या अंदाजपत्रकांतील खर्चाबाबत मागील कलमांतील व्यवस्था लागू पडेल.**

अधिक खर्च करणें जरूर झालें तर पुरवणी अंदाजपत्रक पार्लमेंटपुढें ठेवण्यांत येईल व अंदाजपत्रकाबाबत जे संस्कार होतात, ते सर्व पुरवणी अंदाजपत्रकाबाबत होतील व तीच कामकाजाची रीत लागू पडेल.

**जादा खर्चास मंजुरी**

**९६. हिशोबाच्या वर्षांत मंजूर केलेल्या रकमेपेक्षां अधिक खर्च होऊन गेला, तर झालेल्या अधिक खर्चाबाबत लोकसभेपुढें, जर ती बाब मतदान घेतलें पाहिजे या सदरांतील असेल तर त्या खर्चाची मागणी मांडून**

त्याबाबत कलम ९३ व ९४ त सांगितलेली कारवाई झाली पाहिजे.

मंजुरीपेक्षां अधिक खर्च होणार असें वाटलें म्हणजे ती मागणी पुरवणी पत्रकानें करावयाची असते. पण मंजुरीपेक्षां खर्च होऊन गेला तर काय करावयाचें ? त्याबाबत या कलमाप्रमाणें व्यवस्था सांगितली आहे, ती अशी कीं अधिक खर्च झालेली रक्कम मागणीरूपानें मांडून मंजूर करून घेण्यांत यावी. अशी मागणी आली म्हणजे त्याबाबतची कारवाई कलम ९३ व ९४ कलमांतील व्यवस्थेला अनुसरून होईल. तात्पर्य, खर्च होण्यापूर्वी लोकसभेला खर्चाबाबत टीका करण्यास वाव पाहिजे, तसाच अधिक खर्च केल्यासही अधिकार हवा. मागाहून का होईना, पण त्याबाबत लोकमत स्पष्ट झालें पाहिजे. अधिक खर्च कां झाला अगर, होणार याचीं कारणें लोकप्रतिनिधींना कळलीं पाहिजेत; त्यावर चर्चा झाली पाहिजे व लोकसभेनें त्यांना मान्यता दिली पाहिजे. तिजोरीची किल्ली एका अर्थानें लोकसभेकडे असली पाहिजे. तिजोरीवर लोकसभेचा पूर्णतया ताबा असावा यासाठीं ही व्यवस्था केली आहे.

९७. ( १ ) एखादें बिल अगर उपसूचना, ज्याचा संबंध कलम ९० ( १ ) मधील अ ते फ पर्यंत ज्या बाबी आहेत त्यांच्याशीं येत असेल, तर तें बिल अगर ती उपसूचना अध्यक्षाच्या शिफारसी-शिवाय सभागृहापुढें आणतां येणार नाहीं व वरिष्ठ कायदेमंडळांत असें बिल प्रविष्ट करतां येणार नाहीं.

मात्र कर रद्द व्हावा अगर तो कमी व्हावा अशी उपसूचना आणावयाची असल्यास अध्यक्षाच्या शिफारसीची जरूरी नाहीं.

( २ ) बिल अगर उपसूचना, केवळ तींत दंड अगर फी अगर केलेल्या सोयीबद्दलचा मोबदला मागितलेला असेल एवढ्यानें वर ( १ ) यांत सांगितलेल्या स्वरूपाचीं होणार नाहींत; तसेंच, स्थानिक स्वराज्य संस्थेनें बसवावयाच्या कराबाबत, तो बसविणें, रद्द करणें, कमी करणें–इत्यादि तींत उल्लेख आहे, एवढ्यानें तीं ( १ ) यांत वर्णन केलेल्या स्वरूपाचीं होणार नाहींत.

( ३ ) जर एखादें बिल कायदा झाल्यानंतर त्याचा परिणाम म्हणून हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून खर्च करणें भाग पडणार असेल, तर

**असें बिल कोणत्याही सभागृहाला अध्यक्षानें शिफारस केल्याशिवाय विचारांत घेतां येणार नाहीं.**

पैशाबाबतचें बिल याची व्याख्या कलम ९० मध्यें आहे. पैशाबाबतचें बिल अगर उपसूचना आणावयाची झाल्यास अध्यक्षाची शिफारस आवश्यक आहे व असें बिल वरिष्ठ कायदेमंडळांत आणतां येणार नाहीं. कर रद्द करावा अगर कमी करावा या अर्थाच्या उपसूचनेला अध्यक्षाच्या शिफारसीची जरूरी नाहीं. पैशाचें बिल हें महत्त्वाचें बिल होय; कारण त्यावर सर्व राज्यकारभार चालणार; या दृष्टीनें वाटेल त्यानें उठावें व असलें बिल मांडावें असें होऊं लागलें तर कठीण प्रसंग येईल. म्हणून असल्या बिलांचें नियमन सर्व घटनांतून आहे; अशा बिलाला राज्यप्रमुखाची शिफारस असली पाहिजे असा बहुतेक घटनांतून नियम आहे. सामान्यपणें पैशाबाबतचीं बिलें मंत्रिमंडळच आणतें. एखाद्या बिलाचा परिणाम खर्च वाढण्यांत होणार असेल, तर तें बिल अध्यक्षाची शिफारस असल्याशिवाय पास करतां येणार नाहीं.

## सामान्यतः कामकाजाची रीत

**कामकाजाची रीत**

९८. ( १ ) प्रत्येक सभागृहानें या घटनेंतील व्यवस्थेला बाध न आणतां आपापल्या सभागृहांतील कामकाजाच्या रीतीबाबत नियम करावेत.

( २ ) वर ( १ ) यांत सांगितल्याप्रमाणें नियम तयार होईपर्यंत विद्यमान कायदेमंडळाचे नियम वरिष्ठ कायदेमंळाचा सभापति व लोकसभेचा सभानायक यानीं ज्या कांहीं दुरुस्त्या त्यांत केल्या असतील त्यांना अनुसरून लागू राहतील.

( ३ ) अध्यक्ष वरिष्ठ कायदेमंडळाचा सभापति व लोकसभेचा सभानायक यांचा सल्ला घेऊन संयुक्त सभेबद्दल व दोन्ही सभागृहांतील दळणवळणाबद्दल नियम करील.

( ४ ) दोन्ही सभागृहांच्या संयुक्त सभेंत लोकसभेचा सभानायक अगर त्याच्या गैरहजेरींत ( ३ ) याला अनुसरून केलेल्या नियमाप्रमाणें ज्याला अधिकार असेल तो सभाप्रमुख राहील.

प्रत्येक सभागृहानें आपल्या कामकाजाबद्दल जे नियम करावयाचे आहेत, ते तयार होईपर्यंत चालू मध्यवर्ती कायदेमंडळाचे नियम, त्यांत जे फरक केले असतील त्यासुद्धां लागू राहतील. प्रत्येक सभागृहाची एक नियमावलि (manual of procedure) असतेच; त्यांत प्रश्न विचारण्यापासून ते ठराव, बिलें, संयुक्त सभा, सभासदांचे हक्क इत्यादिबाबत नियम असतात. प्रत्येक सभासदाला या नियमांचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे. यावर सभासदाची कार्यक्षमता अवलंबून असते. कोणता विषय चर्चेला केव्हां व कसा आणावा हें त्याला माहित असलें पाहिजे. सामान्यपणें कामकाजाचे नियम आतां रूढ झाले आहेत. ब्रिटिश पार्लमेंटचे नियम हेच बहुतेक ठिकाणीं आधारभूत आहेत. या नियमांत दोन सभागृहांत संदेश पोहोंचविणें, कामकाजाची दखल देणें, विचारविनिमय करणें याही गोष्टींचा समावेश होतो. हे नियम (३) यांत सांगितल्याप्रमाणें अध्यक्ष करील.

पार्लमेंटमधील भाषा

९९. (१) पार्लमेंटचें कामकाज हिंदींत अगर इंग्रजींत चालेल. मात्र एखाद्या सभासदाला वरीलपैकीं, कोणत्याही भाषेंत आपलें म्हणणें नीटपणें मांडतां येत नसेल, तर सभापति अगर सभानायक त्याला त्याच्या मातृभाषेंत बोलण्याची परवानगी देईल.

(२) जर एखाद्या सभासदानें वरील दोन भाषाव्यतिरिक्त भाषेंत भाषण केलें असेल तर वरिष्ठ कायदेमंडळाचा सभापति, तसेंच लोकसभेचा सभानायक त्याचा सारांश हिंदींत अगर इंग्रजींत करण्याची व्यवस्था करील व हा सारांश सभागृहांतील वृत्तांतांत समाविष्ट केला जाईल.

हिंदी व इंग्रजी यांपैकीं कोणत्याही भाषेंत बोलण्याची सभासदाला मुभा आहे. या भाषेंत जर सभासदाला नीट बोलतां येत नाहीं असें वाटलें, तर सभाप्रमुख त्याला मातृभाषेंत बोलण्याची परवानगी देईल व त्या भाषणाचा सारांश हिंदींत अगर इंग्रजींत करण्याची व्यवस्था होईल. हा सारांश अधिकृत वृत्तांतांत येईल. हिंदी हीच राष्ट्रभाषा होणार हें उघड आहे. कांहीं काल इंग्रजी चालू राहील इतकेंच.

भाषणावर मर्यादा

१००. (१) प्रमुख अगर मुख्य न्यायालयाच्या कर्तव्यकर्मांतर्गत वर्तनावर पार्लमेंटमध्यें चर्चा होणार नाहीं. मात्र जर एखाद्या न्यायाधिशाला काढावा अशा अर्थाचा

अर्ज अध्यक्ष यांच्याकडे धाडावा म्हणून सूचना आल्यास मात्र त्या वेळीं न्यायाधिशाच्या वर्तनावर टीका करतां येईल.

( २ ) वर ( १ ) यांत उल्लेख केलेलें मुख्य न्यायालय यांत परिशिष्ट १ मधील भाग ३ यांतील संस्थानांतील ज्या न्यायालयांना प्रकरण ४ करतां मुख्य न्यायालय मानलें आहे, त्यांचा समावेश होईल.

न्यायदान निःपक्षपाती व निर्भय व्हावयाचें तर न्यायाधिशांनीं आपलें कर्तव्य बजावीत असतां जें वर्तन केलें असेल, त्यावर टीका होतां कामा नये. कायदेमंडळानें न्यायदानांत हस्तक्षेप करूं नये, हा योग्य सिद्धांत आहे. जेव्हां न्यायाधिशाला काढावा अशी सूचना असेल, त्या वेळीं त्यावरील टीका प्रस्तुत ठरेल. तेवढाच अपवाद येथें मानला आहे.

**कामकाज व कोर्टाचे अधिकार**

१०१. ( १ ) पार्लमेंटमध्यें जें कांहीं झालें, तें कामकाजाच्या नियमांना सोडून होतें एवढ्या मुद्द्यावर हें कामकाज कोठेंही चौकशीचा विषय होणार नाहीं.

( २ ) एखादा अधिकारी, अगर पार्लमेंटचा सभासद, ज्याला घटनेप्रमाणें कामकाजाबद्दल अगर पार्लमेंटमध्यें शांतता ठेवण्याबद्दल अधिकार दिले आहेत, त्यानें आपला हा अधिकार चालवीत असतांना जें कांहीं केलें असेल, त्याची दखल कुठल्याही न्यायालयाला घेतां येणार नाहीं.

कामकाजाच्या नियमांना सोडून कांहीं झालें, तेवढ्यानें एखादी गोष्ट बेकायदेशीर होऊं शकत नाहीं. गैरपद्धतीनें झालेलें सर्वच गैरकायदा नसतें. म्हणून गैरपद्धतीनें झालें या कारणासाठीं पार्लमेंटच्या कुठल्याही गोष्टीची दखल अगर चौकशी होणार नाहीं. तसेंच दिलेल्या अधिकारांत अधिकारी अगर सभासद ( २ ) यांत वर्णन केलेल्या अधिकारक्षेत्रांत वागला, तर त्याच्या वर्तनाची चौकशी करण्याचा हक्क कुठल्याही कोर्टाला नाहीं. असा हक्क ठेवला, तर नियमाप्रमाणें वागणें व निःपक्षपातीपणें कामकाज चालविणें कठीण होईल.

# प्रकरण ३ रें–अध्यक्षाचे विधिविषयक हक्क

अध्यक्ष व वटहुकूम

१०२. ज्यावेळीं पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांची बैठक चालू नसेल, त्या वेळीं जर अध्यक्षाला परिस्थिति लक्षांत घेतां तावडतोब कांहीं तरी करणें अवश्य आहे असें वाटलें, तर परिस्थितीच्या दृष्टीनें अवश्य असा वटहुकुम त्याला काढतां येईल.

(२) असा वटहुकुम अधिकार व परिणामकारकता या बाबतींत पार्लमेंटनें पास केलेल्या व अध्यक्षानें मान्यता दिलेल्या कायद्याप्रमाणेंच राहील. परंतु असा प्रत्येक वटहुकुम

(अ) पार्लमेंटच्या सभागृहापुढें ठेवण्यांत येईल व पार्लमेंट पुन्हा भरल्यापासून ६ आठवडे संपतांच रद्द होईल; अथवा ही मुदत संपण्यापूर्वींच जर दोन्ही सभागृहांनीं तो नापसंत आहे असा ठराव केला, तर दुसरा ठराव पास होतांच तो रद्द होईल.

(ब) अध्यक्षास वाटेल त्या वेळेस परत घेतां येईल.

स्पष्टीकरण–जेव्हां दोन्ही सभागृहें एकदम बोलविलीं जाणार नाहींत, तेव्हां जें उशीरां बोलाविलें जाईल, त्या उशीर झालेल्या तारखेपासून ६ आठवड्यांची मुदत मोजण्यांत येईल.

(३) जी गोष्ट पार्लमेंटला या घटनेप्रमाणें करतां येणार नाहीं, अशी गोष्ट वटहुकुमानेंही करतां येणार नाहीं व तशी गोष्ट वटहुकुमांत असल्यास तेवढ्या प्रमाणांत वटहुकूम रद्दबातल मानला जाईल.

राज्यप्रमुख अध्यक्ष याला कार्यकारी सत्ता किती असते व ती त्यानें कशी चालवावयाची, याचा प्रपंच मागील प्रकरणांत आला आहे. अध्यक्षास विधिविषयक म्हणजे कायदे करण्याचा अधिकार किती व केव्हां आहे, याचा विचार या प्रकरणांत

केला आहे. या घटनेंत प्रभुत्व अगर राज्याची मालकी जनतेची व ती प्रातिनिधिक पद्धतीनें कार्यान्वित व्हावयाची आहे. जनतेचे प्रतिनिधि पार्लमेंटमध्यें येतील, ते कायदे करतील व कायद्यानें राज्यकारभार चालविला जाईल, लोकव्यवहाराचें नियमन होईल. राज्यकारभाराचें प्रत्येक कृत्य हें कायद्याशीं संबधित असलें पाहिजे. प्रत्येक अधिकारी आपला अधिकार तत्संबंधीं केलेल्या कायद्याप्रमाणें चालवील. राज्य कोणाच्या लहरीवर अगर मर्जीवर आधारलेलें नाहीं व त्याचा कारभारही कोणा व्यक्तीच्या मर्जीवर ठेवलेला नाहीं. सर्व कांहीं नियमबद्ध आहे. या स्थितींत पार्लमेंट हें जनतेच्या प्रभुत्वाचें रक्षणकर्तें आहे. पार्लमेंट हें कायदे करून मालकी अमलांत आणतें, जनतेची इच्छा क्रियाशील करतें. पण पार्लमेंटची बैठक अखंड व अविरत चालू नसते. मग जेव्हां पार्लमेंट चालू नसेल, तेव्हां जर परिस्थिति बिकट झाली व ताबडतोब इलाज करणें जरूर झालें, तर काय व्यवस्था? कुणी तरी कायदा केला पाहिजे. कारण जें कांहीं होणार, तें कायद्यामार्फतच होणार; म्हणून सर्व घटनांतून राज्यप्रमुखाला या परिस्थितींत अवश्य ते वटहुकुम काढण्याचा अधिकार दिलेला असतो. ताबडतोब पार्लमेंट बोलावून बिल मांडून चर्चा करून कायदा करणें सोपें नसतें. तेवढ्या वेळांत राष्ट्राचा नाश होणें अगर मोठी हानि होणें संभवनीय असतें. अशा परिस्थितींत ताबडतोब वटहुकुम काढून परिस्थितीला तोंड देणें हा एकच मार्ग असतो. म्हणून अध्यक्षानें वटहुकुम काढावा, अशी या कलमांत तरतूद आहे. हा अधिकार म्हणजे मर्यादित कालापर्यंत एकट्यानें कायदा करून तो जारी करणें होय. वटहुकुम हा कायद्याइतकाच विधियुक्त व प्रभावी मानला जाईल. परिस्थितीशीं तोंड देण्यासाठीं अशी सत्ता राज्यप्रमुखाला असणें यांत गैर कांहीं नाहीं अगर लोकशाही तत्त्वांना विसंगत असेंही कांहीं यांत नाहीं. शिवाय हा वटहुकुम मंत्रिमंडळाच्या सल्ल्यावरूनच अध्यक्ष काढणार हें उघडच आहे. तसेंच पार्लमेंट भरल्यानंतर ६ आठवड्यांनंतर तो अमलांत राहत नाहीं. या मुदतींत मंत्रिमंडळ वटहुकुमांतील व्यवस्था अधिक काळ चालू ठेवावयाची असल्यास त्याप्रमाणें बिल आणील व तें पास करून घेईल. असें न केल्यास ६ आठवड्यांनंतर वटहुकुम रद्द होईल. त्याही आधीं दोन्ही सभागृहांनीं नापसंतीचा ठराव केल्यास तोच परिणाम होईल. तात्पर्य, लोकप्रतिनिधींना वटहुकुमाबाबत आपलें म्हणणें व मत देण्याची संधि शक्य तितक्या लवकर मिळेल.

वटहुकुम या शब्दानें निष्कारण गैरसमज होतो. संकटकालीं आपद्धर्म म्हणून कांहीं गोष्टी करणें अवश्य असतें; एवढेंच नव्हे, तर तसें न केलें तर आत्मघात होतो, राष्ट्रनाश होतो. वटहुकुम म्हणजे अपवादप्रसंगांतील व्यवस्था आहे; नित्य धर्म म्हणजे पार्लमेंटचा कायदा, अपवाद म्हणजे अध्यक्षाचा वटहुकुम होय. जेवढा संकट-काल तेवढ्यापुरताच तो असावा; शिवाय शक्य तितक्या लवकर पार्लमेंटपुढें तो

यावा. अशी व्यवस्था असली म्हणजे लोकशाहीला कांहींही धोका पोंचण्याचा संभव नाहीं. मंत्रिमंडळावर राष्ट्राची जबाबदारी असते म्हणून मंत्रिमंडळाला ती पुरी पाडण्याकरतां जरूर पडेल तेव्हां वटहुकुम काढण्याचा सल्ला अध्यक्षाला देतां आला पाहिजे. वटहुकुम लोकमताविरुद्ध असेल, तर पार्लमेंट ठराव करून तो नापसंत करील. पसंत असेल तर मंत्रिमंडळ कायदा करून त्याला विधियुक्त स्वरूप देऊन तो कायम करील.

# प्रकरण ४ थें–संयुक्त सरकारचें न्यायखातें

प्रमुख न्यायालयाची स्थापना व घटना

१०३. (१) हिंदुस्थानचें एक प्रमुख (Supreme) न्यायालय राहील, त्यांत प्रमुख न्यायाधीश व सातांपेक्षा कमी नव्हेत असे पार्लमेंट जी त्यांची संख्या कायदा करून ठरवील, इतके न्यायाधीश असतील.

(२) प्रमुख न्यायालयाचा प्रत्येक न्यायाधीश अध्यक्ष नेमील. त्याची नेमणूक करतांना प्रमुख न्यायालयाचे न्यायाधीश आणि घटक-राज्यांच्या मुख्य न्यायालयांचे न्यायाधीश यांचा अवश्य तेवढ्यापुरता सल्ला घेऊनच ही नेमणूक अध्यक्ष करील. ही नेमणूक अध्यक्ष आपला शिक्कामोर्तब करून करील. याप्रमाणें नेमलेला न्यायाधीश वयाचीं ६५ वर्षें होईपर्यंत कामावर राहील.

(२) मात्र प्रमुख न्यायाधिशाव्यतिरिक्त न्यायाधिशांची नेमणूक करतांना प्रमुख न्यायाधिशाचा सल्ला नेहमीच घेतला जाईल. तसेंच

(अ) न्यायाधिशाला सहीनें आपला लेखी राजीनामा अध्यक्षाकडे केव्हांही देतां येईल.

(ब) (४) यांत सांगितल्याप्रमाणें न्यायाधिशाला कामावरून दूर करतां येईल.

(३) प्रमुख न्यायालयाचा न्यायाधीश होण्यासाठीं उमेदवार हा हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे व

(अ) निदान पांच वर्षें मुख्य न्यायालयांत त्यानें न्यायाधिशाचें काम केलें असलें पाहिजे. अगर अशा लागोपाठ दोन अगर अधिक न्यायालयांत त्यानें न्यायाधिशाचें काम केलें असलें पाहिजे.

(ब) अगर निदान १० वर्षेंपर्यंत मुख्य न्यायालयांत अगर अशाच दोन अगर अधिक न्यायालयांत लागोपाठ १० वर्षेंपर्यंत त्यानें वकिली केली असली पाहिजे.

खुलासा (१)—या कलमांत मुख्य कोर्ट अगर न्यायालय म्हणजे तसा अधिकार चालविणारें कोर्ट अगर हिंदुस्थानांत ही घटना अमलांत येण्यापूर्वी तसा अंमल चालविलेलें कोर्ट होय.

खुलासा (२)—या कलमांत सांगितलेली मुदत मोजतांना जर एखाद्या वकिलानें दरम्यान न्यायाधिशाचें काम केलें असेल, तर तो काळ जमेंत धरला जाईल.

(४) दुर्वर्तन अगर अपात्रता शाबीत झाली आहे या मुद्द्यावर एकाच अधिवेशनांत जर पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांनीं प्रमुख न्यायालयाच्या एखाद्या न्यायाधिशाला काढून टाकावें असा विनंतिवजा ठराव आणून तो हजर असणाऱ्या सभासदांच्या संख्येपैकीं $\frac{2}{3}$ नीं पाठिंबा देऊन पास करून अध्यक्षाकडे धाडला, तर अध्यक्ष त्या न्यायाधिशाला कामावरून दूर करील.

(५) मागील पोटकलमांत सांगितलेलें दुर्वर्तन अगर अपात्रता यांबाबत कशी चौकशी व्हावी, तें कसें शाबीत करावें व ठराव करून करावयाचा विनंतीअर्ज कसा असावा, यासंबंधांत पार्लमेंट कायदा करून सर्व व्यवस्था नियमित करील.

**( ६ ) नेमलेला प्रत्येक न्यायाधीश अधिकारग्रहण करण्यापूर्वी तिसऱ्या परिशिष्टांत सांगितलेली प्रतिज्ञा अध्यक्षासमोर अगर त्यासाठीं नेमलेल्या इसमासमोर घेईल.**

**( ७ ) ज्याची प्रमुख न्यायालयाचा न्यायाधीश म्हणून नेमणूक झाली आहे, अशा इसमास हिंदुस्थानांतील कुठल्याही कोर्टापुढें अगर अधिकाऱ्यापुढें वकील म्हणून काम चालवितां येणार नाहीं.**

प्रमुख न्यायालय हें किमान सात न्यायाधिशांचें असेल. त्यांची नेमणूक अध्यक्ष आपल्या अधिकारांत स्वदस्तुरीनें शिक्कामोर्तब करून करील. नेमणूक करण्यापूर्वी कलमांत सांगितल्याप्रमाणें सल्ला घेण्यांत येईल. नेमलेला न्यायाधीश त्याच्या वयाचीं ६५ वर्षे पुरीं होईपर्यंत कामावर राहील. त्याला काढावयाचें असल्यास व त्यानें राजीनामा न दिल्यास ( ४ ) मध्यें सांगितल्याप्रमाणें त्याचें दुर्वर्तन अगर अपात्रता याचसाठीं त्याला काढण्यांत येईल, पण त्यासाठीं सभागृहांचे ठराव हवेत. तात्पर्य, न्यायाधिशाच्या मनांत आपल्या जागेबाबत शाश्वति हवी व आपली वयो-मर्यादा भरेपर्यंत आपण योग्य तऱ्हेनें वागत असल्यास आपणांस कोणी काढणार नाहीं असा विश्वास हवा. न्यायदान निःपक्षपाती व्हावें, राजकारणांतील पक्षांना त्यांत नेमणुका करून लुडबुड करतां येऊं नये, या दृष्टीनें नेमलेले न्यायाधीश कांहीं वयो-मर्यादेपर्यंत जागेवर राहिले पाहिजेत. अमेरिकेंत नवीन पक्ष अधिकारारूढ झाला, कीं न्यायाधीश देखील बदलतात. न्यायाधिशांच्याही जागा निवडणुकीनें भरल्या जातात. या परिस्थितींत पक्षपाती न्याय होणें व त्यावर राजकारणाची छाप पडणें साहजिक असतें. या नेमणुका गुणावर होणें इष्ट आहे. निवडणुकीनें अगर पुरस्कारानें ( Patronage ) त्या झाल्यास न्यायदानांत कार्यक्षमता व निःस्पृहता राहत नाहीं. म्हणून उमेदवाराची लायकी ठरवून व ज्यांची सल्लामसलत घेणें अवश्य वाटत आहे, त्यांची ती घेऊन अध्यक्षानें न्यायाधिशांची नेमणूक स्वतः करावी व एकदां केली म्हणजे वयोमर्यादा संपेपर्यंत ती कायम राहावी, ही या कलमांतील व्यवस्था उत्कृष्ट आहे. दुर्वतन अगर अपात्रता यासाठीं जरी त्याला पदच्युत करावयाचें झाल्यास दोन्ही सभागृहांचे ठराव पाहिजेत, या व्यवस्थेनें न्यायाची प्रतिष्ठाच वाढते. कोणाच्या लहरीवर न्यायाधिशाची नोकरी अवलंबून नाहीं. विद्यमान मंत्रिमंडळाला पण त्यांना काढतां येणार नाहीं.

न्यायाधिशाच्या कामावर असतांना न्यायाधिशाला वकिली करितां येणार नाहीं ही बंदी अगदीं योग्य आहे. तसेंच अधिकारग्रहण करण्यापूर्वी घटनेशीं निष्ठावंत

राहून निःस्पृहपणें काम करीन, अशी प्रतिज्ञा त्याला करावी लागेल, हीही व्यवस्था योग्य अशीच आहे. मन प्रतिज्ञेनें बद्ध व बाहेरून कोणाचीही भीति नाहीं या परिस्थितींत कायद्याचा कांटा न्यायाधीश समतोल ठेवील अशी आशा बाळगणें अवाजवी नाहीं.

**न्यायाधिशांचें वेतन**

१०४. प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशांचें वेतन, भत्ता, रजा, पेन्शन वगैरे बाबत पार्लमेंट वेळोवेळीं कायदा करून त्या बाबी ठरवून देईल व तोंपर्यंत परिशिष्ट २ मध्यें याबाबत सांगितलेली व्यवस्था अमलांत राहील. मात्र नेमणुकीनंतर त्यांत त्याला अहितकारक होईल असा फरक केला जाणार नाहीं.

**हंगामी प्रमुख न्यायाधीश**

१०५. जेव्हां जेव्हां प्रमुख न्यायाधिशाची जागा खाली पडेल, अगर प्रमुख न्यायाधीश गैरहजेरीमुळें अगर अन्य कारणासाठीं काम पाहूं शकत नसेल, त्या वेळीं सदहू जागेवर अन्य न्यायाधिशांपैकीं एकाला अध्यक्ष नेमील.

**खास न्यायाधिशांची नेमणूक**

१०६. (१) जर एखादे वेळीं काम सुरूं करण्यासाठीं अगर चालू ठेवण्यासाठीं अवश्य ती गणसंख्या नसेल, तर प्रमुख न्यायाधीश संबंधित मुख्य कोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाला विचारून जरूर त्या मुदतीपर्यंत एखाद्या मुख्य कोर्टाच्या न्यायाधिशाला खास न्यायाधीश म्हणून लेखी विनंति करून नेमील.

(२) अशा रीतीनें नेमलेल्या न्यायाधिशानें आपलीं अन्य कामें बाजूस ठेऊन प्रमुख न्यायालयांत हजर राहून सांगितलेल्या मुदतीपर्यंत त्या न्यायालयाचा न्यायाधीश म्हणून काम करावयाचें आहे व हें काम करीत असतांना त्याला त्या न्यायालयांतील न्यायाधिशाचें क्षेत्र, सत्ता, सवलती यांबाबतचे सर्व अधिकार राहतील.

या कलमांत जरूर त्या प्रसंगीं घटक प्रांतांतील मुख्य कोर्टांतून प्रमुख न्यायालयाच्या कामासाठीं न्यायाधीश नेमण्याचा अधिकार दिला आहे.

१०७. या प्रकरणांत कांहींही व्यवस्था असली, तरी प्रमुख न्यायाधिशाला वाटलें तर, ज्या इसमानें प्रमुख न्यायालयांत न्यायाधिशाचें काम केलें असून जो सेवानिवृत्त आहे, अशा इसमास विनंति करून त्याला न्यायाधिशाचें काम करण्यास सांगतां येईल व असें काम तो करील त्या वेळीं त्याचे अधिकार प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशाच्या अधिकारांप्रमाणें राहतील. मात्र कोणाही इसमास त्याच्या इच्छेविरुद्ध काम करण्यास सांगतां येणार नाहीं.

निवृत्त न्यायाधिशांची हजेरी

न्यायाधीश होण्याची विनंति सरकारनें केली तर ती मान्य करून कांहीं काळ न्यायदान करणें हें नागरिकाचें कर्तव्य आहे. वकिलींत अधिक प्राप्ति मिळते म्हणून ही जागा नाकारणें हें नागरिकधर्माला सोडून आहे. निदान अशी भावना इंग्लंडमध्यें आहे. सेवानिवृत्त न्यायाधिशांनीं सुद्धा आपली सेवा देशानें मागितली तर दिली पाहिजे. या कलमांत फक्त सेवानिवृत्त न्यायाधिशांच्या बाबतींत त्यांची मान्यता असल्यास जरूरीच्याच प्रसंगीं त्यांची नेमणूक करतां येईल अशी व्यवस्था आहे.

१०८. प्रमुख न्यायालयाच्या कामाचें दप्तर राहील, व दिल्ली येथें न्यायालयाचें काम चालेल; तथापि अध्यक्षाच्या संमतीनें अन्यत्रही वेळोवेळीं न्यायालयाचें काम चालविण्याबद्दल प्रमुख न्यायाधिशाला अधिकार आहे.

प्रमुख न्यायालयाची जागा

१०९. घटनेंतील व्यवस्था पाळून, खालील बाबतींची प्राथमिक दखल घेण्याचा अधिकार फक्त प्रमुख कोर्टालाच आहे; जेव्हां तंटयाची बाब,

प्रमुख न्यायालयाचें प्राथमिक क्षेत्र

(अ) हिंदुस्थान सरकार आणि एक अगर अधिक घटक राज्यें यांच्यांतील असेल,

(ब) अगर एका बाजूस हिंदुस्थान सरकार व एखादें अगर अधिक घटक राज्यें, व दुसऱ्या बाजूस एक अगर अधिक घटक राज्यें, यांच्यांतील असेल,

(क) अगर दोन अगर अधिक घटक राज्यें यांच्यांतील असेल.

मात्र ही तंटयाची बाब (मग तींत कायद्याचा अगर वस्तु-स्थितीचा मुद्दा असो) अशा स्वरूपाची पाहिजे कीं, तींत एखाद्या कायदेशीर हक्काचें अस्तित्व अगर व्याप समाविष्ट झाला आहे.

मात्र या प्राथमिक क्षेत्रांत खालील गोष्टींचा समावेश होणार नाहीं:

(१) प्रथम परिशिष्ट भाग ३ यांत नमूद केलेल्या संस्थानांपैकीं एक जर तंटयांत पक्षकार असेल आणि जर तो तंटा, एखादा तह अगर करार अगर सनद अगर अन्य दस्तऐवज, जो ही घटना सुरू होण्यापूर्वींच झाला, आणि जो घटना सुरू झाल्यानंतर अमलांत असेल, त्याबाबत उपस्थित झाला असेल तर,

(२) जर तंटयांत एखादें घटक राज्य पक्षकार असून असल्या तंटयाची दखल घेऊं नये असें ज्यांत सांगितलें आहे, असा करार, सनद, तहनामा अगर अन्य दस्तऐवज या-बाबत तंटा असेल तर.

प्रत्येक न्यायालयाचें क्षेत्र दोन दृष्टींनीं विभागलें जातें; एक प्राथमिक व दुसरें अपीलाविषयींचें. प्राथमिक क्षेत्र म्हणजे तक्रार अगर तंटा प्रथम चौकशीस घेऊन त्यांत निकाल देणें. अपीलक्षेत्र म्हणजे एका कोर्टानें निवाडा दिला असतांना त्याविरुद्ध दाद मागण्याची कृति ज्यांत घडते तें. कायद्यानें ही सर्व व्यवस्था ठरविली जाते. प्रदेशाच्या दृष्टीनें अगर विषयाच्या दृष्टीनें हीं क्षेत्रें विभागलीं जातात. या कलमांत विषयाच्या दृष्टीनें प्रमुख न्यायालयाचें सर्वस्वीं प्राथमिक क्षेत्र सांगितलें आहे. या विषयांबाबत अन्य कोणत्याही कोर्टाला दखल घेतां येणार नाहीं. संघराज्य व त्याचे एक अगर अधिक घटक यांच्यांत, तसेंच घटकाघटकांत अगर संघराज्य व घटक विरुद्ध अन्य घटक यांत, ज्या बाबतींत कायदेशीर हक्काचें अस्तित्व अगर विस्तार समाविष्ट आहेत अशा बाबींत तंटा उपस्थित झाल्यास तो तंटा प्रमुख न्यायालयानें चालविणें इष्ट आहे, म्हणून त्याला या बाबतींत प्राथमिक क्षेत्रांतील

अधिकार बहाल करण्यांत आले आहेत. या कलमाची उभारणी अमेरिकेच्या घटनेप्रमाणेंच आहे. प्राथमिक क्षेत्रांत कोणत्या बाबींतील तंटा येणार नाहीं याचा खुलासा ( १ ) व ( २ ) यांत दिला आहे. ( २ ) मध्यें तंट्याची दखल घेतां येणार नाहीं, असें कलम असल्यामुळें ही मनाई उघड आहे. ( १ ) यांत, जे करार घटनेपूर्वी होते व नंतर चालू ठेवले आहेत व जे सनद, तहनामा अगर अन्य दस्तऐवजांत नमूद केलेले आहेत, त्यांचा निर्देश आहे. त्यांची मान्यता ही राजकीय आहे. त्यांत फरक करणें अगर त्याचा अर्थ लावणें हा हक्क कोर्टाला राहत नाहीं. त्याबाबत तंटा निघाला तर सरकार त्याचा निकाल करील. तो अधिकार कार्यकारी सत्तेचा आहे. न्यायदात्या सत्तेला तो नाहीं. घटनेंत नमूद केलेल्या बाबींतून तंटा निर्माण झाला असेल, तर न्यायदात्री सत्ता तेथें प्रभावी होते. तहनामे, करार, सनद हे घटनेबाहेर आहेत म्हणून न्यायालयाला तेथें अधिकार नाहीं.

प्रमुख न्यायालयाचें अपीलक्षेत्र

११०. ( १ ) घटक राज्यांतील मुख्य कोर्टाचा ( हायकोर्ट ) निवाडा, हुकुम अगर फैसला जो अखेरचा असेल मग तो फौजदारी, दिवाणी अगर अन्य कामांतील असो, त्याविरुद्ध प्रमुख न्यायालयाकडे अपील करतां येईल; मात्र ज्या बाबतींत अपील करावयाचें आहे, त्यांत घटनेचा अर्थ कसा लावावयाचा हा प्रश्न संबंधित आहे असा शेरा मुख्य कोर्टानें दिला तरच अपील लागू होईल.

( २ ) जर मुख्य कोर्टानें असा शेरा देण्याचें नाकारलें, पण प्रमुख न्यायालयाला जर त्या बाबतींत घटनेच्या कलमांचा अर्थ लावणें हा प्रश्न निगडित आहे असें वाटलें तर सदहू न्यायालयाला तो निवाडा, हुकुम अगर फैसला यांविरुद्ध अपील करण्याची खास परवानगी देतां येईल.

( ३ ) वर ( १ ) यांत सांगितल्याप्रमाणें शेरा दिला अगर ( २ ) यांत सांगितल्याप्रमाणें परवानगी दिली, तर कोणत्याही पक्षकाराला सदहू प्रश्नाचा निकाल चुकीचा दिला आहे या मुद्द्याखेरीज इतर मुद्द्यावरही अपील करतां येईल.

खुलासा.—अखेरचा निकाल म्हणजे अपील करणाऱ्याच्या बाजूनें तो निकाल मिळाल्यास तंट्याचा निकाल ज्यामुळें पूर्णपणें होतो तो.

ज्या निकालांत घटनेच्या अर्थासंबंधीं कांहीं मुद्दा आला असेल, अशाच निकालाविरुद्ध अपिलाचा हक्क आहे. प्रत्येक अखेरच्या निकालाविरुद्ध नाहीं. शिवाय मुख्य कोर्टानें तसा शेरा दिला पाहिजे; किंवा प्रमुख कोर्टाला तसा अर्थ लावण्याचा प्रश्न उपस्थित होत आहे असें वाटलें पाहिजे, मगच प्रमुख कोर्टाकडे अपील लागू होईल. जेथें शेरा अगर परवानगी दिली असेल, तेथें त्याविरुद्ध त्या प्रश्नाबाबतचा निकाल चुकीचा आहे या मुद्द्यावर अगर अन्य मुद्द्यावरही अपील करतां येईल.

प्रमुख न्यायालयाचें अन्य बाबतींत अपील क्षेत्र

१११. (१) मुख्य कोर्टांतील निवाडा, फैसला, हुकुम जो दिवाणी कामांत दिला गेला असेल त्याविरुद्ध प्रमुख न्यायालयांत अपील करतां येईल. मात्र,

(अ) दाव्याच्या विषयाची किंमत अव्वल कोर्टांत अगर अपिलांत २० हजार रुपयांपेक्षां कमी नाहीं,

(ब) अगर कोर्टाचा निवाडा अथवा हुकुम अगर फैसला यांमध्यें प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें तितक्याच किंमतीच्या मिळकतीविषयीं हक्क अगर प्रश्न गुंतला आहे,

(क) अगर प्रमुख न्यायालयाकडे अपील दाखल करण्यासारखी बाब आहे,

असा शेरा मुख्य कोर्टानें दिला असला पाहिजे; आणि जर ज्या निकालाविरुद्ध अपील करावयाचें आहे, तो निकाल मुख्य कोर्टानें खालच्या कोर्टाकडून आलेल्या निकालावर आपल्या अपीलक्षेत्रांत दिला असेल तर (क) सोडून बाकीच्या बाबतींत कांहीं तरी महत्वाचा कायद्याचा मुद्दा उपस्थित होत आहे, असा आणखी शेरा दिला असला पाहिजे.

(२) ११० कलमांत कांहीं असलें तरी वरील (१) यांत सांगितल्याप्रमाणें अपील करणाऱ्या पक्षकारास अपिलाच्या विषयाबाबत घटनेचा अर्थ चुकीचा लावला गेला असा कायद्याचा मुद्दा अपिलांत घेतां येईल.

घटनेचा अर्थ लावण्याबाबत जसें अपील करतां येईल, तसेंच दिवाणी कामांत दाव्याच्या विषयाची किंमत रु. २० हजारापेक्षां जास्त आहे, अगर तितक्या मिळकतीचा संबंध दाव्यांत आला आहे अगर अपिलाला योग्य अशी दिवाणी बाब आहे, या मुद्यावर प्रमुख न्यायालयाकडे अपील करतां येईल. मात्र कलमांत सांगितल्याप्रमाणें मुख्य कोर्टाचा शेरा पाहिजे. तसेंच अपीलनिकालाविरुद्ध अपील करावयाचें असेल, तर कायद्याचा मुद्दा उपस्थित होत आहे, असा पण शेरा पाहिजे. उद्देश एवढाच कीं, कांहीं तरी मोठी मिळकत अगर महत्त्वाचा कायद्याचा मुद्दा असल्याशिवाय अपील करतां येऊं नये. क्षुल्लक बाबतींत अपील नसावें हें योग्यच आहे. (१) कलमाप्रमाणें अपील केल्यानंतर त्या अपिलांत कायद्याचा मुद्दाही घेतां येईल.

**अपिलाची खास परवानगी**

११२. पहिल्या परिशिष्टांतील भाग ३ मधील संस्थानांना वगळून हिंदुस्थानांतील कुठल्याही कोर्टानें दिलेला निवाडा, फैसला अगर अखेरचा हुकूम, जो कलम ११० अगर १११ खालीं येत नाहीं, त्याविरुद्ध अपील करण्याची खास परवानगी प्रमुख न्यायालयाला देतां येईल.

**प्रमुख न्यायालयाकडे विचारणा**

११३. (१) परिशिष्ट १ यांतील भाग ३ मध्यें नमूद केलेल्या संस्थानांतील मुख्य कोर्टापुढें दिवाणी, फौजदारी अगर अन्य काम चालूं असतांना सदहू संस्थानांव्यतिरिक्त दुसऱ्या संस्थानाचा अगर घटक राज्याचा अगर पार्लमेंटचा कायदा लागू पडेल कीं नाहीं, असा प्रश्न उपस्थित झाल्यास व सदहू प्रश्नाचा निकाल केल्याशिवाय कोर्टापुढील बाबीचा निकाल लागणार नाहीं असें असेल, तर सदहू मुख्य कोर्ट स्वतः अगर पक्षकाराच्या विनंतीवरून सर्व प्रस्तुत माहिती देऊन एक निवेदन तयार करून स्वतःचें त्या बाबतींतील मत प्रदर्शित करून तें प्रमुख न्यायालयाकडे त्याच्या मतासाठीं धाडील.

(२) (१) यांत सांगितल्याप्रमाणें मुख्य कोर्ट मताकरितां एकादी बाब धाडण्याचें नाकारील तर प्रमुख न्यायालयाला त्याप्रमाणें ती धाडावी, अशी मागणी करतां येईल.

(३) (१) अगर (२) याप्रमाणें जेव्हां एखादी बाब प्रमुख न्यायालयाकडे येईल, त्यावेळीं प्रमुख न्यायालयाचा अभिप्राय मिळेपर्यंत मुख्य कोर्टापुढील काम बंद राहील.

(४) पक्षकारांना त्यांचें म्हणणें मांडण्याची संधि दिल्यानंतर प्रमुख कोर्ट प्रश्नावर आपला अभिप्राय देईल व त्याची एक प्रत मुख्य कोर्टाकडे धाडण्यांत येईल व त्या अभिप्रायाप्रमाणें मुख्य कोर्ट त्याबाबतींत कामगिरी करील.

(५) प्रमुख कोर्टाला वाटल्यास त्याजकडे आलेलें प्रकरण अधिक माहितीसाठीं तें परत पाठवूं शकेल.

या कलमांत परिशिष्ट एक भाग ३ मधील संस्थानांतील मुख्य कोर्टाबाबत व्यवस्था आहे. प्रमुख न्यायालयाकडे प्रश्न धाडणें तो कसा असावा व कसा धाडावा हें यांत सांगितलें आहे. शिवाय प्रमुख न्यायाल्याला मुख्य कोर्टानें अभिप्राय मागण्यासाठीं प्रकरण धाडण्याचें नाकारल्यास तें धाडण्याबाबत आज्ञा देतां येईल. प्रकरण प्रमुख न्यायाल्याकडे असेपर्यंत खालच्या कोर्टाचें काम बंद राहील. प्रमुख न्यायालय जो अभिप्राय देईल, त्याप्रमाणें मुख्य कोर्टाला कामगिरी केली पाहिजे. तसेंच अधिक माहितीसाठीं प्रकरण परत धाडण्याचा अधिकार प्रमुख न्यायाल्याला आहे.

**प्रमुख न्यायालयाच्या अधिकारक्षेत्राचा विस्तार**

११४. (१) पार्लमेंटला कायदा करून संघक्षेत्रांतील कोणत्याही बाबीबाबत प्रमुख न्यायाल्याला अधिक क्षेत्र व अधिकार देतां येतील.

(२) हिंदुस्थान सरकार व घटक राज्य यांनीं आपसांत करार करून कोणत्याही बाबींत प्रमुख न्यायालयाला दिलेलें क्षेत्र व अधिकार पार्लमेंटनें तसा कायदा करून व्यवस्था केल्यास त्याला घेतां येतील.

कलम १०९ व १११ यांत प्रमुख न्यायालयाचें क्षेत्र व अधिकार यांचें वर्णन दिलें आहे. या कलमांनुसार संघराज्याच्या कार्यक्षेत्रांत ज्या बाबी येतात व ज्या संघजंत्रींत नमूद केल्या आहेत, त्यापैकीं कुठल्याही बाबींत पार्लमेंटला कायदा करून

प्रमुख न्यायालयाला अधिक क्षेत्र व अधिकार देतां येईल. प्रांत अगर घटक सरकारला प्रांतिक बाब करार करून प्रमुख न्यायालयाकडे सोंपवितां येईल. राज्यकारभाराच्या बाबी अगर क्षेत्र यांचे तीन विभाग या घटनेंत आहेत. संघक्षेत्र, प्रांतिक अगर घटक-क्षेत्र व समान क्षेत्र. या भागांत सर्व राज्यकारभाराची वांटणी आहे. संघक्षेत्र संघराज्याचें, प्रांतिक क्षेत्र घटक राज्याचें व समान क्षेत्र दोघांचें, पण यांत विरोध उत्पन्न झाल्यास संघराज्याचा अधिकार प्रभावी ठरावा अशी योजना या घटनेंत आहे. म्हणून जी बाब प्रांतिक अगर समान क्षेत्रांतील आहे, त्याबाबत संघ व घटक सरकारें यांत करार होऊन त्याबाबत न्याय करण्यास प्रमुख कोर्टाला अधिकार देतां येईल. मात्र तशी सवड पार्लमेंटनें कायदा करून दिली पाहिजे.

**प्रमुख न्यायालय व कांहीं खास हुकुम**

**११५. कलम २५ (२) यांत सांगितलेल्या कामाव्यतिरिक्त गोष्टींसाठीं पार्लमेंटला कायदा करून प्रमुख न्यायालयाला खास हुकुम काढण्याचे अधिकार देतां येतील; नागरिकांस हजर करणें, मनाई देणें, एखादी गोष्ट करण्यास भाग पाडणें, इत्यादि हुकुमांचा यांत समावेश होतो.**

कलम २५ (२) यांत मूलभूत हक्क उपभोगण्याच्या दृष्टीनें खास हुकुम काढण्याचा अधिकार प्रमुख न्यायालयाला दिला आहे. प्रस्तुत कलमांत पार्लमेंटला कायदा करून अन्य बाबतींत तसेच अधिकार प्रमुख न्यायालयाला देतां येतील. उदाहरणार्थ, अटक केलेल्या माणसास हजर करण्यास सांगणें, एखादी गोष्ट करण्यास अगर न करण्यास भाग पाडणें, इत्यादि. तात्पर्य, नागरिकांस योग्य न्याय मिळण्याच्या दृष्टीनें असे अधिकार प्रमुख न्यायालयाला असणें इष्ट असतें. तीच व्यवस्था या कलमांत अभिप्रेत आहे.

**प्रमुख न्यायालयाचे आनुषंगिक अधिकार**

**११६. प्रमुख न्यायालयाला जें क्षेत्र व अधिकार या घटनेनें अगर घटनेनुसार मिळाले असतील ते योग्य व परिणामकारक रीतीनें चालवितां यावेत यासाठीं अन्य इष्ट व आवश्यक असे सर्व अधिकार पार्लमेंटला कायदा करून प्रमुख न्यायालयाला देतां येतील.**

अधिकार अव्वल व आनुषंगिक असे दोन तऱ्हेचे असतात. अव्वल अधिकार चांगल्या रीतीनें चालवितां यावेत, यासाठीं आनुषंगिक अधिकारांची जरूरी असते. गुन्हेगाराला पकडून आणण्याचा हा अव्वल अधिकार झाला; पण त्याला तुरुंगांत

ठेवण्याची व्यवस्था करा अशी आज्ञा देण्याचा अधिकार हा आनुषंगिक आहे, पण आवश्यक आहे आणि म्हणून तो हवा. एखादें काम केलें पाहिजे असा हुकुम देणें हा अव्वल अधिकार झाला. ज्याला हुकुम झाला, त्यानें न केल्यास तें दुसऱ्याकडून करवून घेणें हा आनुषंगिक अधिकार होय. हा नसेल, तर न्याय पुरा मिळणार नाहीं. तात्पर्य, असले आधिकार इष्ट व आवश्यक म्हणून पार्लमेंटला ते कायदा करून प्रमुख न्यायालयाला देतां येतील.

**११७. हिंदुस्थानांतील प्रत्येक कोर्टावर प्रमुख न्यायालयानें कायद्याबाबत दिलेला निर्णय बंधनकारक राहील.**

**प्रमुख कोर्टाचा कायद्याबाबत निर्णय बंधनकारक**

कायदेमंडळ कायदा करतें. कार्यकारी सत्ता तो अमलांत आणते. पण कायद्याचा अर्थ काय हें न्यायालय ठरवितें. विशिष्ट परिस्थितींत कायदा लागू आहे कीं नाहीं, हें पण न्यायालय ठरवितें. चोरी करणें हा गुन्हा कायद्यानें ठरविला. चोरी केली किंवा नाहीं हें न्यायालय ठरविणार व गुन्हा होऊन शिक्षा दिल्यास ती कार्यकारी सत्ता अमलांत आणणार. कायद्याचा अर्थ निरनिराळीं कोर्टें निरनिराळा लावतील. कायदा नक्की काय आहे हेंही मतभेदाचें कारण होऊं शकेल. म्हणून अखेरचा निर्णयात्मक अर्थ सांगणारा कुणी तरी पाहिजे व हें काम प्रमुख न्यायालयाचें आहे. त्याचा निर्णय देशांतील सर्व कोर्टांवर बंधनकारक राहील. न्याय मिळण्यासाठीं कायदा निश्चित पाहिजे व सर्वत्र सारखा पाहिजे. असें नसेल, तर व्यवहारांत शाश्वति व विश्वास येणार नाहीं. म्हणून कायद्याचा अधिकृत अर्थ प्रमुख न्यायालय देईल व तो सर्व कोर्टांनीं मानला पाहिजे. या कलमांत हीच व्यवस्था आहे.

**प्रमुख न्यायालयाच्या हुकुमांची अंमलबजावणी**

**११८. (१) निर्णयासाठीं आलेल्या प्रकरणांत पूर्ण न्याय मिळण्याच्या दृष्टीनें प्रमुख न्यायालयाला अधिकार चालवून इष्ट तो हुकूम अगर हुकूमनामा देतां येईल व त्यांची अंमलबजावणी हिंदुस्थानांत कोठेंही पार्लमेंटनें या बाबतींत केलेल्या कायद्यानुसार होईल.**

**(२) या बाबतींत पार्लमेंटनें केलेल्या कायद्याचें पालन करून, प्रमुख न्यायालयाला सर्व हिंदुस्थानभर, एखाद्या मनुष्याला कोर्टापुढें हजर करण्याची आज्ञा देणें, कागदपत्र दाखविण्याबाबत अगर हजर**

करण्याबाबत हुकुम देणें, अगर या न्यायालयाच्या बेअदबीबाबत चौकशी करणें अगर शिक्षा देणें यांबाबत सर्व अधिकार आहेत.

नुसता न्यायालयाचा हुकुम हा, जर त्याची अंमलबजावणी झाली नाहीं, तर अर्थशून्य आहे. म्हणून प्रमुख न्यायालयाच्या हुकुमांची अंमलबजावणी कशी होईल याबाबतची व्यवस्था या कलमांत सांगितली आहे. हिंदुस्थानभर त्याची अंमलबजावणी होईल. त्याबाबत पार्लमेंट कायदा करील. तसेंच (२) यांत सांगितलेल्या बाबींत प्रमुख न्यायालयाला सर्व अधिकार आहेत. तसे ते न दिले तर प्रमुख न्यायालयाला संपूर्ण न्याय देतां येणार नाहीं.

**अध्यक्ष व प्रमुख न्यायालय**

११९. (१) जेव्हां कायद्याबाबत अगर वस्तुस्थितीबाबत प्रश्न उपस्थित होईल अगर झाला असेल आणि जर तो प्रश्न अध्यक्षाच्या मतें सार्वजनिक महत्त्वाचा असून त्यावर प्रमुख न्यायालयाचें मत घेणें इष्ट आहे, तर सदरहू प्रश्न अध्यक्ष प्रमुख न्यायालयाकडे अभिप्रायार्थ धाडील व प्रमुख न्यायालय योग्य वाटल्यास संबंधित इसमांचें म्हणणें ऐकून घेऊन आपला अभिप्राय अध्यक्षाकडे धाडील.

(२) क. १०९ (१) यांत कांहींही असलें, तरी अध्यक्षाला त्या कलमांत नमूद केलेल्या बाबीसंबंधांतील तंटा प्रमुख न्यायालयाकडे धाडतां येईल व त्यानें तो धाडल्यानंतर प्रमुख न्यायालय पक्षकारांना आपलें म्हणणें मांडण्याची संधि देईल व आपला निर्णय अध्यक्षाकडे धाडील.

सार्वजनिक महत्त्वाचा प्रश्न, मग तो कायद्याबाबत असो अगर वस्तुस्थितीबाबत असो, अध्यक्षाला जर असें वाटलें कीं, त्यावर प्रमुख न्यायालयाचें मत घेणें इष्ट आहे तर तें त्याला घेतां येईल. सदरहू प्रश्नाबाबत संबंधित लोकांचें म्हणणें ऐकून घेऊन प्रमुख न्यायालय आपला अभिप्राय अध्यक्षाकडे धाडील. या व्यवस्थेनें, मागाहून म्हणजे कायदा केल्यानंतर अगर एखादी घटना घडून आल्यानंतर होणारे कायद्याच्या अर्थासंबंधींचे घोटाळे टाळतां येतील. काय कायदा आहे हें अधिकृत रीतीनें अनर्थ होण्यापूर्वीच कळेल. कलम १०९ (१) यांत कांहीं बाबतींत प्रमुख न्यायालयाला अधिकारक्षेत्र नाहीं, असें नमूद केलें आहे. याही बाबतींत अध्यक्षाला

योग्य वाटल्यास ती बाब प्रमुख न्यायालयाकडे अभिप्रायार्थ धाडतां येईल. तात्पर्य, प्रमुख न्यायालयाचा सल्ला जेव्हां अध्यक्षाला घेणें इष्ट वाटेल, तेव्हां या कलमाप्रमाणें त्याला तो घेतां येईल.

**अधिकाऱ्यांची मदत**

१२०. हिंदुस्थानांतील मुलकी आणि न्यायदानी अधिकारी प्रमुख न्यायालयाला मदत होईल असे वागतील.

प्रमुख न्यायालय हें मुख्य व निर्णयात्मक अर्थात् अखेरचा निकाल देणारें कोर्ट आहे, व सर्व मुलकी व न्यायदानी अधिकाऱ्यांनीं या न्यायालयाच्या कामाला मदत होईल असें वागलें पाहिजे. न्यायाची प्रतिष्ठा व श्रेष्ठत्व कार्यकारी अधिकाऱ्यांनीं व न्यायदानी अधिकाऱ्यांनीं राखलें पाहिजे.

**प्रमुख न्यायालयाचे नियम**

१२१. पार्लमेंटनें केलेल्या कायद्यांचें पालन करून, प्रमुख न्यायालय अध्यक्षाच्या संमतीनें कामकाजाच्या पद्धती-बाबत वेळोवेळीं नियम करील. या नियमांत खालील बाबींबद्दल नियम असतील;

(अ) प्रमुख न्यायालयापुढें वकील म्हणून कुणाला काम करतां येईल, याबाबत,

(ब) अपील ऐकणें, व अपील दाखल करण्याची मुदत, वकिलांना त्याबाबत म्हणणें मांडण्यास वेळ देणें वगैरे बाबतच्या अन्य बाबी,

(क) कोर्टापुढील कज्जाच्या खर्चाबाबत, तसेंच वकिलाच्या मेहनताऱ्याबाबत,

(ड) जामीन देण्याबाबत,

(ई) कनिष्ठ कोर्टापुढील काम तहकूब व्हावें याबाबत,

(फ) क्षुलक अगर केवळ त्रास देण्याच्या अगर विलंब करण्याच्या हेतूनें आणलेल्या अपिलांचा ताबड-तोबीनें निकाल करण्याबाबत.

( २ ) घटनेचा अर्थ लावण्यासंबंधीं ज्यांत कायद्याचा मुद्दा उपस्थित झाला आहे, अशा अपिलाचा निकाल देण्यासाठीं, तसेंच ११९ कलमाप्रमाणें अध्यक्षानें एखादें प्रकरण धाडल्यास त्याचा निर्णय देण्यासाठीं पांच तरी न्यायाधीश किमान बसावेत:

मात्र न्यायाधीश आजारी असल्यामुळें अगर त्याचे कांहीं वैयक्तिक हितसंबंध त्या प्रकरणांत येत असल्यामुळें अगर अन्य कारणासाठीं त्याला हजर राहतां येणार नाहीं अशी परिस्थिति वगळून प्रत्येक न्यायाधीशाला प्रकरण ऐकण्याचा अधिकार आहे.

( ३ ) ११९ कलमांत अभिप्रेत असलेला अभिप्राय आणि दुसरा कोठलाही निर्णय असो, तो जाहीर बैठकींत प्रमुख न्यायालयानें सांगितला पाहिजे.

( ४ ) प्रकरणाची चौकशी चालू असतांना जे न्यायाधीश हजर असतील व ज्यांनीं सर्व म्हणणें ऐकून घेतलें असेल, अशा न्यायाधिशांनीं बहुमतानें अभिप्राय अगर निर्णय द्यावयाचा आहे; मात्र कोणाही न्यायाधिशाला भिन्न मत अगर अभिप्राय नमूद करतां येईल व जाहीरही करतां येईल.

कामाकाजाच्या रीतीसंबंधीं नियम प्रमुख न्यायालयाला या कलमानें करतां येतील. ( ब ) मध्यें वकिलाला आपलें म्हणणें मांडण्यास किती वेळ द्यावा, याही-बाबत नियम करण्याची सवड ठेवली आहे. असें वेळेचें नियमन होणें इष्ट आहे. अमेरिकेंतील प्रमुख न्यायालयांत सर्व म्हणणें लेखी घेऊन फक्त एक तास वकिलाला बोलण्याची सवड ठेवली आहे. ( २ ) मध्यें एखाद्या प्रकरणाचा निकाल करण्यासाठीं किमान न्यायाधीश पांच असावेत असें ठरविलें आहे. घटनेचा अगर कायद्याचा अर्थ लावणें अगर कलम ११९ प्रमाणें अभिप्राय व्यक्त करणें या बाबतींत न्याया-धिशांची किमान संख्या ठरविली तरी प्रत्येक न्यायाधिशाला हजर राहून अभिप्राय अगर निर्णय देण्याचा अधिकार ठेवला आहे. मात्र अशा प्रकरणांत त्याचे वैयक्तिक हितसंबंध नसावेत. किमान संख्येनें निर्णय दिला म्हणजे तो कायदेशीर व विधियुक्त होतो. सर्व न्यायाधिशांना या विशिष्ट बाबींत हजर राहण्याची मोकळीक ठेवल्यानें महत्त्वाच्या प्रश्नावर अधिक अधिकारयुक्त निर्णय मिळणें शक्य होतें.

प्रमुख कोर्टाचे निर्णय अगर अभिप्राय कोर्टाच्या जाहीर बैठकींत दिले जातील. यांत कांहीं गुप्तपणा असणार नाहीं. कोर्ट हें सर्वांना खुलें पाहिजे. जनतेचा विश्वास संपादन करण्याच्या दृष्टीनें चौकशी उघड कोर्टांत व निकालही उघड कोर्टांत होणें इष्ट आहे. न्यायाधिशानें आपल्या खोलींत चौकशी करून निर्णय देणें हें लोकशाहीला विसंगत आहे. न्यायालयाचा निर्णय अगर अभिप्राय बहुमतानुवर्ति असेल. पण भिन्न अभिप्राय अगर मत कोणाही न्यायाधिशाला जाहीर करतां येईल. म्हणजे बहुमताचा निर्णय जसा जाहीर होईल, तसेंच अल्पमतवाल्या न्यायाधिशालाही आपलें मत जाहीर करतां येईल.

प्रमुख न्यायालयांतील अधिकाऱ्यांचें वेतन वगैरे

१२२. ( १ ) प्रमुख न्यायालयाच्या नोकरांचे पगार, पेन्शन, भत्ता हे सर्व प्रमुख न्यायाधीश अध्यक्षाच्या सल्ल्यानें ठरवील.

( २ ) नोकरांचे पगार, पेन्शन, भत्ता, तसेंच खात्याचा इतर खर्च याचा बोजा हिंदुस्थानच्या उत्पन्नावर राहील. तसेंच, प्रमुख न्यायालयाला मिळणारी फी वगैरे उत्पन्न हिंदुस्थानच्या उत्पन्नांत जमा केलें जाईल.

परिशिष्ट १ भाग ३ मधील संस्थानांतील मुख्य कोर्टाबाबत

१२३. ( १ ) कलम १०३ व १०६ यांत परिशिष्ट १ भाग ३ मधील संस्थानांतील ज्या मुख्य कोर्टाविषयीं उल्लेख आला आहे, तो उल्लेख, अध्यक्ष प्रमुख न्यायालयाला व संस्थानाधिपतीला विचारून परिशिष्ट एक भाग १ मधील मुख्य कोर्टाच्या दर्जाचें आहे असें ठरवून सदर कलमांकरितां जें मुख्य कोर्ट असल्याचें जाहीर करील, त्या कोर्टाबद्दल असल्याचें समजावें.

( २ ) कलम ११० व ११३ यांत परिशिष्ट एक भाग ३ यांतील संस्थानांतील कोर्टाचा जो उल्लेख आला आहे, तो सदर कलमांत ज्याबाबत अपिलाची अथवा अभिप्रायाची व्यवस्था केली आहे, अशा निर्णायक न्यायाधिकार असलेल्या संस्थानी कोर्टाला अनुलक्षून असल्याचें समजावें.

परिशिष्ट १ भाग ३ यांत लहानमोठीं संस्थानें नमूद केलीं आहेत. प्रत्येकांत मुख्य कोर्ट आहे असें नाहीं. म्हणून या प्रकरणांत त्या संस्थानांबाबतच्या मुख्य कोर्टांचा जेथें जेथें संबंध आला आहे, तेथें तेथें त्यांतील कोणतें मुख्य कोर्ट हें अध्यक्ष प्रमुख न्यायालयाच्या सल्ल्यानें ठरवील. तसेंच, जेथें अखेरचें कोर्ट अभिप्रेत आहे, तेथें तेथें तें मुख्य कोर्ट समजलें जाईल. परिशिष्ट एकमध्यें चार भाग आहेत. भाग १ यांत विद्यमान ९ प्रांत दिले आहेत. भाग २ यांत दिल्ली, कुर्ग व अजमीर मेरवाडा यांचा उल्लेख आहे. भाग ३ मधील अ मध्यें मोठीं १९ देशी संस्थानें व ब मध्यें इतर सर्व लहान संस्थानें यांचा समावेश केला आहे. भाग ४ यांत अंदमान-निकोबार बेटें यांचा समावेश आहे. संबंध परिशिष्ट म्हणजे हिंदुस्थानच्या संघराज्याचा प्रदेश होय. आजच्या घटकेला लहान संस्थानें विलीन झालीं आहेत अगर त्यांचे मोठे गट झाले आहेत. ही प्रगति अद्याप चालू आहे.

## प्रकरण ५ वें–हिंदुस्थानचा सरहिशोबतपासनीस

हिंदुस्थानचा सरहिशोबतपासनीस

१२४. (१) हिंदुस्थानचा असा एक सरहिशोबतपासनीस (Auditor General) असेल व त्याची नेमणूक अध्यक्ष करील; व ज्या कारणासाठीं व ज्या रीतीनें प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशास कामावरून दूर करतां येतें, त्याच कारणासाठीं व त्याच रीतीनें या सरहिशोबतपासनिसालाही कामावरून दूर करतां येईल.

(२) सरहिशोबतपासनिसाचा पगार, अन्य प्राप्ति व नोकरीच्या अटी हीं पार्लमेंट कायदा करून ठरवील. तोंपर्यंत परिशिष्ट २ मध्यें सांगितलेली व्यवस्था अमलांत राहील. मात्र नेमणुकीनंतर या बाबतींत त्याला अहितकारक होईल असा फरक करतां येणार नाहीं.

(३) सरहिशोबतपासनीस निवृत्त झाल्यानंतर हिंदुस्थान सरकार अगर घटक सरकार यामध्यें कोठेंही त्याला पुढें तशा जागेवर नोकरी करतां येणार नाहीं.

(४) सरहिशोबतपासनिसाच्या खात्यांतील नोकरांचा पगार, पेन्शन, भत्ता वगैरे तो अध्यक्षाच्या सल्ल्यानें ठरवील.

(५) वरील नोकरांचा पगार, पेन्शन, भत्ता, तसेंच सरहिशोबतपासनीस याचा पगार, पेन्शन भत्ता हा सर्व खर्च हिंदुस्थानच्या उत्पन्नावरील बोजा समजला जाईल.

कुठल्याही राज्यव्यवस्थेंत हिशोबाची तपासणी आवश्यक असते. खर्चाचा अंदाज करणें, तो कायदेमंडळाकडून मान्य करून घेणें, त्याप्रमाणें खर्च करणें व झालेला खर्च नियमाप्रमाणें झाला कीं नाहीं याची तपासणी करणें, या चार अवस्था खर्चाच्या बाबतींत असतात. प्रत्येक खात्यांत हिशोबनीस असतो, पण त्याचें काम प्रत्यक्ष खर्च होण्यापूर्वी अधिक असतें. मागणी केलेली रक्कम मंजुरींत येते कीं नाहीं, हें तो पाहतो. हिशोबतपासनिसाचें काम याहून अधिक असतें. प्रत्यक्ष खर्च झाला कीं नाहीं, त्यांत शिस्त होती कीं नाहीं, अव्यवस्था किती होती, गैरवाजवी खर्च झाला का, इत्यादि गोष्टी त्यानें पाहावयाच्या असतात.

कार्यक्षम राज्यकारभाराला हे दोन्ही अधिकारी अवश्य आहेत. हिंदुस्थानचा म्हणून सरहिशोबतपासनीस असणें अगदीं अवश्य आहे. त्याची नेमणूक व त्याला काढून टाकणें, याबाबतची व्यवस्था कलम १०३ मध्यें प्रमुख न्यायालयांतील न्यायाधिशाबाबत जी व्यवस्था सांगितली आहे, त्याप्रमाणें आहे. निवृत्त झाल्यानंतर सरकारी नोकरी त्याला करतां येणार नाहीं, हीही योजना योग्य अशीच आहे. त्याचा व त्याच्या खात्याचा खर्च हा हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा आहे. या योजनेनें त्याचें काम तो अधिक चोख व निःस्पृहपणें करूं शकेल.

**सरहिशोबतपासनिसाचें कार्य व अधिकार**

१२५. सरहिशोबतपासनिसानें हिंदुस्थान सरकारच्या, तसेंच कोणत्याही घटक सरकारच्या हिशोबासंबंधांत त्या कामीं कायद्यानें दिलेले अधिकार वापरून जीं कर्तव्यें कायद्यानें सांगितलीं असतील तीं करावीत.

खुलासा—या कलमांत 'कायदा' या शब्दांत कोणताही चालू कायदा, जो हिंदुस्थानांत चालू आहे, त्याचा समावेश केला आहे.

पार्लमेंट कायदा करून सरहिशोबतपासनिसाचीं कामें व अधिकार निश्चित करील. हिंदुस्थान सरकारचे व घटक राज्याचेही हिशोब पाहण्याचा अधिकार त्याला दिला आहे. चालू कायदा एतद्संबंधीं असेल, तोही लागू समजला जाईल.

**१२६.** अध्यक्षाच्या पसंतीनें सरहिशोबतपासनीस हिंदुस्थान सरकारचे हिशोब कसे ठेवावेत याबाबत योजना करील व त्याप्रमाणें ते ठेवले जातील; त्याचप्रमाणें अन्य घटक राज्याच्या हिशोबाबाबत अध्यक्षाच्या पसंतीनें जी पद्धत व जीं तत्त्वें तो ठरवील, त्याप्रमाणें घटक राज्याचे हिशोब ठेवले जातील.

**सरहिशोब-तपासनीस व मार्गदर्शन**

साधारणपणें सर्वत्र सुसंगति व सारखेपणा राहावा या दृष्टीनें नियमांची जरूरी असते. तसेंच हिशोब ठेवण्याच्या बाबतींत पद्धतशीर नमुने तयार करण्यांत येतात. तसें असलें म्हणजे गोंधळ होत नाहीं. या दृष्टीनें सरहिशोबतपासनीस नियम करील. अर्थात् त्याला अध्यक्षाची मान्यता आवश्यक आहे.

**१२७.** हिशोबांच्या तपासणीसंबंधींचे सरहिशोबतपानिसाचे रिपोर्ट अध्यक्षाकडे दाखल केले जातील व तो ते पार्लमेंटपुढें ठेवण्याची व्यवस्था करील.

**तपासणी–रिपोर्ट**

प्रत्येक खात्यांतील हिशोबाची तपासणी होते व सर्व हिशोब तपासून झाल्यावर सरहिशोबतपासनीस रिपोर्ट लिहितो. त्यांत दोषस्थळें, तसेंच विधायक सूचना पण असतात; हा रिपोर्ट त्यानें अध्यक्षास सादर करावयाचा आहे. अध्यक्ष मग तो पार्लमेंटपुढें ठेवण्याची व्यवस्था करील. पार्लमेंटची एक हिशोबसमिति असतेच, ही समिति पण त्या रिपोर्टाची दखल घेते. शिवाय जें कांहीं निवेदन, वृत्तांत अगर अन्य प्रकाशन अगर प्रकरण पार्लमेंटपुढें ठेवण्यांत येतें, त्याबाबत कोणाही सभासदाला नियमानुसार सूचना देऊन त्यावर चर्चा घडवून आणण्यांत येते व बहुश: हे रिपोर्ट चर्चिले जातात. या चर्चेनें लोकमत जागृत आहे कीं नाहीं हेंही कळतें व कारभारावर नजर राहते. उधळपट्टी थांबते. निदान मर्यादित होणें शक्य असतें.

भाग ६

## परिशिष्ट पहिलें भाग १ मधील राज्याबाबत

# प्रकरण १ लें–सामान्य विचार

परिशिष्ट पहिलें भाग १ यांत विद्यमान ९ प्रांत नमूद केले आहेत. भाग २ मध्यें दिल्ली, अजमीर मेरवाडा, कुर्ग व भाग ३ मध्यें प्रमुख संस्थानांचा निर्देश आहे. आतांपर्यंत मध्यवर्ती शासनयंत्राबाबत विचार झाला. मध्यवर्ती सरकारची कार्यकारी सत्ता, कायदेमंडळ व न्यायदान या तीन्हीबाबत काय व्यवस्था राहील याचें विवेचन मागील भागांत केलें. आतां ज्या घटकांनीं संघराज्य बनणार आहे, त्या घटकांचा अगर घटक राज्यांचा विचार या प्रकरणांत होणार आहे. संघराज्याचें शासन मध्यवर्ती सरकारमार्फत चालणार; घटकांचें शासन त्यांच्या त्यांच्या प्रदेशांत व घटनेनें दिलेल्या विषयांत त्यांच्या सरकारमार्फत चालणार. संघराज्याचे घटक विद्यमान प्रांत, तीन कमिशनरचे प्रांत, मोठीं संस्थानें व लहान संस्थानांचे गट हे आहेत. प्रस्तुत भागांत या सर्व घटकांत शासनव्यवस्था कशी राहील याचा विचार केला आहे. विद्यमान प्रांतांना प्रांत न म्हणतां 'राज्य' अगर 'घटक राज्य' संबोधलें आहे, तें योग्यच आहे.

**१२८. या भागांत जेथें राज्य असा उल्लेख असेल, तेथें तो परिशिष्ट पहिलें भाग १ मधील नमूद केलेल्या राज्यांबाबत आहे असें समजावें.**

व्याख्या

परिशिष्ट पहिलें भाग १ यांत विद्यमान नऊ प्रांत नमूद केले आहेत, ते प्रांत असे: १ मद्रास, २ मुंबई, ३ पश्चिम बंगाल, ४ संयुक्त प्रांत, ५ बिहार, ६ पूर्व पंजाब, ७ मध्यप्रांत आणि वऱ्हाड, ८ आसाम, ९ ओरिसा.

# प्रकरण २ रें--कार्यकारी सत्ता

## प्रमुख (Governor)

**१२९. प्रत्येक राज्याचा एक प्रमुख असेल.**

**घटक राज्यप्रमुख**

प्रत्येक प्रांताला एक गव्हर्नर अगर प्रमुख आज आहे. तीच व्यवस्था या घटनेनें कायम ठेवली आहे. प्रत्येक घटकाचा अगर घटक राज्याचा एक प्रमुख राहील व तो कार्यकारी सत्तेचा प्रमुख समजला जाईल. (Head of the Executive) त्याच्या नांवानें कार्यकारी शासन चालेल.

**घटक राज्याची कार्यकारी सत्ता**

**१३० (१) राज्याची कार्यकारी सत्ता प्रमुखाच्या ठिकाणीं प्रतिष्ठित असून घटना व कायदा यांना अनुसरून तिचा उपयोग केला जाईल.**

**(२) (अ) जे अधिकार अगर जीं कामें एकाद्या विद्यमान कायद्यानें एखाद्या अधिकाऱ्याकडे सोंपविलीं असतील, तीं या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें प्रमुखाकडे दिल्याचें मानण्यांत येणार नाहीं,**

**(ब) अगर पार्लमेंटला अगर घटक राज्याच्या कायदेमंडळाला कायदा करून एकादीं कार्यें प्रमुखाच्या अधिकाराखालील अधिकाऱ्यावर सोंपविण्यास प्रतिबंध होणार नाहीं.**

विद्यमान कायद्यांत कांहीं कार्यें इतरांकडून व्हावींत असें असेल, तर त्यांत प्रस्तुत कलमांतील व्यवस्थेनें फरक होणार नाहीं. तसेंच, नवीन कायदा करून प्रमुखाच्या हाताखालील अधिकाऱ्यांना कांहीं कामें करण्यास सांगतां येईल. तात्पर्य, प्रमुखानें कार्यकारी सत्ता घटनेंत असेल, अगर कायदा सांगेल त्याप्रमाणें चालवावयाची आहे.

१३१. ज्या मतदारांना घटक राज्याच्या कायदेमंडळाच्या सार्वत्रिक निवडणुकींत मत देण्याचा अधिकार आहे, त्यांनीं प्रत्यक्ष मत देऊन प्रमुखाची निवडणूक करावयाची आहे.

प्रमुखाची निवडणूक

विकल्पें करून

१३१. प्रमुखाची नेमणूक पुढीलप्रमाणें होईल. घटक राज्यांतील कायदेमंडळांत अगर जेथें वरिष्ठ कायदेमंडळ असेल तेथें दोन्ही सभांच्या संयुक्त बैठकींत, क्रमदेय पद्धतीनें गुप्त मतदान होऊन चार उमेदवार निवडले जातील; व या चार उमेदवारांतून राष्ट्राध्यक्ष आपल्या स्वदस्तुरीचा खलिता काढून एकाची नेमणूक करील.

प्रमुखाची नेमणूक

या दोन कलमांत घटक राज्याच्या प्रमुखाच्या निवडणुकीबद्दल व्यवस्था सांगितली आहे. अमेरिकेंतील घटनेप्रमाणें, गव्हर्नर अगर प्रमुख त्या राज्यांतील मतदारसंघानें प्रत्यक्ष निवडून द्यावयाचा, हा एक मार्ग. यांत गव्हर्नर हा पूर्णतया व प्रत्यक्ष लोकांनीं निवडलेला असल्यामुळें त्याचें नैतिक सामर्थ्य निदान मुख्य प्रधानाइतकें खास राहणार. घटक राज्यांत जबाबदार राज्यपद्धत चालू राहणार असल्यामुळें बहुमतवाला पक्ष अधिकारारूढ होऊन त्याचा नेता मुख्य प्रधान होणार हें उघडच आहे. अशा परिस्थितींत प्रमुख व मुख्य प्रधान हे दोघेही एकाच पक्षाचे सामान्यपणें असूं शकतील व तसे ते असल्यास राज्यकारभार एकविचारें चालेल; पण जर दोघे भिन्न पक्षाचे असतील व जर उभयतांच्या धोरणांत अगर अधिकाराच्या अंमलबजावणींत दोघांत मतभेद झाला, तर संघर्ष अपरिहार्य आहे व त्याचा परिणाम राज्यकारभारावर झाल्यावांचून राहणार नाहीं. शिवाय मुख्य प्रधानाचा सल्ला नेमलेला प्रमुख जितक्या सदनशीर पद्धतीनें मानील, तितका निवडून आलेला प्रमुख मानणार नाहीं. सदनशीरपणानें व जुळतें घेण्याच्या प्रवृत्तीनें दोघेही वागल्यास प्रमुख लोकनियुक्त असणें ही व्यवस्था अयोग्य नाहीं. या व्यवस्थेंत लोकशाही अधिक प्रतिबिंबित आहे. मागील भागांत आपण पाहिलेंच आहे कीं संघराज्याचा अध्यक्ष हा प्रत्यक्ष सामान्य मतदार संघातर्फे निवडावयाचा नाहीं. तथापि त्याच्या निवडणुकीसाठीं जी व्यवस्था ठरविली आहे, त्या व्यवस्थेंत निवडणुकीचें तत्त्व आहे. कलम १३१ मध्यें विकल्पेंकरून जी योजना सुचविली आहे, त्यांतही थोडेंसें निवडणुकीचें तत्त्व आहे.

तथापि शेवटीं प्रमुखाची नेमणूक चार उमेदवारांतून अध्यक्षानें करावयाची आहे. क्रमदेय मतदान पद्धतीनें हे चौघे निवडून यावयाचे असल्यानें अल्पमतवाल्यांचा एखादा उमेदवार त्यांत निवडून येऊं शकेल. पक्षातीत प्रमुख कीं पक्षनिष्ठ प्रमुख असा प्रश्न उपस्थित झाल्यास पक्षातीत प्रमुख असणें केव्हांही इष्ट आहे. तथापि नेमणुकीनें हा हेतु साधेलच असें निश्चित सांगतां येणार नाहीं. तेथेंही पक्षनिष्ठ व्यक्तीचाच पुरस्कार होणें असंभवनीय नाहीं; मात्र अल्पसंख्यांक जमातींना या जागेवर काम करण्याची संधि मिळणें वरीलपैकीं दुसऱ्या योजनेनें अधिक शक्य आहे. प्रत्यक्ष निवडणुकीनें प्रमुख निवडणें झाल्यास देशांत मोठ्या प्रबल पक्षसंघटना असल्याखेरीज तें शक्य नाहीं. निवडणुकीचा हा खटाटोप नको असेल, तर १३१ मधील दुसरी योजना ग्राह्य दिसते. या प्रश्नाबद्दल मतभेद आहे. तथापि हिंदुस्थानां-तील परंपरा व प्रवृत्ति लक्षांत घेतां १३१ कलमांतील दुसरी व्यवस्था योग्य वाटते.

अधिकाराची मुदत

१३२. अधिकारस्वीकार केल्यापासून पांच वर्षें प्रमुख कामावर राहील. मात्र,

(अ) घटक कायदेमंडळाच्या सभानायकाकडे अगर जेथें वरिष्ठ कायदेमंडळ असेल तेथें त्याचा सभापति व कनिष्ठ कायदेमंडळाचा सभानायक या उभयतांकडे राजीनामा धाडून प्रमुखाला कामावरून दूर होतां येईल.

(ब) कलम १३७ यांत सांगितल्याप्रमाणें घटनेविरुद्ध वर्तन केल्याबद्दल प्रमुखाला कामावरून दूर करतां येईल.

(क) प्रमुखपदाची मुदत संपली तरी दुसरा प्रमुख कामावर होईपर्यंत पहिला प्रमुख काम करीत राहील.

प्रमुखाला राजीनामा देतां येईल; तो घटनेविरुद्ध वागल्यास त्याची चौकशी करून कायदेमंडळाला त्याला दूर करतां येईल; अन्यथा त्याची मुदत पांच वर्षें राहील व ती संपली तरी दुसरा येईपर्यंत त्यालाच काम पाहावें लागेल.

**पुन्हा नेमणूक अगर निवडणूक**

१३३. प्रमुख पदावर असणारा, अगर पूर्वी असलेला इसम पुन्हा निवडणुकीस अगर नेमणुकीस पात्र आहे; मात्र फक्त एकदांच.

याचा अर्थ प्रमुखाला एकंदर दोनदां निवडून अथवा नेमणूक होऊन येण्याची व्यवस्था या कलमांत आहे. जर प्रमुख निवडणुकीनें ठरावा असें सम्मत झालें तर या कलमांत निवडणुकीबद्दलचा उल्लेख येईल. तसें न ठरलें तर नेमणुकीचाच उल्लेख फक्त राहील.

**प्रमुख होण्याची पात्रता, निवडणुकींसाठीं**

१३४. (१) प्रमुखपदासाठीं पात्रता येण्यासाठीं उमेदवार हिंदुस्थानचा नागरिक पाहिजे व त्याचें वय ३५ वर्षांपेक्षां अधिक असावें.

(२) एकादा इसम जर—

(अ) घटक राज्याच्या कायदेमंडळाच्या निवडणुकीस अपात्र ठरला असेल; मात्र त्या राज्यांतील तो रहिवासी पाहिजेच असें नाहीं;

(ब) तो हिंदुस्थान सरकारांत अगर परिशिष्ट १ मधील नमूद केलेल्या कोठल्याही राज्यांत अगर वरील सरकारांपैकीं कुणाच्या तरी नियंत्रणाखालीं असलेल्या अशा कुठल्याही स्थानिक अगर अन्य अधिकारी संस्थेंत, ज्या जागेवर राहण्याबद्दल कांहीं प्राप्ति आहे अशा अधिकाराच्या जागेवर असेल,

तर तो घटक राज्याच्या प्रमुखाच्या निवडणुकीस पात्र ठरणार नाहीं.

खुलासा—या कलमासाठीं कोणीही इसम जर केवळ तो—

(अ) हिंदुस्थानचा अगर परिशिष्ट १ भाग १ मधील कुठल्याही घटक राज्याचा मंत्री असेल, अगर

(ब) परिशिष्ट एक भाग ३ मधील कुठल्याही संस्थानचा मंत्री असून कायदेमंडळाला जबाबदार असेल अगर दोन विधिमंडळें असतील, तर कनिष्ठ मंडळाला जबाबदार असेल आणि त्या कायदे-मंडळांतील निदान ¾ तरी सभासद लोकनियुक्त असतील.

तर वर सांगितल्याप्रमाणें तो सरकारी प्राप्ति असलेला नोकर अगर अधिकाराच्या जागेवर आहे असें मानलें जाणार नाहीं.

या कलमांत प्रमुखपदासाठीं कोणाला उभें राहतां येईल, याचा प्रपंच केला आहे. उमेदवार नागरिक पाहिजे, त्याचें वय पस्तीसांपेक्षां अधिक पाहिजे. तो सरकारी नोकर नसावा, पण तो हिंदुस्थानांतील मंत्रिपदावर अगर संस्थानांतील मंत्रिपदावर असला व तो कायदेमंडळाला जबाबदार असल्यास आणि निदान त्या कायदे-मंडळांत ¾ लोकनियुक्त सभासद असल्यास तो उमेदवारीला पात्र होईल; कारण हें पद म्हणजे सरकारी नोकरी अगर प्राप्तीची जागा होऊं शकणार नाहीं.

### विकल्पें करून

१३४. (१) नेमला जाण्यासाठीं इसम हिंदुस्थानचा नागरिक असून त्याच्या वयास ३५ वर्षें पुरीं झालीं असलीं पाहिजेत.

**नेमणुकीसाठीं लायकी**

(२) घटक राज्याच्या कायदेमंडळाच्या निवडणुकींत सभासद होण्यास जर इसम नालायक असेल, तर तो प्रमुख म्हणून नेमला जाण्यास अपात्र आहे.

मात्र नेमला जाणारा इसम त्या घटक राज्याचा रहिवासी पाहिजेच असें नाहीं.

प्रमुखपदाचा उमेदवार राज्यांतील रहिवासी पाहिजे असें नाहीं. मात्र कायदे-मंडळाचा सभासद होण्यास तो नालायक नसला पाहिजे. घटकराज्याबाहेरील पण नागरिक असला तरी चालेल. या व्यवस्थेंत सोय आहे, शिवाय परप्रांतीय प्रमुख

असल्यानें एका दृष्टीनें तो अधिक निःपक्षपाती असूं शकतो. शिवाय हिंदुस्थान हा एकसंघी आहे ही गोष्ट ठळक प्रमाणांत उतरविण्यासाठीं ही व्यवस्था कांहींशी इष्ट अशीच आहे. परप्रांतांतील लायक इसम प्रांतप्रमुख झाल्यानें तो स्थानिक भानगडींपासून, पक्षबाजीपासून अलिप्त राहणें अधिक शक्य आहे. या कलमांतील व्यवस्था जर प्रमुख नेमावयाचा असेल, तर अमलांत यावयाची हें उघड आहे.

**प्रमुखाच्या जागेच्या मर्यादा**

१३५. प्रमुख हा पार्लमेंटचा अगर परिशिष्ट एक मध्यें नमूद केलेल्या कुठल्याही घटक राज्याचा सभासद असतां कामा नये. आणि सभासद असतांना त्याची निवड अगर नेमणूक झाल्यास अधिकारग्रहण करतांच त्याचें सभासदत्व रद्दबातल समजलें जाईल.

( २ ) प्रमुख ह्याला कोठलीही अन्य अधिकाराची अगर प्राप्तीची जागा घेतां येणार नाहीं.

( ३ ) प्रमुखाला सरकारी निवासस्थान असेल व त्याचा पगार व अन्य भत्ता त्या घटक राज्याचें कायदेमंडळ कायदा करून ठरवील व हें होईपर्यंत परिशिष्ट दोन यांत सांगितलेली व्यवस्था अमलांत राहील.

( ४ ) अधिकारावर असेपर्यंत वेतन अगर भत्ता यांत काट केला जाणार नाहीं.

प्रमुखाच्या निवडणुकीस उभें राहतांना कुठल्याही कायदेमंडळाचें सभासदत्व आडवें येत नाहीं. पण निवडणूक होतांच व अधिकार घेताच तें रद्द होतें. प्रमुखपद व सभासदत्व दोन्ही एका वेळीं असणार नाहींत. प्रमुखपद असेपर्यंत दुसरीकडे अधिकाराची जागा घेतां येणार नाहीं. पगार वगैरेबाबत ( ३ ) व ( ४ ) यांतील व्यवस्था योग्यच आहे.

**अधिकारग्रहणाची प्रतिज्ञा**

१३६. प्रमुख अगर त्याचें काम पाहणारा इसम यांस खालील प्रतिज्ञा अधिकारग्रहण करण्यापूर्वीं त्या घटकराज्याच्या कायदेमंडळांत घ्यावी लागेल.

मी—अमुक गंभीरपणें प्रतिज्ञा करतों कीं, (अगर शपथ घेतों कीं,)—या घटकराज्याच्या प्रमुखपदाचें काम प्रामाणिकपणें करीन (अगर प्रमुखाचें कार्य करीन) आणि यथाशक्ति घटना आणि कायदा राखीन, संरक्षण करीन आणि—राज्यांतील लोकांची सेवा व कल्याण करण्यासाठीं वाहून घेईन.

घटना व कायदा राहील, त्याचें संरक्षण होईल, त्यांच्यावर येणारे हल्ले निवारले जातील, ही दक्षता प्रमुखानें घ्यावयाची आहे व त्यासाठीं तो प्रतिज्ञाबद्ध होतो. ज्याचा ईश्वरावर विश्वास आहे, त्यानें प्रतिज्ञेऐवजीं शपथ घ्यावयाची सोय केली आहे.

प्रमुखावर आरोप ठेवण्याची रीत

१३७. (१) घटनेविरुद्ध वर्तन केल्याचा आरोप प्रमुखावर करणें झाल्यास तो घटक राज्याच्या कायदेमंडळापुढें केला पाहिजे.

(२) असा आरोप करणें झाल्यास

(अ) त्यापूर्वीं कायदेमंडळाच्या निदान ३० सभासदांच्या सह्यांनिशीं आरोप करणाऱ्या ठरावाची सूचना लेखी दिली पाहिजे व तो ठराव मांडणार आहों असें त्यांत नमूद केलें पाहिजे आणि

(ब) कायदेमंडळाच्या वटसंख्येपैकीं निदान $\frac{2}{3}$ सभासदांचा त्या ठरावाला पाठिंबा असला पाहिजे.

(३) याप्रमाणें आरोप दाखल झाल्यास कायदेमंडळाचा सभाप्रमुख (Speaker) मध्यवर्ती विधिमंडळाच्या वरिष्ट कायदेमंडळाच्या सभापतीस त्याबाबत दखल देईल. त्यानंतर वरिष्ठ कायदेमंडळ त्यांतली सभासदांची अगर ज्यांत बाहेरचेही इसम आहेत अशांची एक समिति नेमील; या समितीनें आरोपाची चौकशी करावयाची आहे व त्या समितीपुढें प्रमुखाला जातीनें आणि प्रतिनिधीमार्फत हजर राहण्याचा हक्क आहे.

(४) चौकशीनंतर जर वरिष्ठ कायदेमंडळाच्या वटसंख्येच्या ⅔ सभासदांनीं ठराव पास करून आरोप शाबीत झाला असें जाहीर केलें तर त्याचा परिणाम ज्या तारखेला घटक राज्याच्या सभाप्रमुखाला या ठरावाची दखल मिळेल त्या दिवसापासून प्रमुख हा प्रमुखपदावरून काढून टाकला आहे असा होईल.

या कलमांत घटनेविरुद्ध वर्तन केल्यास प्रमुखाला दूर करतां येतें हें सांगितलें आहे. त्याबाबत ठराव कसा आणतां येईल, किती प्रमाणांत बहुमत पाहिजे, तसेंच आरोपाची चौकशी कोण करणार, हें सांगितलें आहे. वरिष्ठ कायदेमंडळांत ⅔ बहुमतानें ठराव पास झाल्यास प्रमुख कामावरून दूर केला जाईल. वाटेल त्यानें उठावें व ठराव आणावा व केवळ बहुमतानें तो पास व्हावा ही योजना हितकारक नाहीं. निवडलेला अगर नेमलेला प्रांतपति यालाही कांहीं शाश्वति हवी. या दृष्टीनें कलमांतील व्यवस्था योग्यच आहे.

**कांहीं प्रसंगीं प्रमुखाचें कार्य करण्याची व्यवस्था**

१३८. प्रस्तुत प्रकरणांत व्यवस्था केली आहे त्याव्यतिरिक्त कांहीं परिस्थिति उत्पन्न झाल्यास प्रमुखाचें कार्य कसें व्हावें हें ठरविण्यासाठीं कायदेमंडळ अगर अध्यक्ष योजना करील.

जर प्रमुख निवडणुकीनें आला असेल, तर त्या घटकराज्याचें कायदेमंडळ योजना करील; जर प्रमुख अध्यक्षानें नेमला असेल, तर अध्यक्ष योजना करील. पुढील कलमांत व्यवस्था सामान्यतः सांगितली आहे. तथापि हीं कलमें लागू पडत नाहींत अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यास योजना करण्याचा अधिकार या कलमांत कायदेमंडळ अगर अध्यक्ष यांना दिला आहे.

**जागा खाली पडल्यास त्यासाठीं पॅनेलची निवडणूक करण्याचा काल**

१३९. (१) प्रमुखपदाची मुदत संपण्यापूर्वी त्याची रिकामी होणारी जागा भरण्यासाठीं निवडणूक, अगर नेमणुकीसाठीं पॅनेलची निवडणूक पुरी झाली पाहिजे.

(२) मृत्यूनें, राजिनाम्यानें, अगर पदभ्रष्ट केलें म्हणून प्रमुखपद खाली झालें म्हणजे शक्य तितक्या लवकर दुसऱ्याची निवडणूक, अगर नेमणुकीसाठीं पॅनेलची निवडणूक

करण्याची व्यवस्था केली जाईल व निवडून आलेला अगर नेमलेला प्रमुख कलम १३२ प्रमाणें पुरीं पांच वर्षें अधिकारावर राहील.

दरम्यान अगर मुदत संपल्यानें प्रमुखाची जागा खाली झाल्यास निवडणुकीची व्यवस्था या कलमांत सांगितली आहे. नेमणुकीच्या दृष्टीनें पॅनेलच्या नेमणुकीची व्यवस्था यांत आहे. दरम्यान निवडणूक झाल्यास निवडून आलेला कलम १३२ प्रमाणें पूर्ण पांच वर्षें अधिकारावर राहील. या योजनेचा विचार कलम ५१ संबंधीं विवरणांत आला आहे, तो पाहावा. या योजनेंतील दोष तेथें दाखविले आहेत.

**प्रमुखाच्या निवडणुकी अगर नेमणुकीसंबंधांत**

१४०. प्रमुखाच्या निवडणुकीबाबत अगर नेमणुकीसाठीं पॅनेलच्या निवडणुकीबाबत कांहीं शंका अगर वाद उत्पन्न झाल्यास प्रमुख न्यायालय त्याबाबत चौकशी करील व त्याचा निर्णय अखेरचा समजला जाईल.

(२) या घटनेंतील व्यवस्थेचें पालन करून त्या त्या घटक-राज्याच्या कायदेमंडळाला प्रमुखाच्या निवडणुकीबाबत अगर पॅनेलच्या निवडणुकीबाबत कायदा करून नियमन करतां येईल.

प्रमुख न्यायालय निवडणुकीसंबंधांत कांहीं वाद उपस्थित झाल्यास चौकशी करून निर्णय देईल व तो अखेरचा असेल. मग ही निवडणूक प्रत्यक्ष असो अगर पॅनेलची असो. घटक-राज्याच्या कायदेमंडळाला कायद्यानें या संबंधांत नियमन करतां येईल.

**प्रमुख व दयादान— शिक्षामाफी वगैरे**

१४१. घटक-राज्याच्या कायदेमंडळाला ज्या बाबतींत कायदे करण्याचा अधिकार आहे, त्या बाबीसंबंधांत शिक्षा झाली असल्यास तिची बजावणी तहकूब करणें, ती थांबविणें, तींत कमी करणें, माफ करणें हा अधिकार प्रमुखाला आहे.

कायदेमंडळाला कायदा करून ज्या बाबतींत अधिकार चालवितां येतो, तेवढ्या क्षेत्रांत हा शिक्षामाफीचा, शिक्षा थांबविण्याचा, वगैरे अधिकार प्रमुखाला आहे. राज्यांत कुणातरी अधिकाऱ्याला दयादान करण्याचा व गुन्हा माफ करण्याचा अधिकार असला पाहिजे. न्यायानें निकाल व शिक्षा योग्य असली तरी भूतदयेनें ती योग्य ठरतेच असें नाहीं. या परिस्थितींत ती कमी होणें अगर माफ होणें इष्ट असतें. हा अधिकार या कलमानें प्रमुखास ( Governor ) दिला आहे.

१४२. घटनेंतील व्यवस्था मानून घटक-राज्याच्या कार्यकारी सत्तेचा व्याप खालीलप्रमाणें राहीलः—

कार्यकारी सत्तेचा व्याप

(अ) ज्या बाबतींत त्या राज्यांतील कायदेमंडळाला कायदे करण्याचा अधिकार आहे, अशा सर्व बाबी आणि

(ब) कलम २३६ अथवा २३७ प्रमाणें परिशिष्ट एक भाग ३ मधील संस्थानांशीं एकएकटेपणें अगर गटानें कांहीं करार होऊन ज्या बाबीसंबंधांत कार्यकारी सत्तेला अधिकार मिळाला असेल, त्या बाबी.

कार्यकारी सत्तेचें क्षेत्र या कलमांत निर्दिष्ट केलें आहे. कायदेमंडळाला जेवढें क्षेत्र घटनेनें दिलें आहे, तें सर्व व कलम २३६, २३७ या अन्वयें अन्य क्षेत्रांतसुद्धां कार्यकारी सत्तेला आपला अधिकार चालवितां येईल. घटक-राज्याच्या कायदेमंडळाचा अधिकार घटनेनें ठरविला आहे. कोणते विषय घटक-राज्याच्या कायदेमंडळाच्या कक्षेंत येतात तें परिशिष्ट ७ मध्यें नमूद केलें आहे. याशिवाय समान क्षेत्र म्हणजे ज्या बाबतींत मध्यवर्ती संघ सरकार व घटक-राज्याचें सरकार दोघांनाही अधिकार आहे, व ज्यांतील विषय यादी ३ परिशिष्ट ७ मध्यें दिले आहेत. तेंही क्षेत्र त्याच्या कक्षेंत येतें. थोडक्यांत म्हणजे प्रांतिक बाबी व समान बाबी या दोहोंत कायदेमंडळाला अधिकार आहे, व हें सर्व अधिकारक्षेत्र कार्यकारी सत्तेला आहे. शिवाय (ब) यांत सांगितल्याप्रमाणें संस्थानांनीं करार करून ज्या बाबी दिल्या असतील, त्याही मग कार्यकारी सत्तेच्या क्षेत्रांत येतात. कार्यकारी सत्ता म्हणजे कायद्याची अंमलबजावणी करणारी सत्ता होय; तेव्हां तिचें क्षेत्र निश्चित असणें हें नागरिकांच्या दृष्टीनें इष्ट आहे.

## मंत्रिमंडळ

१४३. (१) मुख्य मंत्र्याच्या नेतृत्वाखालीं एक मंत्रिमंडळ प्रमुखाला त्याचीं कार्यें करण्याबाबत सल्ला देण्यासाठीं असेल. ज्या बाबतींत घटनेनें प्रमुखाला मर्जीप्रमाणें कार्य करण्यास अधिकार दिला असेल, तेवढें सोडून बाकीच्या बाबतींत मंत्रिमंडळ त्याला सल्ला व मदत देईल.

प्रमुख व मंत्रिमंडळ

(२) एखादी गोष्ट प्रमुखाच्या अधिकारांतील आहे का मंत्रि-मंडळाचा सल्ला घेतला पाहिजे अशा स्वरूपाची आहे असा प्रश्न उपस्थित झाल्यास प्रमुख आपल्या मर्जीप्रमाणें त्याचा निकाल देईल व तो अखेरचा मानला जाईल, व प्रमुखानें सल्ला घ्यावयास हवा होता व मर्जीप्रमाणें वागावयास नको होतें अगर हवें होतें या मुद्द्यावर प्रमुखाचें कोणतेंही कृत्य चौकशीस पात्र होणार नाहीं.

(३) मंत्रिमंडळानें प्रमुखाला सल्ला दिला किंवा नाहीं अगर काय सल्ला दिला, या प्रश्नाची चौकशी कुठल्याही कोर्टाला करतां येणार नाहीं.

घटक-राज्यांत मंत्रिमंडळ असेल व त्याचा प्रमुख मुख्य मंत्री असेल. राज्य-कारभाराचे दोन भाग कल्पिले आहेत; एकांत मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें प्रमुखानें कार्य करावयाचें आहे; दुसऱ्यांत प्रमुखानें आपल्या मर्जीप्रमाणें. त्यांत त्यानें मंत्रिमंडळाचा सल्ला घेतलाच पाहिजे असा निर्बंध नाहीं. कोणती बाब कुठल्या भागांत पडते हेंहीं प्रमुखानें मर्जीनुरूप ठरवावयाचें व त्याचा निकाल अखेरचा मानला जाईल. प्रमुखानें सल्ला घ्यावयास पाहिजे होता अगर मर्जीप्रमाणें वागावयास पाहिजे होतें अगर नको होतें या मुद्द्यावर त्याचें कोणतेंही कृत्य चौकशीस पात्र होणार नाहीं. मंत्रिमंडळानें सल्ला दिला अगर न दिला हीही गोष्ट कोर्टाच्या विचारांत घेतां येणार नाहीं. ती त्याच्या अधिकारक्षेत्राबाहेर आहे. असें नसेल, तर प्रत्येक गोष्ट कुणी तरी कोर्टापुढें नेईल व राज्यकारभार चालविणें अशक्य होईल. मंत्रिमंडळाला पूर्ण संरक्षण या बाबतींत असणें इष्ट आहे. मंत्रिमंडळ नापसंत असेल, त्याचें धोरण अयोग्य वाटत असेल तर त्याबाबत अन्य इलाज सांगितले आहेत. कोर्टाला यांत हस्तक्षेप करूं दिल्यास अनर्थ होईल. मंत्रिमंडळ निर्भय सल्ला देणार नाहीं. योग्य पण अप्रिय गोष्ट मनुष्य सहसा करीत नाहीं; मग ती जर कोर्टापुढें येणार असेल, तर अधिक वाईट परिस्थिति उत्पन्न होईल.

१४४. (१) मंत्र्यांची नेमणूक प्रमुख करील व प्रमुखाची मर्जी असेपर्यंत ते कामावर राहतील.

मंत्र्याबाबत व्यवस्था

मात्र बिहार, ओरिसा व मध्यप्रांत व वऱ्हाड या प्रत्येक घटक-राज्यांत वन्य जातीचें हित पाहण्यासाठीं

एक मंत्री असेल. त्यानें हें काम संभाळून हरिजन व मागासलेले वर्ग यांच्या कल्याणासंबंधींचें अगर अन्य काम पाहावें.

( २ ) प्रमुखानें मंत्र्याकडून अधिकारग्रहणापूर्वी परिशिष्ट ३ मध्यें नमूद केल्याप्रमाणें, अधिकाराबाबत व गुप्ततेबाबत प्रतिज्ञा घ्याव-याची आहे.

( ३ ) जर सलग सहा महिनेपर्यंत एखादा मंत्री कायदेमंडळाचा सभासद नसेल, तर ही मुदत संपतांच त्याचें मंत्रीपद रद्दबातल होईल.

( ४ ) मंत्री निवडण्यांत व त्यांच्याशीं वागण्यांत परिशिष्ट ४ मध्यें जें आदेशपत्र दिलें आहे त्यांतील आदेश सामान्यतः प्रमुख अमलांत आणील; परंतु प्रमुखानें आदेशपत्राप्रमाणें वागणूक केली नाहीं म्हणून त्याचें एखादें कृत्य कायदेशीर नाहीं अशा मुद्द्यावर याबाबत चौकशी करतां येणार नाहीं.

( ५ ) मंत्र्याचे पगार व भत्ते कायदेमंडळ कायदा करून वेळो-वेळीं ठरवील. तोपर्यंत परिशिष्ट दोन मधील व्यवस्था अमलांत राहील.

( ६ ) या कलमानुसार मंत्री नेमणें व काढणें हीं कार्यें प्रमुखानें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचीं आहेत.

प्रमुखानें मंत्री नेमावयाचे आहेत व ते त्याची मर्जी असेपर्यंत कामावर राहतील. ते कसे नेमावे, नेमतांना काय गोष्टी त्यानें विचारांत घ्याव्यात यांबाबत एक आदेशपत्र त्याला देण्यांत येईल व तें परिशिष्ट चारमध्यें दिलें आहे. त्या आदेशपत्रांतील परिच्छेद २ प्रमाणें, ज्याला कायदेमंडळांत टिकाऊ बहुमत आहे असें प्रमुखाला वाटेल, त्या इसमाशीं सल्लामसलत करून मंत्र्यांची नेमणूक त्यानें करावयाची आहे. या मंत्रिमंडळावर संयुक्त दृष्ट्या कायदेमंडळाचा विश्वास असण्याची जरूरीही लक्षांत घेतली पाहिजे व मंत्रिमंडळ नेमतांना संयुक्त जबाबदारीचें तत्त्व वाढीस लागेल अशीही दृष्टि तो ठेवील. शक्य झाल्यास मंत्रिमंडळांत महत्त्वाच्या अल्पसंख्यांक जातीचे मंत्री घेतले जावेत अशीही त्याची दृष्टि राहील. सारांश, मंत्रिमंडळ संयुक्त जबाबदारीचें असेल. त्याच्यावर कायदेमंडळाचा विश्वास पाहिजे,

याचा अर्थ तें कायदेमंडळाला जबाबदार आहे. कायदेमंडळांतील बहुमतवाल्या पक्षाच्या नेत्यास बोलावून त्याला मंत्रिमंडळ उभारण्याचा आदेश प्रमुख देईल व या नेत्यानें जी शिफारस केली असेल ती प्रमुख मानील. संयुक्त जबाबदारी म्हणजे काय, याचें विवरण मागें येऊन गेलें आहे. शक्य तर मंत्रिमंडळांत अल्पसंख्यांकांचे प्रतिनिधि असतील. आदेशपत्राच्या परिच्छेद ३ प्रमाणें, ज्या क्षेत्रांत प्रमुखानें मंत्रिमंडळाचा सल्ला घेऊन कारभार करावयाचा आहे, त्या क्षेत्रांत त्यानें मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें कारभार चालवावयाचा आहे.

## घटक-राज्याचा प्रमुख कायदेसल्लागार

घटक-राज्याचा प्रमुख कायदेसल्लागार

१४५. ( १ ) प्रत्येक घटक-राज्याचा प्रमुख मुख्य न्यायालयांत न्यायाधीश होण्याची पात्रता असणाऱ्या इसमास त्या घटक-राज्यापुरता कायद्याचा प्रमुख सल्लागार म्हणून नेमील.

( २ ) प्रमुख कायदे–सल्लागार हा प्रमुख सांगेल त्या बाबतींत घटक-सरकारला कायद्याबाबत सल्ला देईल; तसेंच कायद्याबाबत जीं अन्य कामें त्यानें करावीं असें प्रमुख ठरवील, तीं सर्व तो करील; तसेंच या घटनेप्रमाणें अगर अन्य कायद्याप्रमाणें जी कांहीं कामें त्यानें करावीं असें नमूद केलें असेल तीं तीं सर्व कामें तो करील.

( ३ ) प्रमुख कायदे–सल्लागार मुख्य मंत्र्यानें राजिनामा दिल्याबरोबर निवृत्त होईल; परंतु दुसरा त्या जागीं येईपर्यंत अगर त्याची पुन्हा नेमणूक होईपर्यंत तो काम पाहील.

( ४ ) प्रमुख कायदे–सल्लागाराला प्रमुख ठरवील तेवढें वेतन मिळेल.

मध्यवर्ती व्यवस्थेंत जशी कायदे–सल्लागाराबाबत योजना आहे, त्याच तत्त्वावर घटक-राज्यांत पण आहे. कार्यकारी सत्तेला कायद्याबाबत सल्ला देणारा असा अधिकारी असणें जरूर आहे.

## घटक-राज्याचें कामकाज

घटक-राज्याचें कामकाज

१४६. (१) प्रमुखाच्या नांवानें घटक-राज्यांतील कार्यकारी सत्ता चालेल.

(२) प्रमुखाच्या नांवानें काढलेले आदेश व आज्ञा यांवर प्रमुखानें त्याबाबतींत केलेल्या नियमाप्रमाणें शिक्कामोर्तब होईल व याप्रमाणें त्यांवर शिक्कामोर्तब झाल्यानंतर त्यांच्या कायदेशीरपणाबद्दल कोणालाही आक्षेप घेतां येणार नाहीं.

मुख्य प्रधानानें प्रमुखाला माहिती पुरविणें

१४७. घटक-राज्याच्या मुख्य प्रधानाचें कर्तव्य खालीलप्रमाणें आहे.

(अ) मंत्रिमंडळाच्या कारभारासंबंधींचे सर्व निर्णय प्रमुखास कळविणें, तसेंच नवीन कायद्याबाबतच्या सूचनाही त्याला कळविणें;

(ब) कारभाराबाबत आणि नवीन कायद्याबाबत जी माहिती प्रमुख मागेल, ती पुरविणें;

(क) एखादी बाब, कीं ज्याबाबत मंत्र्यानें निर्णय घेतला असेल, पण मंत्रिमंडळानें जिचा विचार केला नसेल, अशी बाब मंत्रिमंडळानें विचारांत घ्यावी, अशी प्रमुखानें मागणी केल्यास ती बाब मंत्रिमंडळापुढें विचारार्थ ठेवणें.

मंत्रिमंडळाचे निर्णय व जे कायदे नवीन व्हावयाचे आहेत, ते सर्व प्रमुखाकडे गेले पाहिजेत. कारण राज्यकारभार त्याच्या नांवानें चालणार; अर्थात् तो कसा चालला आहे याची माहिती त्याला असणें अवश्य आहे. एखाद्या ज्या बाबीचा नियमाप्रमाणें मंत्री आपल्या अधिकारांत निकाल करील, तो त्यानें केल्यानंतर तिचा विचार मंत्रिमंडळानें करावा, असें प्रमुखास वाटल्यास तसें सांगण्याचा त्याला अधिकार आहे. मंत्रिमंडळापुढें महत्त्वाच्या धोरणाच्या बाबी येतात अगर एखादी

अंमलबजावणीची बाब, कीं ज्यांत एखादें धोरण समाविष्ट झालें असेल व जें घेतलेल्या निर्णयापासून निराळें असेल, अशीही बाब मंत्रिमंडळापुढें येते. अंमलबजावणीची अगर दुय्यम धोरणाची, तसेंच नेमणुकीसंबंधीं बाब यावर मंत्री आपापल्या खात्यांतच निर्णय घेतो. मंत्रिमंडळापुढें ती बाब ठेवणें अवश्य नसतें. पण अशापैकींही एखादी बाब, जी प्रमुखाला महत्त्वाची वाटेल, ती तो मुख्य प्रधानाला सांगून मंत्रिमंडळापुढें आणवील. हें झाल्यावर जर मंत्रिमंडळानें मंत्र्याचा निर्णय मानला, तर निदान साऱ्याच मंत्रिमंडळाचा तो निर्णय आहे, एवढें तरी समाधान प्रमुखाला मिळेल. जी गोष्ट मंत्रिमंडळ करूं शकणार नाहीं, पण औचित्य न सोडतां प्रमुख करूं शकेल अशी ही योजना आहे. केवळ अधिकाराच्या जोरावर एखादा मंत्री वागेल, तर त्याला आळा घालणारी ही योजना आहे.

# प्रकरण ३ रें – कायदेमंडळ

## सामान्य विचार

परिशिष्ट १ भाग १ यांतील घटक-राज्यांचीं कायदेमंडळें

**१४८. (१) प्रत्येक घटक-राज्याचें एक कायदेमंडळ असेल व त्यांत प्रमुख, आणि**

**(अ)—घटक-राज्यांत दोन सभागृहें**

**(ब) याव्यतिरिक्त घटक-राज्यांत एक सभागृह**

**यांचा समावेश होईल.**

**(२) जेथें दोन सभागृहें असतील तेथें एकास लेजिस्लेटिव्ह कौन्सिल व दुसऱ्याला लेजिस्लेटिव्ह असेंब्ली असें संबोधण्यांत येईल. जेथें एकच असेल तेथें त्याला ले. असेंब्ली असें संबोधण्यांत येईल.**

सभागृहें एक कीं दोन असावींत, हें त्या त्या प्रांतांतील विद्यमान कायदेमंडळांतील सभासदांनीं ठरवावयाचें आहे. कायदेमंडळ म्हणजे प्रमुख व एक अगर दोन सभागृहें; लहान लहान प्रांत झाल्यास दोन सभागृहें असणें जरूर नाहीं. मोठ्या प्रांतांत तशीं तीं असणें योग्य आहे. या प्रश्नाची तात्त्विक चर्चा पूर्वी आलेली आहे.

१४९. (१) कलम २९४ व २९५ यांचें पालन करून ले. असें-ब्लीचे सभासद प्रत्यक्ष निवडणुकीनें निवडून येतील.

असेंब्लीची घटना

(२) निवडणूक, वयांत आलेल्या प्रत्येक इसमास मताधिकार आहे या तत्त्वावर होईल. म्हणजे जो इसम २१ वर्षांहून कमी वयाचा नाहीं, आणि निवास, वेडेपण, गुन्हा अगर लांचलुचपत अगर गैरशिस्त प्रकार यांबाबत घटनेनें अगर अन्य कायद्यानें जो अपात्र ठरला नसेल, अशा प्रत्येकास मतदार म्हणून नोंदलें जाण्याचा अधिकार आहे व मत देण्याचा अधिकार आहे.

(३) असेंब्लीचे मतदार संघ प्रादेशिक असून, आसाममधील स्वयंपूर्ण जिल्हे सोडून एक लाख लोकवस्तीस १ प्रतिनिधि या प्रमाणानें निश्चित केले जातील. याबाबत लोकसंख्या मागील खानेसुमारींतील ग्राह्य धरली जाईल.

मात्र कोठल्याही असेंब्लीच्या सभासदांची संख्या ६० पेक्षां कमी अगर ३०० पेक्षां जास्त असणार नाहीं.

(४) प्रत्येक खानेसुमारीनंतर, कलम २८९ मधील व्यवस्थेचें पालन करून, मतदार संघांत जरूर ते फेरफार करण्यांत येतील आणि ते केव्हां अमलांत येतील या व अन्य बाबतींतील व्यवस्था त्या त्या घटक-राज्याचें कायदेमंडळ कायदा करून ठरवील. मात्र फेरफार होण्याच्या वेळीं असलेली असेंब्ली बरखास्त झाल्यानंतर ते फेरफार अमलांत येतील.

घटक-राज्याच्या कायदेमंडळाची निवडणूक प्रत्यक्ष पद्धतीनें व्हावयाची आहे, व वयांत आलेल्या व जो कायद्यानें अपात्र ठरला नसेल अशा प्रत्येक इसमास मताचा अधिकार आहे, या तत्त्वावर ती होईल. असेंब्लीच्या प्रतिनिधित्वाचें प्रमाण लाखास एक प्रतिनिधि असें राहील. अल्पसंख्यांकांबाबत जी योजना घटनेंत आहे, तिला अनुसरून त्यांना प्रतिनिधित्व मिळेल. खानेसुमारीनंतर अवश्य झालेले फेरफार करण्यांत येतील. कलम २८९ मध्यें निवडणूक-कमिशनची योजना आहे, त्याला अनुसरून हीं कामें होतील.

१५०. ( १ ) जेथें कौन्सिल असेल, तेथें त्यांतील सभासदांची संख्या तेथील असेंब्ली-सभासदांच्या संख्येच्या $\frac{1}{4}$ पेक्षां अधिक असणार नाहीं.

कौन्सिलची घटना

( २ ) एकंदर सभासदांच्या संख्येपैकीं

( अ ) निम्मे सभासद पोटकलम ( ३ ) यांत नमूद केलेल्या गटांमधून (पॅनेलमधून) घेतले जातील.

( ब ) एक तृतीयांश सभासद असेंब्लींतील सभासदांनीं क्रमदेय मतदान पद्धतीनें निवडावयाचे आहेत.

( क ) राहिलेले सभासद प्रमुख (Governor) नेमील.

( ३ ) कौन्सिलच्या पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीपूर्वी व त्यानंतर कलम १५१ ( २ ) प्रमाणें होणाऱ्या उमेदवारांचे पांच गट अगर पॅनेल करण्यांत येतील. पैकीं एकांत त्या घटक-राज्यांतील विश्वविद्यालयांच्या प्रतिनिधींचीं नांवें असतील. बाकीच्या चार गटांत खालील विषयांत विशेष ज्ञान अगर अनुभव आहे, अशांचीं नांवें असतीलः—

( अ ) साहित्य, कला आणि शास्त्र;

( ब ) शेती, मच्छीमारी व तत्सम धंदे;

( क ) वास्तुशास्त्र व शिल्पशास्त्र;

( ड ) राज्यकारभार व सामाजिक सेवा;

( ४ ) ( ३ ) यांत सांगितलेल्या प्रत्येक गटांत त्या गटांतून निवडून द्यावयाच्या संख्येच्या दुप्पट नांवें निदान असलीं पाहिजेत.

( ५ )कायदेमंडळ कायदा करून ( ३ ) व ( ४ ) यांबाबत पोटनिवडणुकींत काय विशेष व्यवस्था राहावी, हें ठरवील.

जेथें कौन्सिल असेल, तेथें सभासदांची संख्या, सभासदनिवड, अगर नेमणूक यांसंबंधींची व्यवस्था या कलमांत सांगितली आहे. कांहीं सभासद असेंब्लीनें

निवडावयाचे, कांहीं नियमानुसार पॅनेलमधून निवडावयाचे व कांहीं प्रमुखानें नेमावयाचे आहेत. साहित्य, विश्वविद्यालय, शास्त्र, कला, शेती, मच्छीमारी, वास्तुशास्त्र, राज्यशासन इत्यादिकांचे प्रतिनिधि पण त्यांत असतील. तात्पर्य, कौन्सिलचें स्वरूप व संघटन हें असेंब्लीच्या स्वरूपापेक्षां निराळें आहे. एक सभागृह प्रादेशिक प्रतिनिधित्व करतें, दुसरें कार्यासंबंधीं ( Functional ) करतें. पुण्याचा प्रतिनिधि म्हणजे प्रदेशाचा प्रतिनिधि. विश्वविद्यालयाचा, अगर इंजिनियरांचा म्हणजे त्या त्या कार्याचा, विद्येचा; यांत प्रदेशाचा भाव येत नाहीं. शिवाय यामुळें अनुभवी, तज्ज्ञ व विद्वान् यांचा लाभ कायदेमंडळाला मिळतो.

**कायदेमंडळाची मुदत**

**१५१. ( १ ) असेंब्लीची मुदत, मुदतीपूर्वीं ती बरखास्त न झाल्यास पहिल्या सभेच्या तारखेपासून पांच वर्षें राहील. ही मुदत संपतांच ती बरखास्त झाली, असें समजण्यांत येईल.**

**( २ ) कौन्सिल हें बरखास्त होणार नाहीं. पण सामान्यपणें एकतृतीयांश सभासद प्रत्येक तिसऱ्या वर्षाला त्या बाबतींत त्या घटक-राज्याच्या कायदेमंडळानें केलेल्या कायद्याच्या नियमानुसार निवृत्त होतील.**

कौन्सिलच्या निवडणुकीच्या या व्यवस्थेंत कायदेमंडळांत सातत्य राहावें, कांहीं तरी अनुभवी लोक असावेत अशी योजना आहे. सर्वच एकदम निवडून द्यावयाचे, तर सर्व जुने जाऊन नवे येण्याचा संभव आहे. असेंब्लींत हा संभव आहेच, पण कौन्सिलच्या बाबतींत ( २ ) यांतील योजनेनें तो वरील सोयीसाठीं टाळला आहे.

**सभासद व वयोमर्यादा**

**१५२. असेंब्लीचा सभासद होण्यासाठीं किमान वय २५ वर्षें व कौन्सिलचा सभासद होण्यासाठीं किमान वय ३५ वर्षें राहील.**

साधारणपणें अधिक प्रातिनिधिक सभागृहांतील सभासदांसाठीं किमान वयो-मर्यादा २१ ते २५ पर्यंत बहुतेक घटनांतून आहे. वरिष्ठ सभागृहांतील सभासदांसाठीं साधारणपणें किमान वयोमर्यादा ३० ते ३५ वर्षें असते. वरिष्ठ व कमी प्रातिनिधिक सभागृहांत अधिक अनुभवी लोक असावेत या दृष्टीनें वयोमर्यादा अधिक ठेवलेली असते. येथें कनिष्ठ व वरिष्ठ सभागृहासाठीं ती अनुक्रमें २५ व ३५ वर्षें अशी ठेवली आहे.

१५३. (१) कायदेमंडळाचें अधिवेशन, मग एक सभागृह असो अगर दोन असोत, वर्षांतून निदान दोनदां बोलाविलें जाईल. व दोन अधिवेशनांतील काल ६ महिन्यांपेक्षां अधिक असणार नाहीं.

कायदेमंडळाचीं अधिवेशनें वगैरे

(२) या कलमांतील व्यवस्थेचें पालन करून, प्रमुख वेळोवेळीं,

(अ) त्याला योग्य वाटेल तेव्हां व त्या ठिकाणीं एका अगर दोन्ही सभागृहांची बैठक बोलावूं शकेल;

(ब) सभागृहाचें अगर गृहांचें काम स्थगित करूं शकेल.

(क) असेंब्ली बरखास्त करूं शकेल.

(३) वर (२) यांतील (अ) व (क) हीं कामें प्रमुखाला त्याच्या मर्जीनुसार (Discretion) करतां येतील.

कायदेमंडळाचें अधिवेशन वर्षांतून दोनदां बोलविलें पाहिजे, तसेंच दोन बैठकींत ६ महिन्यांपेक्षां अधिक काल जातां कामा नये. या व्यवस्थेमुळें लोकमताला वाव राहतो. जनतेच्या गाऱ्हाण्यांना वाचा फुटते. याशिवाय प्रमुखाला योग्य वाटेल तेव्हां कायदेमंडळाचें अधिवेशन बोलवितां येईल. अधिवेशन अगर बैठक स्थगित करणें ( Prorogue ) तसेंच सभागृह बरखास्त करणें हेंही प्रमुखाचेंच काम आहे. सभागृहांच्या बैठकी बोलावणें व सभागृह बरखास्त करणें, ह्या गोष्टी त्याच्या मर्जीतील आहेत. या बाबतींत त्याला मंत्रिमंडळाच्या सल्ल्याची आवश्यकता नाहीं, अथवा तसें बंधन त्याजवर नाहीं.

१५४. (१) प्रमुखाला वाटल्यास असेंब्लींत अगर जेथें दोन सभागृहें असतील तेथें कोठल्याही सभागृहांत अगर त्यांच्या संयुक्त बैठकींत जाऊन त्याला भाषण करतां येईल व याकरतां सभासदांनीं उपस्थित राहावें म्हणून आदेश देतां येईल.

सभागृहांत भाषण करण्याचा प्रमुखाचा अधिकार

(२) प्रमुखाला सभागृहापुढें विचार होत असलेल्या बिलाबाबत अगर अन्य बिलाबाबत संदेश धाडून त्याचा विचार व्हावा असा आदेश

**देतां येईल आणि याप्रमाणें संदेश आला म्हणजे त्या त्या सभागृहानें शक्य तितक्या लवकर त्याबाबत विचार करावयाचा आहे.**

प्रमुखाला सभागृहांत जाऊन भाषण करण्याचा, तसेंच संदेश धाडून एखाद्या बिलाबाबत विचार व्हावा असें सांगण्याचा अधिकार या कलमांत दिला आहे. एखादें बिल चालू असेल तेव्हां अगर तें पास होऊन प्रमुखाच्या संमतीसाठीं आलें असलें तरी, कांहीं सूचना करून विचारार्थ परत धाडण्याचा हा अधिकार आहे. सभागृह घाईनें अगर भावनेला बळी पडून अगर गटबाजीमुळें अन्याय करणारें बिल जर पास करूं लागलें, अगर त्यानें तें केलें असेल, तर जरूर तर त्यांत इष्ट फरक करण्याच्या दृष्टीनें हा अधिकार प्रमुखाला आहे. सनदशीर प्रमुख असला, तरी एवढा अधिकार त्याला असणें इष्टच आहे.

**अधिवेशनाच्या सुरुवातीचें खास भाषण**

**१५५. ( १ ) कायदेमंडळाच्या प्रत्येक अधिवेशनाच्या सुरुवातीस असेंब्लींत व जेथें दोन सभागृहें असतील तेथें त्यांच्या संयुक्त बैठकींत प्रमुख भाषण करील व अधिवेशन कोणत्या कामासाठीं बोलाविलें आहे याचा निर्देश त्याच्या भाषणांत असेल.**

**सभागृहाच्या कामाकाजासंबंधींच्या नियमांत प्रमुखाच्या भाषणांत आलेल्या गोष्टींची चर्चा सभागृहांत होण्यासाठीं वेळ व अग्रक्रम देण्यासाठीं योजना केली जाईल.**

कायदेमंडळाच्या प्रत्येक अधिवेशनाच्या सुरुवातीस प्रमुख भाषण करील व त्यांत त्या अधिवेशनांत काय कामें व्हावीं याचा उल्लेख असेल. प्रमुख हा सनदशीर प्रमुख असल्यामुळें त्याचें भाषण म्हणजे मंत्रिमंडळानें तें तयार केलेलें असणार. या भाषणांत मंत्रिमंडळाचा कार्यक्रम व धोरण यांबाबत उल्लेख असणार. म्हणून त्या भाषणावर सामान्य चर्चा व्हावी व तिला प्रथमस्थान अगर अग्रक्रम मिळावा हें साहजिक आहे. नियमांत त्याप्रमाणें व्यवस्था असेल. इंग्लंडमध्यें राजाचें भाषण ( address ) मंत्रिमंडळ तयार करतें व राजा तें वाचतो. त्यांत मंत्रिमंडळाचा अधिवेशनांतील कार्यक्रम व सामान्यत: प्रमुख प्रश्नांबाबत उल्लेख असतो व या भाषणावर सभागृहांत चर्चा होते. ही चर्चा नेहमीं उपयुक्त ठरते. मंत्रिमंडळाला आपलें धोरण सभागृहापुढें असल्यामुळें त्याचें समर्थन करतां येतें. लोकांना पण त्यापासून माहिती मिळते. मंत्रिमंडळाचे उद्देश स्पष्ट होतात. या कलमांतील व्यवस्था या सर्व दृष्टीनें इष्ट आहे.

मंत्र्यांचे व प्रमुख कायदे-सल्लागार यांचे अधिकार सभागृहाबाबत

१५६. प्रत्येक मंत्र्याला आणि तसेंच प्रमुख कायदे-सल्लागाराला असेंब्लींत व जेथे दोन सभागृहें असतील तेथें दोन्ही सभागृहांत भाग घेण्याचा व भाषणें करण्याचा अधिकार आहे; तसेंच सभागृहांच्या संयुक्त बैठकींत पण भाग घेण्याचा त्याला अधिकार आहे. तसेंच कायदेमंडळाच्या कोणत्याही समितींत तो सभासद नेमला गेला असल्यास तिच्या कामांत पण भाग घेण्याचा त्याला अधिकार आहे; मात्र या कलमानें मत देण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं.

मंत्री व प्रमुख कायदे-सल्लागार यांना सभागृहांच्या कामांत भाग घेण्याचा अधिकार आहे. ज्या सभागृहाचें मंत्र्याला सभासदत्व नसेल, तेथें फक्त भाषण करतां येईल; मत देतां येणार नाहीं. दोन सभागृहांचें सभासदत्व एकाच वेळीं असणें कायदेशीर नाहीं. पण मंत्र्याला सरकारी धोरण समजावून सांगण्यासाठीं दोन्हीकडे हजर राहून भाग घेण्याचा अधिकार असणें जरूर आहे. समितीबाबतही हाच नियम लागू आहे. ज्या सभागृहाची समिति असेल व जर त्या सभागृहाचा मंत्री हा सभासद असेल, तर त्या समितींत तो भाग घेईल व मतही देऊं शकेल. समिति ज्या सभागृहाची आहे, त्या सभागृहाचा तो सभासद नसेल तर त्याला ह्या समितीच्या चर्चेंत भाग घेतां येईल, पण मत देतां येणार नाहीं.

## घटक कायदेमंडळाचे अधिकारी

सभाप्रमुख व सभाउपप्रमुख

१५७ शक्य तितक्या लवकर असेंब्ली सभाप्रमुख व सभाउपप्रमुख या जागांसाठीं दोन सभासदांची निवड करील व जेव्हां जागा खाली पडेल, त्या त्या वेळीं त्या त्या जागेसाठीं निवड केली जाईल.

सभाप्रमुखाचा राजीनामा वगैरे

१५८. सभाप्रमुख अगर सभाउपप्रमुख असणारा सभासद

(अ) त्याचें असेंब्लीचें सभासदत्व संपल्यास ती जागा खाली करील;

(ब) स्वदस्तुरीनें लेखी पत्र सभाप्रमुख असल्यास सभाउपप्रमुखास, सभाउपप्रमुख असल्यास सभाप्रमुखास धाडून राजीनामा देऊं शकेल;

(क) हजर असलेल्या सभासदांनीं त्याच्याविरुद्ध बहुमतानें अविश्वासाचा ठराव पास केल्यास त्याला कामावरून दूर केलें जाईल. मात्र (क) यांत उल्लेखिलेला ठराव मांडण्याची सूचना निदान १४ दिवस आधीं दिली पाहिजे.

या कलमांत सभाप्रमुख (Speaker) व सभाउपप्रमुख यांना एकंदर असलेल्या सभासदांनीं नुसत्या बहुमतानें अविश्वासाचा ठराव पास केल्यास जागेवरून दूर व्हावें लागेल. या व्यवस्थेंत निदान $\frac{2}{3}$ बहुमतानें ठराव पास व्हावा, असें केल्यास अधिक चांगलें होईल. हे अधिकारी जरी बहुश: बहुमतवाल्या पक्षाचे असले, तरी निवडीनंतर ते पक्षातीत राहावेत, अशी अपेक्षा असते व तशी परंपरा सर्वत्र आहे. त्यांना केवळ नुसत्या एकंदर सभासदांच्या बहुमतानें दूर करण्याची व्यवस्था ठेवल्यास जरूर तो नि:पक्षपातीपणा ते दाखवूं शकतील असें वाटत नाहीं. सभाप्रमुखाचे अधिकार जरी कामकाजाबद्दल (Procedure) असले, तरी कायदेमंडळांतील जीवनांत कामकाजपद्धति ही अत्यंत महत्त्वाची मानली जाते. (Procedure is nine points in Parliament.)

सभाप्रमुखाच्या गैरहजेरींत कोणी काम करावें ?

१५९. (१) सभाप्रमुखाची जागा खाली झाल्यास सभाउपप्रमुखानें त्या जागीं काम करावें, व सभाउपप्रमुख पण नसेल तर असेंब्लींतील एकाद्या सभासदाची त्या कामासाठीं प्रमुख नेमणूक करील.

(२) सभाप्रमुखाच्या गैरहजेरींत सभाउपप्रमुख असेंब्लींत काम पाहील व तोही गैरहजर असेल तर नियमाप्रमाणें ज्यास अधिकार असेल, तो पाहील व तो गैरहजर असेल तर असेंब्ली ज्याला नेमील तो पाहील.

सामान्यतः सभाप्रमुख व सभाउपप्रमुख हे दोघेही गैरहजर असतील तर नियमाप्रमाणें कांहीं सभासदांचें पॅनेल सभाप्रमुख सभेचें नियंत्रण करण्यासाठीं नेमून ठेवतो. ( Panel of Chairmen ) त्यांतून एक अध्यक्षस्थानीं बसतो. तेही सर्व गैरहजर असले तर मग सभागृह तात्पुरती एकाद्या सभासदाची नेमणूक करतें व तो सभासद अध्यक्षस्थान घेतो. त्या स्थानाचा अधिकारी इसम आला कीं, तो तें स्थान सोडतो. तसेंच या स्थानाचा वरचा अधिकारी सभागृहांत आला म्हणजे खालच्यानें स्थान सोडावयाचें असतें. सभाप्रमुख हजर असतांना सभाउपप्रमुखांस अध्यक्षाच्या खुर्चीवर अर्थात्च बसतां येणार नाहीं.

**कौन्सिलचा सभापति व उप-सभापति**

१६०. जेथें कौन्सिल आहे, तेथें कौन्सिल शक्य तितक्या लवकर सभापति व उप-सभापति या जागेकरतां दोन सभासदांची निवड करील; तसेंच ती ती जागा खाली झाल्यास त्या त्या वेळीं कौन्सिल पुन्हां निवड करील.

१६१. सभापति व उप-सभापति या जागेवर काम करणारा सभासद

( अ ) त्याचें कौन्सिलचें सभासदत्व संपल्यास ती ती जागा खालीं करील;

( ब ) सभापति व उप-सभापति एकमेकांस स्वदस्तुरीनें लेखी पत्र देऊन आपआपल्या जागेचा राजीनामा देऊं शकतील;

( क ) त्याला नालायक म्हणून अगर त्याच्याविरुद्ध कौन्सिलच्या एकंदर सभासदांच्या बहुमतानें अविश्वासाचा ठराव पास करून त्याला जागेवरून दूर करतां येईल. मात्र क यांत उल्लेखिलेला ठराव आणण्याची सूचना निदान १४ दिवस आधीं दिलेली असली पाहिजे.

या कलमांतील विशेष गोष्ट म्हणजे सभापति अगर उप-सभापति याच्याविरुद्ध अविश्वासाचा ठराव एकंदर सभासदांच्या बहुमतानें पास झाला पाहिजे; नुसत्या हजर असणाऱ्या सभासदांच्या बहुमतानें नव्हे.

१६२. (१) जेव्हां सभापतीची जागा खाली असेल, त्या वेळीं उप-सभापति त्या जागीं काम करील व जर उप-सभापतीचीही जागा खाली असेल, तर तें काम करण्यास कौन्सिलच्या दुसऱ्या एकाद्या सभासदाची प्रमुख नेमणूक करील.

उप-सभापति अगर अन्य, सभापतीचें काम करूं शकेल

(२) सभापतीच्या गैरहजेरींत सभागृहांत उप-सभापति काम पाहील. त्याच्या गैरहजेरींत नियमाप्रमाणें ज्याला अधिकार आहे, तो पाहील; आणि तोही गैरहजर असेल, तर कौन्सिल ज्याला नेमील तो अध्यक्षस्थान स्वीकारून काम पाहील.

१६३. सभाप्रमुख व सभाउपप्रमुख, त्याचप्रमाणें सभापति व उप-सभापति यांचें वेतन व अन्य प्राप्ति कायदेमंडळ कायदा करून ठरवील व ही गोष्ट होईपर्यंत परिशिष्ट दोनमध्यें सांगितलेली व्यवस्था अमलांत राहील.

सभाप्रमुख व सभापतीचा पगार वगैरे

## कामकाज-पद्धति

१६४. (१) या घटनेंत जें सांगितलें असेल, त्याचें पालन करून, सभागृहांत अगर सभागृहांच्या संयुक्त बैठकींत उपस्थित झालेले सर्व प्रश्न हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांच्या बहुमतानें निर्णित होतील; मात्र सभापति अगर सभाप्रमुख अगर त्याच्या जागीं काम करणारा मतदान करणार नाहीं.

मतदान, गणसंख्या वगैरे

सभाप्रमुख अगर सभापति अगर त्याच्या जागीं काम करणारा हा प्रथम मतदान करणार नाहीं, मात्र उभयपक्षीं समान मतें पडल्यास त्यानें निर्णायक (Casting Vote) मत दिलें पाहिजे.

( २ ) कायदेमंडळांतील कोणत्याही सभागृहाचें काम एखाद्या सभासदाची जागा खाली आहे म्हणून गैरकायदा होणार नाहीं; तसेंच ज्याला मत देण्याचा अधिकार नव्हता, अगर हजर राहून भाग घेण्याचा अधिकार नव्हता, असा इसम हजर राहिला, त्यानें भाग घेतला, अगर मत दिलें, असें आढळून आलें, तरी तेवढयानें, झालेलें कामकाज गैरकायदा ठरणार नाहीं.

( ३ ) जेव्हां असेंब्लींत अगर कौन्सिलांत सभेला गणसंख्या हजर नसेल, त्या वेळीं सभाप्रमुख अगर सभापति अगर जो त्या जागीं काम करीत असेल, त्यानें सभा तहकूब केली पाहिजे, अगर सभा गणसंख्या हजर होईपर्यंत थांबविली पाहिजे. गणसंख्या दहा सभासद अगर एकंदर सभागृहाच्या वटसंख्येच्या एक षष्ठमांश यांत जी अधिक ती होय.

जेथें विशिष्ट बहुमतानें निर्णय लागला पाहिजे, असे प्रश्न वगळून सभागृहांतील इतर सर्व प्रश्नांचा निर्णय हजर असलेल्या सभासदांच्या बहुमतानें केला जाईल. सभेचा अध्यक्ष दोन्ही बाजूला समान मतें पडतील, तेव्हांच मत देईल. तें मत त्यानें दिलेंच पाहिजे असा त्यावर निर्बंध आहे. त्यास एरवीं मत देण्याचा अधिकार नाहीं. सभासदाची जागा भरली नाहीं, यासाठीं सभेचें काम थांबणार नाहीं अगर एखाद्यानें अनधिकारानें भाग घेतला म्हणून झालेलें काम गैरकायदा होणार नाहीं.

गणसंख्या ( कोरम ) म्हणजे किमान सभासदांची संख्या, कीं जी हजर असल्याशिवाय कामकाज चालू होणार नाहीं. दहा सभासद अगर वट सभासदांच्या १/६ इतके सभासद यांत जी अधिक संख्या, ती त्या त्या सभागृहाची गणसंख्या असेल. सभागृह ४८ सभासदांचें असेल, तर गणसंख्या १० राहील; सभागृह २०० चें असेल, तर ३४ ही गणसंख्या राहील. कारण ही १/६ संख्या १० पेक्षां अधिक आहे. सभेसाठीं किमान कांहीं सभासद हजर पाहिजेत. या दृष्टीनें ही व्यवस्था असते. गणसंख्या हजर नसेल, तर सभेचा अध्यक्ष सभा थांबवील अगर तहकूब करील.

## सभासदांची नालायकी

१६५. असेंब्ली व कौन्सिलच्या प्रत्येक सभासदानें सभागृहांत स्थानापन्न होण्यापूर्वी तिसऱ्या परिशिष्टांत नमूद केलेली प्रतिज्ञा प्रमुखासमोर अगर जो इसम त्यासाठीं नेमला असेल, त्याच्यापुढें घेऊन तिला मान्यता दर्शविली पाहिजे.

**सभासदानें घ्यावयाची प्रतिज्ञा**

प्रतिज्ञा घेतल्याशिवाय सभासदत्व पूर्ण अगर प्रभावी होत नाहीं. प्रतिज्ञा घेतल्याशिवाय सभेंत भाग घेतां येणार नाहीं. ही प्रतिज्ञा, घटनेला व कायद्याला निष्ठावंत राहून काम करीन अशा अर्थाची आहे. हें नैतिक बंधन सर्व घटनांतून आहे.

१६६. (१) कोणाही इसमास दोन्ही सभागृहांचे सभासद होतां येणार नाहीं व दोन्हीकडे तो निवडून आल्यास कोणत्या सभागृहाचें सभासदत्व त्यानें सोडावें, हें कायदेमंडळ कायदा करून ठरवील.

**जागा खाली करणें**

(२) कोणाही इसमास एकाच वेळीं पार्लमेंटचे व घटक-राज्याच्या कायदेमंडळाचे सभासद होतां येणार नाहीं आणि जर कोणी इसम अशा तऱ्हेनें दोन्हीकडे सभासद असेल, तर घटक-राज्याच्या प्रमुखानें केलेल्या नियमांत निर्दिष्ट केलेली ठराविक मुदत संपतांच घटक-राज्यांतील कायदेमंडळांतील त्याची जागा रिकामी झाली असें मानण्यांत येईल; मात्र ह्या मुदतीपूर्वींच जर त्यानें पार्लमेंटचा राजीनामा दिला असेल, तर मात्र तसें मानण्यांत येणार नाहीं.

(३) (अ) जर एखाद्या घटक-राज्याच्या कायदेमंडळाचा सभासद यापुढील कलमांतील पोटकलम (१) यांत सांगितल्याप्रमाणें अपात्र झाला, अगर

(ब) त्यानें आपला राजीनामा सभाप्रमुख अगर सभापति यांजकडे—जसें असेल तसें—लेखी दिला, तर

त्याची जागा खाली झाली असें होईल.

(४) जर एखादा सभासद कायदेमंडळाच्या सर्व सभांना ६० दिवसपर्यंत बिनपरवानगीनें गैरहजर असेल, तर सभागृहाला त्याची जागा खाली झाली असें जाहीर करतां येईल.

मात्र वरील मुदत मोजतांना जर सभागृह लागोपाठ चार दिवसांपेक्षां अधिक काळ तहकूब अगर स्थगित झालें असेल, तर तो काळ जमेंत धरला जाणार नाहीं.

कोणाही इसमास एकापेक्षां अधिक सभागृहाचे सभासद एकाच वेळीं राहतां येणार नाहीं. या बाबतींत घटक-कायदेमंडळ कायदा करून कोणती जागा खाली झाली हें ठरवील. तसेंच पार्लमेंट म्हणजे मध्यवर्ती कायदेमंडळ व प्रांतांतील कायदेमंडळ या दोन्हींतही एकदम सभासद राहतां येणार नाहीं. दोन्हींचा सभासद झालेल्यानें पार्लमेंटचा राजीनामा ठराविक मुदतींत न दिल्यास प्रांतिक कायदेमंडळाचें त्याचें सभासदत्व जाईल. ही मुदत प्रमुख नियम करून ठरवून देईल. कलम १९० (१) प्रमाणें सभासदाला अपात्रता आली अगर त्यानें राजीनामा दिला अगर सभागृहाची परवानगी न घेतां सभासद गैरहजर राहिल्यास त्याचें सभासदत्व जाईल. मात्र ठराविक मुदतीपर्यंत गैरहजर राहिला, तरी सभागृहानें सभासदत्व रद्द केलें तरच जाईल; आपोआप जाणार नाहीं.

**सभासद व अपात्रता**

१९१. (१) कोणाही इसमास असेंब्ली अगर कौन्सिलचे सभासद पुढील परिस्थितींत होतां येणार नाहीं अगर सभासद म्हणून राहतां येणार नाहीं, जर–

(अ) तो हिंदुस्थान सरकार अगर परिशिष्ट एक भाग १ यांत नमूद केलेलीं घटक-राज्यें यांच्या अधिकारांतील ज्या जागा कायदेमंडळानें अपात्रता आणीत नाहींत असें ठरविलें असेल अशा वगळून इतर कोणत्याही प्राप्तीच्या जागेवर असेल;

(ब) तो वेडा असून तसा त्याला योग्य कोर्टानें ठरविला असेल;

(क) तो नादार असून कोर्टानें त्याला मुक्त केला नसेल;

(ड) तो परराज्याला निष्ठेनें बांधला असेल अगर परराज्याचा प्रजाजन अगर नागरिक असेल, अगर परराज्याचा प्रजाजन म्हणून नागरिकत्वाचे हक्क अगर सवलती त्यास मिळाल्या असतील;

(ई) तो घटक-राज्याच्या कायदेमंडळानें पास केलेल्या अन्य कोणत्याही कायद्यानें अपात्र ठरला असेल.

(२) या कलमासाठीं कोणीही इसम हिंदुस्थान सरकार अगर परिशिष्ट एक मध्यें नमूद केलेलीं राज्यें यांच्या अधिकारांतील प्राप्तीच्या जागेवर आहे असें मानलें जाणार नाहीं, जर केवळ तो

(अ) हिंदुस्थान सरकारचा अगर परिशिष्ट एक भाग १ मधील घटक-राज्याचा मंत्री आहे, अगर

(ब) परिशिष्ट एक भाग ३ मधील संस्थानांत मंत्री आहे, मात्र तो जबाबदार मंत्री आहे आणि त्या कायदेमंडळांत जर दोन सभागृहें असतील, तर कनिष्ठ सभागृहाला जबाबदार असून या सभागृहांतील $\frac{3}{4}$ सभासद लोकनियुक्त आहेत.

या कलमांत सभासदाला अपात्रता केव्हां येते हें सांगितलें आहे. प्राप्तीची जागा, वेडेपण, नादारी, परराज्याशीं निष्ठा अगर परराज्याचा प्रजाजन अगर नागरिक असणें अगर त्या तऱ्हेचे त्याला हक्क असणें या सर्व गोष्टी अपात्रता आणणाऱ्या आहेत. केवळ मंत्री आहे या कारणासाठीं तो इसम प्राप्तीच्या जागेवर आहे असें होणार नाहीं. प्राप्तीच्या जागेवर काम करीत असल्याची परिस्थिति असेल, तर मुळांत त्यास निवडणुकीस उभें राहतां येणार नाहीं अगर त्याची सभासद म्हणून नेमणूकही होणार नाहीं. निवडणुकीनंतर कलमांत वर्णन केलेली अपात्रता आली, तर सभासद म्हणून राहतां येणार नाहीं.

**प्रतिज्ञा न घेतां सभेंत भाग घेतल्यास शिक्षा; तसेंच अपात्रता असतां भाग घेतल्यास शिक्षा**

१६८. जर एखादा इसम कलम १६५ प्रमाणें प्रतिज्ञा न घेतां असेंब्लींत अगर कौन्सिलांत सभासद म्हणून बसेल अगर मत देईल अगर आपण अपात्र आहोंत अगर अपात्र ठरलों आहोंत, अगर एखाद्या कायद्यानें भाग घेण्यास मनाई केली आहे हें ठाऊक असून जर सभागृहांच्या कामकाजांत सभासद म्हणून भाग घेईल, तर अशा प्रत्येक दिवसाबद्दल रु. ५०० दंडास तो पात्र होईल व हा दंड सरकारी कर्ज समजून त्याच्याकडून वसूल केला जाईल.

प्रतिज्ञा घेतल्याशिवाय सभासदत्व विधियुक्त नाहीं म्हणून त्यापूर्वी भाग घेतल्यास दंडास तो इसम पात्र आहे. तसेंच, आपण कायद्याप्रमाणें सभासद होण्यास पात्र नाहीं, अगर अपात्र ठरतों आहोंत हें माहित असून एखाद्या इसमानें सभेंत भाग घेणें म्हणजे सभेची फसवणूक करण्यासारखेंच आहे व त्याला त्याबद्दल शिक्षा होणें युक्तच आहे. या कलमांत त्याबद्दल पांचशें रुपयांच्या दंडाची शिक्षा सांगितली आहे; हा दंड सरकारी कर्ज म्हणून वसूल केला जाईल. सरकारी कर्ज असलें म्हणजे ऋणकोला तें प्रथम दिलें पाहिजे; त्याचा बोजा त्याच्या मिळकतीवर पहिला असतो.

## सभासदांचे हक्क व सवलती

**सभासदांचे हक्क व सवलती**

१६९. (१) कामकाजी नियम व स्थायी आज्ञा यांचें पालन करून, प्रत्येक कायदेमंडळांत भाषणस्वातंत्र्य आहे.

(२) सभागृहांत केलेल्या भाषणाबद्दल अगर दिलेल्या मताबद्दल, अगर सभागृहाच्या समितींत केलेल्या भाषणाबद्दल अगर दिलेल्या मताबद्दल कुठल्याही कोर्टांत सभासदाला जाब विचारला जाणार नाहीं; तसेंच सभागृहांतील कामासंबंधीं जे अधिकृत वृत्तांत सभागृहाच्या हुकुमानें प्रसिद्ध होतील, त्यांतील मजकुराबद्दल सभासदाला कोणी जाब विचारणार नाहीं.

(३) अन्य बाबतींत सभासदांचे हक्क व त्यांना मिळणाऱ्या सवलती याबाबत त्या त्या कायदेमंडळानें कायदा करून ते ठरवावे व हें होईपर्यंत घटना अंमलांत येण्याच्या आरंभीं इंग्लंडमधील कॉमन्स सभेच्या सभासदांइतके हक्क वा सवलती त्यांना असतील.

(४) (१), (२), (३) यांतील व्यवस्था, जे सभासद नसतांही घटनेप्रमाणें सभागृहांत हजर राहून बोलूं शकतात त्यांच्या बाबतींत पण लागू आहे.

कामकाजी नियम व स्थायी आज्ञा प्रत्येक सभागृहाला असाव्या लागतात. त्यांत भाषणाच्या मर्यादा दिलेल्या असतात. भाषण बदनामीकारक, शिवराळ, अपमान करणारें, राज्यद्रोही, व्यक्तिविषयक टीका करणारें नसावें इत्यादि मर्यादा त्यावर नियमानें घातलेल्या असतात. त्याचप्रमाणें कालमर्यादा पण असते. या मर्यादा न सोडतां सभासदाला पूर्ण भाषणस्वातंत्र्य आहे. तो जे बोलेल, त्याबद्दल कोर्टात कांहीं कारवाई त्याविरुद्ध होणार नाहीं. असें भाषणस्वातंत्र्य नसेल, तर योग्य मत-प्रदर्शन होणार नाहीं; स्पष्ट व निःपक्षपाती अभिप्राय प्रकट होणार नाहीं. सभासदानें मत दिल्याबद्दल कोर्ट कांहीं करूं शकणार नाहीं. मत देणें हें कर्तव्य आहे म्हणून तें गुन्हा होऊं शकत नाहीं. अगर अन्य तऱ्हेनें कोर्टापुढें त्याबद्दल जाब मागितला जाणार नाहीं. तसेंच अधिकृत रिपोर्टात कांहींही आलें तर त्याबद्दल देखील सभासद जबाबदार नाहीं. भाषणें जनतेला समजण्यासाठीं त्यांचें प्रकाशन व मुद्रण होणें अवश्य आहे. तें जर अधिकृत असेल, तर त्याबद्दलची जबाबदारी सभासदावर नाहीं. सभासद जें बोलेल त्याबद्दल जर तें नियमाविरुद्ध असेल, तर अध्यक्ष उपाययोजना करील. कोर्टाला तो अधिकार नाहीं. जे सभासद नाहींत, पण सभेच्या कामकाजांत भाग घेण्याचा ज्यांना अधिकार आहे,—उदाहरणार्थ, प्रमुख-कायदे-सल्लागार-त्यांनाहीं सभासदांसारखेच हक्क आहेत व तेंही योग्य आहे. त्यांनाही भाषण करून स्वतःचा अभिप्राय निर्भयपणें देतां आला पाहिजे. खटल्याची भीति असेल, तर हें होणार नाहीं.

**सभासदांचें वेतन**

१७०. सभासदांचें वेतन व अन्य भत्ता हीं कायदेमंडळ कायदा करून ठरवील; व तोंपर्यंत ही घटना अमलांत येण्यापूर्वीं जी व्यवस्था या बाबतींत होती, ती अमलांत राहील.

## कायदेमंडळांतील कामकाज-पद्धत

बिल दाखल करणें व पास करणें याबाबत व्यवस्था

१७१. (१) कलम १७३ व १८२, जीं पैशासंबंधीं व अर्थव्यवस्थेसंबंधींचीं आहेत, त्यांतील व्यवस्थेचें पालन करून, कोणतेंही बिल असेंब्ली अगर कौन्सिल यामध्यें आणतां येईल.

(२) कलम १७२ व १७३ यांतील व्यवस्थेचें पालन करून, जेथें दोन सभागृहें आहेत तेथें कोणतेंही बिल दोन्ही सभागृहांत उपसूचनेशिवाय अगर दोन्ही सभागृहांनीं मान्य केलेल्या उपसूचनांसह मान्य झाल्याशिवाय पास झालें असें मानलें जाणार नाहीं.

(३) चालू बिल एका अगर दोन्ही सभागृहांचीं अधिवेशनें स्थगित झालीं, म्हणून बाद होणार नाहीं.

(४) कौन्सिलपुढें चालू असलेलें बिल असेंब्ली बरखास्त झाली म्हणून बाद होणार नाहीं.

(५) असेंब्लीपुढें चालू असलेलें बिल अगर असेंब्लीनें पास केलेलें पण कौन्सिलपुढें चालू असलेलें बिल असेंब्ली बरखास्त झाल्यास बाद होईल.

पैशासंबंधींचीं व अर्थव्यवस्थेसंबंधींचीं बिलें असेंब्लींतच प्रथम दाखल झालीं पाहिजेत. हीं बिलें सोडून बाकीचीं कोणत्याही सभागृहांत प्रथम मांडतां येतात. जेथें दोन सभागृहें आहेत, तेथें दोन्ही सभागृहांनीं उपसूचनेशिवाय अगर उपसूचना मान्य करून, मान्यता दिल्याशिवाय बिल पास झालें असें मानलें जाणार नाहीं. कौन्सिल बरखास्त होत नसल्यामुळें कोणतीं बिलें बाद होतात व कोणतीं होत नाहींत हें (४) व (५) यांत नमूद केलें आहे. सभागृहाची बैठक स्थगित झाली म्हणून चालू बिलें बाद होत नाहींत. चालू बिलें म्हणजे जीं दाखल केलीं आहेत, पण ज्यावर विचार झाला नाहीं तीं. प्रत्येक बिल प्रथम मांडलें जातें, मग त्यावर सामान्यतः विचार होतो; नंतर कलमवार विचार होतो. नंतर दुरुस्त बिल पास केलें जातें. कित्येक बिलें विचारासाठीं चिकित्सा समिति (Select Committee) कडे

सोंपविलीं जातात. तिचा रिपोर्ट आला म्हणजे त्यावर विचार होऊन कलमवार चर्चा होते. पुष्कळ बिलें लोकमताचा अंदाज घेण्यासाठीं फिरविण्यांत येतात. हें लोकमत संस्था व व्यक्ति यांजकडून मिळतें व तें विचारांत घेऊन पुढें चर्चा होते. बिल पास झालें व त्याला प्रमुखाची संमति मिळाली, म्हणजे तें कायदा या संज्ञेला पात्र होतें. बिल बाद होणें म्हणजे त्याबाबत पुढें कांहीं होत नाहीं. पुन्हा तें मांडलें पाहिजे; त्याशिवाय तें विचारांत घेतलें जात नाहीं.

संयुक्त बैठका

१७२. (१) जेथें दोन सभागृहें असतील व असेंब्लींत बिल पास होऊन कौन्सिलकडे तें धाडलें असेल व जर सहा महिन्यांत दोन्ही सभागृहांनीं तें पास केलें नाहीं व दरम्यान जर असेंब्ली बरखास्त झाली नाहीं, तर प्रमुख (Governor) दोन्ही सभागृहांची संयुक्त बैठक बोलावील व तींत त्या बिलावर चर्चा होऊन मतदान होईल. मात्र हें कलम पैशासंबंधींच्या बिलाला लागू नाहीं.

(२) वरील सहा महिन्यांची मुदत मोजतांना ४ दिवसांपेक्षां अधिक काळपर्यंत दोन्ही सभागृहांच्या बैठकी तहकूब अगर स्थगित झाल्या असतील, तर तो काल विचारांत घेतला जाणार नाहीं.

(३) या कलमाप्रमाणें भरलेल्या संयुक्त बैठकींत ज्या कांहीं उपसूचना मान्य होतील त्यांसह तें बिल हजर असलेल्या सभासदांच्या बहुमतानें पास झाल्यास तें घटनेप्रमाणें दोन्ही सभागृहांनीं पास केलें असें मानलें जाईल.

मात्र

(अ) जर तें बिल कौन्सिलनें उपसूचनांसह पास केलें नसेल आणि असेंब्लीकडे परत धाडलें असेल, तर विलंबामुळें जेवढ्या उपसूचना अवश्य झाल्या असतील, त्यांव्यतिरिक्त कोणतीही उपसूचना संयुक्त बैठकींत मांडतां येणार नाहीं.

(ब) जर तें बिल कौन्सिलनें पास करून असेंब्लीकडे धाडलें असेल तर विलंबामुळें अवश्य झालेल्या उपसूचना, तसेंच ज्या बाबतींत उभय सभागृहांत मतभेद झाला असेल, त्या बाबीसंबंधांत उपसूचना संयुक्त बैठकींत मांडतां येतील; कोणत्या उपसूचना प्रस्तुत आहेत व मांडतां येतील याबाबतचा निर्णय सभेचा अध्यक्ष देईल व तो अखेरचा असेल.

या कलमांत कायदेमंडळांच्या संयुक्त बैठकीसंबंधीं विचार आहे. सहा महिने जर कौन्सिल एकादें बिल पास न करतां स्वस्थ बसेल, तर प्रमुख संयुक्त बैठक बोलावील, तींत बहुमतानें निर्णय होईल, व तो निर्णय घटनेप्रमाणें असल्याचें मानलें जाईल, म्हणजे दोन्ही सभागृहांनीं तें बिल पास केलें असा त्याचा अर्थ होईल. कारण बिल पास होण्यास बिलें दोन्ही सभागृहांनीं पास करावीं लागतात. संयुक्त बैठकींत कोणत्या उपसूचना मांडतां येतील हें (अ) व (ब) मध्यें आहे. बिल कौन्सिलनें नापास करून धाडलें व त्यांत कांहीं उपसूचना नसतील तर फक्त विलंबामुळें जरूर झालेल्या उपसूचना मांडतां येतील. उदाहरणार्थ, बिल अगर त्यांतील कलम केव्हां अमलांत यावें वगैरे. तसेंच जेथें उपसूचनांसह बिल पास करून धाडलें असेल, तेथें ज्यात मतभेद असेल त्याबाबत देखील उपसूचना आणतां येतील. तात्पर्य, संयुक्त बैठकींत चर्चेचें क्षेत्र सर्व बिल न होतां अवश्य तेवढेंच ठेऊन तें मर्यादित केलें आहे.

१७३. (१) पैशासंबंधींचें बिल कौन्सिलमध्यें दाखल केलें जाणार नाहीं.

**पैशासंबंधीं बिलाबाबत**

(२) पैशासंबंधींचें बिल असेंब्लींत पास झाल्यानंतर कौन्सिलकडे धाडण्यांत येईल; कौन्सिलनें बिल मिळाल्यापासून तीस दिवसांच्या आंत ज्या कांहीं शिफारसी करावयाच्या असतील, त्या करून सदरहू बिल असेंब्लीकडे परत पाठवावयाचें आहे; असेंब्लीला वाटलें तर त्या अगर त्यांपैकीं कांहीं शिफारसी ती स्वीकारील अगर कोणतीही स्वीकारणार नाहीं.

( ३ ) जर कांहीं शिफारसी असेंब्लीनें स्वीकारल्या, तर त्यासुद्धां सदहू बिल दोन्ही सभागृहांनीं पास केलें असें मानलें जाईल.

( ४ ) जर असेंब्लीनें कांहींच शिफारसी स्वीकारल्या नाहींत, तरी सदहू बिल असेंब्लीनें सदर शिफारसीखेरीज पास केलें असें मानलें जाईल.

जर कौन्सिलनें तीस दिवसांत आपल्या शिफारसींसह सदहू बिल असेंब्लीकडे परत धाडलें नाहीं, तर सदहू बिल दोन्ही सभागृहांनीं पास केलें असें मानण्यांत येईल.

पैशासंबंधीं बिलाबाबत सामान्य विवरण पूर्वी मध्यवर्ती कायदेमंडळाचा विचार करतांना आलें आहे. त्याला अनुसरूनच हें कलम आहे. असलें बिल असेंब्लींतच दाखल झालें पाहिजे. कौन्सिलला फक्त शिफारसी करतां येतील. असेंब्ली ही लोकांची प्रत्यक्ष प्रातिनिधिक संस्था आहे; ती वाटल्यास शिफारसी स्वीकारील अगर अमान्य करील. असेंब्लीला पैशासंबंधींच्या बिलाबाबत पूर्ण अधिकार आहे. जो कर देईल तो कारभार चालवील, हें तत्त्व यांत आहे. मुदतींत शिफारसी न आल्या तर, ज्या स्वरूपांत असेंब्लीनें बिल पास केलें, त्या स्वरूपांत तें दोन्ही सभागृहांनीं पास केलें असें मानण्यांत येईल. फार विलंब कौन्सिलला करूं देणें इष्ट नाहीं.

**पैशासंबंधीं बिलाची व्याख्या**

१७४. ( १ ) या प्रकरणापुरतें पैशासंबंधीं बिल म्हणजे ज्यांत खालील बाबीबद्दल पृथक् अगर सर्वशः संबंध येत असेल तें:—

( अ ) कर बसविणें, रद्द करणें, माफ करणें, त्यांत बदल करणें अगर त्याचें नियमन करणें;

( ब ) कर्ज काढण्याबाबत नियमन, अगर पैशाबाबत राज्यानें ग्वाही देणें; अगर पैशाची जबाबदारी ज्या कायद्यानुसार घेतली असेल, अगर घ्यावयाची असेल, त्या कायद्यांत दुरुस्ती करणें;

( क ) पैशाची तरतूद;

(ड) सरकारी उत्पन्नाची विल्हेवाट;

(ई) खर्चाचा बोजा उत्पन्नावर राहील हें जाहीर करणें, अगर असल्या खर्चांत वाढ करणें;

(फ) उत्पन्न जमा करणें, त्याची व्यवस्था अगर विल्हेवाट लावणें, त्याच्या हिशोबाची तपासणी करणें;

(ग) अ ते फ पर्यंत ज्या बाबी नमूद केल्या आहेत, त्यांना आनुषंगिक असलेल्या बाबी.

(२) एखादें बिल, केवळ त्यांत दंड अगर अन्य आर्थिक शिक्षा देण्याची व्यवस्था आहे म्हणून, तसेंच त्यांत परवाना-फीची व्यवस्था आहे अगर सोयीबद्दल मोबदल्याची व्यवस्था आहे म्हणून, तसेंच एखाद्या स्थानिक स्वराज्य संस्थेनें अगर शासनानें कर बसविला अगर रद्द केला अगर माफ केला अगर त्यांत नियमन केलें म्हणून, तें बिल पैशासंबंधीं बिल होणार नाहीं.

(३) एखादें बिल पैशासंबंधीं आहे, कीं नाहीं याबाबत प्रश्न उपस्थित झाल्यास त्याबाबत असेंब्लीचा सभाप्रमुख निर्णय देईल व तो अखेरचा असेल.

(४) जेव्हां पैशासंबंधींचें बिल कौन्सिलकडे धाडावयाचें असेल, अगर मंजुरीसाठीं प्रमुखाकडे धाडावयाचें असेल, त्या वेळीं त्यावर सभाप्रमुख तें पैशासंबंधींचें बिल आहे असा शेरा मारील व नंतर तें धाडण्यांत येईल.

या कलमांत पैशासंबंधींचें बिल म्हणजे काय हें सांगितलें आहे. कराबाबत, मग तो कमी करणें असो, बसविणें असो, अगर बदल करणें असो, ज्यांत उल्लेख येईल तें पैशासंबंधीं बिल होय. कर्ज काढणें, त्याची फेड करणें, त्याबद्दल ग्वाही देणें. उत्पन्न, पैशाचा पुरवठा, त्याची विल्हेवाट, उत्पन्नावरील बोजा असणारा खर्च कोणता हें जाहीर करणें, उत्पन्नाची जमा, त्याचा हिशोब याबाबतचें बिल पैशासंबंधीं बिल

होय. केवळ दंड अगर आर्थिक शिक्षा अगर परवाना फी, अगर सोयीबद्दल मोबदला अगर स्थानिक संस्थांनीं बसविलेले कर यांबाबत उल्लेख आला, तर तेवढ्यानें तें बिल या व्याख्येंत पडणार नाहीं. कोणतें बिल अशा स्वरूपाचें आहे, याचा निर्णय सभाप्रमुख देईल. असल्या प्रत्येक बिलावर त्याचा शेरा असेल. असल्या बिलासंबंधीं अधिक विवरण पूर्वी आलेंच आहे.

बिलांना मान्यता

१७५. असेंब्लीनें बिल पास केल्यावर अगर जेथें दोन सभागृहें असतील तेथें दोन्ही सभागृहांनीं बिल पास केल्यानंतर तें प्रमुखाकडे धाडण्यांत येईल; प्रमुख त्याला मान्यता दिल्याचें जाहीर करील, अगर मान्यता देत नाहीं हें जाहीर करील अगर तें अध्यक्षाच्या विचारासाठीं राखून ठेवलें आहे असें जाहीर करील.

तथापि जेथें एकच सभागृह आहे, तेथें बिल पास झालें व तें प्रमुखाकडे मंजुरीसाठीं आल्यानंतर प्रमुखाला वाटल्यास तें बिल पुन्हा सर्वच सर्व अगर कांहीं विवक्षित कलमें आपल्या शिफारशींच्या उपसूचनांसह पुन्हा विचारासाठीं तो सभागृहाकडे धाडील; आणि याप्रमाणें बिल सभागृहाकडे पुनर्विचारार्थ आलें म्हणजे प्रमुखानें सुचविलेल्या दुरुस्त्यांवर अगर सर्व बिलावर सभागृह विचार करील आणि दुरुस्तीसह अगर त्याशिवाय सभागृहानें बिल पास करून प्रमुखाकडे धाडल्यास प्रमुखाला मान्यता नाकारतां येणार नाहीं.

प्रमुखानें बिलाला मान्यता दिल्याशिवाय बिल कायदा होत नाहीं. प्रमुखाला बिलाचा पुन्हा विचार व्हावा म्हणून सांगण्याचा अधिकार आहे. त्यांत दुरुस्त्या सुचविण्याचा अधिकार आहे. मात्र हा अधिकार जेथें एकच सभागृह आहे, तेथें आहे. सभागृहानें पुन्हा विचार करून जसें बिल पास केलें असेल, तसें प्रमुखाला मान्य केलें पाहिजे. प्रमुख हा कार्यकारी सत्तेचा मुख्य आहे, म्हणून त्याच्यावर अधिक जबाबदारी आहे. त्यानें स्वत: विचार करून दुरुस्त्या सुचविल्या व त्या सभागृहानें न मानल्यास त्याची जबाबदारी संपते. त्याला वाटल्यास तो अजीबात मान्यताच देत नाहीं, असें जाहीर करूं शकेल. अगर अध्यक्षाकडे विचारार्थ तें बिल धाडील. त्यानें मान्यता देत नाहीं असें जाहीर केलें व मंत्रिमंडळ त्या बिलाबाबत

जिद्दखोर झालें, तर पेंचप्रसंग उत्पन्न होईल. मंत्रिमंडळ राजीनामा देईल व तें बहुमतांत असेल तर दुसरें मंत्रिमंडळ चालणार नाहीं. कदाचित् निवडणूक जाहीर केली जाईल आणि त्यानंतर जें मंत्रिमंडळ येईल, त्याचा सल्ला प्रमुखाला ऐकावाच लागेल. पण सामान्यतः बहुमत असलेल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्याविरुद्ध प्रमुख वागणार नाहीं व घटनेच्या मूलभूत व्यवस्थेला तो सोडणार नाहीं.

**विचारार्थ ठेवलेलीं बिलें**

१७६. जेव्हां प्रमुख अध्यक्षाच्या विचारार्थ बिल राखून ठेवील व तें जेव्हां अध्यक्षाकडे येईल त्यावेळीं अध्यक्ष त्याबद्दल आपली मान्यता अगर अमान्यता जाहीर करील.

मात्र जेव्हां बिल पैशासंबंधींचें बिल नसेल, त्या वेळीं अध्यक्ष प्रमुखाला, सभागृहानें अगर सभागृहांनीं त्या बिलाचा सर्वशः अगर विवक्षित कलमांचा विचार व्हावा असा संदेश देऊन तें बिल पुन्हा विचारासाठीं सभागृहांकडे धाडण्यास सांगूं शकेल; आणि याप्रमाणें अध्यक्षाच्या सांगण्यावरून प्रमुखानें बिल सभागृहाकडे विचारार्थ धाडल्यास, त्या वेळेपासून सहा महिन्यांच्या आंत सभागृह त्याचा विचार करील आणि जर तें बिल पुन्हा तसेंच अगर दुरुस्तीसह पास झालें तर तें अध्यक्षाकडे विचारार्थ धाडलेंच पाहिजे.

जेव्हां अध्यक्षाकडे बिल जाईल, त्या वेळीं अध्यक्ष साधारणपणें मध्यवर्ती मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें चालेल. तो बिलाला मान्यता देईल अगर तें अमान्य करील. शिवाय त्याचा पुन्हा विचार व्हावा म्हणून शिफारसही करील; दुरुस्त्या सुचवील. पुन्हा जर तें बिल पास झालें, तर विचारार्थ अध्यक्षाकडे येईल. आणि जर पुन्हा अध्यक्षानें तें अमान्य केलें, तर पेंचप्रसंग निर्माण होईल हें उघड आहे.

## अर्थव्यवस्थेबाबत कामकाजाची पद्धत

**वार्षिक अंदाजपत्रक**

१७७. (१) प्रत्येक महसूल सालासाठीं प्रमुख त्या साला-करितांची अंदाजी जमा व खर्च यांबाबतचें निवेदन सभागृहापुढें ठेवण्याची व्यवस्था करील. हें निवेदन

घटनेंतील या भागांत 'वार्षिक अंदाजपत्रक' म्हणून संबोधण्यांत येईल.

(२) अंदाजी खर्च जो अंदाजपत्रकांत दाखविण्यांत येईल, त्यांत खालील गोष्टी पृथक्‌पणें दाखविल्या पाहिजेतः—

(अ) उत्पन्नावरील बोजा म्हणून घटनेप्रमाणें मानलेला खर्च;

(ब) जो अन्य खर्च उत्पन्नांतून करावयाचा म्हणून ठरविला असेल तो;

आणि उत्पन्नांतून करावयाचा खर्च अन्य खर्चापासून स्वतंत्र दाखविला पाहिजे.

(३) खालील खर्च उत्पन्नावरील बोजा असलेला खर्च मानण्यांत येईलः

(अ) प्रमुखाचें वेतन व भत्ता, तसेंच त्याच्या कचेरीबाबतचा खर्च;

(ब) सभाप्रमुख व सभाउपप्रमुख, तसेंच जेथें कौन्सिल असेल, तेथें सभापति व उप-सभापति यांचें वेतन व भत्ता;

(क) ज्याबद्दल राज्य जबाबदार आहे, असें कर्ज, त्यावरील व्याज, फेडफंडांत टाकावयाची रक्कम, कर्जफेडीसंबंधींची रक्कम त्याचप्रमाणें कर्ज उभारण्यासाठीं, तसेंच त्याच्या परतफेडीसाठीं व त्याची व्यवस्था करण्यासाठीं होणारा खर्च;

(ड) मुख्य न्यायालयाच्या न्यायाधिशांचा पगार व भत्ता;

(ई) कोर्टाचा हुकुमनामा अगर लवादनिवाडा फेडण्यासाठीं लागणारी रक्कम;

(फ) अन्य कोणताही खर्च जो घटनेनें अगर घटक-राज्याच्या कायद्यानें उत्पन्नावर बोजा आहे असें निर्देशिलें असेल तो.

या कलमांत उत्पन्नावरील बोजा असणारा खर्च याचें वर्णन केलें आहे. याबाबत विवेचन पूर्वी आलेंच आहे. उत्पन्नावरील बोजा असलेला खर्च दरसाल सभागृहाच्या मतास टाकणें आवश्यक नसतें. ही आवश्यकता ठेवली तर सर्व राज्य-कारभारासाठीं ज्या खर्चाची आवश्यकता असते तो खर्च या सदरांत येतो. इंग्लंड-मध्यें असल्या खर्चाचा समावेश 'संकलित हिशोब' (Consolidated Accounts) या सदरांत करतात. अंदाजपत्रकावर अनेक दिवस चर्चा चालते, म्हणूनही, किमान खर्च हा बोजा समजून त्याबाबत मतदान होत नाहीं. मंत्रिमंडळाला काढावयाचें असेल, तर अन्य बाबींवर काट आणून टीका करतां येते अगर त्याला कामावरून दूर करतां येतें. खर्चाची रक्कमच मान्य न झाल्यास मंत्रिमंडळ कोलमडेल हें उघड आहे. त्याचबरोबर राज्ययंत्र चाललें पाहिजे, या दृष्टीनें कांहीं खर्च दरसाल सभागृहाच्या मतावर अवलंबून असूं नये.

१७८. (१) जो खर्च उत्पन्नावरील बोजा म्हणून ठरला असेल, त्याबाबत सभागृहांत चर्चा होईल, पण त्यावर मतदान होणार नाहीं.

**अंदाजपत्रकाबाबत कामकाज**

(२) अन्य खर्चाचे अंदाज पृथक् पृथक् मागण्या म्हणून असें-ब्लीपुढें मांडण्यांत येतील. त्या मंजूर करणें, नाकारणें अगर कमी करून मंजूर करणें हे सर्व अधिकार सभागृहाला आहेत.

(३) प्रमुखाच्या शिफारसीशिवाय मागणी सभागृहापुढें मांड-ण्यांत येणार नाहीं.

सर्व अंदाजपत्रकांतील खर्चावर चर्चा होईल, पण ज्या खर्चाचा बोजा उत्पन्नावर आहे असें ठरलें आहे, त्यांबाबत मतदान होणार नाहीं. अन्य खर्च मागण्यांच्या स्वरूपांत सभागृहापुढें येईल. उ. शिक्षणासाठीं अमुक रक्कम; त्यावर सभागृहाला मत देऊन ती नाकारतां येईल अगर तींत काट करतां येईल. प्रत्येक मागणी प्रमुखाच्या शिफारसीसह मांडण्यांत येईल.

१७९. (१) प्रमुख खालील गोष्टी एका परिशिष्टांत स्पष्ट करून आपली सही करून खर्च मान्य झाल्याचा दाखला देईलः—

मान्य झालेल्या खर्चाबाबत

(अ) मागील कलमानुसार असेंब्लीनें मंजूर केलेल्या रकमा;

(ब) उत्पन्नावर बोजा असलेल्या खर्चाच्या रकमा; मात्र त्या मागील वर्षाच्या अंदाजपत्रकांतील तद्विषयक रकमेपेक्षां अधिक असतां कामा नये.

(२) वर (१) यांत सांगितल्याप्रमाणें तयार झालेलें व प्रमुखाच्या सहीनिशीं दाखला असलेलें परिशिष्ट असेंब्लीपुढें ठेवण्यांत येईल; पण त्यावर चर्चा अगर मतदान होणार नाहीं.

(३) पुढील दोन कलमांतील व्यवस्थेचें पालन करून, उत्पन्नांतून भागविला जाणारा कोणताही खर्च जर तो दाखला दिलेल्या परिशिष्टांत नसेल, तर योग्य रीतीनें मंजूर झाला असें मानलें जाणार नाहीं.

सभागृहानें खर्च मंजूर केल्यानंतर उत्पन्नावर बोजा असलेला व मंजूर झालेला खर्च असे एका परिशिष्टांत दाखविण्यांत येतील व तें परिशिष्ट प्रमुखाच्या सहीनिशीं असेंब्लीपुढें ठेवण्यांत येईल. या परिशिष्टांत जो खर्च दाखविला असेल, तोच मान्य झालेला व अधिकृत मानला जाईल. जर तो खर्च या परिशिष्टांत नसेल, तर तो अधिकृत नाहीं व तो करतां येणार नाहीं.

१८० कुठल्याही महसूल सालांत अधिकृत खर्चापेक्षां अधिक खर्च करणें अवश्य झालें, तर प्रमुख अशा अवश्य झालेल्या खर्चाबाबतचे अंदाज सभागृहापुढें पुरवणी अंदाजपत्रक काढून ठेवील व मागील कलमांतील व्यवस्था जी वार्षिक अंदाजपत्रकाबाबत व खर्चाबाबत सांगितली आहे, ती या बाबतींत लागू पडेल.

खर्चाबाबत पुरवणीपत्रक

खर्चाचे अगर उत्पन्नाचे अंदाज नेहमींच बरोबर ठरतात असें नाहीं. म्हणून पुरवणी खर्चाचें पत्रक सभागृहापुढें ठेऊन मंजुरी घेणें जरूर असतें. खर्च अधिक होणार असेल तर तो प्रत्यक्ष करण्यापूर्वी त्याला आगाऊ मंजुरी घेण्याची व्यवस्था या कलमांत आहे. साध्या अंदाजपत्रकाप्रमाणेंच त्यावर चर्चा अगर मतदान होईल.

अधिक झालेला खर्च

१८१. जर कोणत्याही महसूल सालांत कोठल्याही खात्यावर उत्पन्नांतून झालेला खर्च असेंब्लीनें त्या सालासाठीं मंजूर केलेल्या खर्चापेक्षां अधिक झाला असेल व जर ती बाब असेंब्लीच्या मंजुरीची जरूरी आहे अशी असेल, तर अधिक खर्च मागणीरूपानें सभागृहापुढें मंजुरीसाठीं ठेवला पाहिजे; कलम १७८ व १७९ मध्यें मागणीबाबत जी व्यवस्था आहे, तीच या मागणीबाबत लागू होईल.

कलम १८० प्रमाणें अधिक खर्च आवश्यक आहे असें वाटल्यास त्या खर्चाचे पुरवणी अंदाज सभागृहापुढें ठेवावयाचे आहेत. कलम १८१ प्रमाणें खर्च झाला आहे अशी परिस्थिति असून मंजुरीपेक्षां अधिक केलेल्या खर्चाला मागाहून मंजुरी मागावयाची आहे. कितीही काळजीपूर्वक अंदाजपत्रक तयार केलें, तरी सालमजकुरीं कांहीं तरी अकल्पित घटना निर्माण होते व ताबडतोब खर्च करावा लागतो. जर तो खर्च सभागृहानें मंजूर केला पाहिजे अशा स्वरूपाचा असेल, तर त्या अधिक खर्चाला मंजुरी पाहिजे. ही बाब सभागृहापुढें आली म्हणजे तो विषय चर्चेला येतो. प्रतिनिधींना धोरणावर टीका करतां येते. यामुळें सरकारला काळजीपूर्वक खर्च करणें, तसेंच काळजीपूर्वक बजेट तयार करणें भाग पडतें. सभासद जागरूक पाहिजेत व त्यांना ती जागरूकता प्रकट करण्यास संधि पाहिजे.

अर्थविषयक बिलें

१८२. (१) कलम १७४ पोटकलम १ यांत अ ते फ पर्यंत ज्या बाबी नमूद केल्या आहेत, त्यासंबंधांत एखादें बिल अगर दुरुस्ती सुचविणारी उपसूचना प्रमुखाच्या शिफारसीशिवाय दाखल केली जाणार नाहीं अगर मांडली जाणार नाहीं, आणि असें बिल कौन्सिलमध्यें दाखल केलें जाणार नाहीं.

मात्र एखादा कर कमी करावा अगर रद्द करावा, अशा उपसूचनेला शिफारसीची जरुरी नाहीं.

( २ ) एकादें बिल अगर उपसूचना यांत जर दंड अगर आर्थिक शिक्षा अगर परवाना-फी अगर सोयीचा मोबदला, अगर स्थानिक संस्था अगर शासन यांतील कराबाबत तो रद्द करणें अगर कमी करणें अगर त्याचें नियमन करणें, याबाबत व्यवस्था केली असेल, तर एवढ्यानें तें बिल अगर ती उपसूचना वरील ( १ ) यांत नमूद केलेल्या स्वरूपाची आहे असें मानलें जाणार नाहीं.

( ३ ) जें बिल पास झालें म्हणजे व कायदा म्हणून लागू झालें म्हणजे सरकारी उत्पन्नांतून खर्च करणें भाग होईल, असें बिल सभागृहानें त्याचा विचार करावा अशी शिफारस प्रमुखानें केल्याशिवाय सभागृहाला पास करतां येणार नाहीं.

पैशासंबंधीं बिल कौन्सिलमध्यें दाखल करतां येणार नाहीं. तसेंच अशा बिलास प्रमुखाची शिफारस पाहिजे. त्याचप्रमाणें एखादी उपसूचना, कीं जिचा संबंध क. १७४ पो. क. १ यांतील अ ते फ यांतील बाबींशीं आहे, अशी प्रमुखाच्या शिफारसीशिवाय मांडतां येणार नाहीं. राज्याच्या अर्थव्यवस्थेसंबंधींची जबाबदारी मंत्रिमंडळाची आहे. उत्पन्न व खर्च यांचा पूर्ण विचार करून मंत्रिमंडळ बजेट मांडतें व करयोजना ठरवितें. त्या बाबतींत वाटेल ती ढवळाढवळ करणें योग्य नाहीं. ज्यांना कारभार चालवावयाचा आहे त्यांना कांहीं तरी सत्ता हवी. कर वाढवणारी उपसूचना अगर बिल प्रमुखानें शिफारस केल्याशिवाय मांडतां येणार नाहीं, याचा अर्थ मंत्रिमंडळाला त्याबाबत त्याचें एकंदर धोरण लक्षांत घेऊन विचार करण्याला संधि देणें हा आहे. प्रमुख हा मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानेंच शिफारस करणार अगर नाकारणार. शिवाय त्याची सनदशीर कां होईना, पण जबाबदारी आहे. कर कमी करणें अगर रद्द करणें यासाठीं शिफारसीची जरूरी नाहीं. तशी उपसूचना असल्यास ती एकदम मांडतां येईल. ती पास झाल्यास काय होईल व सर्व बजेट व करयोजना यावर काय परिणाम होईल याची जाणीव सभागृहाला तात्काळ होते. खर्च आधीं मंजूर होत असतो. मग जमेचा म्हणजे उत्पन्नाचा विचार होतो. या योजनेनें चर्चेला मर्यादा बसते. कुठलाही खर्च करावा लागेल असा परिणाम करणारें बिल प्रमुखानें शिफारस केल्याशिवाय मांडतां येणार नाहीं. तात्पर्य, करयोजना व खर्च अशीं दोन्ही स्वरूपें नीट जुळतीं पाहिजेत व म्हणून त्या कामीं अधिक दक्षता असावी हें इष्ट आहे. तसेंच लोक कर देणार तर तो कसा खर्च केला जातो हेंही पाहण्याचा त्यांना हक्क आहे. राज्यकारभारांतील मुख्य बाब म्हणजे अर्थव्यवस्थाच होय.

## सामान्यतः कामकाजाची पद्धत

१८३. (१) सभागृहांतील कामकाज व व संचालन यांबाबत घटनेला अनुसरून, सभागृहानें नियम करावेत.

कामकाजी नियम

(२) वर (१) यांत दर्शविल्याप्रमाणें नियम तयार होईपर्यंत, ही घटना सुरू होण्यापूर्वी त्या त्या प्रांतांतील कायदे-मंडळाचे जे नियम असतील, ते, त्यांत सभापति अगर सभाप्रमुख, जसें असेल तसें, यांनीं जे फेरफार अगर बदल केले असतील, त्यासुद्धां लागू होतील.

(३) जेथें दोन सभागृहें असतील तेथें प्रमुख सभाप्रमुख व सभापति यांचा सल्ला घेऊन संयुक्त बैठकीच्या कामकाजाबद्दल व संचालनाबद्दल व दोघांनीं एकमेकांत दळणवळण कसें ठेवावें याबद्दल नियम करील.

(४) संयुक्त बैठकींत सभाप्रमुख अध्यक्षस्थानीं राहील; त्याच्या गैरहजेरींत (३) यांत सांगितल्याप्रमाणें जे नियम होतील त्याप्रमाणें जो अधिकारी असेल, तो इसम अध्यक्षस्थानीं बसेल.

प्रत्येक सभागृहानें कामकाजासंबंधीं नियम करावेत. ते तयार होईपर्यंत त्या त्या प्रांतांतील कायदेमंडळाचे जे नियम असतील, त्यांत सभापति व सभाप्रमुख यांनीं केलेल्या दुरुस्त्यांसह ते लागू राहतील. संयुक्त बैठकीबाबतचे नियम प्रमुख दोन्ही सभागृहांच्या मुख्यांशीं सल्लामसलत करून करील. संयुक्त बैठकींत असेंब्लीचा सभाप्रमुख अध्यक्ष होईल. असेंब्लींत सभासद अधिक म्हणून तो अध्यक्ष असावा अशी विचारसरणी यांत आहे. सामान्यतः संयुक्त बैठकींत वरिष्ठ सभागृहाचा सभापति अध्यक्षस्थान स्वीकारतो. या ठिकाणीं हें तत्त्व अमान्य केलें आहे. तथापि वरिष्ठ सभागृहाचा सभापति संयुक्त बैठकींत अध्यक्ष असणें अधिक चांगलें.

१८४. कायदेमंडळांतील कामकाज प्रांतांत सामान्यतः बोलल्या जाणाऱ्या भाषेंत अगर भाषांत अगर हिंदींत अगर इंग्रजींत चालेल.

कायदेमंडळाची भाषा

**( २ ) सभापति अगर सभाप्रमुख योग्य वाटेल तेव्हां, सभासदानें अन्य भाषेंत केलेल्या भाषणाचा गोषवारा प्रांतीय भाषेंत अगर इंग्रजींत सभागृहाला मिळेल अशी व्यवस्था करील व ह्या गोषवारा सभागृहाच्या अधिकृत वृत्तांतांत नमूद केला जाईल.**

प्रांतांतील प्रचलित भाषेंत अथवा प्रांतांत अनेक भाषा प्रचारांत असल्या, तर त्यांपैकीं भाषेंत, तसेंच हिंदी व इंग्रजी या भाषांत सभासदाला बोलतां येईल. अन्य भाषेंत त्यानें भाषण केलें, तर त्याचा गोषवारा मुख्य प्रांतभाषेंत अगर इंग्रजींत सभागृहाला देण्यांत येईल. हिंदी ही राष्ट्रीय भाषा ठरलीच आहे व नागरी ही राष्ट्रीय लिपि होणार हेंही स्पष्ट आहे. एक राष्ट्र झालें म्हणजे एक भाषा व एक लिपि पाहिजे. दोन भाषा व दोन लिपि म्हणजे दोन राष्ट्रें असा अर्थ होतो. हिंदुस्थान या राष्ट्राची एक भाषा व एक लिपि असलीच पाहिजे. घटक प्रांतांत त्या प्रांतांची भाषा व तिची लिपि राहील. या योजनेंत इष्ट तोच समन्वय आहे. इंग्रजी कांहीं दिवस ठेवणें व्यवहाराला धरून आहे. तथापि हिंदी सर्वत्र शक्य तितक्या लवकर आली पाहिजे. राष्ट्रभाषा हें एकीकारक असें द्रव्य आहे.

**चर्चेवर मर्यादा**

**१८५. ( १ ) प्रमुख न्यायालयाचे न्यायाधीश व मुख्य कोर्टाचे न्यायाधीश यांनीं न्यायदानाच्या कामीं जें वर्तन केलें असेल, त्यावर कायदेमंडळांतील कोणत्याही सभागृहांत चर्चा होणार नाहीं.**

**( २ ) या कलमांत मुख्य कोर्टाचा जो उल्लेख आला आहे, त्यांत परिशिष्ट एक भाग ३ यांत उल्लेखिलेल्या संस्थानांतील ज्या कोर्टांना भाग ५ यांतील प्रकरण ४ मध्यें मुख्य कोर्ट म्हणून मानलें आहे त्यांचाही समावेश आहे.**

न्यायदान निर्भय व निःपक्षपाती राहावें म्हणून त्याबाबत कायदेमंडळांत चर्चा होऊं नये हें इष्ट तत्त्व येथें मान्य केलें आहे. कायदा अपुरा असेल अगर त्याचा अर्थ कोर्टानें चुकीचा केला तर कायदेमंडळानें नवीन कायदा आणून अगर जुन्यांत

दुरुस्ती करून इष्ट तो फरक घडवून आणावा. न्यायाधिशावर चर्चा करणें म्हणजे न्यायदान लोकप्रियतेवर अवलंबून ठेवण्यासारखें आहे. निकाल न्यायाला धरून पाहिजेत; मग ते लोकप्रिय असोत अगर नसोत. त्यावर टीका होऊं लागली म्हणजे साहजिक त्याचा परिणाम होतो व तसें होणें इष्ट नाहीं. भाग ३ मधील संस्थानांत जीं कोर्टें भाग ५ प्रकरण ४ मध्यें मुख्य म्हणून समजलीं आहेत, तीं कोर्टें या कलमाखालीं मुख्य कोर्टें समजलीं जातील; म्हणजे त्यांच्या न्यायाधिशांवरही कायदेमंडळांत चर्चा होणार नाहीं.

**न्यायालय व कायदेमंडळांतील काम**

**१८६ (१) कामकाज पद्धतशीर झालें नाहीं या कारणासाठीं कायदेमंडळांतील काम विधियुक्त नाहीं असा आक्षेप घेतां येणार नाहीं.**

**(२) कायदेमंडळांतील अधिकारी अगर अन्य सभासद, ज्यांना घटनेप्रमाणें कामकाजाचें नियमन करणें, सभेचें संचालन करणें अगर सभेंत व्यवस्था ठेवणें हे अधिकार आहेत, अशांनीं या अधिकारान्वयें जें केलें असेल त्याबाबत कोणत्याही कोर्टाला चौकशी करण्याचा अगर दखल घेण्याचा अधिकार नाहीं.**

केवळ कामकाजाच्या रीतींत नियमांना सोडून एखादी गोष्ट कायदेमंडळांत झाली, तर ती विधियुक्त नाहीं असा आक्षेप कुठेंही घेतां येणार नाहीं. हे सर्व प्रश्न सभागृहांतच निकालांत लागतात. एखादा कायदा कामकाजाच्या नियमांना धरून पास झाला नाहीं, ही तक्रार चालणार नाहीं. पण असला कायदा करण्याचा घटने-प्रमाणें कायदेमंडळाला अधिकार नाहीं, ही तक्रार निराळ्या स्वरूपाची आहे व असला प्रश्न प्रमुख न्यायालयापुढें येऊं शकतो. पहिली तक्रार रीतीबाबतची आहे; दुसरी मौलिक आहे. त्याचप्रमाणें ज्यांना अधिकार आहे, अशांनीं अधिकारान्वयें संचालन, व्यवस्था इत्यादींबाबत जें केलें असेल त्याची दखल कोर्टाला घेतां येणार नाहीं. कोर्ट जर दखल घेईल, तर सभेचें काम अशक्य होईल. दररोज मनाई हुकुम लागतील. नाराज सभासद कोर्टाकडे धांव घेतील. सभागृह कामकाजाबाबत संपूर्ण व प्रभुत्वपूर्ण असलें पाहिजे.

## प्रकरण ४ थें--प्रमुखाची कायदेकानूबाबत सत्ता

कायदेमंडळाला सुटी असतां वटहुकुम काढणें

१८७. ( १ ) जेव्हां असेंब्लीची बैठक चालू नसेल, अगर जेथें कौन्सिलही आहे तेथें दोन्ही सभागृहांच्या बैठकी चालू नसतील, अशा कालांत जर प्रमुखाला परिस्थिति लक्षांत घेतां तावडतोब कांहीं उपाययोजना करणें जरूर आहे असें वाटेल तर त्याला परिस्थितीला तोंड देण्यासाठीं जरूर ते वटहुकुम काढतां येतील.

मात्र ज्या बाबतींत प्रस्तुत कायदेमंडळानें पास केलेला कायदा अध्यक्षाच्या विचारार्थ राखून ठेवला, पण त्याची मान्यता मिळाली नसतां घटनेप्रमाणें असनदशीर ठरला असता, अशा बाबतींत प्रमुखाला अध्यक्षाच्या सूचनेशिवाय वटहुकुम काढतां येणार नाहीं.

( २ ) या कलमाप्रमाणें काढलेला वटहुकुम कायदेमंडळानें पास केलेल्या व प्रमुखानें मान्यता दिलेल्या कायद्याप्रमाणें जारी होईल. मात्र प्रत्येक वटहुकुम

( अ ) असेंब्लीपुढें अगर जेथें कौन्सिल आहे तेथें दोन्ही सभागृहांपुढें ठेवण्यांत येईल आणि कायदेमंडळाची बैठक सुरू झाल्यापासून सहा आठवडे संपतांच तो आपोआप रद्द होईल; तसेंच त्याहीपूर्वीं जर असेंब्लीनें ठराव करून व जेथें दोन सभागृहें आहेत तेथें दोघांनीं ठराव करून नापसंत केला तर तो रद्द होईल.

( ब ) प्रमुखाला तो केव्हांही परत घेतां येईल.

खुलासा—जेथें दोन सभागृहें आहेत व दोन्ही एकाच वेळीं बोलाविलीं नसतील तर जें उशीरा बोलाविलें असेल त्याच्या बैठकीच्या सुरुवातीपासून ही सहा आठवडे मुदत मोजली जाईल.

(३) ज्या बाबतींत विधियुक्त कायदा करतां येणार नाहीं अशी एखादी बाब वटहुकुमांत असेल, तर तेवढ्यापुरता तो वटहुकुम रद्द समजला जाईल.

मात्र जेथें घटक-राज्याचा कायदा पार्लमेंटच्या कायद्याशीं विसंगत आहे अगर समान यादींतील बाबीबाबत एखाद्या विद्यमान कायद्याशीं विरुद्ध आहे, अशा परिस्थितीबाबत जी व्यवस्था घटनेंत केली आहे, ती लक्षांत घेऊन जो वटहुकुम अध्यक्षाच्या सांगण्यावरून काढला असेल, तो अध्यक्षाच्या विचारासाठीं राखून ठेवलेल्या व त्याला अध्यक्षांनीं संमति दिलेल्या कायद्याप्रमाणें मानला जाईल.

प्रमुख हा कार्यकारी सत्तेचा प्रमुख आहे. त्याला कायदेकानू करण्याची सत्ता सामान्यतः नाहीं. ही सत्ता कायदेमंडळाला आहे व कायदेमंडळ यांत प्रमुख समाविष्ट आहे. तथापि जेव्हां कायदेमंडळ चालू नसेल व जर बिकट परिस्थिति झाली, तर काय करावयाचें हा मोठा प्रश्न आहे. राज्यकारभार व त्यांतील प्रत्येक कार्य कायद्याला अगर कायद्यान्वयें काढलेल्या नियमानुसार चालतात. मग बिकट परिस्थितींत जर वाट दाखविणारा अगर अधिकार देणारा कायदा अगर नियम नसेल, तर तसा कायदा अगर नियम ताबडतोब होणें जरूर आहे. कायदेमंडळ चालू नाहीं व कायदा करणें जरूर आहे अशा परिस्थितींत वटहुकुम काढून काम चालविणें देशहितार्थ अवश्य ठरतें. अशी सत्ता प्रत्येक घटनेंत कुणाला तरी दिलेली असते. मात्र हे वटहुकुम शक्य तितक्या लवकर कायदेमंडळापुढें आले पाहिजेत. त्यांचें रूपांतर कायद्यांत होऊन ते कायदे योग्य रीतीनें पास झाले पाहिजेत. या कलमांत ही व्यवस्था केली आहे. जो कायदा करतां येणार नाहीं, त्याबाबत वटहुकुम काढतां येणार नाहीं. ज्या बाबतींतील कायद्याला अध्यक्षाच्या मान्यतेची जरूरी आहे, अशा बाबतींत अध्यक्षाच्या सांगण्यावरूनच वटहुकुम काढतां येईल. कायदेमंडळ सुरू झालें कीं, सहा आठवड्यांत जर वटहुकुमाच्या जागीं कायदा पास झाला नाहीं, तर वटहुकुम रद्द होईल. तसेंच त्यापूर्वीही नापसंतीचा ठराव करून कायदेमंडळ तो रद्द करूं शकेल. सामान्यतः वटहुकुम काढल्यावर व कायदेमंडळापुढें तो ठेवल्यानंतर, मंत्रिमंडळ त्याबाबत बिल आणून तें कायदेमंडळाकडून पास करून घेईल. कुठल्याही परिस्थितींत हा प्रश्न कायदेमंडळापुढें येईल व लोकमताप्रमाणें त्याचा निकाल लागेल. एवढी व एवढ्या कालापुरती वटहुकुम काढण्याची सत्ता प्रमुखाला असली

पाहिजे. बिकट परिस्थिति प्रसंगीं एकाएकी उद्भवते, कायदेमंडळ चालू नसतें, त्वकर बोलविणें शक्य नसतें; या वेळीं राज्यकारभार जर नीट चालवावयाचा, तर अवश्य ते वटहुकुम काढणें जनहिताचें आहे. न काढणें अनर्थकारक ठरेल.

# प्रकरण ५ वें–आणीबाणीच्या परिस्थितीबाबत व्यवस्था

आणीबाणीची परिस्थिति व प्रमुखाचे अधिकार

१८८. (१) जेव्हां प्रमुखाला शांतता व सुव्यवस्था धोक्यांत आणणारी परिस्थिति उत्पन्न झाली आहे व घटनेंतील व्यवस्थेप्रमाणें राज्यकारभार चालविणें शक्य नाहीं असें वाटेल, तेव्हां तो जाहीरनामा काढून त्यांत निर्दिष्ट केल्याप्रमाणें तो आपलीं कामें आपल्या मर्जीच्या अखत्यारांत करील असें जाहीर करील; व जाहीरनाम्यांतील उद्देशांच्या पूर्तीसाठीं त्याला इष्ट अगर आवश्यक वाटणारी पूरक व आनुषंगिक सर्व व्यवस्था सदहू जाहीरनाम्यांत समाविष्ट असेल; त्याचप्रमाणें राज्यांतील संस्थेबाबत अगर अधिकाऱ्याबाबत घटनेंत असलेली व्यवस्था अंशतः अगर पूर्णतः तहकूब करण्याची योजना पण सदहू जाहीरनाम्यांत असेल.

मात्र या कलमानें मुख्य कोर्टाबाबत घटनेंत जी व्यवस्था आहे तिला अंशतः अगर पूर्णतः तहकूब करण्याचा अधिकार प्रमुखाला प्राप्त होत नाहीं.

(२) येणेंप्रमाणें जाहीरनामा काढतांच प्रमुख तो अध्यक्षाकडे रवाना करील व अध्यक्ष त्याला वाटल्यास तो रद्द करील अगर कलम २७८ प्रमाणें आपल्या अधिकारांत जें त्याला योग्य वाटेल त्याप्रमाणें करील.

(३) जाहीरनामा दोन आठवडे अमलांत राहील; मात्र त्यापूर्वी प्रमुखाला तो रद्द करतां येईल; तसेंच अध्यक्षाला पण जाहीर निवेदन काढून रद्द करतां येईल.

**( ४ ) या कलमानुसार करावयाचीं कामें प्रमुखाच्या मर्जीतील अखत्याराचीं आहेत.**

सामान्यतः सर्व राज्यकारभार घटनेप्रमाणें चालावा हें ठीक आहे. पण प्रजातंत्र म्हणजे उघड उघड पक्षनिष्ठ राजकारण आहे. राज्यकारभारांत अनेकदा पेंचप्रसंग निर्माण होतात. कायदेमंडळांतील बहुमतवाला पक्ष निवडणुकींत जरी बहुमतवाला ठरला असला, तरी कालांतरानें लोकांत अप्रिय होऊं शकतो. तसेंच बहुमतवाला पक्ष सभागृहांत राजकीय उलाढालीमुळें अल्पमतवाला होऊं शकतो. अनेक वेळां निर्विवाद बहुमत कुठल्याच पक्षाला नसतें. मंत्रिमंडळ अस्थिर असतें. राजकारणांतील ही अस्वस्थता राज्यकारभारांत पण उमटते व ही गोष्ट जनहिताच्या दृष्टीनें इष्ट नाहीं. कोणीच मंत्रिमंडळ बनविण्यास तयार नसेल अगर प्रमुखाला जो तयार आहे त्याला सांगणें जनहिताच्या दृष्टीनें इष्ट नसेल तर कांहीं तरी राज्यकारभार चालविण्याची व्यवस्था करणें जरूर आहे. तसेंच विशिष्ट गोष्ट केली नाहीं तर प्रांताची शांतता धोक्यांत येईल व ती गोष्ट करण्यास मंत्रिमंडळ तयार नसेल तर काय करावयाचें ! राज्यकारभाराची जबाबदारी मंत्रिमंडळावर खरी; पण प्रमुखही त्याबाबत घटनेप्रमाणें जबाबदार आहे, कारण राज्यकारभार त्याच्या नांवानें चालतो. लष्करी कायदा पुकारणें अगर दुसरें अप्रिय पण आवश्यक असें कांहीं करणें मंत्रिमंडळ अनेक वेळां जरूर असूनही करणार नाहीं. मंत्रिमंडळानें केलें नाहीं म्हणून जनहित अगर सार्वजनिक शांतता धोक्यांत आणणें म्हणजे प्रजाद्रोह आहे. अशा वेळीं आणीबाणीची वेळ जाहीर करून प्रमुखानें राज्यकारभार हातीं घेणें अगर अध्यक्षानें तसेंच करणें याशिवाय तिसरा मार्ग नाहीं. अध्यक्ष दूर, व स्थानिक परिस्थितीशीं तोंड देणें त्याला अवघड पडेल हें उघड आहे. म्हणून या कलमांत दोन आठवडे राज्यकारभार प्रमुख हातीं घेऊं शकेल अशी व्यवस्था आहे. त्यासाठीं जरूर तीं घटनेंतील कलमें तो तहकूब करील. जाहीरनामा काढल्याबरोबर तो अध्यक्षाकडे रवाना होईल. अध्यक्ष त्याला वाटल्यास तो रद्द करील अगर कलम २७८ प्रमाणें सर्व अधिकार आपल्याकडे घेऊन राज्यकारभार चालवील. कायदेमंडळ तहकूब करील व तें काम पार्लमेंटकडे देईल. त्याला २७८ कलमाप्रमाणें अनेक अधिकार आहेत व ते अत्यंत व्यापक पण इष्ट आहेत. असें त्यानें कांहीं केलें नाहीं तर जाहीरनामा दोन आठवडे संपताच रद्द होईल. मात्र या मुदतींत जीं कार्यें प्रमुख करील तीं तो आपल्या मर्जीतील अखत्याराप्रमाणें. म्हणजे त्या कामीं मंत्रिमंडळाचा सल्ला घेण्याची जबाबदारी त्याच्यावर नाहीं. सामान्यतः मंत्रिमंडळ नसेलच; पण अंशतः त्यानें मंत्रिमंडळाचे अधिकार घेतले व मंत्रिमंडळ असलें तरी त्याचा सल्ला घेण्याची जबाबदारी या परिस्थितींत त्याच्यावर नाहीं. तो कार्यकारी सत्ता वस्तुतः चालवितो. या कलमाप्रमाणें जाहीरनामा काढणें अगर त्याबाबत जें

काम करणें तें सर्व पुन्हा त्याच्या मर्जीतील अखत्याराचें आहे व या कामीं मंत्रिमंडळाला विचारण्याचें कारण नाहीं. मंत्रिमंडळाचा सल्ला त्यानें घेऊन जाहीरनामा काढला पाहिजे असा निर्बंध त्याच्यावर नाहीं. सर्व जबाबदारी त्याची आहे. अवश्य ती परिस्थिति उत्पन्न झाली आहे हें त्यानें ठरवावयाचें आहे, किती अधिकार त्यानें घ्यावे, हेंही त्यानें ठरवावयाचें आहे.

असा अधिकार अशा रीतीनें थोड्या कालापर्यंत देणें हें प्रजातंत्र अगर लोकशाहीला सोडून नाहीं. लोकशाही म्हणजे अव्यवस्था व अशांतता नव्हे. तेवढ्यापुरता जरूर तो अधिकार प्रमुखाला असणें योग्य आहे. विचारविनिमय व्हावा हें ठीक; पण त्यांत कालगति होत असेल, अगर अवश्य तें करण्यास अप्रियतेमुळें मंत्रिमंडळ तयार नसेल, तर जनहितार्थ असें करणारा कोणी तरी असला पाहिजे.

# प्रकरण ६ वें—परिशिष्टांत घातलेले व वन्य प्रदेश

१८९. या घटनेंत—

व्याख्या

(अ) 'परिशिष्टांतील प्रदेश' म्हणजे पांचव्या परिशिष्टांतील पॅरा १८ ला जोडलेल्या कोष्टकांतील भाग १ ते ७ यांत त्या त्या घटकांच्या संबंधांत नमूद केलेले प्रदेश होय;

(ब) 'वन्य प्रदेश' म्हणजे ६ व्या परिशिष्टांतील पॅ. १९ ला जोडलेल्या कोष्टकांतील भाग १ व २ यांत नमूद केलेले प्रदेश होय.

हिंदुस्थानांत जंगलांत व डोंगरांत पुष्कळ मागासलेल्या जाती राहतात. ते ते प्रदेश राज्यकारभारासाठीं पृथक्पणें नमूद करून त्याबाबत त्यांच्या उन्नतीसाठीं अवश्य ती योजना करण्यांत आली आहे. हे प्रदेश परिशिष्ट ५ मध्यें नमूद केले आहेत. त्यांची प्रांतवार यादी दिली आहे. या प्रदेशांना 'परिशिष्टांतील प्रदेश' असें नामाभिधान या घटनेंत दिलें आहे. 'वन्य प्रदेश' हे परिशिष्ट ६ त नमूद केले आहेत. ते हिंदुस्थानच्या सरहद्दींत पण टोंकाला आहेत. त्यांतील जाती वन्य आहेत व त्याची व्यवस्था खासपणें या घटनेंत केली आहे. त्यांची प्रगति व सुधारणा त्वकर व्हावी या दृष्टीनें ती व्यवस्था करण्यांत आली आहे.

वन्य प्रदेशांतील राज्यकारभार

१९०. (१) पांचव्या परिशिष्टांत नमूद केलेल्या व्यवस्थेप्रमाणें परिशिष्ट एक भाग १ यांतील प्रांतामधील परिशिष्टांतील प्रदेश व वन्य प्रदेश यांचें नियंत्रण होईल व त्याप्रमाणें राज्यकारभार चालेल.

(२) सहाव्या परिशिष्टांत नमूद केलेल्या व्यवस्थेप्रमाणें आसाम-मधील वन्य प्रदेशांचा राज्यकारभार चालेल.

या पांचव्या व सहाव्या परिशिष्टांत तपशीलवार योजना दिली आहे. त्याबाबत विवरण त्या ठिकाणीं केलें आहे.

# प्रकरण ७ वें—घटक-राज्यांतील मुख्य न्यायालयें

मुख्य न्यायालय म्हणजे काय

१९१ (१) या घटनेसाठीं परिशिष्ट एक भाग ३ यांतील संस्थानें सोडून बाकीच्या हिंदुस्थानासाठीं खालील कोर्टें मुख्य न्यायालयें मानलीं जातील:—

(अ) कलकत्ता, मद्रास, मुंबई, अलाहाबाद, पाटणा नागपूर येथील मुख्य न्यायालयें, तसेंच पूर्व पंजाबचें न्यायालय;

(ब) या प्रकरणान्वयें वरील प्रांतांत मुख्य न्यायालय म्हणून नेमलेलें अगर मुख्य न्यायालय म्हणून पुर्नरचना केलेलें दुसरें कोणतेंही न्यायालय;

(क) अनुरूप कायदेमंडळानें कायद्यानें या घटनेसाठीं म्हणून मुख्य न्यायालय म्हणून जाहीर केलेलें दुसरें कोणतेंही न्यायालय;

मात्र जर सदहू कायदेमंडळानें या पोटकलमांत नमूद केलेल्या कोर्ट अगर कोर्टाबद्दल मुख्य न्यायालय प्रस्थापित व्हावें अशी व्यवस्था केली असेल, तर सदहू मुख्य न्यायालय प्रस्थापित झाल्यापासून या

कलमांतील व्यवस्था जणू कांहीं हें नवीन न्यायालय पूर्वीपासूनच या कलमांत नमूद आहे असें समजून लागू होईल.

( २ ) अन्यथा जर कांहीं या घटनेंत नमूद केलें नसेल, तर या प्रकरणांतील व्यवस्था वर ( १ ) यांत उल्लेखिलेल्या सर्व मुख्य कोर्टांना लागू होईल.

या कलमांत घटक प्रांतांत मुख्य कोर्टें कोणतीं, नवीन मुख्य कोर्ट स्थापण्याचा अगर त्यांची पुनर्रचना करण्याचा अधिकार व व्यवस्था हीं सांगितलीं आहेत. स्वायत्त घटक अगर प्रांत यांत प्रमुख, कायदेमंडळ व मुख्य न्यायालय या तीन संस्था अवश्य आहेत. कार्यकारी, विधिविषयक व न्यायादानी असें त्यांचें क्रमशः स्वरूप आहे. प्रमुख हा मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालवितो, पण त्याच्या नांवानें तो चालतो म्हणून कार्यकारी सत्तेचा तो प्रमुख होय.

**मुख्य न्यायालयाची घटना**

१९२. प्रत्येक मुख्य न्यायालय हें स्थायी असून त्याचा एक मुख्य न्यायाधीश असेल व त्याच्या जोडीला वेळोवेळीं अध्यक्ष जरूर वाटेल तेवढे न्यायाधीश नेमील.

मात्र, याप्रमाणें नेमलेले न्यायाधीश, तसेंच एखादा पुरवणी न्यायाधीश नेमला असल्यास तो धरून या सर्वांची संख्या, त्या मुख्य न्यायालयाबाबत जी कमाल संख्या अध्यक्षानें हुकुमानें वेळोवेळीं ठरविली असेल, त्यापेक्षां केव्हांही अधिक असणार नाहीं.

मुख्य न्यायालय हें स्थायी म्हणजे त्याचे कामकाजाचे वृत्तांत व कागदपत्र हे कायम राहतील. तात्पुरतें असें हें कोर्ट नाहीं. मुख्य न्यायाधीश व त्याच्या जोडीला अध्यक्ष जरूर तेवढे न्यायाधीश नेमील. मात्र कमाल संख्येपेक्षां ही संख्या अधिक असणार नाहीं.

**न्यायाधिशाची नेमणूक व नोकरीच्या शर्ती**

१९३. अध्यक्ष, प्रमुख न्यायालयाच्या मुख्य न्यायाधिशाशीं, तसेंच प्रांताच्या प्रमुखाशीं आणि जेव्हां मुख्य न्यायाधिशाव्यतिरिक्त न्यायाधिशाची नेमणूक करावयाची असेल, तेव्हां मुख्य कोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाशीं विचारविनिमय करून आपल्या शिक्कामोर्तबानें प्रत्येक

न्यायाधिशाची नेमणूक करील आणि नेमलेला न्यायाधीश साठ वर्षे अगर ६५ वर्षांपर्यंतची जी मर्यादा घटक कायदेमंडळ कायद्यानें ठरवील, तोंपर्यंत कामावर राहील;

मात्र

(अ) प्रमुखाकडे लेखी राजीनामा धाडून न्यायाधीश निवृत्त होऊं शकेल.

(ब) कलम १०३ (४) ला अनुसरून अध्यक्षाला प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशाप्रमाणेंच न्यायाधिशाला कामावरून दूर करतां येईल.

(क) दुसऱ्या मुख्य न्यायालयांत अगर प्रमुख न्यायालयांत न्यायाधीश म्हणून नेमणूक झाल्यास पहिली जागा न्यायाधिशानें सोडली पाहिजे.

(२) न्यायाधीश म्हणून नेमला जाणारा इसम हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे व

(अ) ज्या प्रांतांत मुख्य कोर्ट आहे, अगर ज्याकरितां मुख्य कोर्ट आहे, अशांत निदान १० वर्षे न्यायखात्यांत त्यानें न्याय देण्याचें काम केलें असलें पाहिजे अगर

(ब) मुख्य कोर्टांत अगर अशा दोन अगर अधिक कोर्टांत लागोपाठ १० वर्षें तरी निदान वकील म्हणून काम केलें असलें पाहिजे.

खुलासा १—या कलमासाठीं,

(अ) १० वर्षें वकिलीची मुदत मोजतांना वकील झाल्यानंतर जर त्यानें न्यायदानाचें काम केलें असेल तर तो काल धरला जाईल;

(ब) परिशिष्ट एक भाग १ व २ मधील घटकराज्यांत न्यायदानाचें काम केलेली मुदत मोजतांना १५ ऑगस्ट १९४७ पूर्वी १९३५ च्या कायद्याप्रमाणें जो ब्रिटिश हिंदुस्थान होता त्यांत सामील असलेल्या प्रदेशांतील मुख्य कोर्टांत घटना अमलांत येण्यापर्यंत वकिली केलेला काल अगर त्या प्रदेशांतील न्यायदानाचा काल जमेंत धरला जाईल.

खुलासा २—पोटकलम (अ) व (ब) यांत जो मुख्य न्यायालयाबाबत उल्लेख आला आहे, त्यांत परिशिष्ट एक भाग ३ यांत नमूद केलेल्या संस्थानांतील कोर्टांचा जीं कलम १०३ व १०६ साठीं मुख्य कोर्टें मानिलीं आहेत त्यांचा समावेश आहे.

न्यायाधिशाची नेमणूक अध्यक्ष प्रमुख न्यायालयाचा प्रमुख न्यायाधीश, प्रांत-प्रमुख व जरूर तेथें प्रांतांतील मुख्य कोर्टाचा मुख्य न्यायाधीश यांचा सल्ला घेऊन करील. वयोमर्यादा ६० आहे; तथापि कायद्यानें ती ६५ पर्यंत नेतां येईल. अनेकांच्या मतें ६५ वयापर्यंत मनुष्य कार्यक्षम राहतो. ही बाब कायदेमंडळावर सोंपविली आहे. नेमणूक अध्यक्ष करणार, म्हणजे त्यांत प्रांतिक राजकारणाचे रंग सामान्यतः उमटणार नाहीं. न्यायालयांतील नेमणुका केवळ गुणावर झाल्या पाहिजेत. न्यायाधीश कमाल वयोमर्यादेपर्यंत काम करील. कलम १०३ मध्यें सांगितल्याप्रमाणें त्याला कामावरून दूर करतां येईल. पक्षोपपक्षाच्या राजकारणापासून त्याला जोंपर्यंत तो चांगला वागत आहे तोंपर्यंत कांहीं भीति नाहीं. पात्रतेच्या दृष्टीनें तो १० वर्षें कामाचा अनुभवी अगर वकिली केलेला असला पाहिजे. वांटणीपूर्वी असलेल्या हिंदुस्थानांत कोठेंही त्यानें काम केलें असेल अगर वकिली केली असेल, तर ती मुदत घटना सुरू होईपर्यंतची जमा धरली जाईल. तसेंच संस्थानांतील ज्या कोर्टांना मुख्य कोर्ट म्हणून मानलें आहे त्यांचाही समावेश या कलमासाठीं 'मुख्य कोर्ट' यांत केला आहे.

१९४. कलम १०३ (४) व (५) हीं जशीं प्रमुख न्यायालयाला लागू आहेत, त्याप्रमाणें तीं मुख्य न्यायालयाला लागू होतील व यांत जेथें प्रमुख न्यायालयाला उद्देशून उल्लेख असेल, तो येथें मुख्य न्यायालयाला अनुलक्षून समजावा.

प्रमुख न्यायालया-बाबतची व्यवस्था मुख्य न्यायालयाला लागू

कलम १०३ (४) व (५) यांत न्यायाधिशाला कामावरून दूर करण्याबाबत व्यवस्था सांगितली आहे. त्याबाबत विवरण पूर्वींच आलें आहे.

१९५. अधिकारग्रहण करण्यापूर्वीं प्रत्येक न्यायाधिशानें प्रमुखापुढें अगर त्या कामासाठीं नेमलेल्या इसमापुढें परिशिष्ट तीनमध्यें नमूद केलेली प्रतिज्ञा घेतली पाहिजे.

अधिकारग्रहणा-पूर्वीची प्रतिज्ञा

परिशिष्ट ३ मधील प्रतिज्ञा, घटनेला निष्ठावंत राहीन व यथाशक्ति व प्रामाणिकपणें काम करीन व तें करतांना घटना व कायदे यांना अनुसरून तें करीन, व तें काम कोणाशीं दुष्टावा न करतां अगर कोणाविषयीं प्रेम न धरतां तसेंच भीति अगर मर्जी या दोन्हीला न जुमानतां करीन, अशा अर्थाची आहे. प्रतिज्ञा घेतल्यानें निदान कांहीं नैतिक जबाबदारी माणसाला वाटत असते.

१९६. ज्या इसमानें

न्यायाधिशाचें काम केल्यानंतर वकिलीला बंदी

(अ) मुख्य न्यायालयांतील न्यायाधिशाचें काम केलें असेल अगर

(ब) पुरवणी न्यायाधीश अगर तात्पुरता न्यायाधीश म्हणून काम केलें असेल,

त्याला हिंदुस्थानांत कुठल्याही न्यायालयापुढें अगर अधिकाऱ्यापुढें वकील म्हणून काम करतां येणार नाहीं.

अनेक दृष्टींनें ही योजना इष्ट आहे. एकदां न्यायाधीश म्हणून काम केल्यानंतर वकील म्हणून काम करणें, प्रतिष्ठा व निःपक्षपाती न्याय या दोन्ही दृष्टींनीं योग्य नाहीं. आपल्याबरोबर न्यायाधीश म्हणून बसलेला इसम आपल्यासमोर वकील म्हणून येत आहे, या गोष्टीचा परिणाम कांहींतरी कां होईना, न्यायाधिशावर होणें अपरिहार्य

आहे. तसेंच सेवानिवृत्त न्यायाधिशानें वकील म्हणून काम करणें हें अन्य वकिलांना धंद्याच्या दृष्टीनें नुकसानकारक ठरतें.

न्यायाधिशांचें वेतन वगैरे

१९७. मुख्य कोर्ट ज्या घटक-राज्यांत असेल, त्या त्या घटक-राज्याच्या कायदेमंडळानें कायदा करून मुख्य कोर्टांच्या न्यायाधिशांचें वेतन, भत्ता, रजा, पेन्शन वगैरे ठरवावयाचें आहे; व हें ठरेपर्यंत याबाबतींत परिशिष्ट दोनमध्यें जी व्यवस्था सांगितली आहे ती अमलांत राहील.

मात्र कोणाही मुख्य न्यायाधिशाचा पगार मासिक चार हजार रु. पेक्षां कमी असणार नाहीं व कोणाही न्यायाधिशाचा साडेतीन हजारांपेक्षां कमी असणार नाहीं.

तसेंच न्यायाधिशाचा पगार, अगर रजा व पेन्शन यांबाबतचे हक्क एकदां त्याला नेमल्यानंतर त्याला अनहितकारक होतील अशा रीतीनें बदलले जाणार नाहींत.

न्यायाधीश वकिलांतून घ्यावयाचे तर पुरेसा पगार दिल्याशिवाय कोणी येणार नाहीं हें उघड आहे. वास्तविक न्यायाधिशाचें काम हें पगारापेक्षां प्रतिष्ठेसाठीं आहे. व प्रत्येक नागरिकानें राज्यासाठीं कर्तव्य कांहीं केलें पाहिजे या दृष्टीनें त्याकडे पाहिलें पाहिजे. आजच्या स्थितींत कलमांतील पगारयोजना वावगी म्हणतां येणार नाहीं. न्यायाधिशाला साधारणपणें संसाराची चिंता नसावी अशी स्थिति उपलब्ध असावी.

तात्पुरते न्यायाधीश

१९८. (१) जेव्हां मुख्य न्यायाधिशाची जागा खाली होईल अगर गैरहजेरीमुळें अगर अन्य कारणांसाठीं तो आपलें काम करूं शकत नसेल, त्या वेळीं त्याचें काम त्याच न्यायालयांतील कोणत्या न्यायाधिशानें करावें हें अध्यक्ष ठरवील.

(२) (अ) जेव्हां न्यायाधिशाची एखादी जागा खाली पडेल अगर न्यायाधीश मुख्य न्यायाधीश म्हणून तात्पुरतें तें काम पाहत असेल, अगर गैरहजेरीमुळें अगर अन्य कारणासाठीं न्यायाधीश काम करूं

शकत नसेल तर या जागेवर पात्र असलेला दुसरा इसम अध्यक्ष नेमील.

( ब ) याप्रमाणें नेमलेला इसम न्यायालयाचा न्यायाधीश म्हणून समजला जाईल.

( क ) या कलमाखालीं केलेली कोणतीही नेमणूक अध्यक्षाला रद्द करतां येईल.

तात्पुरते न्यायाधीश नेमण्याची व्यवस्था या कलमांत सांगितली आहे. तात्पुरत्या न्यायाधिशाची नेमणूक रद्द करण्याचा हक्क अध्यक्षाला आहे.

**पुरवणी न्यायाधीश**

१९९. जेव्हां मुख्य कोर्टाचें काम तात्पुरतें वाढलें असेल अगर शिल्लक पडलें असेल आणि तें पुरें करण्यास विद्यमान न्यायाधिशांची संख्या अध्यक्षाला अपुरी वाटली तर कमाल संख्येची मर्यादा संभाळून त्याला दोन वर्षेपर्यंत पात्र इसमांची पुरवणी न्यायाधीश म्हणून नेमणूक करतां येईल.

**निवृत्त न्यायाधीश व न्यायदान**

२००. या प्रकरणांत कांहींही असलें, तरी मुख्य कोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाला या कलमाचें पालन करून त्या कोर्टांत ज्यानें न्यायाधीश म्हणून काम केलें असेल अशा इसमास न्यायाधिशाचें काम करण्याविषयीं केव्हांही विनंति करतां येईल व या विनंतिप्रमाणें तो इसम जेव्हां काम करीत असेल तेव्हां त्याला न्यायाधिशाचे सर्व अधिकार, सत्ता व खास हक्क प्राप्त होतील. मात्र अन्यथा त्याला त्या कोर्टाचा न्यायाधीश म्हणून मानलें जाणार नाहीं.

मात्र कोणाही इसमास त्यानें मान्यता दिल्याशिवाय याप्रमाणें न्यायासनावर बसून काम करण्यास सांगतां येणार नाहीं.

निवृत्त न्यायाधिशांना वकिलीची बंदी कलम १९६ प्रमाणें केली आहे. मात्र त्यांची इच्छा व संमति असल्यास मुख्य न्यायाधिशाला त्यांना केव्हांही न्यायदानाच्या कामासाठीं बोलावितां येईल. मात्र जेव्हां तो न्यायासनावर बसून काम करील, तेव्हां त्याला न्यायाधिशाचे अधिकार प्राप्त होतील; पण त्याला न्यायाधीश म्हणून समजलें

जाणार नाहीं. कामापुरते न्यायाधिशाचे अधिकार, पण न्यायाधीश नव्हे! ज्यांना शक्ति व इच्छा आहे व सेवा करावयाची आहे, त्यांच्यासाठीं ही व्यवस्था आहे. याप्रमाणें व्यवस्था इंग्लंड व अमेरिकेंत आहे.

**विद्यमान मुख्य कोर्टाचें क्षेत्र**

२०१. या घटनेंतील व्यवस्था पाळून, तसेंच प्रस्तुत घटनेनें दिलेल्या अधिकारानुसार योग्य कायदेमंडळानें केलेल्या कायद्याचें पालन करून विद्यमान मुख्य कोर्टाचें न्यायदानाचें क्षेत्र, त्याचप्रमाणें त्या त्या कोर्टाच्या न्यायाधिशांचे न्यायदानाबाबत अधिकार, तसेंच कोर्टाच्या नियमांबाबत, त्याच्या बैठकीबाबत, तसेंच न्यायदानाच्या वेळीं एकानें बसावें अगर अधिक संख्येनें, याबाबत घटना सुरू होण्यापूर्वी जी व्यवस्था होती ती चालू राहील.

मात्र घटना सुरू होण्यापूर्वी एखाद्या मुख्य कोर्टाच्या अव्वल अधिकारक्षेत्रांत जमीनमहसूल अगर त्याबाबत वसुलीसंबंधांत झालेल्या एखाद्या कृत्याबद्दल चौकशी करण्यासंबंधीं जी मर्यादा कोठें असेल, ती यापुढें राहणार नाहीं.

विद्यमान मुख्य कोर्टाचे अधिकार, इत्यादि जे घटना सुरू होण्यापूर्वी असतील तेच राहतील. मात्र घटनेला अनुसरून त्या त्या प्रांतांतील कायदेमंडळानें कांहीं नवी व्यवस्था केल्यास त्या प्रमाणांत पूर्वीची व्यवस्था बदलली जाईल. मात्र जो निर्बंध मुख्य कोर्टाच्या अव्वल अधिकारक्षेत्रांत ( Original jurisdiction ) जमीन-महसुलाबाबत कोठें कोठें होता, तो यापुढें राहणार नाहीं. या प्रश्नाबाबत तें कोर्ट ही घटना अमलांत येतांच चौकशी करूं शकेल.

**कांहीं आदेश काढण्याची मुख्य कोर्टाची सत्ता**

२०२. ( १ ) कलम २५ मध्यें कांहींही असलें, तरी प्रत्येक मुख्य कोर्टाला आपआपल्या अधिकारक्षेत्रांतील प्रदेशांत या घटनेंतील भाग ३ यांत सांगितलेल्या हक्कांच्या बजावणीसाठीं अगर अन्य कारणासाठीं, इसमास हजर करण्यासंबंधीं अगर मनाई हुकुम अमुक केले पाहिजेत अशी आज्ञा वगैरे आदेश देतां येतील.

(२) वर (१) यांत मुख्य कोर्टाला दिलेल्या अधिकारानें कलम २५ (२) यांत प्रमुख न्यायालयाला दिलेल्या अधिकारांत कांहींही कमी होणार नाहीं.

कलम २५ प्रमाणें प्रमुख न्यायालयाला आदेश काढण्याची सत्ता दिली आहे. या कलमांत भाग ३ यांत जे मौलिक हक्क नागरिकांना दिले आहेत, त्यासंबंधांत प्रत्येक मुख्य कोर्टाला त्याच्या अधिकारक्षेत्रांतील प्रदेशांत जरूर ते आदेश काढण्याचा अधिकार दिला आहे. मनाई म्हणजे व्यक्तीनें अमुक करूं नये, ही निषेधात्मक आज्ञा आहे; अमुक करावें ही विधिस्वरूपाची आहे, तसा आदेश देतां येईल. तसेंच अटक केलेला इसम हजर करा असा आदेश देतां येईल. तात्पर्य, जे जरूर ते आदेश देतां येतील. हा अधिकार प्रांतिक मुख्य कोर्टांना मिळतो, म्हणून प्रमुख न्यायालयाला जो अधिकार २५ (२) कलमाप्रमाणें आहे, त्यांत कांहीं कमी होणार नाहीं. त्याचा अधिकार कायम व जशाचा तसाच आहे. या कलमानें त्यांत फरक होत नाहीं.

**मुख्य कोर्ट व कारभार**

२०३. (१) प्रत्येक मुख्य कोर्टाला त्याच्या अधिकारक्षेत्रांतील प्रदेशांत असणाऱ्या सर्व कोर्टांवर देखरेख करण्याचा अधिकार आहे.

(२) मुख्य कोर्ट,

(अ) या कोर्टांकडून माहिती मागवील;

(ब) एकादा कज्जा अगर अपील एका कोर्टाकडून काढून तत्सम अगर अधिक अधिकाराच्या कोर्टाकडे वर्ग करील अगर अपील एखाद्या कोर्टाकडून काढून स्वतःकडे घेईल;

(क) या कोर्टांतून कामकाज चालविण्यासंबंधीं सामान्य नियम तयार करील व त्यासाठीं नमुने (forms) तयार करील.

(ड) कोर्टांच्या अधिकाऱ्यांनीं हिशोब, शेरे, पुस्तकें कशीं ठेवावीं याबाबत नमुने तयार करील.

(३) मुख्य कोर्ट शेरीफ, कारकून, कोर्टांचे अन्य अधिकारी, ॲटर्नी, साधे व अव्वल दर्जाचे वकील (advocate) जे तेथें धंदा करतात, त्यांना काय मेहनताना (fees) द्यावा, याबाबत तक्ते तयार करील.

मात्र (२) व (३) यांत सांगितल्याप्रमाणें जे नियम व जे नमुने तयार करण्यांत येतील, ते विद्यमान कायद्याशीं विसंगत नसावेत व त्यांना प्रमुखाची आधीं मंजुरी असली पाहिजे.

न्यायदान व कोर्टांचा कारभार या दोन्ही गोष्टी मुख्य कोर्टाला करावयाच्या आहेत. अधिकारक्षेत्रांतील कोर्टांचें काम, त्यांची रीत, कज्जे व अपिलें यांचे वर्ग करण्याचे अधिकार, नियम व नमुने, वकिलांची फी वगैरे गोष्टी कारभार या सदरांत येतात. या सर्वांवर मुख्य कोर्टाची देखरेख राहील. अवश्य ते नियम मुख्य कोर्ट करील. साधारणतः नियमावलि (Manual) प्रत्येक मुख्य कोर्ट तयार करतें. नियम व नमुने प्रमुखाच्या मंजुरीनंतरच लागू होतील.

**काहीं कज्जे मुख्य कोर्टानें चालविणें**

२०४. जर एखाद्या खालच्या कोर्टांतील कज्ज्यांत घटनेच्या अर्थासंबंधीं महत्त्वाचा मुद्दा उपस्थित झाला असेल, तर तो कज्जा मुख्य कोर्ट आपल्याकडे घेऊन व तो चालवून त्याचा निकाल करील.

खुलासा—या कलमांत ‘ मुख्य कोर्ट ’ यांत परिशिष्ट एक, भाग ३ मधील संस्थानांतील अखेरच्या कोर्टाचा समावेश आहे.

संस्थानांतील अखेरच्या कोर्टाला कलमांत उल्लेखिलेल्या स्वरूपाचा खटला खालच्या कोर्टांतून स्वतःकडे मागवून निकाल करतां येईल. या कलमानें मुख्य कोर्टाला असले खटले स्वतःकडे घेऊन चालविण्याचा अधिकार दिला आहे. सामान्यतः कज्जा ज्या कोर्टाच्या अधिकारक्षेत्रांत दाव्याचें कारण घडलें असेल, अगर प्रतिवादी राहत असेल, तेथें चालला पाहिजे. या कलमानें दाव्याचें स्वरूप विशिष्ट असलें, तर मुख्य कोर्ट तो दावा आपल्याकडे घेईल.

**मुख्य कोर्टांतील नोकरांचे पगार व इतर खर्च**

२०५. (१) मुख्य कोर्ट ज्या ठिकाणीं असेल, त्या प्रांतांतील प्रमुखाच्या सल्ल्यानें मुख्य न्यायाधीश मुख्य कोर्टाच्या नोकरांचे व अधिकाऱ्यांचे पगार ठरवील.

( २ ) मुख्य कोर्टाच्या नोकरांचा व अधिकाऱ्यांचा पगार, भत्ता, त्याचप्रमाणें त्याच्या कारभाराचा अन्य खर्च, तसेंच सर्व न्यायाधिशांचे पगार व भत्ते असा सर्व खर्च घटकाच्या उत्पन्नावर बोजा असलेला खर्च समजला जाईल व त्याचप्रमाणें फी व अन्य पैसा जो कोर्टाकडे येईल, तो उत्पन्नाचा भाग मानला जाईल.

मुख्य कोर्टाचा खर्च उत्पन्नावरील बोजा असलेला खर्च आहे. म्हणजे त्याबाबत कायदेमंडळांत मतदान नाहीं. त्याचप्रमाणें जें उत्पन्न फी, दंड वगैरे येईल तें प्रांतिक सरकारच्या उत्पन्नाचा भाग मानला जाईल.

**मुख्य कोर्टाची रचना व पुनर्रचना**

२०६. परिशिष्ट एक भाग १ मध्यें नमूद केलेल्या घटक-राज्याच्या कायदेमंडळाला कायदा करून मुख्य कोर्ट त्या प्रदेशापुरतें अगर त्याच्या भागापुरतें स्थापतां येईल; तसेंच विद्यमान मुख्य कोर्ट असेल तर पुनर्रचना त्या प्रदेशापुरती अगर भागापुरती करतां येईल, अगर त्यां प्रदेशांत दोन मुख्य कोर्टें असतील तर त्यांचें एक कोर्ट करतां येईल.

( २ ) जेथें पुनर्रचना केली असेल अगर दोन कोर्टें एक केलीं असतील व तसें ज्या कायद्यानें केलें असेल त्या कायद्यांत पुढील गोष्टींची पण तजवीज होईलः

( अ ) विद्यमान सर्व न्यायाधिशांना कायम ठेवणें व अन्य कोर्टाचे अगर कोर्टाचे अधिकारी जे अवश्य वाटतील त्यांना कायम ठेवणें,

( ब ) आणि पुनर्रचना केलेलें अगर नवीन कोर्ट अस्तित्वांत येण्यापूर्वी चालू असलेले कज्जे नव्या कोर्टापुढें ठेवणें;

आणि यांशिवाय पुनर्रचनेमुळें अगर एक केल्यानें ज्या गोष्टी जरूर झाल्या असतील त्यांबाबत व्यवस्था करणें.

कायदेमंडळाला नवीन कोर्ट स्थापणें अगर असलेल्याची पुनर्रचना करणें, अगर दोन असतील तर त्यांचें एक कोर्ट करणें हे अधिकार या कलमानें दिले आहेत. यांबाबत

कायदा करतांना सर्व विद्यमान न्यायाधिशांना ठेवलें पाहिजे व त्याचप्रमाणें अन्य अधिकारी जेवढे अवश्य असतील त्यांना कायम ठेवलें पाहिजे. याबाबत कलमें त्या कायद्यांत असतील. चालू कामें व कज्जे यांबाबत व्यवस्थाही त्यांत असलीच पाहिजे. नवीन कोर्ट झालें म्हणून चालू कामें निकालांत लागलीं तर कठीण प्रसंग होईल.

**मुख्य कोर्टाचें क्षेत्र वाढविणें अगर कमी करणें**

२०७. पार्लमेंटला कायदा करून ज्या घटक-राज्यांत मुख्य कोर्टाची बसण्याची मुख्य जागा आहे, त्याव्यतिरिक्त अन्य घटक-राज्याच्या अगर अन्य एकाद्या प्रदेशाबाबत

(अ) मुख्य कोर्टाच्या क्षेत्रांत वाढ अगर

(ब) मुख्य कोर्टाचें क्षेत्र कमी करतां येईल.

मात्र ह्या कायद्यासंबंधींचें बिल कोणत्याही सभागृहांत दाखल होण्यापूर्वी

(१) जर त्याचा संबंध क्षेत्र वाढविणें अगर कमी करण्याविषयीं परिशिष्ट एक भाग १ अगर भाग ३ मधील विभाग अ यांत नमूद केलेल्या घटकांशीं येत असेल, तर त्या त्या घटकाची संमति पाहिजे.

(२) जर क्षेत्र वाढविणें असेल, तर ज्या घटक-राज्यांत मुख्य कोर्टाची बसण्याची मुख्य जागा असेल, त्याची संमति असली पाहिजे.

या कलमानें मुख्य कोर्टाचें अधिकारक्षेत्र कायदा करून वाढवितां येईल अगर कमी करतां येईल. मात्र त्यासंबंधांतील घटकांची संमति बिल दाखल करण्यापूर्वी घेतली पाहिजे. तसेंच जर क्षेत्र वाढविणें असेल, तर ज्या घटकांत मुख्य कोर्टाचें मुख्य ठाणें आहे, त्याची पण संमति हवी. या उभयतांच्या संमतीशिवाय बिल दाखल करतां येणार नाहीं.

**प्रदेशाबाहेर अधिकार असलेल्या मुख्य कोर्टासंबंधीं कायदेमंडळाच्या अधिकारावर नियंत्रण**

२०८. ज्या घटक-राज्यांत मुख्य कोर्टाची बसण्याची मुख्य जागा आहे, त्या राज्याच्या प्रदेशाबाहेर जेव्हां त्या मुख्य कोर्टाला अधिकारक्षेत्र असेल, तेव्हां या घटनेप्रमाणें

(अ) मुख्य जागा ज्या राज्यांत आहे त्याच्या कायदेमंडळाला प्रदेशाबाहेर असलेल्या मुख्य कोर्टाच्या अधिकारक्षेत्रांत कांहींही कमी जास्त करण्याचा अधिकार नाहीं.

(ब) तसेंच परिशिष्ट एक, भाग १ अगर ३ यांतील नमूद केलेल्या घटकाच्या कायदेमंडळांना, कीं ज्यांच्या अधिकारांत हा प्रदेश येतो त्यांना मुख्य कोर्टाचें तें अधिकारक्षेत्र कमी करण्याचा अधिकार नाहीं.

(क) तसेंच (ब) याला बाध न येतां ज्या कायदे-मंडळाला या क्षेत्राबाबत कायदे करण्याचा अधिकार आहे, त्याला या क्षेत्राबाबत जर त्या क्षेत्रांत मुख्य कोर्टाचें मुख्य ठाणें असतें तर जे कायदे करतां आले असते, ते करण्याला प्रतिबंध येणार नाहीं.

या कलमाप्रमाणें एका प्रांतांतील अगर घटकांतील कीं ज्याच्या प्रदेशांत मुख्य कोर्टाचें मुख्य ठाणें आहे अशा मुख्य कोर्टाला जर त्या प्रदेशाबाहेर काम चालविण्याचा अधिकार असेल, तर तो कमीजास्त करण्याचा अधिकार मुख्य ठाणें ज्यांत आहे, त्या प्रांतांतील कायदेमंडळाला नाहीं. तसेंच ज्या क्षेत्रांत असा अधिकार आहे त्या क्षेत्रांतील कायदेमंडळ जर तें क्षेत्र परिशिष्ट एक, भाग १ व ३ यांतील प्रांतांतील असेल, तर तो अधिकार नष्ट करण्याचा त्याला अधिकार नाहीं. ज्या कायदेमंडळाला अधिकार असेल, त्याचा अधिकार या कलमानें कमी केला नाहीं. प्रांतांतील कायदे-मंडळाला त्याच्या प्रदेशाबाबत कायदे करतां येतात; बाहेरील प्रदेशाबाबत कायदे करण्याचा अधिकार त्याला नाहीं. दोन प्रांतांशीं संबंध येणाऱ्या बाबींत कायदे करण्याचा अधिकार मध्यवर्ती विधिमंडळाला म्हणजे पार्लमेंटला आहे.

२०९. जेथें मुख्य कोर्ट दोन घटक प्रदेशांत काम करतें अगर एक घटक व कांहीं अन्य प्रदेश कीं जो त्या घटकाचा भाग नाहीं तेथें काम करतें, त्या वेळीं

अर्थ लावणें

(अ) या प्रकरणांत मुख्य कोर्टाच्या न्यायाधिशांबाबत जेथें जेथें प्रमुखाचा उल्लेख आला आहे, तेथें

तेथें प्रमुख म्हणजे ज्या घटकांत मुख्य कोर्टाचें मुख्य ठाणें आहे त्याचा प्रमुख समजणें.

(ब) जेथें जेथें दुय्यम कोर्टाचे नियम व नमुने यांना प्रमुखाकडून मान्यता मिळण्याचा संबंध आला आहे, तेथें तेथें ती मान्यता ज्या घटकांत दुय्यम कोर्ट असेल त्या प्रमुखाची अगर ज्या संस्थानांत तें असेल त्या संस्थानिकाची अगर जेथें पहिल्या परिशिष्टामधील भाग १ अगर ३ यांतील घटका-व्यतिरिक्त प्रदेशांत तें असेल, तेथें अध्यक्षाची मान्यता असें समजावें.

(क) जेथें उत्पन्नाचा संबंध असेल तेथें तें उत्पन्न मुख्य ठाणें असलेल्या घटक-राज्याचें उत्पन्न समजावें.

हें कलम आनुषंगिक आहे. कलम २०८ प्रमाणें जेव्हां परिस्थिति असेल, तेव्हां मान्यता कोणाची, तसेंच प्रमुख कोण याचें स्पष्टीकरण केलें आहे.

## प्रकरण ९ वें-मुख्य हिशोबतपासनीस

**घटकाचा मुख्य हिशोबतपासनीस**

२१० (१) परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाच्या कायदे-मंडळाला कायदा करून घटकांसाठीं एक मुख्य हिशोबतपासनीस असावा अशी व्यवस्था करतां येईल; आणि याप्रमाणें व्यवस्था असली म्हणजे प्रमुख आपल्या मर्जीच्या अखत्यारांत त्याची नेमणूक करील व त्याला कामावरून दूर करणें झाल्यास मुख्य कोर्टाच्या न्यायाधिशाबाबत जीं कलमें लागू आहेत, तीं लागू होतील.

( २ ) जेव्हां ( १ ) प्रमाणें कायदा होईल, तेव्हां त्या कायद्यांत, तो कायदा प्रसिद्ध होऊन ३ वर्षें होईपर्यंत मुख्य हिशोबतपासनीस याची नेमणूक होणार नाहीं अशी व्यवस्था असेल.

( ३ ) या कायद्यांत हिशोबतपासनिसाच्या नोकरीसंबंधीं सर्व व्यवस्था असेल; तसेंच त्याचीं प्रांतांतील हिशोबाबाबतचीं कामें स्पष्ट केलेलीं असतील; तसेंच त्याचा पगार, पेन्शन, भत्ता हा खर्च उत्पन्नावरील बोजा असलेला खर्च असेंही जाहीर केलें जाईल.

( ४ ) घटकांतील मुख्य हिशोबतपासनीस परिशिष्ट १ भाग १ मधील अन्य प्रांतांतील तीच जागा घेऊं शकेल अगर हिंदुस्थानचा मुख्य हिशोबतपासनीस होऊं शकेल; मात्र याव्यतिरिक्त हिंदुस्थान सरकारच्या अगर अन्य कोणत्याही घटक-राज्याच्या अधिकारांतील जागा निवृत्तीनंतर त्याला घेतां येणार नाहीं.

( ५ ) मुख्य हिशोबतपासनिसाच्या कचेरींतील नोकरांचे पगार, भत्ता, पेन्शन हें सर्व प्रमुखाच्या सल्ल्यानुसार मुख्य हिशोबतपासनीस ठरवील व तो खर्च उत्पन्नावरील बोजा असलेला खर्च मानला जाईल.

( ६ ) हिंदुस्थानच्या सरहिशोबतपासनिसाला परिशिष्ट एक भाग १ मधील घटकांच्या हिशोबाबाबत आदेश देण्याचा जो अधिकार आहे व ज्याचा उल्लेख कलम १२६ मध्यें आहे, त्यांत या कलमानें कांहींही काट होणार नाहीं.

या कलमांत घटकराज्यांत मुख्य हिशोबतपासनीस असावा व त्याप्रमाणें कायदा करून कायदेमंडळानें तें घडवून आणावें अशी व्यवस्था आहे. मात्र पहिला हिशोब-तपासनीस ३ वर्षांनीं नेमला जाईल. कारण विद्यमान व्यवस्था एकदम बदलणें योग्य होणार नाहीं. प्रांतांतील हिशोबांवर व हिशोबतपासनीसावर हिंदुस्थानच्या प्रमुख हिशोबतपासनिसाची देखरेख कलम १२६ प्रमाणें राहील.

**२११.** हिंदुस्थानच्या प्रमुख हिशोबतपासनिसाचे, तसेंच मुख्य हिशोबतपासनिसाचे घटकाच्या हिशोबासंबंधींचे रिपोर्ट त्या त्या घटकाच्या प्रमुखाला सादर करण्यांत येतील व तो ते रिपोर्ट कायदेमंडळापुढें ठेवण्याची व्यवस्था करील.

**तपासणीचे रिपोर्ट**

हें कलम अर्थात् परिशिष्ट १ भाग १ मधील घटकांना लागू आहे. हिशोब-तपासनिसाचे रिपोर्ट कायदेमंडळापुढें ठेवले पाहिजेत. कायदेमंडळाची एक सार्वजनिक हिशोब समिति ( Public Accounts Committee ) असते. ती हे वृत्तांत पाहते. त्याबाबत योग्य त्या अधिकाऱ्यांना सवालजबाब करतें; खुलासे मागते व ही समिति आपला रिपोर्ट मग कायदेमंडळास सादर करतें. त्यावर सभागृह चर्चा करतें. अशा रीतीनें लोकमत जागरूक राहतें व दिलेले कर योग्य रीतीनें सरकार खर्च करतें कीं नाहीं, हें लोकांना समजूं शकतें.

# भाग ७

## परिशिष्ट एक, भाग २ मधील घटकांबाबत

परिशिष्ट एक, भाग २ यांतील घटकांचा कारभार

२१२. (१) या भागांतील इतर व्यवस्थेचें पालन करून, परिशिष्ट एक, भाग २ मधील घटकांचा कारभार अध्यक्ष त्याला वाटेल त्या प्रमाणांत, चीफ कमिशनर अगर उपप्रमुख यांना नेमून त्यांच्यामार्फत अगर जवळच्या प्रांताच्या प्रमुखामार्फत अगर संस्थानाच्या अधिपतीमार्फत चालवील.

मात्र शेजारच्या प्रांताच्या प्रमुखामार्फत अगर संस्थानच्या अधिपतीमार्फत चालविणें झाल्यास

(अ) त्या प्रमुखाचा अगर संस्थानिकाचा सल्ला घेतला जाईल व

(ब) अध्यक्ष ठरवील त्या रीतीनें घटकांतील जनतेची त्याबाबतची इच्छा काय आहे हें पाहिलें जाईल.

(२) परिशिष्ट एक भाग ३ मधील एखाद्या संस्थानिकानें आपल्या संस्थानच्या कारभाराबाबत सर्व अधिकार व सर्व सत्ता हिंदुस्थान सरकारच्या स्वाधीन केली असेल, तर त्या संस्थानचा कारभार जणूं कांहीं परिशिष्ट एक भाग २ मधील तें एक घटक आहे असें समजून चालविला जाईल व या घटनेंतील भाग २ मधील घटकांना लागू पडणारीं कलमें त्याला लागू होतील.

या भागांत जे कमिशनरचे प्रांत आहेत, त्यांच्या कारभाराबाबत विचार केला आहे. हे प्रांत म्हणजे दिल्ली, अजमीर-मेरवाडा व कुर्ग. या प्रांतांना स्वायत्तता देणें अशक्य आहे. हे लहान प्रांत आहेत. या प्रांताच्या मुख्य कमिशनरला सल्लामसलत देणारें कौन्सिल असेल. असे लहान प्रांत न ठेवतां त्यांना जवळच्या प्रांतांत सामील करून घेणें इष्ट वाटतें. फक्त दिल्ली प्रांत, कीं ज्या ठिकाणीं मध्यवर्ती सरकारची राजधानी आहे तो स्वतंत्र प्रांत असावा व त्याचा कारभार सरळ मध्यवर्ती सरकारनें पहावा. स्थानिक स्वराज्याच्या दृष्टीनें अमेरिकेची राजधानी जी वॉशिंग्टन, तो

संघ-राज्याचा ( federal division ) एक भाग म्हणून मानला आहे व त्याची व्यवस्था मध्यवर्ती सरकार पाहतें. अशा व्यवस्थेनें संघर्ष टळतो. वरील प्रांतांचा कारभार या कलमानें चीफ कमिशनर किंवा जवळच्या प्रांताचा प्रमुख यामार्फत चालणार व त्याची जबाबदारी अध्यक्षावर आहे. तसेंच भाग ३ मधील जीं मोठीं संस्थानें आहेत, त्यांपैकीं एखाद्या संस्थानच्या संस्थानिकानें आपली सत्ता व अधिकार हिंदुस्थान सरकारला दिले, तर त्याची व्यवस्था या भागांत सांगितलेल्या व्यवस्थेला अनुसरून होईल, म्हणजे अर्थात् चीफ कमिशनर नेमून अगर जवळच्या प्रांताच्या प्रमुखामार्फत त्याचा कारभार चालेल.

**कायदेमंडळ अगर सल्लागारमंडळ नेमणें**

२१३. परिशिष्ट १, भाग २, यांत नमूद केलेल्या घटकांचा कारभार, जो चीफ कमिशनर अथवा उपप्रमुखामार्फत चालविण्याचा आहे, त्या कामीं अध्यक्ष वाटल्यास

( अ ) स्थानिक कायदेमंडळ अगर

( ब ) सल्लागार मंडळ अगर दोन्ही नेमील अगर चालू ठेवील

व त्यानें कोणते अधिकार चालवावे, त्याची घटना काय असावी, त्याला सत्ता काय असावी हें सर्व त्या हुकुमांत नमूद करील.

**कुर्ग**

२१४. अध्यक्ष दुसरी कांहीं व्यवस्था करीपर्यंत कुर्गच्या कायदे-कौन्सिलची सत्ता, अधिकार व घटना, त्याचप्रमाणें कुर्गची जमा व खर्चाची व्यवस्था, यांत कांहीं बदल होणार नाहीं.

कलम २१३ मध्यें वरील छोट्या प्रांतासाठीं अध्यक्षानें कायदेमंडळ अगर सल्लागारमंडळ नेमण्याची अगर पूर्वीपासून तें अस्तित्वांत असल्यास तें चालू ठेवण्याची व्यवस्था आहे. या कायदेमंडळाची घटना वगैरे सर्व कांहीं तो ठरवील. तात्पर्य, हे घटक अध्यक्षाच्या देखरेखीखालीं राहणार आहेत. कलम २१४ याप्रमाणें कुर्गची विद्यमान व्यवस्था अध्यक्ष बदलीपर्यंत चालू राहील. हे लहान घटक ठेवणें म्हणजे तेथील जनतेला मागासलेलें ठेवणें आहे. पूर्ण स्वायत्तता देणें योग्य नाहीं व एखादें कौन्सिल अगर सल्लागार मंडळ नेमल्यानें तेथील जनतेचें समाधान होणार नाहीं. यांत उत्तम उपाय म्हणजे दिल्लीशिवाय बाकीचे असले छोटे प्रांत नजदीकच्या राज्यव्यवस्थेंत सामील करणें हा होय.

# भाग ८

## परिशिष्ट एक, भाग ४ मधील प्रदेशांबाबत आणि या परिशिष्टांत उल्लेख नसलेल्या प्रदेशांबाबत

परिशिष्ट एक, भाग ४ मधील प्रदेश व परिशिष्टांत नसलेले प्रदेश यांचा कारभार

२१५. ( १ ) परिशिष्ट एक, भाग ४ यांत नमूद केलेले प्रदेश, तसेच हिंदुस्थानांत समाविष्ट असलेले पण सदर्हू परिशिष्टांत नसलेले प्रदेश, यांचा कारभार अध्यक्ष चीफ कमिशनर अगर अन्य अधिकारी नेमून त्यांच्या-मार्फत जितक्या प्रमाणांत त्याला योग्य वाटेल, तेवढ्या प्रमाणांत चालवील.

( २ ) या प्रदेशांतील शांतता व सुराज्य यासाठीं अध्यक्ष नियम जाहीर करील व या नियमांनीं त्याला या प्रदेशांत लागू असलेला पार्लमेंटनें केलेला कायदा रद्द करतां येईल अगर दुरुस्त करतां येईल व अध्यक्षानें जाहीर केलेल्या नियमांना या प्रदेशापुरतें पार्लमेंटनें त्या प्रदेशांसाठीं केलेल्या कायद्याइतकें प्राबल्य व प्रभाव असेल.

या कलमांतील व्यवस्था अंदमान व निकोबार बेटें यांच्यासाठीं आहे. तसेंच जे प्रदेश परिशिष्ट एकमध्यें नाहींत, पण हिंदुस्थानांत समाविष्ट आहेत, त्यांनाही ही व्यवस्था लागू पडेल. तात्पर्य, एखादा प्रदेश आज हिंदुस्थानांत नाहीं म्हणून परिशिष्ट एकमध्यें नाहीं, पण उद्यां आला तर त्याच्यासंबंधीं व्यवस्था या कलमांत आहे. अर्थात् या कलमांत सांगितलेला कारभार कसा असावा, हें सर्व अध्यक्ष ठरवील.

# भाग ९

## संघ व घटक-राज्यें यांचे संबंध

# प्रकरण १ लें–कायदेकानूविषयक संबंध

## कायदेकानूविषयक अधिकारांतील विभागणी

**पार्लमेंट व घटक-राज्यांच्या कायदेमंडळांनीं केलेल्या कायद्यांचा व्याप**

२१६. (१) या घटनेंतील व्यवस्थेला अनुसरून, पार्लमेंट हिंदुस्थानांतील सर्व प्रदेशांसाठीं अगर एखाद्या भागासाठीं कायदे करील, तसेंच घटक-राज्याचें कायदे-मंडळ त्या राज्याच्या सर्व प्रदेशांसाठीं अगर त्याच्या भागासाठीं कायदे करील.

(२) पार्लमेंटचा कोणताही कायदा, त्याचा परिणाम अधिकार-क्षेत्राबाहेर होतो म्हणून गैरकायदा ठरणार नाहीं.

ज्याच्या त्याच्या प्रादेशिक क्षेत्रांत जें तें कायदेमंडळ कायदे करण्यास समर्थ आहे. पार्लमेंट म्हणजे हिंदुस्थानच्या संघ-राज्याचें कायदेमंडळ हें हिंदुस्थानांतील सर्व प्रदेशांबाबत कायदे करण्यास समर्थ आहे. शिवाय पार्लमेंटचा कायदा अधिकार-क्षेत्राबाहेर परिणाम करतो, एवढ्यावरून तो अवैध अथवा गैरकायदा ठरणार नाहीं, अगर पार्लमेंटला तसा कायदा करण्याचा अधिकार नाहीं, असाही आक्षेप घेतां येणार नाहीं.

कायद्याचा अंमल प्रदेशविषयक व व्यक्तिविषयक असा द्विविध असतो. प्रदेशविषक म्हणजे त्या प्रदेशांतील व्यक्तींवर व त्यांच्या संबंधांवर तो परिणाम करतो. व्यक्तिविषयक म्हणजे एकाद्या व्यक्तीला, कीं जी नागरिक या नात्यानें कायद्याखालीं येते, तिला तो कायदा त्या राज्याबाहेरच्या प्रदेशांतसुद्धां लागू पडतो. एकपत्नीत्वाचा कायदा हा समजा, हिंदी नागरिकावर लागू असेल, तर तो नागरिक हिंदुस्थानाबाहेर गेला व तेथें त्यानें दुसरी पत्नी केली तरी तो गुन्हा होय, मग तेथील कायद्यानें तो गुन्हा असो अगर नसो.

पार्लमेंट व अन्य कायदेमंडळें व कायद्यांचें विषयक्षेत्र

२१७. ( १ ) पुढील दोन पोटकलमांत कांहींही असलें, तरी पार्लमेंटलाच फक्त परिशिष्ट सात, यादी १, यांत नमूद केलेल्या बाबीबाबत कायदे करण्याची सत्ता आहे. ( ही यादी संघ-यादी म्हणून या घटनेंत संबोधिली आहे. )

( २ ) पुढील पोटकलमांत कांहींही असलें, तरी पार्लमेंटला, व मागील पोटकलमाला अनुसरून परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाच्या कायदेमंडळाला परिशिष्ट सात, यादी ३,यांत नमूद केलेल्या बाबीबाबत कायदे करण्याची सत्ता आहे. ( ही यादी समान यादी म्हणून या घटनेंत संबोधिली आहे. )

( ३ ) मागील दोन पोटकलमांना अनुसरून, परिशिष्ट एक, भाग १, यांतील घटकाच्या कायदेमंडळालाच फक्त परिशिष्ट सात, यादी २, यांतील बाबीबाबत कायदे करण्याची सत्ता आहे. ( ही यादी घटक-राज्याची यादी म्हणून या घटनेंत संबोधिली आहे. )

( ४ ) पार्लमेंटला परिशिष्ट एक भाग, १ व ३ यांत नमूद नसलेल्या प्रदेशाबाबत अगर त्याच्या भागाबाबत वाटेल त्या बाबतींत मग ती बाब घटक-राज्याच्या यादींत असली, तरी कायदे करण्याची सत्ता आहे.

एकंदर राज्यकारभाराच्या बाबींचें वर्गीकरण करून त्या तीन याद्यांत घातल्या आहेत. संघ-यादी म्हणजे जे विषय साधारणतः मध्यवर्ती स्वरूपाचे आहेत, व ज्याबाबत कायदा हा मध्यवर्ती सरकारनें करणें इष्ट आहे, अशा बाबींची होय. चलन, संरक्षण, वाहतुक, पोस्ट याबाबत, तसेंच परदेशांतील व्यापाराबाबत आयात-निर्यात, कांहीं करांबाबत, राष्ट्रीय कर्जाबाबत मध्यवर्ती सरकारनेंच कायदे करणें योग्य व आवश्यक असतें. प्रत्येक प्रांताचें सैन्य अगर नाणें असणें योग्य नाहीं. कांहीं बाबी केवळ प्रांतिक स्वरूपाच्या असतात व त्यांचें स्वरूप व व्याप पण स्थानिक असतो. त्या बाबींचा समावेश घटक-राज्याची यादी तयार करून त्यांत केला आहे. उदाहरणार्थ, सुव्यवस्था, न्यायदान, बंदोबस्त, सार्वजनिक बांधकामें, स्थानिक स्वराज्य, वगैरे.

कांहीं बाबी जरी स्थानिक स्वरूपाच्या असल्या, तरी त्यांना अधिक महत्त्व असतें व त्या मध्यवर्ती सरकारच्याही कक्षेंत येऊं शकतात, व यांबाबत सामान्यपणें सर्वत्र सारखा कायदा असणें इष्ट असतें. हें क्षेत्र समान बाबीचें क्षेत्र समजून त्यांची एक यादी केली आहे व ती समान यादी होय. या बाबींबाबत दोन्ही सरकारच्या कायदे-मंडळांना कायदे करतां येतील. मात्र पार्लमेंटचा कायदा व घटक कायदेमंडळाचा कायदा यांत विसंगति असल्यास पार्लमेंटचा कायदा प्रभावी मानला जाईल. समान बाबीमध्यें फौजदारी कायदा, लग्नविषयक कायदे इत्यादिकांचा समावेश आहे. या यादीबरहुकुम कायदे करण्याचा अधिकार आहे. पार्लमेंटलाच फक्त संघ-यादीबाबत, घटक कायदेमंडळालाच फक्त घटकराज्याच्या यादीबाबत व दोघांनाही समान यादीबाबत कायदे करण्याचा अधिकार आहे. मागील कलमांत अधिकारप्रदेश सांगितला. या कलमांत विषयक्षेत्र निश्चित केलें आहे.

**प्रमुख न्यायालया-बाबत कायदा**

२१८. प्रमुख न्यायालयाची घटना, त्याचें संघटन, त्याचें क्षेत्र व अधिकार यांबाबत कायदा करण्याचा अधिकार फक्त पार्लमेंटलाच आहे.

**अधिक न्यायालयें स्थापन करण्याची पार्लमेंटची सत्ता**

२१९. या प्रकरणांत कांहींही असलें, तरी संघ-यादींतील बाबीसंबंधांतील विद्यमान कायदे अगर पार्लमेंट करील ते कायदे यांचा कारभार अधिक चांगला व्हावा या दृष्टीनें पार्लमेंटला कायदा करून अधिक न्यायालयें स्थापतां येतील.

जेव्हां जरूर पडेल तेव्हां अधिक कोर्टें पार्लमेंटला स्थापतां येतील व प्रमुख न्यायालयासंबंधींचा सर्व अधिकार पार्लमेंटला आहे. कारण पार्लमेंट ही मध्यवर्ती कायदे करणारी संस्था आहे.

**मुख्य कोर्टाची स्थापना व संघटन यांबाबत कायदा**

२२०. (१) परिशिष्ट एक, भाग १, यांतील घटकाच्या कायदेमंडळालाच फक्त त्याच्या प्रदेशांत मुख्य ठाणें असणाऱ्या मुख्य कोर्टाची घटना व संघटनसंबंधीं कायदा करण्याचा अधिकार आहे.

(२) परिशिष्ट एक, भाग २, यांतील घटकांत मुख्य ठाणें असलेल्या मुख्य कोर्टाची घटना व संघटनबाबत कायदा करण्याचा हक्क फक्त पार्लमेंटलाच आहे.

ज्या प्रदेशांत मुख्य कोर्टाचें मुख्य ठाणें असेल, तेथील कायदेमंडळालाच फक्त त्याच्याबाबत कायदे करण्याचा हक्क आहे. या कोर्टात किती न्यायाधीश असावेत, तसेंच त्याच्या कचेरीचें संघटन कसें असावें हें सर्व तें कायदेमंडळ कायदा करून ठरवील. कमिशनरचे प्रांत म्हणजे अजमीर-मेरवाडा वगैरे यांबाबत पार्लमेंट कायदा करून हें ठरवील. त्या प्रदेशाबाबत पार्लमेंटलाच फक्त अधिकार आहे.

**मुख्य कोर्टाचें क्षेत्र व अधिकार यांबाबत कायदा**

२२१ ( १ ) संघ-यादींतील बाबीसंबंधांत मुख्य कोर्टाचें क्षेत्र व अधिकार याबाबत कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटलाच फक्त आहे.

( २ ) घटक-राज्याच्या यादींतील बाबीसंबंधांत परिशिष्ट एक, भाग १, यांतील घटकांच्या कायदेमंडळालाच फक्त त्या प्रदेशांत अधिकार असणाऱ्या मुख्य कोर्टाचा अधिकार व क्षेत्र यांबाबत कायदा करण्याचा अधिकार आहे.

( ३ ) समान यादींतील बाबीसंबंधांत परिशिष्ट एक, भाग १, यांतील घटकाच्या कायदेमंडळाला तसेंच पार्लमेंटलाही त्या त्या प्रदेशांत अधिकार असणाऱ्या मुख्य कोर्टाचा अधिकार व क्षेत्र यांबाबत कायदा करण्याचा अधिकार आहे.

( ४ ) परिशिष्ट एक, भाग २, यांतील घटकांत अधिकार चालविणाऱ्या मुख्य कोर्टाचे अधिकार व क्षेत्र यांबाबत कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे.

संघ-यादींतील बाबीबाबत मुख्य कोर्ट जो अधिकार चालवील व जेथें चालवील त्याबाबत कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे. कारण संघ-यादींतील बाबी मध्यवर्ती स्वरूपाच्या आहेत. त्याच न्यायानें प्रांतिक अगर घटक कायदेमंडळाला घटक-राज्याच्या यादीबाबत मुख्य कोर्टाच्या अधिकाराविषयीं कायदे करण्याचा अधिकार आहे. समान यादीबाबत दोघांना आहे. मुख्य कोर्ट तीन्ही यादींतील बाबीसंबंधांत न्याय देणार, कायदे चाल- विणार, म्हणून तीन्ही क्षेत्रांत त्याचा अधिकार व क्षेत्र हे संबंधीं व समर्थ कायदेमंडळानें ठरविणें हें अगदीं योग्य आहे.

दिवाणी व फौजदारी कामकाजासंबंधीं कायदा

२२२. पार्लमेंटला, तसेंच मुख्य कोर्टाचें मुख्य ठाणें ज्या परिशिष्ट एक, भाग १, यांतील घटक-राज्यांत आहे, त्याच्या कायदेमंडळाला मुख्य कोर्टानें दिवाणी व फौजदारी कामकाज कसें चालवावें याबाबत कायदा करण्याचा अधिकार आहे.

अवशिष्ट कायदे करण्याची सत्ता

२२३. (१) पार्लमेंटला समान यादींत व घटक-राज्याच्या यादींत नसलेल्या कोणत्याही बाबीबाबत कायदा करण्याचा अधिकार आहे.

(२) या अधिकारांत या दोन्हींपैकीं कोणत्याही यादींत उल्लेख नसलेला कर बसविण्याचाही अधिकार समाविष्ट आहे.

कलम २२२ प्रमाणें दिवाणी व फौजदारी कज्जांत कामकाज कसें चालवावें हें ठरविण्याचा अधिकार पार्लमेंट व संबंधी कायदेमंडळाला आहे.

कलम २२३ मध्यें ज्या बाबी समान यादींत अगर घटक-राज्याच्या यादींत नाहींत, व ज्यांचा उल्लेख संघ-यादींत पण नाहीं, अशा ज्या कांहीं असतील त्यांबाबत कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे; म्हणजे शेष अधिकार अगर अवशिष्ट सत्ता पार्लमेंटला आहे हें सांगितलें आहे. अधिकारविभागणी केव्हांही पूर्ण होत नाहीं, म्हणून शेष सत्ता कोणाची ( residuary power ) हें स्पष्ट सांगावें लागतें. या सत्तेंत वरील दोन्ही यादींत नसलेला कर बसविण्याचा अधिकार पण समाविष्ट आहे. तात्पर्य, तोडून दिलेल्या बाबी प्रांतिक कायदेमंडळानें पाहावयाच्या, कांहीं स्पष्ट सांगितलेल्या बाबी दोन्ही कायदेमंडळानीं व बाकीच्या मग त्या संघ-यादींत असोत अगर नसोत, सर्व पार्लमेंटनें पाहावयाच्या आहेत.

२२४. कलम २१७ (१) यांत कांहींही असलें, तरी

पार्लमेंटच्या कायदा करण्याच्या सत्तेवर परिशिष्ट एक, भाग ३ मधील संस्थानांच्याबाबत नियंत्रण

(अ) परिशिष्ट १, भाग ३, यांत नमूद केलेलीं संस्थानें अगर त्यांचे गट यांच्या प्रदेशांत असलेल्या तार व टपाल बाबतींतील हक्कासंबंधीं जोंपर्यंत हिंदुस्थान सरकार व संबंधी संस्थान अगरत्यांचा गट यांत करार झाला नाहीं, अगर

ते हक्क हिंदुस्थान सरकारनें घेतले नाहींत, तोंपर्यंत पार्लमेंटला त्याबाबत कायदा करतां येणार नाहीं.

मात्र या कलमानें पार्लमेंटला असल्या संस्थानांत अगर त्यांच्या गटांत असलेल्या तार व टपाल व्यवस्थेचें नियंत्रण व नियमन करण्यास प्रतिबंध येत नाहीं.

( ब ) परिशिष्ट एक, भाग ३ यांतील संस्थानांतील तार, टपाल, टेलिफोन, बिनतारी संदेश, नभोवाणी आणि अन्य दळणवळणाची साधनें यांबाबत पार्लमेंटला त्यांचें नियमन व नियंत्रण करण्यापुरताच कायदा करण्याचा अधिकार आहे.

( क ) कंपन्यांबाबत कायदा करण्याचा पार्लमेंटला जो अधिकार आहे, त्यांत परिशिष्ट एक, भाग ३, यांतील संस्थानांत संस्थानच्या मालकीच्या अगर नियंत्रणाखालीं असणाऱ्या व संस्थानाच्या हद्दींतच व्यापार करणाऱ्या कंपन्यांची स्थापना, नियमन व विसर्जन यासंबंधीं कायदा करण्याचा अधिकार समाविष्ट नाहीं.

या कलमांत पार्लमेंटच्या कायदे करण्याच्या अगर वैध सत्तेवर काय नियंत्रण आहे हें सांगितलें आहे. परिशिष्ट एक, भाग ३, यांत जीं मोठीं संस्थानें नमूद केलीं आहेत, त्यांत असणाऱ्या तार, टपाल, टेलिफोन, बिनतारी संदेश, नभोवाणी आणि दळणवळणाचीं अन्य साधनें यांबाबत नियमन व नियंत्रण करण्याचा अधिकार फक्त पार्लमेंटला आहे. त्यांच्या मालकी हक्कासंबंधीं कायदा करण्याचा अधिकार नाहीं. करारान्वयें अगर ती बाब हिंदुस्थान सरकारनें विकत घेतल्यास मात्र पार्लमेंटला अधिकार प्राप्त होईल. या कलमांतील बाबी मध्यवर्ती स्वरूपाच्या आहेत. दळणवळण व वाहतुक या स्वरूपाच्या या बाबी आहेत. हिंदुस्थानांत व्यापार करणाऱ्या ज्या कंपन्या ( Corporations ) असतील, त्यांच्याबाबत पार्लमेंटला कायदा करण्याचा अधिकार आहे. पण जर कंपनी सर्वस्वीं या कलमांत सांगितलेल्या संस्थानाच्या

हद्दींतच व्यापार करीत असेल व तिची मालकी अगर नियंत्रण संस्थानाकडे असेल, तर त्याबाबत पार्लमेंटला कायदा करण्याचा अधिकार नाहीं. ही बाब केवळ संस्थानच्या स्वायत्त सत्तेतील आहे व त्या स्वरूपाची असल्यानें पार्लमेंट त्यांत हात घालणार नाहीं.

**परिशिष्ट एक, भाग ३, यांतील संस्थानाबाबत कायदा करण्याची सत्ता व मर्यादा**

**२२५. या प्रकरणांत कांहींही असलें, तरी परिशिष्ट एक, भाग ३, यांत नमूद केलेलें संस्थान अगर त्यांचा गट यांबाबत पार्लमेंटला कायदा करण्याचा जो हक्क आहे तो तें संस्थान अगर तो त्यांचा गट यांनीं हिंदुस्थान सरकारशीं जो करार केला असेल व त्यांत ज्या मर्यादा सांगितल्या असतील, त्यांना अनुसरून असेल.**

परिशिष्ट १, भाग ३ यांत प्रमुख संस्थानें आहेत, त्यांच्या कारभाराबाबत पार्लमेंटला त्यांच्याशीं केलेला करार व त्यांतील मर्यादा यांना धरून कायदे करतां येतील. संस्थानांना असलेली अंतर्गत स्वायत्तता अगर मोकळीक यांत मान्य केलेली आहे व जेवढें राज्यकारभाराचें क्षेत्र करार करून ते देतील, तेवढयापुरते कायदे पार्लमेंट करील व ते तेथें लागू होतील. सर्व संस्थानांनीं करार करून महत्त्वाच्या व मध्यवर्ती स्वरूपाच्या बाबी–संरक्षण, चलन, परराष्ट्रीय संबंध, वाहतुक व दळणवळण –मध्यवर्ती सरकारच्या स्वाधीन केल्या आहेत. हे करार व्यक्तिशः अगर गटशः झालेले आहेत. सामीलनामा असें याला म्हणतात. या सामीलनाम्यांतील मर्यादा संभाळून पार्लमेंट कायदे करील व ते तें संस्थान अगर गट अमलांत आणील.

**राष्ट्राच्या दृष्टीनें घटक-राज्याच्या यादींतील बाबीसंबंधांत पार्लमेंटला कायदा करण्याची सत्ता**

**२२६. या प्रकरणांत पूर्वीं कांहीं आलें असलें, तरी वरिष्ठ कौन्सिलनें जर हजर व मत देणाऱ्या सभासदांच्या संख्येपैकीं $\frac{2}{3}$ नें ठराव करून घटक-राज्याच्या यादींतील एखाद्या बाबीबाबत पार्लमेंटनें कायदा करणें राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें सोईचें अगर अवश्य आहे असें सांगितलें, तर पार्लमेंटला सर्व हिंदुस्थानासाठीं अगर एखाद्या भागासाठीं त्या बाबीबाबत कायदा करतां येईल व तशी कायदेशीर सत्ता पार्लमेंटला प्राप्त होईल.**

ज्या बाबीबाबत प्रांतीय कायदेमंडळांनाच कायदे करण्याचा अधिकार आहे, अशा बाबीबाबत पार्लमेंटनें कायदा करणें राष्ट्रहितासाठीं सोयीचें अगर अवश्य असेल तर तशी सत्ता पार्लमेंटला असली पाहिजे. ही सत्ता कशी प्राप्त होते, हें या कलमांत सांगितलें आहे. वरिष्ठ कौन्सिलनें ⅔ बहुमतानें ठराव पास करून पार्लमेंटला तसेंस ांगितलें म्हणजे ही सत्ता प्राप्त होते.

**आणीबाणीच्या परिस्थितींत प्राप्त होणारी सत्ता**

**२२७. (१) आणीबाणीची परिस्थिति आहे असें जाहीर झाल्यानंतर व जाहीरनामा अमलांत असेपर्यंत घटक-राज्याच्या यादींतील कोणत्याही बाबीबाबत पार्लमेंटला हिंदुस्थानांतील सर्व प्रदेशाबाबात अगर भागाबाबत कायदा करण्याचा अधिकार आहे.**

**(२) आणीबाणीच्या परिस्थितीबाबत जाहीरनामा नसता, तर जो कायदा पार्लमेंटला करतां आला नसता, तो कायदा ज्या प्रमाणांत अधिकाराबाहेर असेल त्या प्रमाणांत जाहीरनामा रद्द झाल्यापासून तो सहा महिन्यांनीं रद्द होईल; मात्र ही मुदत संपण्यापूर्वी ज्या गोष्टी केल्या अगर केल्या नाहींत, त्यांवर सदर कायदा रद्द झाल्यानें कांहीं परिणाम होणार नाहीं.**

तीन याद्यांपैकीं दोन याद्या—संघ-यादी व समानयादी, यांबाबत पार्लमेंटला केव्हांही कायदा करतां येतो. घटक-राज्याच्या यादींतील बाबीबाबत त्या त्या कायदे-मंडळालाच अधिकार आहे. तथापि आणीबाणीची परिस्थिति जाहीर होतांच व तत्संबंधींचा जाहीरनामा अमलांत असेपर्यंत याही यादीबाबत कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटला प्राप्त होतो व तो कायदा देशभर अगर त्यांत नमूद केलेल्या भागावर जारी होतो. हा कायदा जाहीरनामा रद्द होऊन सहा महिने होईपर्यंत अमलांत राहील व त्यानंतर त्याचा जेवढा भाग पार्लमेंटच्या अधिकाराबाहेर सामान्य परिस्थितींत आहे, तेवढा रद्द होईल. मात्र त्यायोगें झालेल्या गोष्टीवर कांहीं परिणाम होत नाहीं. म्हणजे तीं कृत्यें गैरकायदा ठरत नाहींत अगर त्याअन्वयें ज्या योजना झाल्या असतील, त्याबद्दल आक्षेप येऊं शकत नाहीं. आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली व प्रत्येक कायदेमंडळालाच कायदा करणें प्राप्त झालें तर वेळ जाईल व कदाचित् परिस्थिति अधिक बिघडेल; यासाठीं व तसेंच सुसूत्रता सर्वत्र राहावी यासाठीं ही सत्ता पार्लमेंटला मर्यादित कालपर्यंत असणें ठीक आहे.

२२८. कलम २२६ व २२७ यांतील कोणत्याही व्यवस्थेनें घटक कायदेमंडळाच्या, या घटनेप्रमाणें असलेल्या अधिकारावर कांहींही बंधन येत नाहीं; मात्र घटक कायदेमंडळानें केलेला कायदा पार्लमेंटनें या कलमांन्वयें केलेल्या कायद्याशीं विसंगत असेल तर पार्लमेंटनें केलेला कायदा मग तो घटक-राज्यानें केलेल्या कायद्यापूर्वीचा असो अगर नंतरचा असो, प्रभावी आहे, व ज्या प्रमाणांत घटक कायदेमंडळाचा कायदा पार्लमेंटच्या कायद्याशीं विसंगत असेल, त्या प्रमाणांत तो रद्द ठरेल; मात्र हें पार्लमेंटचा कायदा जारी आहे तोपर्यंतच होईल.

**कलम २२६ व २२७ या अन्वयें केलेले कायदे व घटक कायदेमंडळांनीं केलेले कायदे यांतील विसंगतता**

पार्लमेंटचा कायदा व प्रांतांतील कायदेमंडळाचा कायदा यांत विरोध आल्यास पार्लमेंटचा कायदा प्रभावी व तेवढया प्रमाणांत प्रांतीय कायदा रद्द ठरेल. दोन विसंगत कायदे चालू ठेवणें म्हणजे लोकव्यवहार धोक्यांत आणणें होय. कायदा स्पष्ट पाहिजे, निश्चित पाहिजे. या दृष्टीनें विरोध असल्यास त्यांत प्रभावी कोणता हें येथें स्पष्ट केलें आहे. मध्यवर्ती विधिमंडळाचा कायदा प्रभावी समजला जातो; तेंच येथें केलें आहे. संयुक्त अगर संघस्वरूपी घटना जेथें आहे, तेथें हें तत्त्व स्वीकारलें जातें. सामान्यतः देशासाठीं एक कायदेमंडळ असतें, पण मोठा देश म्हणून घटना संघ स्वरूपाची असल्यामुळें त्यांत मध्यवर्ती कायदेमंडळाप्रमाणेंच घटक कायदेमंडळें असणें जरूर होतें व त्यामुळें क्षेत्र, विषय, इत्यादींबाबत विभागणी करणेंही क्रमप्राप्त असते-त्याचप्रमाणें विरोध अगर संघर्ष झाल्यास श्रेष्ठ कोण हेंही ठरवावें लागतें.

२२९. (१) घटकांतील एका अगर अधिक कायदेमंडळांना कलम २२६ व २२७ या व्यतिरिक्त, पार्लमेंटला कायदा करतां येत नाहीं अशा बाबतींत पार्लमेंटनें कायदा करणें इष्ट आहे असें वाटलें, तर त्या त्या घटकांतील एका अगर जेथें दोन असतील तेथें दोन्ही सभागृहांनीं त्या संबंधांत तसे ठराव पास केल्यास पार्लमेंटला ठरावाप्रमाणें कायदा करतां येईल व तो कायदा ठराव करणाऱ्या घटकांत जारी होईल. तसेंच

**दोन अगर अधिक घटकांच्या संमतीनें कायदा करण्याचा अधिकार**

दुसऱ्या कोणत्याही घटकाला कायदेमंडळाचा ठराव करून तो अमलांत आणतां येईल.

( २ ) याप्रमाणें पार्लमेंटनें पास केलेला कायदा पार्लमेंटच्या कायद्यानेंच दुरुस्त अगर रद्द होईल, पण जेथें तो जारी आहे त्या घटकाच्या कायदेमंडळाला तो रद्द अगर दुरुस्त करतां येणार नाहीं.

कलम २२६ व २२७ मध्यें जेव्हां राष्ट्राच्या हितासाठीं, अगर आणीबाणीची परिस्थिति असेल तेव्हां पार्लमेंटला सामान्यतः अधिकार नसलेल्या विषयाबाबत कायदा करतां येतो. या कलमानें, जर एखाद्या घटकानें अगर अधिक घटकांनीं आपल्या कायदेमंडळामार्फत ठराव पास करून पार्लमेंटला असा कायदा करण्यास सांगितलें तर पार्लमेंट तसें करील. मग आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली आहे अगर राष्ट्राच्या हितार्थ जरूर आहे असा वरिष्ठ कौन्सिलचा ठराव करण्याची जरूरी नाहीं. हा कायदा पास झाला म्हणजे तो एक त्या विषयाबाबत नमुना ( Form ) होतो, व अन्य घटकांनाही तो कायदेमंडळाचा ठराव करून लागू करतां येतो. याप्रमाणें त्या विषयाबाबत सुसूत्रता सर्वत्र येते. अशा प्रकारचा एकदा कायदा झाला म्हणजे तो रद्द करणें अगर दुरुस्त करणें झाल्यास तो अधिकार पार्लमेंटला आहे. व्यक्तिशः घटकाला तो रद्द अगर दुरुस्त करतां येणार नाहीं.

**आंतरराष्ट्रीय करारांना प्रभावी करण्याचे कायदे**

२३०. या प्रकरणांतील मागील कलमांत कांहींही असलें, तरी अन्य राष्ट्रांशीं केलेला करार, तहनामा, अगर संकेत यांबाबत ते अमलांत आणण्यासाठीं जरूर तो कायदा कोणत्याही घटकासाठीं अगर त्याच्या भागासाठीं करण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे.

सर्व शेष अधिकार पार्लमेंटला आहेतच. तथापि अनिश्चितता शक्य तेवढी कमी व्हावी म्हणून निरनिराळ्या क्षेत्रांतील अधिकाराची घोषणा या प्रकरणांत केली आहे. या कलमांत आंतरराष्ट्रीय तहनामे, करार, संकेत हे अमलांत आणण्यासाठीं अवश्य ती कायदे करण्याची सत्ता पार्लमेंटला दिली आहे. या कलमाप्रमाणें कायदा करून तो कोणत्याही घटकांत अगर त्याच्या भागांत लागू करतां येईल.

**पार्लमेंट व अन्य कायदेमंडळें यांच्या कायद्यांतील विरोध**

२३१. (१) घटकाच्या कायदेमंडळानें केलेला कायदा पार्लमेंटला अधिकार असलेल्या बाबतींत केलेल्या कायद्याशीं विसंगत असेल, अगर ज्या बाबतींत पार्लमेंटला अधिकार आहे अशा एखाद्या विद्यमान कायद्याशीं विसंगत असेल तर या कलमाचें पो. कलम (२) चें पालन करून, पार्लमेंटनें केलेला कायदा, मग तो घटक कायदेमंडळाच्या कायद्याच्या आधीं केलेला असो अगर नंतर केलेला असो, अगर विद्यमान कायदा, जसें असेल तसें, प्रभावी ठरेल व त्याच्याशीं घटक कायदेमंडळाचा कायदा ज्या प्रमाणांत विसंगत असेल, त्या प्रमाणांत तो रद्द होईल.

(२) परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाच्या कायदेमंडळानें समान यादींतील बाबीबाबत एखादा कायदा केला, व तो जर त्यापूर्वीं त्याच बाबतींत पार्लमेंटनें केलेल्या कायद्याशीं अगर विद्यमान कायद्याशीं विसंगत असेल व जर तो कायदा अध्यक्षाच्या विचारासाठीं राखून ठेवलेला होता व त्याला अध्यक्षाची संमति मिळून पास झाला असेल तर तो कायदा पार्लमेंटनें केलेल्या कायद्यावर प्रभावी ठरेल.

मात्र यामुळें पार्लमेंटला त्याच बाबतींत घटक कायदेमंडळानें केलेला कायदा दुरुस्त करणें अगर रद्द करणें अगर नवीन कायदा करणें या बाबतींत प्रतिबंध येणार नाहीं.

सामान्यतः जेथें जेथें प्रांतीय कायदा व मध्यवर्ती कायदा यांत विरोध येईल तेथें मध्यवर्ती कायदा प्रभावी व विसंगतीच्या प्रमाणांत प्रांतीय कायदा रद्द ठरेल. (२) यांत अपवाद सांगितला आहे. कारण घटक कायदेमंडळाचा कायदा अध्यक्षानें विचार करून संमति दिल्यानंतर तो अधिक महत्त्वाचा ठरतो, व त्या स्थितींत तो जरी पार्लमेंटच्या कायद्याशीं विसंगत असेल, तरी प्रभावी ठरेल. अर्थात् अध्यक्ष त्याच्या विचारासाठीं कायदा आल्यानंतर त्या बाबीसंबंधांत पार्लमेंटनें केलेले अगर अन्य विद्यमान कायदे असतील ते लक्षांत घेऊनच मान्यता देईल, व विसंगतीचे प्रसंग क्वचित्च येतील. तथापि आले तर (२) यांत सांगितल्याप्रमाणें परिणाम होईल.

असें झालें म्हणजे पार्लमेंटला नवीन कायदा करून विसंगतीचा परिहार करणें जरूर पडेल व तसा अधिकार कलमांत दिला आहे. पार्लमेंट कायदा करून प्रांतीय कायदा दुरुस्त करील, रद्द करील अगर स्वतःचा नवीन कायदा करून विसंगति दूर करील. विसंगति फार काळ ठेवणें कधींही योग्य होत नाहीं.

## कायदे करण्याबाबतच्या सत्तेवर मर्यादा

शिफारशीबाबतची व्यवस्था कामकाजी स्वरूपाची समजणें

२३२. पार्लमेंटचा अगर परिशिष्ट एक, भाग १ मधील घटक-राज्याच्या कायदेमंडळाचा कोणताही कायदा अगर त्यांतील कोणतीही व्यवस्था घटनेंत सांगितलेली शिफारस घेण्याची राहिली, एवढ्या कारणासाठीं गैर-कायदा ठरणार नाहीं; जर त्या कायद्याला

(अ) प्रमुखाची शिफारस हवी होती; पण प्रमुखाची अगर अध्यक्षाची मान्यता मिळाली असेल;

(ब) अध्यक्षाची शिफारस हवी होती, पण अध्यक्षाची मान्यता मिळाली असेल

तर.

घटनेप्रमाणें कांहीं कायदे कायदेमंडळांत बिलरूपानें दाखल करण्यापूर्वी प्रमुखाची अगर अध्यक्षाची शिफारस लागते. ही बाब कामकाजी स्वरूपाची (Procedural) आहे. अशी शिफारस नसतांना जर कायदा पास झाला, तर तो तेवढ्या कारणाकरतां अवैध अगर गैरकायदा ठरणार नाहीं; मात्र घटनेप्रमाणें प्रमुखाची अगर अध्यक्षाची मान्यता मिळालेली असली म्हणजे झालें.

# प्रकरण २ रें—कारभारविषयक संबंध

## सामान्य

संघ व घटक यांच्या जबाबदाऱ्या

२३३. प्रत्येक घटकाची कार्यकारी सत्ता अशी चालविली जाईल कीं पार्लमेंटनें केलेले कायदे व त्या त्या घटक प्रदेशांत जारी असलेले कायदे यांना धरून कामकाज होईल,

व संघाच्या कार्यकारी सत्तेला याबाबत हिंदुस्थान सरकारला जरूर वाटतील ते आदेश घटकांना देण्याचा अधिकार आहे.

कार्यकारी सत्तेचें काम प्रचलित कायदे असतील त्यांना धरून चाललें पाहिजे. ही जबाबदारी कार्यकारी सत्तेवर आहे. मग हे कायदे घटक कायदेमंडळाचे असोत अगर पार्लमेंटचे असोत. त्या सर्वांना धरून राज्यकारभार चालवण्याची जबाबदारी कार्यकारी सत्तेवर आहे. घटकांतील कार्यकारी सत्ता ही जबाबदारी आपल्या क्षेत्रांत संभाळील व संघाची कार्यकारी सत्ता म्हणजे मध्यवर्ती कार्यकारी सत्ता अवश्य ते आदेश या बाबतींत देईल, तसा अधिकार तिला दिला आहे.

**संघाचा अधिकार राखण्याचें घटकांचें कर्तव्य**

२३४. (१) प्रत्येक घटक-राज्याची कार्यकारी सत्ता अशी चालविली जाईल कीं, संघाच्या कार्यकारी सत्तेच्या कामकाजांत अडथळा अगर विरोध उत्पन्न होणार नाहीं, आणि संघाच्या कार्यकारी सत्तेला या बाबतींत हिंदुस्थान सरकारला अवश्य वाटणारे आदेश घटकांना देण्याचा अधिकार आहे.

(२) राष्ट्रीय व लष्करी महत्त्वाच्या दृष्टीनें अवश्य म्हणून जाहीर झालेल्या दळणवळणाच्या साधनांबाबत ( Communications ), त्यांची निर्मिति व निगा यांसाठींही संघाच्या कार्यकारी सत्तेला घटकांना आदेश देण्याचा अधिकार आहे.

मात्र या कलमानें, पार्लमेंटच्या, राष्ट्रीय मार्ग अगर जलमार्ग जाहीर करण्याच्या अधिकारावर अथवा अशा जाहीर झालेल्या राष्ट्रीय मार्गावर व जलमार्गावर संघाची जी सत्ता आहे त्यावर, अथवा नाविक, लष्करी अगर विमानदळाबाबतचीं दळणवळणाचीं साधनें निर्माण करणें व त्यांची निगा राखणें यांबाबतच्या संघाच्या अधिकारावर कांहींही मर्यादा पडणार नाहीं.

घटकांतील कार्यकारी सत्तेनें मुख्य व मध्यवर्ती कार्यकारी सत्ता म्हणजे संघसत्ता हिच्या कामांत अडथळा अगर विरोध येईल, असें वागतां कामा नये. संघाच्या कार्यकारी सत्तेला अविरोधेंकरून वागणें हें तिचें कर्तव्य आहे व या बाबतींत जरूर

ते आदेश संघाची कार्यकारी सत्ता देऊं शकेल. जसें दोन कायदेमंडळांनीं केलेल्या कायद्यांत विरोध नसावा, तसेंच संयुक्त घटनेंत ज्या दोन कार्यकारी सत्ता असतात, त्यांत विरोध असतां कामा नये. प्रांतीय सरकार व मध्यवर्ती सरकार यांच्या राज्य-कारभाराच्या कार्यांत विरोध नसावा. सरकार म्हणजे कार्यकारी सत्ता. घटकांतील कार्यकारी सत्तेचें कर्तव्य मध्यवर्ती कार्यकारी सत्तेला धरून वागण्याचें आहे. असें न होईल तर राज्यकारभारांत एकसूत्रीपणा राहणार नाहीं. तार-टपालादि दळणवळणाचीं साधनें निर्माण करणें व त्यांची निगा राखणें यांबाबत जरूर ते आदेश संघाची कार्यकारी सत्ता घटकांना देईल. राष्ट्रीय मार्ग व जलमार्ग यांबाबत पार्लमेंट व संघ यांचे जे अधिकार आहेत, त्यांवर कांहींही मर्यादा या कलमामुळें बसणार नाहीं. संघाला वाटेल तेव्हां संरक्षणाच्या दृष्टीनें तार, टेलिफोन, बिनतारी संदेश यांबाबत कार्य करण्याचे हक्क आहेत; तेही अबाधित आहेत. संघ केव्हांही हीं साधनें निर्माण करील व त्यांची निगा राखील.

**संघाचा घटकांना सत्ता देण्याचा अधिकार**

२३५. (१) घटनेंत कांहींही असलें, तरी अध्यक्ष घटक सरकारच्या संमतीनें, ज्या बाबीबाबत संघाच्या कार्यकारी सत्तेला अधिकार आहे अशा बाबीबाबतचीं कामें करण्याचा अधिकार सशर्त अगर बिनशर्त त्या सरकारला अगर त्याच्या अधिकाऱ्यांना देईल.

(२) ज्या बाबतींत घटक कायदेमंडळाला कायदे करण्याचा अधिकार नाहीं, अशी बाब असली तरी त्यांतही पार्लमेंटनें केलेल्या व घटक प्रदेशांत लागू असलेल्या कायद्यानें घटकावर अगर त्याच्या अधिकाऱ्यांवर कांहीं कर्तव्यें लादतां येतील; तसेंच त्यांना कांहीं अधिकार बहाल करतां येतील अगर तसें करण्याचे अधिकार देतां येतील.

(३) जेव्हां प्रस्तुत कलमाप्रमणें घटकावर अगर त्याच्या अधिकाऱ्यांवर कांहीं कर्तव्यें लादलीं जातील अगर कांहीं अधिकार बहाल केले जातील, त्या वेळीं हिंदुस्थान सरकार त्याला काम करण्याबाबत जो अधिक खर्च आला असेल, त्याबाबत जी रक्कम करारानें ठरली असेल, ती अगर करार झाला नसल्यास हिंदुस्थानचा प्रमुख न्यायाधीश याबाबत जो लवाद नेमील त्या लवादानें ठरवून दिलेली रक्कम देईल.

संघ-कार्यकारी सत्तेचीं कांहीं कामें सशर्त अगर अन्यथा, अध्यक्ष घटक सरकारला त्याच्या संमतीनें देऊं शकेल. त्याचप्रमाणें पार्लमेंटनें पास केलेल्या कायद्यानें घटकावर अगर त्याच्या अधिकाऱ्यावर कांहीं कर्तव्यें लादतां येतील अगर त्यांना अधिकार बहाल करतां येतील. मात्र तो कायदा घटक प्रदेशांत लागू असला पाहिजे. मग ती बाब घटक कायदेमंडळाच्या कक्षेबाहेरील असली तरी चालेल. तसेंच या कायद्यानें हे अधिकार बहाल करण्याचा अधिकार पण देतां येईल. म्हणजे असले अधिकार देण्याचा अधिकार अमुक व्यक्तीला आहे अशी व्यवस्था त्या कायद्यांत असूं शकेल. या व्यवस्थेनें संघाचें अंमलबजावणीचें कार्य घटकावर सोंपविलें जातें. घटक हा संघाच्या खास क्षेत्रांतील कामांबाबत संघाचा कार्यकर्ता होतो. प्रत्येक बाबतींत संघाचेच असे अधिकारी नेमणें शक्य नाहीं. विषय सर्वस्वीं संघाचा, तथापि त्याची अमलबजावणी केवळ संघाच्याच अधिकाऱ्यांनीं करावयाची म्हटलें, तर देशभर दुहेरी नोकर वर्ग होईल. म्हणून घटक अगर घटकाचा नोकर वर्ग हा या कलमांतील व्यवस्थेनें मर्यादित बाबतींत संघाचें कार्य करतो व तेवढ्यापुरता संघाचा तो गुमास्ता (Agent) होतो. या कामाबद्दल हिंदुस्थान सरकार घटकांना मोबदला देण्यास बांधलेलें आहे.

**कांहीं घटकांचीं वैध, कार्यकारी, न्यायदानीं कार्यें स्वतःकडे घेण्याचा संघाचा अधिकार**

२३६. (१) हिंदुस्थान सरकारला परिशिष्ट एक, भाग ३ मधील घटकाशीं करार करून, पण संघ व ते ते घटक यांचे या घटनेप्रमाणें जे जे संबंध असतील त्यांना अनुसरून त्या घटकाची कायदाकानूनसंबंधींचीं, कार्यकारी स्वरूपाचीं, तसेंच न्यायदानीं कामें स्वतःकडे घेतां येतील.

(२) हिंदुस्थान सरकार परिशिष्ट एक यांत नमूद न केलेल्या हिंदी घटकांशीं पण असा करार करूं शकेल, मात्र हा करार परकी क्षेत्रांतील अधिकाराबाबत जो विद्यमान कायदा असेल, त्याला अनुसरून राहील.

खुलासाः—येथें हिंदी घटक याचा अर्थ जो प्रदेश हिंदुस्थानच्या प्रादेशिक क्षेत्रांत नाहीं, पण ज्याला अध्यक्षानें हिंदी घटक म्हणून मान्यता दिली आहे हा आहे.

(३) जर (१) प्रमाणें एकाद्या घटकाशीं केलेल्या करारांत कांहीं बाबी असतील कीं, ज्यांच्या संबंधांत त्या घटकाशीं कलम २३७ प्रमाणें परिशिष्ट १, भाग १ मधील घटक-राज्याचा पूर्वींच करार झाला असेल, तर कलम २३७ प्रमाणें झालेल्या करारांत त्या बाबींबद्दल जी व्यवस्था केली असेल, ती (१) प्रमाणें झालेल्या कराराच्या तारखेपासून रद्द होऊन प्रभावी होणार नाहीं.

(४) संघ व परिशिष्ट एक, भाग ३ मधील घटक यांच्यांत (१) प्रमाणें करार झाल्यानंतर

(अ) संघाच्या कार्यकारी सत्तेला करारांत नमूद केलेल्याप्रमाणें त्या त्या बाबींत काम करण्याचा अधिकार राहील.

(ब) करारांत नमूद केलेल्या बाबीबाबत पार्लमेंटला कायदे करण्याचा अधिकार राहील.

(क) कलम ११४ (२) ला अनुसरून प्रमुख न्यायालयाला अशा करारांत नमूद केलेल्या बाबींबाबत न्यायदान करण्याचा अधिकार राहील.

राज्यकारभाराचें स्वरूप त्रिविध आहे. वैध—कायदे करणें, कार्यकारी—अंमल चालविणें, न्यायदानी—न्याय देणें. हे तीन्ही अधिकार तीन संस्थांमार्फत कार्यान्वित होतात. मध्यवर्ती सत्ता म्हणजे संघ-राज्याची सत्ता हे अधिकार स्वतःच्या क्षेत्रांत अनुरूप संस्थांमार्फत चालवितेच. पण घटकक्षेत्रांत, राष्ट्रीय हिताचें असेल, राष्ट्राच्या संरक्षणासाठीं जरूर असेल, तसेंच आणीबाणीची परिस्थिति असेल, तेव्हां मध्यवर्ती सत्तेला हे अधिकार चालवण्याची सत्ता आहे. तसेंच सोयीसाठीं घटकांशीं करार करून हे अधिकार मध्यवर्ती सरकारला चालवितां येतील. तसेंच मध्यवर्ती सरकार कायदा करून आपल्या खास क्षेत्रांतील अधिकार मर्यादेपर्यंत घटक सरकारमार्फत चालवूं शकेल.

हिंदुस्थानचें प्रादेशिक क्षेत्र परिशिष्ट एक मध्यें सांगितलें आहे. मुख्य प्रांत, कमिशनरचे प्रांत, मोठीं संस्थानें, लहान संस्थांनाचे गट, अंदमान वगैरे बेटें यांमिळून तें क्षेत्र बनलें आहे. या क्षेत्रांतील प्रदेशाबाबत व तसेंच त्याच्याबाहेरच्या

प्रदेशाबाबत राज्यकारभाराच्या दृष्टीनें या घटनेंत व्यवस्था आहे. या कलमांत परिशिष्ट एक भाग ३ यांतील घटकांना म्हणजे मोठ्या हिंदी संस्थानांना करार करून राज्यकारभाराचा भाग हिंदुस्थान सरकारच्या स्वाधीन करतां येईल हें सांगितलें आहे. तसेंच जो प्रदेश हिंदुस्थानच्या क्षेत्रांत नाहीं, पण अध्यक्षानें तसा ठरविला आहे, त्याबाबतही व्यवस्था या कलमांत आहे. एकदा करार केला कीं, त्याप्रमाणें राज्यकारभार हिंदुस्थान सरकार आपणाकडे घेईल.

**परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकांना भाग ३ मधील घटकांच्या राज्यकारभारांतील बाबी घेण्याबाबत अधिकार**

२३७. परिशिष्ट १, भाग १ यांतील घटक सरकारला परिशिष्ट एक, भाग ३ मधील घटकांशीं त्या त्या बाबतींत करार करून त्या घटकांतील कायदेविषयक, कार्यकारी व न्यायदानीं कामें अध्यक्षाच्या आगाऊ संमतीनें स्वतःकडे घेतां येतील. मात्र हा करार घटक-क्षेत्र अथवा समान क्षेत्र यांतील नमूद केलेल्या बाबींबाबत असला पाहिजे.

(२) परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटक व परिशिष्ट एक, भाग ३ यांतील घटक यांत (१) प्रमाणें करार झाला म्हणजे,

(अ) करारांत नमूद असेल त्या बाबींत परिशिष्ट एक भाग १ यांतील घटकाची कार्यकारी सत्ता प्रभावी होईल.

(ब) करारांत असेल त्याप्रमाणें परिशिष्ट १, भाग १ यांतील घटकाच्या कायदेमंडळाला त्या बाबतींत कायदे करण्याचा अधिकार येईल.

(क) त्याचप्रमाणें परिशिष्ट १, भाग १ यांतील घटकाच्या मुख्य व इतर कोर्टांस कराराप्रमाणें न्यायदान करतां येईल.

मध्यवर्ती सरकारला परिशिष्ट १ भाग ३ मधील घटकांचा म्हणजे मोठ्या हिंदी संस्थानांचा राज्यकारभार घेण्याचा जसा अधिकार दिला आहे, त्याच रीतीनें परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांना म्हणजे मुख्य प्रांतांना भाग ३ मधील घटकांचा म्हणजे

मोठ्या संस्थानांचा राज्यकारभार स्वतःकडे घेण्याचा अधिकार या कलमांत आहे. करार करून पण अध्यक्षाच्या आगाऊ संमतीनें हें करतां येईल. करार होतांच करारान्वयें कारभार पाहण्याचें काम घटक सरकारकडे येतें. भाग ३ मधील संस्थानें प्रांतांना जेथें जेथें लागून आहेत, तेथें तेथें सोयीसाठीं व कार्यक्षमतेच्या दृष्टीनें अशी व्यवस्था होणें इष्ट आहे. त्या व्यवस्थेनें काटकसरही होईल.

सार्वजनिक कृत्यें, रेकॉर्ड व न्यायालयांचें कामकाज

२३८. (१) हिंदुस्थानच्या सर्व प्रदेशांत संघ व घटक यांच्या सार्वजनिक कृत्यांबाबत, तसेंच त्यांच्या रेकॉर्डाबाबत व न्यायालयांतील कामकाजाबाबत पुरी मान्यता दिली जाईल व विश्वास ठेवला जाईल.

(२) कोणत्या पद्धतीनें व कोणत्या परिस्थितींत वर (१) यांत उल्लेखिलेलीं सार्वजनिक कृत्यें, रेकॉर्ड व कामकाज यांची शाबिती करावी व शाबितीचा परिणाम काय होईल, या गोष्टी कायद्यानें ठरविल्या जातील.

(३) अखेरचा फैसला व अखेरचा हुकुम जे हिंदुस्थानांतील कोठलींही दिवाणी न्यायालयें देतील, त्यांची बजावणी कायद्याप्रमाणें हिंदुस्थानभर कोठेंही करतां येईल.

मात्र समान यादींतील क्रमांक २, ४, ५ या बाबींत कायदे करण्याची सत्ता परिशिष्ट १, भाग ३ मधील घटकांशीं झालेल्या करारानें पार्लमेंटला दिली नसेल, तर त्या घटकांतील कोर्टांनीं दिलेले अखेरचे फैसले अगर अखेरचे हुकुम यांना (१) व (३) यांतील व्यवस्था लागू पडणार नाहीं.

हिंदुस्थान हा मोठा देश आहे. शिवाय घटना संयुक्त स्वरूपाची; यामुळें अनेक कायदेमंडळें, अनेक शासनसंस्था, अनेक कोर्टें, त्याचप्रमाणें संघ व घटक सरकारांचीं कारभारविषयक अनेक सार्वजनिक कृत्यें असणार. या सर्वांना मान्यता देशभर मिळाली पाहिजे, त्यावर विश्वास असला पाहिजे. दर वेळीं त्याबाबत खरें कां खोटें हा प्रश्न उपस्थित झाला, तर कारभार चालणें कठीण होईल. म्हणून योग्य अशी व्यवस्था या कलमांत केली आहे. या बाबी कशा शाबित कराव्यात व शाबित

झाल्या म्हणजे त्याचा काय परिणाम होईल, हें कायदा करून ठरविलें जाईल. उदाहरणार्थ, शिक्कामोर्तब असलें म्हणजे तो हुकुम खरा मानावा वगैरे. त्याचप्रमाणें एका कोर्टानें अखेरचा निकाल दिला, तर त्याची बजावणी सर्व देशभर होणें जरूर आहे. नाहीं तर कारभाराची अवस्था कठीण होईल. मुंबई कोर्टाचा अखेरचा निकाल जर मद्रासमध्यें नेला, तर त्याची ताबडतोब बजावणी झाली पाहिजे. पुन्हां दावा, पुन्हां चौकशी असें झालें तर न्यायाला विलंब लागेल; शिवाय तो महाग होईल; त्यांत पद्धत राहणार नाहीं; न्यायदानांत एकजिनसीपणा येणार नाहीं. या दृष्टीनें ( ३ ) मधील व्यवस्था योग्य आहे. कोणत्या न्यायालयांच्या अखेरच्या निकालांना ही व्यवस्था लागू नाहीं हें कलमाच्या शेवटीं दिलें आहे. दिवाणी व फौजदारी कामकाजाची पद्धत व पुराव्याबाबत, भाग ३ मधील ज्या घटकांत पार्लमेंटला कायदा करण्याचा अधिकार प्राप्त झाला नसेल, तेथील कोर्टाच्या निकालांना ( १ ) व ( ३ ) लागू पडणार नाहीं. जे निकाल योग्य कामकाज चालून दिले जातील, त्यांनाच ही सवलत आहे, हा याचा अर्थ आहे. पार्लमेंट या बाबतींत अधिकारी असलें म्हणजे योग्य कायदा करण्याची दक्षता घेईल हें उघड आहे व ते कायदे या संस्थानांतील कोर्टांना लागू असले म्हणजे त्याच्या निकालांना ह्या सवलती मिळतील.

## पाणीपुरवठ्यांत हस्तक्षेप

पाणीपुरवठ्याबाबत तक्रारी

२३९. जर परिशिष्ट एक, भाग १ अगर ३ यांतील घटक सरकारला असें वाटलें कीं, त्या घटकांतील नैसर्गिक जलप्रवाहाचा उपयोग, वांटणी अगर नियंत्रण या बाबतींत

( अ ) जें झालें आहे अगर होणार आहे अशा कार्यकारी कृत्यानें अथवा जो झाला आहे अगर होणार आहे, अशा कांहीं कायद्यामुळें

( ब ) अथवा कोणी अधिकाऱ्यानें अधिकार न बजाविल्यामुळें,

त्या घटकांवर अगर त्याच्या नागरिकांवर जलप्रवाहाबाबतच्या त्यांच्या हितसंबंधांवर प्रतिकूल परिणाम झाला आहे अगर होण्याचा संभव आहे, तर त्या घटकांच्या सरकारनें अध्यक्षाकडे तक्रार नोंदवावी.

नैसर्गिक जलप्रवाह अर्थात् नद्या व नाले देशाच्या एका प्रदेशांत उगम पावून दुसऱ्या प्रदेशांत वाहत जातात व प्रसंगीं तिसऱ्या प्रदेशांत सागराला मिळतात. या परिस्थितींत प्रदेशाप्रदेशांना कांहीं अधिकार साहजिक व कांहीं आंतरराष्ट्रीय संकेतानें मिळतात. एखाद्या प्रदेशानें पाटबंधारे घालून सर्व पाणी अडविलें व खालच्या प्रदेशांत त्यामुळें पाण्याचें दुर्भिक्ष झालें तर त्या खालच्या प्रदेशानें काय करावें ? सामान्यत: जें पाणी निसर्गत: येतें व वाहतें तें निसर्गामुळें प्राप्त झालेलें असल्यामुळें ज्यांतून त्याचा प्रवाह जातो त्या प्रत्येक प्रदेशाला तें योग्य ( equitable ) प्रमाणांत मिळालें पाहिजे. जेथें हे दोन प्रदेश दोन पृथक् स्वतंत्र राज्यांत आहेत तेथें यांबाबत तंटा उपस्थित झाल्यास व तो आपसांत न मिटल्यास आंतरराष्ट्रीय कोर्ट अगर अन्य संघटन यांजकडे निर्णयासाठीं नेण्यांत येतो. जेथें दोन्ही प्रदेश एकाच राजकीय सत्तेखालीं आहेत, तेथें जी मध्यवर्ती सत्ता असते, ती त्याचा निर्णय देते. या कलमांत असा तंटा उपस्थित झाल्यास संबंधी घटक सरकारानें त्याची नोंद अध्यक्षाकडे करावी असा मार्ग सांगितला आहे.

तक्रारींचा निर्णय

२४०. ( १ ) अध्यक्षाकडे याप्रमाणें तक्रार आली व त्यांत असलेले मुद्दे तितक्या महत्त्वाचे आहेत असें त्याला वाटलें म्हणजे, तो एक कमिशन नेमील व त्या कमिशनमध्यें ज्यांना बंधारे, वास्तुशास्त्र, कारभार, अर्थ, कायदा यांसंबंधांत विशेष ज्ञान व अनुभव आहे, अशा सभासदांना तो मर्जीप्रमाणें नेमील व त्यांना सदर तक्रारीबाबत अगर अन्य बाबी, ज्या तो सांगेल त्यांबाबत आपल्या आदेशानुसार चौकशी करून रिपोर्ट करण्यास विनंति करील.

( २ ) याप्रमाणें नेमलेलें कमिशन चौकशी करून अध्यक्षाकडे रिपोर्ट सादर करील व त्या रिपोर्टांत वस्तुस्थिति काय आहे हें स्पष्ट करून कमिशन आपल्या शिफारसी नमूद करील.

( ३ ) ह्या रिपोर्ट विचारांत घेतल्यानंतर जर अध्यक्षाला त्या संबंधांत कांहीं अधिक खुलासा हवा असेल अगर एखाद्या नवीन मुद्यावर, जो कमिशनपुढें नव्हता, कांहीं मार्गदर्शन हवें असेल, तर तो पुन्हा, कमिशननें अधिक चौकशी करून रिपोर्ट करावा म्हणून त्याकडे प्रकरण सोंपवील.

( ४ ) कमिशननें विनंति केल्यास त्याजपुढील कामकाजाबद्दल कोर्टापुढील कामकाजासंबंधीं जशा आज्ञा अगर हुकुम काढतां येतात तसे हुकुम प्रमुख न्यायालय चौकशीच्या संबंधांत काढील.

( ५ ) कमिशनच्या रिपोर्टांत कोणत्या व्यक्तींनीं अगर सरकारांनीं कमिशनबाबत झालेला खर्च, तसेंच कमिशनपुढें हजर राहणाऱ्या घटकाचा अगर व्यक्तींचा खर्च द्यावा, याबाबत शिफारस असेल आणि या बाबतींत खर्चासंबंधीं जो हुकुम अध्यक्ष देईल, तो प्रमुख न्याया-लयाच्या हुकुमाप्रमाणें समजला जाऊन त्याची बजावणी होईल.

( ६ ) रिपोर्ट विचारांत घेतल्यानंतर त्याला अनुसरून व पुढें दिलेल्या मर्यादा संभाळून अध्यक्ष हुकुम काढील.

( ७ ) रिपोर्टाचा विचार केल्यानंतर अध्यक्षाला त्यांत महत्त्वाचा कायद्याचा मुद्दा निर्माण होत आहे असें वाटल्यास कलम ११९ प्रमाणें प्रमुख न्यायालयाला त्या बाबतींत अध्यक्ष मत विचारील आणि प्रमुख न्यायालयाचें मत आल्यानंतर त्यासह तो रिपोर्ट पुन्हा कमिशनकडे धाडण्यांत येईल व कमिशन मग न्यायालयाच्या मताला धरून रिपोर्टा-मध्यें जरूर ते फेरफार करून त्यासह तो अध्यक्षाकडे धाडील.

( ८ ) या कलमाप्रमाणें काढलेल्या हुकुमाची बजावणी संबंधी घटक करील व जर त्याचा एखादा कायदा या हुकुमाशीं विसंगत असेल, तर तेवढ्या प्रमाणांत तो रद्द ठरेल.

( ९ ) या कलमाप्रमाणें काढलेला हुकुमसंबंधी घटकानें अर्ज केल्यास व नेमलेल्या कमिशननें त्यावर हुकुम दुरुस्त करावा असा अभिप्राय दिल्यास अध्यक्ष त्याप्रमाणें हुकुम दुरुस्त करील.

पाणीप्रवाहाच्या वांटणीबाबत घटकाची तक्रार आल्यास तज्ज्ञांचें कमिशन नेमून अध्यक्ष वस्तुस्थितीबाबत चौकशी करवील व कमिशनच्या शिफारसी विचा-रांत घेऊन त्याप्रमाणें हुकुम करील. एखादा कायद्याचा मुद्दा उपस्थित झाल्यास

त्याबाबत प्रमुख न्यायालयाचा अभिप्राय घेण्यांत येईल व त्याला धरून कमिशन आपल्या शिफारसी दुरुस्त करील व त्या मग अध्यक्ष हुकुम काढून अमलांत आणवील. हुकुमाप्रमाणें घटक वागेल व हुकुमाविरुद्ध त्याचा कायदा असल्यास तेवढ्यापुरता कायदा रद्द होईल.

**परिशिष्ट एक, भाग २ मधील घटकांतील पाणीपुरवठ्यांत हस्तक्षेप**

२४१. जर अध्यक्षाला परिशिष्ट एक, भाग २ यांतील घटकाच्या अगर त्यांतील रहिवाश्याच्या हिताच्या दृष्टीनें परिशिष्ट एक, भाग १ अगर ३ यांतील घटकांत असणाऱ्या नैसर्गिक जलप्रवाहाचे उपयोग अगर नियंत्रण या बाबतींत—

(अ) जें झालें आहे अगर होणार आहे, अशा कांहीं कार्यकारी कृत्यानें,

(ब) अथवा कोणी अधिकाऱ्यानें अधिकार न बजाविल्यामुळें,

कांहीं प्रतिकूल परिणाम झाला आहे अगर होण्याचा संभव आहे, असें वाटल्यास मागील कलमांत सांगितल्याप्रमाणें तो कमिशन नेमून त्याकडे तो प्रश्न सोंपवील व मागील कलमांतील सर्व व्यवस्था जणूं कांहीं हा घटक परिशिष्ट एक, भाग १ मधील घटक आहे व त्यानें तक्रार केली आहे असें समजून लागू पडेल.

**न्यायालयांना याबाबत अधिकार नाहीं**

२४२. या घटनेंत कांहींही असलें, तरी प्रमुख न्यायालय अगर कोठल्याही कोर्टाला, ज्या बाबतींत मागील तीन कलमांप्रमाणें अध्यक्षाला कारवाई करतां आली असती, अशा बाबतींत दखल घेण्याचा अधिकार नाहीं.

या जलप्रवाहासंबंधींचे प्रश्न कोर्टाकडे नेणें इष्ट नाहीं म्हणून ते अध्यक्षानें कमिशनमार्फत त्याबाबत शिफारसी मागवून निकाल लावावयाचे आहेत. जेवढ्यापुरते कायद्याचे मुद्दे उपस्थित होतील, तेवढे प्रमुख न्यायालयाकडे अभिप्रायार्थ धाडण्यांत येतील.

## प्रांताप्रांतांतील व्यापार व उदीम

**व्यापार व उदीम यांबाबत सवलती देण्यास अगर भेदाभेद करण्यास बंदी**

२४३. जलमार्गें अगर वायुमार्गें अगर खुष्कीच्या मार्गें होणारा व्यापार अगर उदीम यांबाबत एका घटकाला अधिक सवलत देणें अगर घटकाघटकांत भेदाभेद कुठल्याही कायद्यानें अगर नियमानें करतां येणार नाहीं.

व्यापार व उदीम या दृष्टीनें सर्व हिंदुस्थान हा एक घटक आहे. म्हणून एका प्रांताला दुसऱ्या एखाद्या प्रांतालाच इतरांना न देतां, कांहींही सवलत देतां येणार नाहीं. तसेंच याबाबत कुठलाही भेदाभेद करतां येणार नाहीं. सर्वांना सारखी वागणूक असली पाहिजे. सवलती देणारा अगर भेदाभेद करणारा कायदा अगर नियम गैरकायदा ठरेल.

**घटकाघटकांतील व्यापार व दळण-वळण यांवर मर्यादा**

२४४. कलम १६ अगर मागील कलम यांत कांहींही असलें तरी कुठल्याही घटकाला

(अ) आपल्या प्रदेशांतील ज्या तयार झालेल्या अगर उत्पन्न होणाऱ्या वस्तूंवर त्यानें कर लादला असेल, तसल्या वस्तु जर अन्य घटकांतून येतील तर त्यांवर, अशा आयात झालेल्या वस्तु व सदर घटकांत तयार अगर उत्पन्न होणाऱ्या वस्तु यांत भेदाभेद होणार नाहीं अशा प्रकारें कर बसवितां येईल.

(ब) व तसेंच त्या घटकाशीं होणाऱ्या व्यापाराच्या, धंद्याच्या अथवा दळणवळणाच्या स्वातंत्र्यावर सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें अवश्य असलेलीं बंधनेंही कायद्यानें घालतां येतील.

मात्र घटनारंभापासून पांच वर्षेंपर्यंत कलम ३०६ मधील पोट-कलम (अ) यांत निर्देश केलेल्या वस्तूंच्या व्यापारउदीमाबाबत वरील पोटकलम (ब) लागू करतां येणार नाहीं.

कलम २४३ व २४४ अंमलांत आणण्याकरितां सत्ताधिकाऱ्याची नेमणूक

२४५. २४३ व २४४ कलमांतील व्यवस्था अमलांत आणण्यासाठीं पार्लमेंट योग्य वाटेल तो सत्ताधिकारी नेमील व त्याला जरूर ते अधिकार देईल व जरूर तीं कामें नेमून देईल.

या कलमांत घटकांना इतर घटकांतून येणाऱ्या मालावर कर बसविण्याचा अधिकार दिला आहे. मात्र तेवढाच कर तो माल त्या घटकांत तयार होत असेल अगर उत्पन्न होत असेल, तर त्यावर प्रथम बसविला पाहिजे. म्हणजे दोन्हीं ठिकाणच्या मालावर कर बसेल व तोही असा असला पाहिजे कीं, त्यांत भेदाभेद नसावा; म्हणजे परिणामीं समान होईल असा तो असला पाहिजे. तसेंच सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें व्यापारस्वातंत्र्य जें मौलिक हक्क म्हणून घटनेंत दिलें आहे, त्यावरही कायद्यानें मर्यादा घालतां येईल. आयात कर बसविला कीं, स्वातंत्र्यावर मर्यादा आलीच. मात्र ही मर्यादा कलम ३०६ (अ) यांत सांगितलेल्या वस्तूंबाबत ५ वर्षें बसवितां येणार नाहीं. या वस्तु म्हणजे कापूस, लोंकर, वर्तमानपत्राचा कागद, अन्नधान्यें, पेट्रोल व मशिनरी इत्यादि होत.

घटना सुरू होऊन ५ वर्षें होईपर्यंत या वस्तूंच्या व्यापारावर मर्यादा घालतां येणार नाहीं, ही योजना विद्यमान परिस्थिति लक्षांत घेऊन केली आहे. वास्तविक सर्व हिंदुस्थान हा एक घटक समजून योजनापूर्वक व्यापार व उद्योग यांची मांडणी केली म्हणजे अधिक चांगलें होईल. एका राज्यांत पूर्ण व्यापारस्वातंत्र्य असणें हीच इष्ट स्थिति आहे.

## घटकाघटकांत सूत्रबद्धता

आंतरप्रांतीय कौन्सिल

२४६. जर अध्यक्षाला सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें इष्ट वाटेल, तर तो हुकुम काढून कायदेशीर रीतीनें एक कौन्सिल स्थापन करील व त्या कौन्सिलचें संघटन, त्याचीं कर्तव्यें, त्याचें कामकाज यांबाबत त्या हुकमांत व्यवस्था असेल व या कौन्सिलला

(अ) घटकाघटकांत उत्पन्न झालेल्या तंट्याबाबत चौकशी करून सल्ला देणें,

(ब) घटकाघटकांत अगर सर्व घटकांत अगर संघ व कांहीं घटक अगर सर्व घटक यांत समान हितसंबंधाच्या गोष्टी कोणत्या, याची चौकशी करणें व त्याबाबत चर्चा करणें,

(क) वरील तऱ्हेच्या कोणत्याही विषयाबाबत शिफारसी करणें आणि विशेषतः त्या बाबतींत धोरण व कार्य यांत सूत्रबद्धता राहावी म्हणून शिफारसी करणें,

हीं कामें करावीं लागतील.

देशांतील राज्यकारभारांत धोरण व अंमलबजावणीचें कार्य यांत सूत्रबद्धता असणें इष्ट आहे. कारभार हांकतांना नाना प्रश्न उत्पन्न होतात. निरनिराळीं खातीं त्यांचा विचार करीत असतात. राज्यकारभार म्हणजे, धोरण व त्याच्या अंमलबजावणीचें कार्य अशा त्याच्या दोन अवस्था असतात. धोरण ठरवितांना नाना दृष्टिकोण लक्षांत घेतले जातात, वादविवाद व चर्चा होते, विशिष्ट धोरणाचे संभाव्य परिणाम अंदाजिले जातात व मग धोरण निश्चित होतें. मग त्याची अंमलबजावणी कार्यकारी सत्तेची जी संघटना असेल, तिनें करावयाची असते. घटक व घटक, व घटक व संघ यांच्यांत अनेक समान बाबी असतात अगर उत्पन्न होतात, त्याबाबतचें धोरण ठरल्यानंतर त्यांत व अंमलबजावणींत सूत्रबद्धता असणें जरूर असतें. हें काम कायमस्वरूपी संघटनेकडे दिल्यास सुयंत्रित कारभाराला मदत होते. याच दृष्टीनें या कलमांतील योजना आहे. अर्थात् ही कार्यान्वित करणें हें अध्यक्षाच्या मर्जीवर ठेवलें आहे. तात्पुरती योजना नेहमीं मध्यवर्ती सत्ता करते. पण कायम योजना म्हणूनही ही व्यवस्था विचारार्ह आहे, एवढें निश्चित.

## भाग १०

# अर्थ, मिळकत, करार व दावे

## प्रकरण १ लें – अर्थ

२४७. संदर्भानें अन्यथा अपेक्षित नसेल तर या भागांत,

शब्दांचे अर्थ

(अ) 'अर्थसमिति' (Finance Commission) म्हणजे कलम २६० प्रमाणें अस्तित्वांत आलेली अर्थसमिति होय.

(ब) 'घटक' यांत परिशिष्ट एक, भाग २ मधील घटक समाविष्ट नाहींत.

(क) जेथें परिशिष्ट एक, भाग २ मधील घटकांचा उल्लेख येईल, तेथें त्यांत परिशिष्ट एक, भाग ४ मधील व अन्य प्रदेश जो हिंदुस्थानांत आहे, पण त्या परिशिष्टांत नमूद नाहीं, यांचा समावेश होईल.

मागील भागांत संघराज्य व घटक-राज्यें यांच्यांतील कारभारविषयक संबंध सांगितले. विधिविषयक, कार्यकारी व न्यायदानीं कामें कोणत्या परिस्थितींत कोणत्या शर्तीवर संघाला घटकांचीं आपल्याकडे घेतां येतात, तसेंच संघाचीं खास कामें घटक संघटनेमार्फत केव्हां चालवावीं व कशीं चालवावीं या सर्वांचा प्रपंच मागील भागांत आला आहे. प्रस्तुत भागांत अर्थ, मिळकत, करार व दावे यांसंबंधीं व्यवस्था सांगितली आहे. या कलमांत कोणत्या अर्थानें या भागांत शब्द वापरले आहेत हें सांगितलें आहे. हा अर्थ या भागापुरताच मर्यादित आहे.

२४८. कांहीं करांचें ऐन उत्पन्न सर्व अगर अंशतः घटकांत कसें वांटलें जावें यासंबंधांत जी पुढें व्यवस्था सांगितली आहे, ती पाळून 'हिंदुस्थानचें उत्पन्न' या शब्दांत, जें सर्व उत्पन्न व जो सार्वजनिक पैसा हिंदुस्थान सरकारला

'हिंदुस्थानचें उत्पन्न' 'घटकाचें उत्पन्न' यांचा अर्थ

मिळतो, अगर जो हिंदुस्थान सरकार उभा करतें त्याचा समावेश होतो; तसेंच ' घटकाचें उत्पन्न ' या शब्दांत, सर्व उत्पन्न व सार्वजनिक पैसा जो घटक सरकारला मिळतो अगर जो घटक सरकार उभा करतें त्याचा समावेश होतो.

**संघानें बसविलेले पण घटकांनीं गोळा करून घ्यावयाचे कर**

२४९. (१) संघयादींत नमूद केलेले स्टँपावरील कर (duty), तसेंच औषधी व प्रसाधन वस्तूंवर अंतर्गत (excise duty) कर हिंदुस्थान सरकार बसवील. पण ते

(अ) परिशिष्ट एक, भाग २ यांतील घटकांत बसविले असतील तर ते हिंदुस्थान सरकार गोळा करील आणि

(ब) अन्यत्र सर्व ठिकाणीं ज्या ज्या घटकांत बसविले असतील तो तो घटक ते वसूल करील.

(२) ज्या महसूल वर्षासाठीं हे कर बसविले जातील, त्या करांची त्या वर्षाची रक्कम हिंदुस्थान सरकारचें उत्पन्न म्हणून मानली न जातां त्या त्या घटकाला ती त्याचें उत्पन्न म्हणून दिली जाईल.

सरकारचें उत्पन्न प्रत्यक्ष कर, पदार्थांवरील कर (duty) परवाना-फी इत्यादिकांपासून असतें. तसेंच सरकार कर्ज काढून पैसा उभा करतें, या सर्वांचा समावेश सरकारचें उत्पन्न यांत होतो. हिंदुस्थान सरकारप्रमाणेंच घटकसरकार देखील कर्ज उभारूं शकतें व तेथेंही त्यासुद्धां सर्व उत्पन्नाचा समावेश घटक सरकारचें उत्पन्न या शब्दांत होतो. तात्पर्य, सरकारी पैसा–मग तो कोणत्याही रीतीनें येवो–तो सरकारी उत्पन्न म्हणून मानला जातो.

संघ-यादींत कांहीं व्यवहाराबाबत स्टँपड्यूटी बसविण्याचा जो हक्क हिंदुस्थान सरकारला दिला आहे, तसाच कांहीं वस्तूंवर अंतर्गत कर (excise duty) बसविण्याचाही हक्क आहे; त्याची बजावणी कशी करावयाची यासंबंधींची व्यवस्था या कलमांत आहे. चेक, हुंडया वगैरे व्यवहारांत जी स्टँपड्यूटी सरकार बसवील ती घटकानें वसूल करावी व घ्यावी. तसेंच कांहीं औषधी वस्तु व कांहीं प्रसाधन-

वस्तु कीं ज्यांच्या निर्मितींत अफू अगर दारूसारख्या मादक पदार्थांचा उपयोग केला जातो, अशा वस्तूंवर हिंदुस्थान सरकार जो अंतर्गत कर बसवील तोही घटक गोळा करील व घेईल. परदेशांतून जी वस्तु येते त्यावर जो कर बसतो, त्याला आयात कर ( Import duty ) म्हणतात. देशांत जेव्हां वस्तु तयार होते व त्यावर जेव्हां कर बसतो, तेव्हां त्याला अंतर्गत कर ( excise duty ) म्हणतात. साखरेवरील कर, तंबाखूवरील कर या स्वरूपाचे आहेत. हे कर उत्पादनावर आहेत; विक्रीवर नाहींत. पदार्थ तयार झाला, कीं कर आला.

या कलमांत मध्यवर्ती सरकारचे कांहीं कर घटकांनीं गोळा करावयाचे व स्वतःचें उत्पन्न म्हणून जमा करावयाचे असें आहे.

**संघानें बसविलेले व गोळा केलेले पण ज्यांचें उत्पन्न घटकांना द्यावयाचें असे कर**

२५०. ( १ ) खालील कर हिंदुस्थान सरकार बसवील, व गोळा करील व ( २ ) यांत लिहिल्याप्रमाणें घटकांना देईल:—

( अ ) शेतजमीन सोडून इतर मिळकतीच्या वारसावरील कर,

( ब ) शेतजमीन सोडून इतर मिळकतीवरील कर,

( क ) आकाशमार्गानें अगर रेल्मार्गें जाणाऱ्या उतारू व वस्तूंवर मुक्काम कर,

( ड ) रेल्वेचा माल व उतारूवाहतुक यांच्या हांशिलावरील कर.

( २ ) परिशिष्ट एक, भाग २ यांतील घटकांतील उत्पन्न सोडून वरील करांचें वार्षिक उत्पन्न खर्च वजा जातां ज्या ज्या घटकांत हे कर बसविले असतील, त्यांना त्यांना पार्लमेंटनें कायद्यानें ठरविलेल्या तत्त्वानुसार वांटून दिलें जाईल व हें उत्पन्न हिंदुस्थान सरकारचें उत्पन्न म्हणून जमा केलें जाणार नाहीं.

या कलमांत, संघ कर बसवील व गोळाही करील व कांहीं ठरींव तत्त्वाप्रमाणें घटकांत त्यांचें उत्पन्न वांटलें जाईल हें सांगितलें आहे. शेतजमिनी सोडून इतर मिळकतीचा वारसा जेव्हां मिळेल, त्या वेळीं मिळकतीवर कर घेतला, तर त्या कराचें

उत्पन्न प्रांतांना दिलें जाईल. तसेंच मिळकत-कर म्हणजे माणसाजवळ मिळकत आहे, त्यावर त्याला कर द्यावा लागल्यास तोही प्रांतांत वांटला जाईल.

मुक्काम कर म्हणजे माल ज्या गांवीं नेला जाईल, तेथें द्यावा लागणारा कर, तसेंच उतारूंना तसाच द्यावा लागणारा कर हेही संघ गोळा करील व त्यांचें उत्पन्न वांटलें जाईल. रेल्वेच्या दरावरील कर पण त्याचप्रमाणें वांटला जाईल. हे सर्व कर अशा स्वरूपाचे आहेत, कीं संघामार्फत ते गोळा होणें अधिक सोयीचें आहे. आयात कर, प्राप्तीवरील कर, जसे मध्यवर्ती स्वरूपाचे आहेत, तसेच हेही आहेत. कलमांत सांगितलेले कर संघ गोळा करील व खर्च वजा जातां जें उत्पन्न येईल तें घटकांत वांटलें जाईल. तें कसें वांटावें याबाबत पार्लमेंट कायदा करून निश्चित तत्त्वें ठरवील. लोकसंख्येप्रमाणें, कीं क्षेत्राप्रमाणें, कीं माणसांच्या उत्पन्नाप्रमाणें, अगर सर्व गोष्टींचा विचार करून, हें उत्पन्न वांटावें हें ठरविलें जाईल.

दिल्ली, कुर्ग वगैरे घटकांतून जें उत्पन्न झालें असेल, तें वजा जाऊन ही वांटणी होईल. दिल्ली वगैरे भाग २ मधील घटक मध्यवर्ती सत्तेखालीं आहेत, म्हणून त्यांतील उत्पन्न या योजनेंत येणार नाहीं.

**संघानें बसविलेले व गोळा केलेले, पण ज्यांच्या उत्पन्नाची वांटणी संघ व घटक यांच्यांत व्हावयाची असे कर**

२५१. (१) शेतीचें उत्पन्न सोडून अन्य उत्पन्नावर हिंदुस्थान सरकार कर बसवील व त्या करांचें उत्पन्न (२) यांत सांगितल्याप्रमाणें संघ व घटक यांत वांटलें जाईल.

(२) परिशिष्ट एक, भाग २ मधील घटकांतून अशा करांचें जें उत्पन्न येईल तें सोडून व तसेंच संघाकडून जी प्राप्ति होते, त्याबाबतचेंही करांचें उत्पन्न सोडून, अशा करांचें जें वार्षिक उत्पन्न खर्च वजा जातां राहील, त्याचा ठरवून दिलेला हिस्सा हिंदुस्थान सरकारची जमा म्हणून न राहतां, वेळोवेळीं जसें ठरविलें जाईल त्याप्रमाणें, हा कर बसविलेल्या घटकांत त्या त्या प्रमाणांत वांटला जाईल.

(३) पोटकलम (२) मधील कामाकरितां, संघाकडून जी प्राप्ति (emoluments) होते, त्याबाबतचें कराचें उत्पन्न सोडून, जें प्रमाण त्या वर्षासाठीं उत्पन्नावरील करांच्या बाबतींत ठरविलें असेल, तें प्रमाण परिशिष्ट एक भाग २ मधील घटकांचें उत्पन्न वजा करतांना लक्षांत घेतलें जाईल.

(४) या कलमांत

(अ) 'उत्पन्नावरील कर' यांत कलम २६६ मधील पोटकलम (अ) यांत सांगितलेल्या उत्पन्नाच्या कराबद्दल जी रक्कम हिंदुस्थान सरकार बसवील, तिचा समावेश आहे. पण संस्था-कर (Corporation Tax) याचा समावेश नाहीं.

(ब) 'ठरविले' म्हणजे

(१) अर्थसमिति (Finance Commission) अस्तित्वांत येईपर्यंत अध्यक्षानें हुकुम काढून ठरविले ते आणि

(२) अर्थसमिति अस्तित्वांत आल्यानंतर तिच्या शिफारसी विचारांत घेऊन अध्यक्षानें हुकुम काढून ठरविले तें.

(क) 'संघाकडून प्राप्ति' यांत हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नांतून दिलें जाणारें पेन्शन अगर अन्य प्राप्ति कीं, ज्यावर उत्पन्न-कर घेतां येतो यांचा समावेश आहे.

या कलमांत जे कर संघानें बसवावयाचे व गोळा करावयाचे व ज्यांचें उत्पन्न घटकांत वांटावयाचें, त्यांच्या बाबत विचार केला आहे. शेतीचें उत्पन्न सोडून बाकीच्या उत्पन्नावर हिंदुस्थान सरकार कर बसवील, तें हिंदुस्थान सरकार गोळा करील व खर्च वजा जातां त्याचें जें उत्पन्न येईल, तें वेळोवेळीं ठरविण्यांत येणाऱ्या प्रमाणांत संघ व घटक यांत वांटलें जाईल. या योजनेंत दिल्ली वगैरे कमिशनरचे प्रांत येणार नाहींत. या लहान घटकांत जें उत्पन्न असल्या करांपासून येईल, तें हिंदुस्थान सरकारकडे पूर्णपणें राहील. तसेंच संघाकडून जी प्राप्ति पेन्शन वगैरे स्वरूपांत मिळत असेल, त्यावरील कराचें उत्पन्नही या योजनेंत येणार नाहीं. याव्यतिरीक्त असल्या करांचें उत्पन्न जे खर्च वजा जातां राहील, तें वेळोवेळीं कसें वांटावें हें अध्यक्ष ठरवील व त्याप्रमाणें तें वांटलें जाईल. अर्थसमिती काम करूं लागली म्हणजे ती शिफारसी

करील व त्यांचा विचार करून, अध्यक्ष हुकुम काढून वांटणी कशी करावी हें ठरवील. उत्पन्नावरील कर यांत संस्था-कर ( Corporation Tax ) याचा समावेश होणार नाहीं. मात्र क. २६६ ( अ ) यांत सांगितलेल्या कराऐवजीं एखादी रक्कम हिंदुस्थान सरकारनें ठरविली तर तिचा या करांत समावेश होईल.

कलम २४९, २५० व २५१ यांत संघाकडून बसविल्या जाणाऱ्या करांसंबंधीं विचार केला आहे. संघाचे कांहीं कर घटक गोळा करणार व घेणार, संघाचे इतर कांहीं कर संघ गोळा करणार व घटकांना देणार, कांहीं कर संघ गोळा करणार व स्वतः घटकांमध्यें ते वांटणार. संयुक्त घटनेंत जशी अधिकारविभागणी ही महत्वाची बाब असते, तशीच उत्पन्नाची विभागणी हीही महत्वाची बाब आहे. कांहीं कर स्थानिक स्वरूपाचे असतात, कांहीं प्रांतिक स्वरूपाचे व कांहीं व्यापक व मध्यवर्ती स्वरूपाचे असतात. कांहीं कर मध्यवर्ती सत्तेनें गोळा करणें सोयीचें असतें. तसेंच कांहीं कर सारखेपणा असावा म्हणून मध्यवर्ती सरकारकडे स्वखुषीनें घटक देत असतात. या तीन कलमांतील व्यवस्था सर्वमान्य सिद्धांतांना धरून आहे. करांची वांटणी कशी करावी, याही बाबतींत कांहीं सिद्धांत आहेत. त्याबाबतचा विचार अर्थ-समिती व अध्यक्ष करतील. सुव्यवस्था जशी अवश्य, तशीच चांगली अर्थव्यवस्था कीं, जींत मध्यवर्ती सत्ता व घटक यांना त्यांना कराव्या लागणाऱ्या कामाच्या दृष्टीनें पूर्ण संधि आहे, अशी अमलांत येणें अत्यंत जरूर असते. घटक महत्वाकांक्षी असतात, तरीपण त्यांना योग्य संधि दिली पाहिजे. राज्यकारभार पैशाशिवाय चालत नाहीं. ' सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः ' म्हणून अर्थव्यवस्था ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे.

संघकार्यासाठीं करावर जादा पट्टी (Surcharge)

**२५२. कलम २५० व २५१ यांत कांहीं असलें, तरी त्या कलमांत उलेखिलेल्या करांवर संघकार्यासाठीं अधिक बोजा, अगर जादा पट्टी ( Surcharge ) पार्लमेंटला केव्हांही बसवितां येईल व त्याचें सर्व उत्पन्न हिंदुस्थान सरकारचें उत्पन्न समजलें जाईल.**

जेव्हां जेव्हां जरूर पडेल तेव्हां संघाच्या कारभारासाठीं २५०, २५१ कलमांत सांगितलेल्या करावर ' सरचार्ज ' म्हणजे अधिक कर पार्लमेंट बसवील व या अधिक कराचें जें उत्पन्न येईल, त्यांत वांटणी होणार नाहीं. जसेंच्या तसें तें हिंदुस्थान सरकारला जाईल.

२५३. (१) संघ मिठावर कर बसविणार नाहीं.

संघानें बसविलेले व गोळा केलेले कर पण संघ व घटक यांत त्यांच्या उत्पन्नाची वांटणी

(२) औषधी व प्रसाधन वस्तूंवरील अंतर्गत कर सोडून संघयादींत नमूद केलेले इतर वस्तूंवरील अंतर्गत कर हिंदुस्थान सरकार बसवील व गोळा करील; पण जर पार्लमेंटनें तसा कायदा केल्यास ज्या घटकांत हा कर लागू असेल, त्यांना त्याच्या उत्पन्नाचा खर्च वजा जातां, सर्व अगर अंशतः भाग दिला जाईल व ही रक्कम कशी वांटावयाची याबाबत तत्त्वें त्या कायद्यांत सांगितलीं जातील.

मिठावर कर बसविला जाणार नाहीं. हा निर्बंध मुद्दाम घटनेंत घातला आहे. वास्तविक कराबाबत असे निर्बंध नसतात. कराचें क्षेत्र सरकारला मोकळें असलें पाहिजे. हिंदुस्थानांतील मागील इतिहास लक्षांत घेतां हा निर्बंध घालण्याचीही आवश्यकता नाहीं. कारण सहसा मिठावर कर बसणार नाहीं. तथापि असा घटनेंत मुद्दाम निर्बंध ठेवणें इष्ट नाहीं. हा कर गेला आहे, पण त्याचा परिणाम इष्ट असा झालेला नाहीं.

अंतर्गत कर ( excise duty ) हिंदुस्थान सरकार बसवील व गोळा करील व पार्लमेंटनें कायदा केल्यास त्याचें उत्पन्न सर्व अगर अंशतः घटकांना देण्यांत येईल. या विभागणीचीं तत्त्वें त्या कायद्यांत सांगितलीं जातील. लोकसंख्या, क्षेत्र, विक्री इत्यादि गोष्टींवर ही विभागणी ठरेल, हें उघड आहे.

ताग अगर तागाच्या तयार मालावर कर

२५४. कलम २५३ यांत कांहींही असलें, तरी तागावरील व तागाच्या तयार मालावरील निर्यात कराचें उत्पन्न खर्च वजा जातां पार्लमेंट ज्या प्रमाणांत सालोसाल वांटावें म्हणून कायदा करून ठरवील, त्याप्रमाणें पूर्णतः अगर अंशतः ज्या घटकांत ताग पिकतो त्यांना त्या कायद्यांत सांगितलेल्या विभागणीच्या तत्त्वानुसार वांटलें जाईल; व हें उत्पन्न हिंदुस्थानचें उत्पन्न म्हणून समजलें जाणार नाहीं.

मात्र पार्लमेंट याबाबत कायदा करून निकाल देईपर्यंत १९३५ च्या हिंदुस्थानबाबतच्या कायद्याप्रमाणें याबाबत काढलेला जो हुकुम घटना

सुरू होण्यापूर्वी अमलांत असेल, तो जारी राहील व त्यांत लिहिल्याप्रमाणें वांटणी होईल.

ताग बंगाल व बिहारमध्यें पिकतो, त्यावरील निर्यात कराचा फायदा बंगाल व बिहारला मिळणें इष्ट आहे. १९३५ च्या कायद्यांत अशीच व्यवस्था आहे. कांहीं प्रमाणांत निर्यात कराचें उत्पन्न मध्यवर्ती सरकार घेतें व बाकीचें ताग पिकवणाऱ्या प्रांतांना देण्यांत येतें. तशीच व्यवस्था या कलमांत आहे. मात्र पार्लमेंटनें कायदा करून तें ठरवावें असें सांगितलें आहे. तसा कायदा होईपर्यंत जी व्यवस्था घटना सुरू होण्यापूर्वी चालू असेल, तीच अमलांत राहील. तात्पर्य, तागावरील निर्यात कराचें सर्वस्वीं उत्पन्न मध्यवर्ती सरकारला मिळणार नाहीं. सामान्यतः निर्यात कराचें उत्पन्न मध्यवर्ती सरकार घेत असतें. पण तागाच्या बाबतींत वर लिहिल्याप्रमाणे फरक करण्यांत आला आहे. सर्व कर घेऊन प्रांतांना मदत (Subvention) देणें अगर कांहीं करांच्या बाबी प्रांतांना तोडून देणें अगर दोहींत वांटणी ठेवणें, यांपैकी जसें सोयीस्कर होईल तें करणें योग्य आहे. मदत दिली तर प्रांत कर बसवीत नाहींत. प्रांतांवर, घटकांवर कर बसविण्याची जबाबदारी टाकणें अधिक चांगलें. तसें केलें म्हणजे वावगा खर्च होणार नाहीं व प्रांत अधिक कार्यक्षम होतील.

**संघाकडून कांहीं घटकांना मदत**

२५५. ज्या घटकांना मदतीची जरूरी आहे असें पार्लमेंट ठरवील, त्यांना त्यांच्या उत्पन्नाच्या साह्यार्थ देणग्या म्हणून कांहीं रकमा देण्याची पार्लमेंट कायदा करून व्यवस्था करील व या रकमा हिंदुस्थानच्या उत्पन्नावरील बोजा म्हणून समजल्या जातील;

मात्र घटकांतील परिशिष्टांतील प्रदेशांचा कारभार त्या घटकाच्या अन्य प्रदेशांबरोबर आणण्यासाठीं, तसेंच घटकांतील परिशिष्टांतील जातींची उन्नति करण्यासाठीं ज्या संवर्धनाच्या योजना घटकानें हिंदुस्थान सरकारच्या संमतीनें सुरू केल्या असतील, त्यांचा भांडवली व वार्षिक खर्च जो जरूर पडेल तो, हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून मदत म्हणून दिला जाईल व ही मदत परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांना मिळेल.

तसेंच हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून आसामला भांडवली व वार्षिक खर्चासाठीं जी मदत मिळेल ती

(अ) परिशिष्ट सहा, परिच्छेद १९ ला जोडलेल्या तक्त्याच्या पहिल्या भागांत जे वन्य प्रदेश नमूद केले आहेत, त्यांच्या कारभारांत, घटना सुरू होण्यापूर्वी तीन वर्षांत जमेपेक्षां जो अधिक खर्च झाला असेल, त्याची सरासरी आणि

(ब) वन्य प्रदेशांचा कारभार अन्य प्रदेशाबरोबर येण्यासाठीं ज्या संवर्धनाच्या योजना हिंदुस्थान सरकारच्या संमतीनें सुरू केल्या असतील, त्यांच्या खर्चाची रक्कम

इतकी असेल.

मध्यवर्ती सत्तेचें कराबाबतचें क्षेत्र मोठें असणार. जे घटक आर्थिक दृष्ट्या मागासलेले आहेत, त्यांना सालोसाल मदत करणें हें इष्ट आहे. ती किती हें पार्लमेंट ठरवील व त्याचा बोजा उत्पन्नावर राहील. म्हणजे अंदाजपत्रकाच्या वेळीं त्याबाबत मतदान होणार नाहीं. तसेंच मागासलेले प्रदेश, वन्य प्रदेश व मागासलेल्या जाती यांच्या उन्नतीसाठीं संघ मदत देईल. आसामला वन्य प्रदेशाच्या कारभारांत तूट येणार म्हणून मदत मिळेल, तसेंच वन्य प्रदेशाच्या उन्नतीसाठीं मदत मिळेल.

**धंदा, व्यवसाय, रोजगार यांवर कर**

२५६. (१) कलम २१७ मध्यें कांहींही असलें, तरी पण (२) व (३) हीं पोटकलमें पाळून घटक कायदेमंडळाला घटक, नगरपालिका, जिल्हा लोकल बोर्ड, लोकल बोर्ड अगर त्यांत असलेल्या दुसऱ्या स्थानिक शासनसंस्थेसाठीं व्यवसाय, रोजगार, धंदे यांवर कर बसविण्याबाबत कायदे करण्याचा अधिकार आहे.

(२) व्यवसाय, रोजगार, धंदे यांवर जो कर बसविला जाईल व ज्याचें उत्पन्न घटक, नगरपालिका, बोर्ड अगर अन्य स्थानिक शासन संस्था यांना द्यावें लागेल, तो कोणाही व्यक्तीवर दरसाल रु. २५० पेक्षां अधिक बसणार नाहीं.

मात्र घटना सुरू होण्यापूर्वींच्या महसूल वर्षांत एखाद्या घटकांत, नगरपालिकेंत, बोर्डांत अगर स्थानिक शासनसंस्थेंत धंदा, व्यवसाय, रोजगार यांवर पूर्वींच कर बसविलेला असेल व त्याचा दर अगर दराची कमाल मर्यादा रु. २५० पेक्षां अधिक असेल, तर पार्लमेंटनें सामान्यतः अगर विशिष्ट घटक, नगरपालिका अगर बोर्ड अगर स्थानिक शासन संस्था यांबाबत कायदा करून त्यांत बदल करीपर्यंत विद्यमान व्यवस्थेप्रमाणें तो वसूल केला जाईल.

( ३ ) घटक कायदेमंडळाला धंदा, व्यवसाय, रोजगार यांबाबत कर बसविण्याचा जो अधिकार आहे, त्या योगें, त्या त्या गोष्टींपासून होणाऱ्या उत्पन्नावर कर बसविण्याचा जो अधिकार पार्लमेंटला आहे, त्याला कांहींही बाधा येत नाहीं.

या कलमांत जे कर विशेषेंकरून स्थानिक स्वरूपाचे आहेत, त्याबाबत विचार केला आहे. डॉक्टर, वकील, इंजिनियर, व्यापारी, दुकानदार, नोकरवर्ग यांवर कर बसविण्याचा अधिकार स्थानिक संस्था व घटक कायदेमंडळाला आहे. मात्र हा कर प्रत्येक व्यक्तीवर दरसाल रु. २५० पेक्षां अधिक नसावा. तसेंच जर रु. २५० पेक्षां अधिक कर विद्यमान व्यवस्थेंत असेल तर पार्लमेंट कायदा करून तो बदलीपर्यंत तीच व्यवस्था राहील. उत्पन्नावरील कर बसविण्याच्या पार्लमेंटच्या अधिकारांत या कलमानें बाध येत नाहीं. गांवांत एखादा इसम धंदा करतो म्हणून स्थानिक शासन-संस्था त्याच्यावर धंदा अगर व्यवसाय कर बसवील. त्याचा उद्देश स्थानिक स्वराज्य नीट चालविण्यासाठीं अवश्य असलेलें उत्पन्न उभारणें हा आहे. घटकही आपल्या उद्देशासाठीं असेच कर बसवील, पण रु. २५० पेक्षां तो अधिक असणार नाहीं. तथापि त्या धंद्यापासून, अगर नोकरीपासून जें उत्पन्न व्यक्तीला मिळत असेल, तें मध्यवर्ती सरकारनें बसविलेल्या उत्पन्नावरील कराला मात्र राहीलच. म्हणजे एखाद्याला नगरपालिकेला, घटकाला व त्याचप्रमाणें संघसरकारलाही कर द्यावा लागेल. त्याची मर्यादा या कलमांत सांगितलेली आहे. या व्यवस्थेनें स्थानिक संस्थांना उत्पन्न मिळेल, घटकालाही मिळेल, व संघाचें कमी होणार नाहीं.

**कांहीं अपवाद**

२५७. एखादा कर अगर सेस अगर फी अगर पट्टी घटना सुरू होण्यापूर्वीं घटक, नगरपालिका अगर अन्य स्थानिक शासन संस्था यांनीं कायदेशीरपणें बसविला

असेल व त्याचा उपयोग आपआपल्या कार्यासाठीं ते करीत असतील तर जरी हे कर, पट्टी, सेस अगर फी संघ-यादींत समाविष्ट असले, तरी पार्लमेंट कायदा करून त्यांत बदल घडून आणीपर्यंत विद्यमान व्यवस्थेप्रमाणें वसूल केले जातील.

जे कर संघ-यादींत नमूद आहेत, पण सध्यां घटक अगर अन्य स्थानिक संस्था यांनीं जे बसविले आहेत, व त्यांजकडून आपल्या उपयोगासाठीं वसूल केले जात आहेत, ते पार्लमेंट कायदा करून बदलीपर्यंत चालू राहतील. या योजनेनें गोंधळ उत्पन्न होणार नाहीं. तसेंच नीट व्यवस्थितपणें कारभार चालेल. जेव्हां बदल होईल, तेव्हां सर्व गोष्टींचा विचार होईल. आर्थिक व्यवस्थेंत गोंधळ व घोटाळा टळावा या दृष्टीनें ही व्यवस्था योग्यच आहे.

परिशिष्ट एक, भाग ३ मधील संस्थानांशीं करांबाबत करार

२५८. ( १ ) या प्रकरणांत कांहींही असलें, तरी पोटकलम ( २ ) मधील व्यवस्था पाळून संघाला परिशिष्ट एक, भाग ३ मधील संस्थानांशीं हिंदुस्थान सरकारला त्यांत बसविण्याचा अधिकार असलेल्या कराबाबत करार करतां येईल व त्या करारांत, या प्रकरणांत विभागणीची जी व्यवस्था सांगितली आहे, त्याव्यतिरिक्त वांटणीसंबंधीं व्यवस्था करतां येईल व असा करार झाला म्हणजे त्या कराराला अनुसरून या प्रकरणांतील व्यवस्था त्या संस्थानाबाबत लागू पडेल.

( २ ) वरील ( १ ) याप्रमाणें केलेला करार, घटना अंमलांत आल्यापासून १० वर्षांपेक्षां अधिक काळ चालणार नाहीं.

मात्र करारार्ची पांच वर्षे पुरीं झाल्यानंतर अर्थसमितीचा त्याबाबतचा रिपोर्ट विचारांत घेऊन जर अध्यक्षाला योग्य वाटलें, तर तो करारांत दुरुस्ती करील अगर तो रद्द करील.

परिशिष्ट एक, भाग ३ मध्यें मोठीं देशी संस्थानें नमूद केलीं आहेत. सदहू संस्थानांत संघ-कर बसविणें झाल्यास त्याबाबत संस्थानांशी संघाला करार करतां येईल; तसेंच उत्पन्नाची वांटणी कशी करावी हेंही करार करून ठरवितां येईल. तात्पर्य, हीं संस्थानें करार करून अर्थव्यवस्थेंत, करयोजनेंत सामील करून घेतां येतील. आज

जी विसंगति संस्थान हद्दींत व संघहद्दींत करयोजनेबाबत दिसते, ती असल्या करारांनीं दूर होईल. एकदा करार झाला म्हणजे त्याप्रमाणें व्यवस्था लागू होईल व त्या प्रमाणांत या प्रकरणांतील व्यवस्था जुळवून घेतली जाईल. हा करार १० वर्षें अमलांत राहील. पांच वर्षांनंतर जर अर्थसमितीच्या रिपोर्टावरून त्यांत बदल करणें अगर तो साफच रद्द करणें इष्ट वाटलें, तर अध्यक्ष तसें करील. साऱ्या हिंदी-संघराज्यांत आर्थिक व्यवस्थेंत व करयोजनेंत सूत्रबद्धता आणण्याच्या दृष्टीनें हें कलम योग्यच आहे.

**'ऐन उत्पन्न' कसें काढावयाचें ?**

२५९. (१) मागील कलमांत 'खर्च वजा जातां उत्पन्न' अगर 'ऐन उत्पन्न' असें जेथें जेथें आलें आहे त्याचा अर्थ त्या त्या करापासून येणाऱ्या उत्पन्नांतून वसुली खर्च वजा जातां जी रक्कम राहील ती, असा समजावा; तसेंच एखाद्या प्रदेशाबाबत एखाद्या कराचें ऐन उत्पन्न किती हें हिंदुस्थानचा सरहिशोबतपासनीस ठरवील व त्याप्रमाणें तो दाखलापत्र देईल व तें निर्णयात्मक मानलें जाईल.

(२) वर जें लिहिलें आहे त्याला अनुसरून, तसेंच या घटनेंत कांहीं तसा स्पष्ट उल्लेख असल्यास त्याला अनुसरून, पार्लमेंट जो कायदा करील अगर अध्यक्ष जो हुकुम काढील त्यांत, घटनेच्या या भागांत एखादें कराचें उत्पन्न घटकाला दिलें असेल अगर द्यावयाचें असेल, त्याबाबत तें उत्पन्न कसें मोजावें, तसेंच कोणत्या वेळेपासून व कोणत्या मुदतीसाठीं मोजावें, तसेंच एक महसूल वर्ष व दुसरें महसूल वर्ष यांत तें जुळवून कसें घ्यावें, त्यासंबंधीं व त्याला आनुषंगिक अशा सर्व गोष्टींची व्यवस्था असेल.

ऐन उत्पन्न म्हणजे काय व तें कसें मोजावें हें या कलमांत सांगितलें आहे. एखाद्या प्रदेशाबाबत एखाद्या कराचें ऐन उत्पन्न काढणें झाल्यास तें मध्यवर्ती संघ सरकारचा सरहिशोबतपासनीस काढील व त्याचा निर्णय अखेरचा असेल. याबाबत पार्लमेंट कायद्यानें अगर अध्यक्ष हुकुमानें तपशीलवार नियम करील व त्याप्रमाणें हें सर्व होईल.

२६० (१) घटना सुरू होऊन पांच वर्षें होतांच व त्यानंतर प्रत्येक पांचवें वर्ष संपतांच अगर अन्य ज्या वेळीं अध्यक्षाला अवश्य वाटेल तेव्हां, तो हुकुम काढून एक अर्थसमिति स्थापील व तींत एक सभापति व चार सभासद तो नेमील.

अर्थसमिति (फिनान्स कमिशन)

(२) पार्लमेंट कायदा करून कमिशनच्या सभासदांची आवश्यक पात्रता ठरवील व त्याचप्रमाणें त्यांची निवड कशी व्हावी हेंही ठरवील.

(३) ह्या समितीचें कर्तव्य खालील बाबतींत अध्यक्षाला शिफारसी करण्याचें आहे:—

(अ) ज्या करांचें ऐन उत्पन्न या प्रकरणानुसार संघ व घटक यांत वांटावयाचें आहे अगर वांटावें लागेल, त्याच्या वांटणीबद्दल, तसेंच घटका-घटकांत कोणत्या हिस्सेरशीनें तें वांटावें याबाबत,

(ब) हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून घटकांना कोणत्या तत्त्वानुसार मदत द्यावी याबाबत;

(क) परिशिष्ट एक भाग ३ यांतील संस्थानांत हिंदुस्थान सरकारनें जे कर बसवावयाचे, त्याबाबत त्या घटकाशीं अगर संस्थानाशीं जो करार संघानें केला असेल, तो चालू ठेवावा का दुरुस्त करावा याबाबत; आणि

(ड) अर्थव्यवस्था भक्कम राहावी या दृष्टीनें ज्या कांहीं बाबी समितीकडे अध्यक्षानें विचारासाठीं धाडल्या असतील, त्यांबाबत.

**( ४ ) समिति आपल्या कामकाजाबाबत नियम करील आणि समितीला तिचें कार्य करण्यासाठीं जे अधिकार पार्लमेंट कायदा करून देईल, ते राहतील.**

या प्रचंड देशाची अर्थव्यवस्था नीट राहावी म्हणून कायमची सल्लामसलत देणारी अशी तज्ज्ञ मंडळी असणें इष्ट आहे. या दृष्टीनें या कलमांतील व्यवस्था आहे. घटना सुरू होऊन पांच वर्षें होतांच एक अर्थसमिति अध्यक्ष नेमील. व नंतर दर पांच वर्षांनीं ती पुन्हां नव्यानें नेमील. म्हणजे कायम स्वरूपी ही व्यवस्था राहील. या समितींतील सभासदांची पात्रता पार्लमेंट कायदा करून ठरवील. समितीचा एक मुख्य अगर सभापति राहील. या समितीचें काम म्हणजे ( ३ ) यांत दिलेल्या बाबींसंबंधांत अध्यक्षाला शिफारसी करणें हें होय. हा तज्ज्ञांचा सल्ला अध्यक्षाला मिळावयाचा आहे. समिति कामकाजी नियम करील, व तिचे अधिकार पार्लमेंट कायद्यानें ठरवील.

**अर्थसमितीच्या शिफारशी**

**२६१. मागील कलमांत सांगितल्याप्रमाणें ज्या शिफारशी अर्थसमिति अध्यक्षाकडे धाडील त्या व त्याबाबत अध्यक्षानें काय निर्णय घेतले, याचा खुलासा अशीं दोन्ही अध्यक्ष पार्लमेंटपुढें ठेववील.**

शिफारशी, त्यावरील निर्णय व या बाबतचा खुलासा अशीं दोन्ही पार्लमेंटपुढें आलीं, म्हणजे पार्लमेंटमध्यें त्याची चर्चा होऊं शकते. कोणाही सभासदाला त्याबाबत चर्चा व्हावी अशी सूचना नियमानुसार आणतां येते. म्हणजे त्याबाबत लोकमताचें निदर्शन होतें, साधकबाधक टीका होते व राज्यकारभाराच्या या महत्त्वाच्या भागावर प्रकाश पडतो.

## अर्थव्यवस्थेसंबंधींच्या इतर बाबी

**हिंदुस्थानच्या उत्पन्नांतून देतां येणारा खर्च**

**२६२. एकाद्या सार्वजनिक कामाबाबत कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटला अगर घटक-कायदेमंडळाला नसतांना सुद्धां त्या कार्यासाठीं संघ अगर घटक यांना सार्वजनिक कार्य म्हणून मदत देतां येईल.**

संघ-यादींतील एखाद्या बाबतींत घटकाला तिचें कार्य सार्वजनिक हिताचें होत आहे असें वाटल्यास मदत देतां येईल. तसेंच संघाला घटक-राज्याच्या यादींतील बाबीबाबत त्याच कारणासाठीं मदत देतां येईल. थोडक्यांत, उभयतांना सार्वजनिक कार्याकरितां मदत देण्याचा अधिकार आहे. सामान्यतः ज्या बाबी अधिकारक्षेत्रांत आहेत, त्याबद्दल खर्च करण्याची सत्ता शासनसंस्थेला असते. या कलमांत अपवाद सांगितलेला आहे.

**सरकारी पैसा व त्याची व्यवस्था**

२६३. (१) अध्यक्ष व घटकाचा प्रमुख हिंदुस्थानचें अगर घटकाचें, जसें असेल तसें, जें उत्पन्न जमा होईल तें नियमांत उलेखिलेले कांहीं अपवाद सोडून हिंदुस्थान सरकारच्या अगर घटक सरकारच्या खातीं जमा व्हावें याबाबत नियम करील, व या नियमांत, उत्पन्नाचा पैसा खातीं जमा करण्याबाबत, तो काढून घेण्याबाबत, तसेंच तो कुणाजवळ राहावा याबाबत व तत्संबंधीं व त्याला आनुषंगिक असलेल्या गोष्टींबाबत काय पद्धत असावी, हें नमूद असेल अगर हें ठरविण्यासाठीं कोणाला अधिकार आहे हें नमूद असेल.

(२) या कलमांत कांहींही असलें, तरी पार्लमेंट कायदा करून हिंदुस्थानच्या उत्पन्नखातीं जमा झालेला पैसा, सरकारखातें कसा जमा व्हावा, तो कसा काढला जावा, तो कोठें राहावा, याबाबत नियमन करूं शकेल; तसेंच घटक-कायदेमंडळ कायदा करून घटकाच्या उत्पन्नखातीं येणारा पैसा कसा जमा व्हावा, तो कसा काढला जावा, तो कोठें राहावा याबाबत नियमन करूं शकेल.

या कलमांत अध्यक्ष व पार्लमेंट, प्रमुख व घटक कायदेमंडळ यांना तिजोरीच्या संबंधांत नियमन करण्याकरितां अवश्य असलेल्या अधिकाराचा विचार केला आहे. उत्पन्नाच्या रकमा कशा जमा व्हाव्यात, त्या काढणें झाल्यास कशा काढाव्यात, तसेंच सरकारी खजिना कोठें राहावा, यासंबंधीं नियम असतील. कोट्यवधि रुपयांचा हा कारभार अव्यवस्थित असतां कामा नये, त्यांत पद्धत असली पाहिजे. उत्पन्नाच्या अनेक बाबी असतात, त्या कशा जमा व्हाव्यात, तसेंच खर्चाचीं अनेक खातीं असतात, त्यांपैकीं कोणता खर्च कोणत्या खातीं जावा, तो पैसा कोणाच्या हुकुमानें

मिळावा, तसेंच सरकारी खजिना कुठें कुठें किती प्रमाणांत असावा, याबाबत नियम होणें अवश्य आहे. ते करण्याचा अधिकार अध्यक्ष व प्रमुख यांना दिला आहे. पार्लमेंट व घटक कायदेमंडळ पण याबाबत नियमन करूं शकेल.

२६४. संघाच्या मिळकतीवर, पार्लमेंट कायद्यानें अन्यथा न ठरवील तर घटक अगर घटकांतील कोणतीही अधिकारी सत्ता कर बसविणार नाहीं.

**सार्वजनिक मिळकत व करमाफी**

मात्र पार्लमेंट कायदा करून अन्यथा ठरवीपर्यंत जर संघाच्या एखाद्या मिळकतीवर ही घटना सुरू होण्यापूर्वी कर बसला असेल, अगर कराला ती पात्र असेल तर तो कर चालू असेपर्यंत त्या कराला ती पात्र राहील अगर पात्र असल्याचें मानण्यांत येईल.

संघाच्या मिळकती देशभर असणार. कांहीं मध्यवर्ती खातीं, जसें प्राप्तिकर खातें, कस्टम खातें, पोस्ट व तार, रेल्वे इत्यादि, यांच्या मिळकती सर्वत्र आहेत. त्यावर घटकांतील कर बसणें इष्ट नाहीं, म्हणून त्या मिळकतीवर करमाफी असेल. पण पार्लमेंटनें तसा कायदा केल्यास ही माफी जाईल. तसेंच घटनेपूर्वी जर एखादा कर वसूल होत असेल, अगर त्याला मिळकत पात्र असेल तर ती व्यवस्था पार्लमेंट अन्यथा कायदा करीपर्यंत चालू राहील. होतां होईल तों या घटनेंत अर्थविषयक व्यवस्था जी विद्यमान आहे, ती ताबडतोब व तडकाफडकीं बदललेली नाहीं. पार्लमेंटला अधिकार मात्र दिले आहेत. म्हणजेच अनुभव घेऊन योग्य विचार करून बदल करण्याची संधि ठेवली आहे.

२६५. पार्लमेंट कायदा करून अन्यथा ठरवीपर्यंत कोणत्याही घटक-राज्याच्या कायद्यानें विजेच्या उपयोगावर व तिच्या विक्रीवर ( मग ती वीज सरकार निर्माण करीत असो अगर खाजगी रीतीनें ती निर्माण होत असो ) कर बसविला जाणार नाहीं, अगर कर बसविण्यास अधिकार दिला जाणार नाहीं; जर ती वीज

**विजेवरील करापासून माफी**

( अ ) हिंदुस्थान सरकार वापरीत असेल, अगर हिंदुस्थान सरकारच्या उपयोगाकरितां तिची विक्री झाली असेल; अगर

(ब) संघाच्या रेल्वेच्या निर्मितीसाठीं, निगेसाठीं, त्या चालविण्यासाठीं हिंदुस्थान सरकार तिचा उपयोग करीत असेल अगर एकादी रेल्वे-कंपनी सदर रेल्वे चालविण्यासाठीं तिचा उपयोग करीत असेल, अगर सरकारला अगर एकाद्या रेल्वे कंपनीला संघ-रेल्वेची निर्मिति, निगा अगर ती चालविणें यासाठीं तिची विक्री झाली असेल,

तर, आणि जर कायद्यानें विजेच्या विक्रीवर कर बसविला अगर बसविण्याचा अधिकार दिला, तर त्या कायद्यांत अशी व्यवस्था असेल कीं, हिंदुस्थान सरकारला अगर रेल्वे कंपनीला वर सांगितल्याप्रमाणें संघ-रेल्वेची निर्मिति, निगा व ती चालू ठेवणें यासाठीं जी वीज विकत दिली जाईल, तिची किंमत, दुसऱ्या कोठल्याही मोठ्या प्रमाणावर विजेचा उपयोग करणाऱ्या गिऱ्हाइकाला जी किंमत द्यावी लागेल, त्यांतून कराची रक्कम कमी करून जेवढी होईल तेवढी आकारली जाईल.

हिंदुस्थान सरकार स्वत:साठीं, तसेंच संघ-रेल्वेसाठीं जी वीज विकत घेईल अगर वापरील त्यावर घटक-राज्य कर बसवूं शकणार नाहीं. मात्र पार्लमेंटला कायदा करून कर बसविण्यास मुभा देतां येईल. असा कर बसविला तर जी वीज हिंदुस्थान सरकारला अगर रेल्वे कंपनीला संघ-रेल्वेसाठीं दिली जाईल, तिची किंमत कराची रक्कम कमी करून आकारिली जाईल व ही आकारतांना अन्य मोठ्या गिऱ्हाइकाला जी किंमत द्यावी लागत असेल, ती विचारांत घेतली जाईल. किरकोळ गिऱ्हाइकापेक्षां मोठ्या गिऱ्हाइकाला कमी किंमत द्यावी लागते.

**घटक-राज्यें व संघ-कराची माफी**

२६६. यापुढें सांगितलेली व्यवस्था पाळून, घटक सरकारला हिंदुस्थानच्या प्रदेशांत असणाऱ्या जमिनीवर व इमारतीवर असलेला संघ-कर द्यावा लागणार नाहीं; तसेंच या प्रदेशांत मिळणाऱ्या, उद्भव पावणाऱ्या अगर निर्माण होणाऱ्या उत्पन्नावर कर द्यावा लागणार नाहीं.

(अ) मात्र घटक-राज्य जर खुद्द अगर कोणामार्फत धंदा अगर व्यापार करीत असेल, तर त्यावरील संघ-कर अगर त्या कराऐवजीं त्या धंद्यावर अगर तत्संबंधीं व्यवहारांवर बसविलेली रकमेची पट्टी ( Levy ), तसेंच त्या धंद्यांतून अगर व्यापारांतून जें उत्पन्न येईल अगर त्यानिमित्त जी मिळकत ताब्यांत असेल, त्यांवर जो संघ-कर अगर पट्टी बसविली जाईल, त्यांत माफी मिळणार नाहीं.

(ब) परिशिष्ट एक, भाग ३ मधील संस्थानिकांची जी जमीन, इमारती अगर अन्य प्राप्ति त्याची खाजगी मिळकत अगर खाजगी प्राप्ति असेल, तिला या कलमानें संघ-करापासून माफी असणार नाहीं.

खुलासाः—या कलमासाठीं, घटक सरकारच्या सामान्य कार्यांना आनुषंगिक असे जे व्यापारी व्यवहार आहेत, उदाहरणार्थ, जंगलांतील मालाची विक्री, तसेंच जेलमध्यें तयार झालेल्या मालाची विक्री, त्यांतून निघणाऱ्या उत्पादनाला अगर होणाऱ्या कामांना धंदा अगर व्यापार समजलें जाणार नाहीं.

कलम २६४, २६५ व २६६ या तीन्हींमध्यें करमाफीसंबंधीं विचार केला आहे. सरकारी कामासाठीं वीज, तसेंच सरकारी मिळकती यांवर करमाफी सामान्यतः असेल. संघ-कर कोणत्या मिळकतीवर बसणार नाहींत हेंही सांगितलें आहे. घटक-राज्याच्या मालकीची मिळकत घटक-प्रदेशाबाहेर पण हिंदुस्थानांत असणार, तसेंच त्यांचें कांहीं उत्पन्न बाहेरून पण हिंदुस्थानांतून येणार, त्यावर संघ-कर असल्यास या कलमानें माफी दिली आहे. मात्र घटक जर सरकारी म्हणून स्वतः अगर कुणामार्फत धंदा अगर व्यापार करील, तर त्यावर संघ-कर बसेल. उदाहरणार्थ, घटकानें विजेचें उत्पादन स्वतः केलें, अगर दुसरे कारखाने काढले तर त्यावर जे कर संघ बसवील, ते दिले पाहिजेत. कारण हे धंदे जर खाजगी असते तर त्यावर कर बसला असता. मात्र घटक-राज्याच्या सामान्य कार्यातून जर उत्पादन होत असेल, तर तें कार्य धंदा मानला जाणार नाहीं. उद्योगक्षेत्रांत राज्यानें प्रवेश करणें हें सामान्य कार्य मानलें जाणार नाहीं.

जेव्हां करयोजना मांडली जाते, त्या वेळीं ती कशी, केव्हां, कोणाकडून अमलांत येईल हें सांगितलें जातें. तसेंच कोणाला, केव्हां माफी मिळेल हेंही सांगितलें जातें; तसेंच कर परत केव्हां मिळेल, याचीही व्यवस्था असते. पुष्कळ वेळां कर आगाऊ घेतला जातो; मग हिशोब होतो व कांहीं भाग परत करावा लागतो. कर वसूल केल्यानंतर पण मुदतींत माफीचा हक्क उत्पन्न होतो. या सर्व गोष्टींचा विचार करयोजनेंत असावा लागतो. वरील कलमांत शासन संस्थांना मिळणाऱ्या करमाफीचा विचार केला आहे.

**कांहीं खर्चाबाबत व पेन्शनीबाबत जुळवणी**

२६७. या घटनेप्रमाणें एखाद्या न्यायालयाचा अगर समितीचा खर्च अगर ही घटना अंमलांत येण्यापूर्वी ज्यांनीं ब्रिटिश राजवटींत हिंदुस्थानांत केलेल्या नोकरीबद्दल पेन्शनें मिळविलीं असतील, तीं हिंदुस्थानच्या उत्पन्नावर अगर परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकाच्या उत्पन्नावर बोजा म्हणून असतील तर

(अ) जेव्हां हिंदुस्थानच्या उत्पन्नावर बोजा असेल तेव्हां तें कोर्ट अगर ती समिति हिनें वरीलपैकीं एखाद्या विशिष्ट घटकासाठीं काम केलें असेल अगर एखाद्या इसमानें संपूर्णपणें अगर अंशतः त्या घटकाबाबत नोकरी केली असेल; अगर

(ब) जेव्हां विशिष्ट घटकाच्या उत्पन्नावर बोजा असेल, तेव्हां तें कोर्ट अगर ती समिति हिनें संघासाठीं अगर दुसऱ्या अन्य घटकासाठीं काम केलें असेल, अगर एखाद्या इसमानें संपूर्णपणें अगर अंशतः संघाबाबत, अगर अन्य घटकाबाबत नोकरी केली असेल,

तर तो घटक, अगर संघ अगर अन्य घटक आपआपल्या उत्पन्नांतून खर्च व पेन्शनें याबाबत आपला हिस्सा करारानें जो ठरेल तो देईल अगर याप्रमाणें करार न ठरल्यास हिंदुस्थानचा प्रमुख न्यायाधीश

लवाद नेमील व तो लवाद वरील सरकारांनीं द्यावयाचा खर्चाचा हिस्सा ठरवून देईल.

ज्या खर्चाचा अगर पेन्शनींचा बोजा हिंदुस्थानच्या अगर घटकांच्या उत्पन्नावर घटनेनें ठेवला आहे, त्याबाबत जर कांहीं काम अन्य शासनसंस्थेसाठीं झालें असेल, अगर नोकरी अन्य शासनसंस्थेसाठीं केली असेल तर त्या शासनसंस्थेनें मग ती संघ असो अगर घटक असो, कामाप्रमाणें खर्च उचलला पाहिजे. हें करारानें ठरेल, व न ठरलें तर लवाद नेमला जाईल व तो हा खर्च ठरवून देईल.

# प्रकरण २ रें–कर्ज

हिंदुस्थान सरकार व कर्ज-उभारणी

२६८. संघाच्या कार्यकारी सत्तेला, पार्लमेंटनें वेळोवेळीं कायदा करून जी मर्यादा ठरविली असेल तिला अनुसरून, हिंदुस्थानच्या उत्पन्नाच्या तारणावर कर्ज उभारतां येईल, तसेंच ठरविलेल्या मर्यादेंत त्याबाबत ग्वाही देतां येईल.

राज्यकारभारासाठीं पैसा लागतो. तो कर अगर कर्ज यांपासून मिळूं शकतो. मागील प्रकरणांत करासंबंधीं विचार झाला. या प्रकरणांत कर्जाबद्दल विचार केला आहे. हें कर्ज काढण्याचा अधिकार संघाच्या कार्यकारी सत्तेला म्हणजे विद्यमान मध्यवर्ती सरकारला आहे. जें सरकार कारभार करणार, त्याला हा अधिकार असला पाहिजे. कर्ज काढण्याबाबत कांहीं मर्यादा वेळोवेळीं पार्लमेंट कायदा करून ठरवील. त्या मर्यादेंत हिंदुस्थानच्या उत्पन्नाच्या तारणावर कर्ज काढलें जाईल व त्याबाबत अवश्य ती ग्वाही दिली जाईल. प्रत्येक कर्ज काढतांना पार्लमेंटची संमति अवश्य नाहीं. हा अधिकार सर्व घटनांतून कार्यकारी सत्तेलाच दिलेला आहे. कारण कारभाराची गरज याच सत्तेला माहित असणार व कारभाराची जबाबदारी पण कार्यकारी सत्तेवर असणार. या दृष्टीनें हा अधिकार तिला असणें अगदीं योग्य आहे. संघ सरकारला कर्ज कोठेंही उभारण्याचा अधिकार आहे.

घटक व कर्ज-उभारणी

२६९. (१) या कलमांतील व्यवस्थेला अनुसरून, परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाच्या कार्यकारी सत्तेला, घटक कायदेमंडळ वेळोवेळीं कायदा करून जी मर्यादा

ठरवील, तिला अनुसरून घटकाच्या उत्पन्नाच्या तारणावर हिंदुस्थानच्या प्रदेशांत कर्ज उभारतां येईल; तसेंच ठरविलेल्या मर्यादेंत त्याबाबत ग्वाही देतां येईल.

( २ ) हिंदुस्थान सरकार ज्या योग्य वाटतील अशा शर्ती घालून परिशिष्ट एक, भाग १ अगर भाग ३ यांतील घटकांना कर्ज देऊं शकेल अगर जोंपर्यंत मागील कलमांत सांगितलेली मर्यादा उलंघिली जात नाहीं, तोंपर्यंत या घटकांनीं उभारलेल्या कर्जाची ग्वाही देऊं शकेल आणि जी रक्कम याप्रमाणें कर्ज म्हणून दिली जाईल, ती हिंदुस्थानच्या उत्पन्नावरील बोजा समजली जाईल.

( ३ ) परिशिष्ट एक, भाग १ अगर ३ मधील घटक-राज्याला जर हिंदुस्थान सरकारनें पूर्वी दिलेलें कर्ज, अगर हिंदुस्थान सरकारच्या आधींच्या सरकारनें दिलेलें कर्ज अंशतः जरी बाकी असेल अगर ज्या कर्जाबद्दल हिंदुस्थान सरकारनें अगर त्याच्या आधींच्या सरकारनें ग्वाही दिली असून तें अंशतः जरी बाकी असेल तर हिंदुस्थान सरकारच्या संमतीशिवाय कर्ज काढतां येणार नाहीं.

या पोटकलमाखालीं ज्या शर्ती योग्य वाटतील, त्या घालून हिंदुस्थान सरकारला संमति देतां येईल.

हिंदुस्थान सरकारला क.२६८ प्रमाणें देशीं अगर परदेशीं कर्ज काढतां येतें. घटकांना मात्र हिंदुस्थानांतच तें काढतां येईल. तसेंच हिंदुस्थान सरकार ( २ ) प्रमाणें त्यांना कर्ज देईल अगर ग्वाही देईल. पूर्वीचें कर्ज अगर ग्वाही दिलेलें कर्ज जोंपर्यंत अंशतः जरी बाकी असेल, तोंपर्यंत घटकाला हिंदुस्थान सरकारच्या परवानगीशिवाय कर्ज काढतां येणार नाहीं. हिंदुस्थानची पत ही हिंदुस्थान सरकारची जोखीम आहे. ती बाजारांत राहील, हें पाहणें त्या सरकारचें कार्य आहे. घटकांच्या कर्जावर देखरेख ठेवणें व त्यायोगें देशांतील अर्थव्यवस्था बिघडणार नाहीं, तसेंच नाणेबाजारांत गडबड होणार नाहीं हें मध्यवर्ती सरकारनें पाहिलें पाहिजे. या दृष्टीनें या कलमांतील योजना योग्य आहे; पण ती सर्वस्वीं उत्कृष्ट म्हणतां येणार नाहीं. वास्तविक, प्रत्येक घटकानें कर्ज काढण्यापूर्वी मध्यवर्ती सरकारचा सल्ला अगर संमति घेणें आवश्यक

असलें पाहिजे. तसें असलें म्हणजे नाणें बाजारावर मध्यवर्ती सरकार परिणाम करूं शकेल व कांहीं अंशीं त्याचें नियमनही करूं शकेल. घटक सरकार कर्ज काढण्यापूर्वी मध्यवर्ती बँकेचा सल्ला सामान्यपणें घेईलच, तथापि कायद्यानें यांबाबत मध्यवर्ती सत्तेचा सल्ला अगर संमति अवश्य करणें अधिक श्रेयस्कर ठरेल.

# प्रकरण ३ रें—मिळकत, करार, देणीं व दावे

देणें, घेणें, हक्क व जबाबदारी यांचा वारसा

२७०. ही घटना अमलांत येतांच हिंदुस्थान सरकार व परिशिष्ट एक, भाग १ यांतील प्रत्येक घटकाचें सरकार यांजकडे अनुक्रमें हिंदुस्थानचें वसाहत सरकार व त्या त्या गव्हर्नरच्या प्रांताचें सरकार यांच्या सर्व मिळकतीचा, देण्याघेण्याचा वारसा येईल, मात्र ही घटना अंमलांत येण्यापूर्वी पाकिस्तान अगर पूर्व बंगाल, पश्चिम बंगाल, पश्चिम पंजाब आणि पूर्व पंजाब यांच्या निर्मितीमुळें ज्या कांहीं जुळवण्या झाल्या असतील, त्यांना अनुसरून हा वारसा येईल.

१९४७ च्या ब्रिटिश पार्लमेंटच्या कायद्यानें १९३५ च्या घटना कायद्यांत बदल करून हिंदुस्थानचें राजकीय स्वरूप वसाहतीचें स्वराज्य असें केलें आहे. १५ ऑगस्ट १९४७ नंतर हिंदुस्थानचें सरकार म्हणजे वसाहतीचें सरकार ( Dominion of India ) असें कायद्यानें संबोधिलें आहे. हें सरकार त्याच्या पूर्वीच्या सरकारचें वारस आहे. फाळणीमुळें पाकिस्तान व कांहीं प्रांत नवीन झाले. फाळणीमुळें मिळकत, देणींघेणीं यांबाबत हिशोब होऊन अनेक जुळवण्या ( Adjustment ) झाल्या आहेत, त्यांना अनुसरून जी मिळकत, देणींघेणीं हिंदुस्थानच्या वसाहत सरकारला मिळालीं, तीं त्यांत जी कांहीं भर पडेल त्यासुद्धां, घटना सुरू झाल्यानंतर जें हिंदुस्थान सरकार अस्तित्वांत येईल, त्याच्या वांट्याला जातील. सर्व देणींघेणीं, तसेंच करारमदार, हक्क व जबाबदाऱ्या ज्या कांहीं असतील त्यासुद्धां हा वारसा नवीन सरकारकडे येईल. नैतिक दृष्ट्या एका सरकारनें केलेले करारमदार व दिलेलीं आश्वासनें हीं पुढें येणाऱ्या सरकारवर बंधनकारक असतात. असें नसेल तर सरकारला कोणी कर्ज देणार नाहीं, व्यवहार होणें मुष्कील होईल, सार्वजनिक शांतता व विश्वास राहणार नाहीं. म्हणून नवीन येणारें सरकार शक्य तितके जुने करार व जबाबदाऱ्या स्वीकारतें. हेंच तत्त्व या कलमांत सांगितलें आहे.

२७१. यापुढें सांगितलेल्या व्यवस्थेचें पालन करून, परिशिष्ट एक, भाग ३ मधील संस्थानें सोडून हिंदुस्थानांत कोठेंही जी मिळकत वारस नाहीं म्हणून अगर मालक सांपडत नाहीं म्हणून मोकळी पडली आहे, अगर नष्टवंश झाला म्हणून ही घटना अंमलांत येण्यापूर्वी राजाला मिळाली असती, ती सर्व जर परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटक हद्दींत असेल, तर तिची मालकी त्या घटकाची म्हणून घटक-सरकारकडे जाईल; अन्यत्र संघाची म्हणून हिंदुस्थान सरकारकडे जाईल.

**बिनवारसी, बिन-मालकीची अगर मालक उपलब्ध नसेल अशी मिळकत**

मात्र जर एकादी मिळकत जी एरवीं राजाला प्राप्त झाली असती ती परिशिष्ट एक, भाग १ मधील एकाद्या घटकाच्या ताब्यांत असेल, अगर हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांत असेल, तर ज्यासाठीं, व ज्या कार्याकरितां हा ताबा असेल, त्यासाठीं व त्या कार्याकरितां ती ती मिळकत घटक सरकार अगर हिंदुस्थान सरकार यांच्या मालकीची होईल.

राज्य हें सर्व नागरिकांचें शेष वारस आहे. कायद्याप्रमाणें व्यक्तीची मिळकत त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वारसांना मिळेल. जेथें हा वारस नाहीं, अगर उपलब्ध होत नाहीं, तेथें हा वारसा राज्याला मिळेल. तसेंच मालक नाहींसा झाला, अगर सांपडत नाहीं, अशा स्थितींत मालकी राज्याकडे येते. ही व्यवस्था १९३५ च्या कायद्यांत आहे, तीच या कलमांत आणली आहे. राजाचा वारसा राज्याकडे आला आहे. राजासुद्धां राज्याचा प्रतीक होता. येथें प्रस्तुत घटनेंत राजा नाहीं. म्हणून संघ-सरकार त्या जागीं येतें. त्याला मालकी येते. घटक सरकारला त्याच न्यायानें मालकी येते. जर मिळकतीचा कबजा आधींच एखाद्या कार्याकरितां म्हणून संघ-सरकार अगर घटक सरकारकडे असेल तर त्याची मालकी पण त्या कार्यासाठीं त्याकडे राहील.

२७२. (१) संघाची कार्यकारी सत्ता, तसेंच परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकाची कार्यकारी सत्ता यांना, संबंधित कायदेमंडळानें केलेल्या कायद्यांना अनुसरून आपली एखादी मिळकत जी सरकारी कार्यासाठीं असेल

**मिळकत देण्या-बाबत सत्ता**

ती देणें, विकणें, गहाण ठेवणें अगर अन्य रीतीनें तिची वासलात लावणें, तसेंच सरकारी कार्यासाठीं मिळकत विकत घेणें अगर कायद्यानें ती मिळवणें आणि करार करणें, यांबाबत अधिकार आहे.

( २ ) संघासाठीं अगर परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकासाठीं जी मिळकत घेतली असेल, ती संघाची अगर घटकाची, जसें असेल तसें, मालकीची म्हणून राहील.

संघ-सरकार व परिशिष्ट एक, भाग १ मधील घटक सरकार यांना त्यांच्याकडे असलेल्या मिळकती विकणें, देणें, गहाण ठेवणें इत्यादि बाबतींत पूर्ण अधिकार आहे. तसेंच सरकारी कार्यासाटीं मिळकत विकत घेणें अगर कायद्यानें मिळविणें याही बाबतींत पूर्ण अधिकार आहे. तसेंच करार करण्याचाही अधिकार आहे. सरकारतर्फे करार करणें नेहमी जरूर असतें, व हा अधिकार या कलमानें कार्यकारी सत्तेला दिला आहे.

करार

२७३. ( १ ) संघ सरकार अगर परिशिष्ट भाग १ मधील घटक सरकार कार्यकारी सत्तेच्या अनुरोधानें जे करार करील ते अनुक्रमें अध्यक्ष व प्रमुख यांच्या नांवानें असतील आणि असे सर्व करार व सर्व आश्वासनें जीं मिळकतीबाबत असतील तीं अध्यक्ष अगर प्रमुख याच्यातर्फे, तो सांगेल त्याप्रमाणें व सांगेल त्या इसमामार्फत लेख होऊन पुरे केले जातील.

( २ ) जे करार व जीं आश्वासनें या घटनेच्या उद्देशासाठीं असतील, अगर यापूर्वी असलेल्या हिंदुस्थान सरकारच्या बाबतींतील केलेल्या कायद्याच्या उद्देशासाठीं असतील, त्या कराराबद्दल अथवा आश्वासनाबद्दल अध्यक्ष अगर प्रमुख हे व्यक्तिशः जबाबदार नाहींत. तसेंच त्यांच्यातर्फे जो इसम करार करील अगर आश्वासन देईल तो पण व्यक्तिशः जबाबदार नाहीं.

करार करण्याचा अगर आश्वासन अगर ग्वाही देण्याचा अधिकार संघ-सरकारला तसेंच घटक सरकारला आहे. हे सर्व लेख अध्यक्ष अगर प्रमुख यांच्या नांवानें असतील. म्हणजे कराराच्या अगर ग्वाहीच्या दस्तऐवजांत अध्यक्ष अगर प्रमुख यांचें नांव करारकर्ता अथवा ग्वाही देणारा म्हणून असेल. तसेंच प्रत्यक्ष दस्तऐवज कोणी कसा करून द्यावयाचा हें अध्यक्ष अगर प्रमुख ठरवील व त्याप्रमाणें कागद पुरा केला जाईल. असा करार जरी अध्यक्षाच्या अगर प्रमुखाच्या नांवानें असला तरी ते त्याबाबत व्यक्तिशः जबाबदार नाहींत. जबाबदारी त्या त्या शासनसंस्थेची. तसेंच जे इसम अध्यक्ष अगर प्रमुखातर्फे कागदावर सही करतील, तेही व्यक्तिशः जबाबदार नाहींत. या करारांबाबत सरकार जबाबदार आहे; कारण करार सरकारतर्फे होणार. जसें राज्य अध्यक्षाच्या नांवानें चालणार, जसे सर्व हुकुम अध्यक्ष अगर प्रमुख यांच्या नांवानें निघणार, तसे करारही त्याच्या नांवानें होणार. यांत व्यक्तिगत जबाबदारी असणार नाहीं.

**दावे व कोर्टांतील कामें**

२७४. (१) हिंदुस्थान सरकार 'हिंदुस्थान सरकार' या नांवानें दावा लावील; तसेंच त्या नांवानें त्याविरुद्ध दावा आणतां येईल; तसेंच परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकाला घटक-राज्याच्या नांवानें दावा लावतां येईल व त्या नांवानें त्याविरुद्ध दावा आणतां येईल; मात्र घटनेनें दिलेल्या अधिकारानुसार पार्लमेंटनें अगर घटक कायदेमंडळानें याबाबत जे कायदे केले असतील, त्याला अनुसरून व जर ही घटना झाली नसती तर ज्या बाबतींत हिंदुस्थान वसाहतीला अगर संबंधित प्रांतांना दावे आणतां आले असते, अगर त्याविरुद्ध दावे लावले असते, तेवढ्या बाबतींतच हें करतां येईल.

(२) ही घटना सुरू होण्याच्या तारखेस

(अ) जर एखादें काम कोर्टापुढें चालू असेल व त्यांत हिंदुस्थान वसाहत पक्षकार असेल, तर त्या जागीं हिंदुस्थान सरकार आपोआप पक्षकार होईल; आणि

**(ब) तसेंच जर एखाद्या कोर्टापुढील चालू कामांत प्रांत पक्षकार असेल, तर त्या जागीं संबंधी घटक आपोआप पक्षकार होईल.**

सरकारविरुद्ध दावे कसे आणावे अगर सरकारनें कोणत्या नांवानें दावे आणावेत हें या कलमांत सांगितलें आहे. 'हिंदुस्थान सरकार', तसेंच घटक-राज्याचें नांव जें असेल तें घालून दावा आणतां येईल अगर त्याविरुद्ध आणला जाईल. घटना सुरू होतांच ज्या चालू कामांत 'हिंदुस्थान वसाहत' हा पक्षकार आहे, अगर प्रांत पक्षकार आहे त्याऐवजीं अनुक्रमें 'हिंदुस्थान सरकार' अगर संबंधी घटक-राज्य आपोआप पक्षकार म्हणून येईल. कारण हे वारस आहेत. म्हणून त्यांना व त्याविरुद्ध काम चालू ठेवणें हें अगदीं न्यायाला धरून आहे.

# भाग ११

## आणीबाणीच्या प्रसंगाबाबत व्यवस्था

२७५. (१) जर अध्यक्षाला वाटलें कीं परिस्थिति आणीबाणीची आहे व तिच्यामुळें हिंदुस्थानच्या संरक्षणाला धोका उत्पन्न झाला आहे, मग तो धोका अंतर्गत अशांततेमुळें असो, अगर युद्धामुळें असो, तर तो त्या अर्थाची घोषणा करील.

आणीबाणीची घोषणा

(२) वर (१) यांत सांगितल्याप्रमाणें काढलेली घोषणा (जिचा उल्लेख या घटनेंत 'आणीबाणीची घोषणा' म्हणून केला आहे)—

(अ) नंतर काढलेल्या घोषणेनें रद्द होईल;

(ब) पार्लमेंटच्या प्रत्येक सभागृहापुढें ठेवण्यांत येईल;

(क) सहा महिने संपतांच तिचा अंमल संपुष्टांत येईल; मात्र दरम्यान जर पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांनीं ठराव करून ती मंजूर केल्यास ती पुढें चालू राहील.

(२) हिंदुस्थानच्या संरक्षणाला धोका उत्पन्न झाला आहे हें जाहीर करणारी आणीबाणीची घोषणा, प्रत्यक्ष युद्ध सुरू होण्यापूर्वी, तसेंच अंतर्गत अशांतता उत्पन्न होण्यापूर्वींही, जर अध्यक्षाला धोका समीप आहे असें वाटेल, तर करतां येईल.

राज्याचें पहिलें कर्तव्य देशाचें बाहेरील शत्रूपासून व अंतर्गत अशांततेपासून संरक्षण करणें हें होय. केव्हां या संरक्षणाला धोका उत्पन्न होईल हें कोणी निश्चितपणें तारीखवार सांगूं शकत नाहीं. धोका येतांच, अगर तो समीप आला असल्याची चाहूल लागतांच त्याबाबत जरूर ती उपाययोजना करणें हें देशांतील कार्यकारी सत्तेचें

प्रथम कर्तव्य आहे. या परिस्थितींत काय करावें हें ठरविण्याचा अधिकार कार्यकारी सत्तेला असला पाहिजे.

या घटनेप्रमाणें मध्यवर्ती कार्यकारी सत्तेचा प्रमुख अध्यक्ष आहे. त्याला वाटलें कीं, धोका आला अगर समीप आला म्हणजे तो आणीबाणीच्या परिस्थितीची घोषणा करील. धोका येईपर्यंत वाट पाहणें मूर्खपणाचें ठरतें. म्हणून याबाबत अध्यक्षाला या कलमानें योग्य तो अधिकार दिला आहे. त्यानें घोषणा केली म्हणजे ती सहा महिने अमलांत राहील. ती पार्लमेंटपुढें ठेवण्यांत येईल. मग पार्लमेंटमध्यें तिच्यावर चर्चा होऊं शकेल. लोकमतप्रदर्शनाला संधि मिळेल. सभागृहांनीं घोषणा मंजूर केल्यास ती चालू राहील. न केल्यास सहा महिन्यांत ती संपेल. त्याच्या आधींही अध्यक्ष दुसरी घोषणा काढून ती रद्द करूं शकेल. तात्पर्य, युद्धापासून व अंतर्गत अशांततेपासून देश वांचविण्यासाठीं अशी व्यवस्था असणें अवश्य आहे. आजच्या जगांत जाहीर न होतांच युद्धें सुरू होतात व क्रान्तीच्या नांवावर केव्हां देशांत वावटळ उठेल याचा नेम नाहीं. या परिस्थितींत सतत जागृति हेंच इष्ट धोरण आहे.

**आणीबाणीच्या घोषणेचा परिणाम**

२७६. आणीबाणीची घोषणा जारी असेपर्यंत, या घटनेंत कांहींही असलें तरी--

(अ) संघाच्या कार्यकारी सत्तेला घटकाच्या कार्यकारी सत्तेला तिनें आपली सत्ता कशी चालवावी, याबाबत आदेश देतां येतील.

(ब) पार्लमेंटला ज्याबाबत कायदे करण्याचा अधिकार आहे, त्या अधिकारांत असेही कायदे करण्याच्या अधिकाराचा समावेश होईल, कीं ज्या योगें त्या विषयासंबंधीं हिंदुस्थान सरकारला अगर त्याच्या अधिकाऱ्यांना अगर त्याच्या अधिकारी संस्थांना अधिकार दिला जाईल व त्यांवर कर्तव्यें लादलीं जातील अगर तसा अधिकार देण्याची अगर कर्तव्यें लादण्याची सत्ता बहाल केली जाईल.

आणीबाणीची घोषणा जारी असेपर्यंत सर्वसामान्य राज्यव्यवस्था आहे तशीच राहूं शकत नाहीं. घटनेप्रमाणें घटक कार्यकारी सत्ता आपआपल्या क्षेत्रांत स्वायत्त व स्वतंत्र आहे. पण ही घोषणा होतांच घटकांची कार्यकारी सत्ता कशी वापरावी याबाबत मध्यवर्ती सरकार अगर कार्यकारी सत्ता आदेश देईल. म्हणजे कांहीं काळ राज्य संयुक्त स्वरूपाचें न राहतां अंशतः एकसंघी, एकतंत्री होईल. देशावर संकट आहे अशा वेळीं साऱ्या देशांत एकसूत्रीपणा असणें अधिक जरूर आहे. सर्व घटक एका तंत्रानें चालले पाहिजेत. शांतता, सुव्यवस्था, वाहतुक, दळणवळण, मालपुरवठा, कामगारांबाबत धोरण, उत्पादनाचें धोरण हीं देशभर एक असलीं पाहिजेत, म्हणून निर्णायक सत्ता एके ठिकाणीं केंद्रित असणें जरूर आहे. त्या दृष्टीनें देशांतील कार्यकारी सत्ता केंद्रित करण्याची या कलमांतील व्यवस्था योग्य आहे. तसेंच प्रत्येक बाबतींत पार्लमेंट कायदा करूं म्हणेल तर संकटकाळीं हें अयोग्य व धोक्याचें ठरेल. म्हणून पार्लमेंटलाही या काळांत हिंदुस्थान सरकारला अधिकार देणारे कायदे करण्याचा अधिकार दिला आहे. एकदा अधिकार दिला व त्याचप्रमाणें अधिकार देण्याची सत्ता दिली, म्हणजे कार्य सुकर होतें. जें जरूर व निकडीचें तें कार्य पार्लमेंटकडे न जातां नियमानें मध्यवर्ती सरकार करूं शकतें. अर्थात् हें सत्तादान संकटकाळापुरतेंच आहे. सामान्यतः पार्लमेंटची सत्ता अबाधित आहे व ही सत्तामुद्रा पार्लमेंटच देणार, यावरून पार्लमेंटचें प्रभुत्व मान्य केलें आहे.

**आणीबाणीची घोषणा चालू असतांना उत्पन्नाच्या वांटणीबाबत व्यवस्था**

**२७७. आणीबाणीची घोषणा अमलांत असेपर्यंत अध्यक्ष हुकुम काढून कलम २४९ ते २५९ यांतील सर्व अगर अंशतः व्यवस्था, तो जे अपवाद अगर जे बदल व्हावेत असें ठरवील ते पाळून चालू राहील व हें किती मुदतीपर्यंत चालू राहावें हें तो हुकुमांत नमूद करील; मात्र ज्या महसूल वर्षांत घोषणा रद्द होईल त्या वर्षाच्या अखेरीपलीकडे ही मुदत कांहीं असलें तरी राहणार नाहीं.**

आणीबाणीची घोषणा जारी असतांना अध्यक्षाला, उत्पन्नाबाबतची जी व्यवस्था घटनेचें कलम २४९ ते २५९ यांत सांगितली आहे, त्यांत वाटेल तो बदल करतां येईल, वाटेल ते अपवाद ठरवितां येतील. त्यानें हुकुम काढून ते ठरवावयाचे आहेत व त्यांत त्यानें हुकुमाची कालमर्यादा पण नमूद करावयाची आहे. मात्र ज्या महसूलसालांत घोषणा रद्द होईल, त्याच्या अंतापलीकडे ही मर्यादा जाणार नाहीं. कारण मग सामान्य परिस्थिति निर्माण होऊन नेहमींचा कारभार सुरू होईल.

या कलमानें जरूर तें उत्पन्न अध्यक्षाला संकटकाळीं राज्यकारभार चालविण्यासाठीं घेतां येईल.

**परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांतील शासनयंत्र निष्फल ठरलें तर होणारी व्यवस्था**

२७८. (१) जेव्हां कलम १८८ प्रमाणें घटकाच्या प्रमुखानें जाहीरनामा काढून तो अध्यक्षाकडे धाडला व तो मिळाल्यानंतर जर अध्यक्षाला वाटलें, कीं घटकाचा कारभार घटनेंतील व्यवस्थेप्रमाणें चालणें अशक्य आहे, तर तो घोषणा करून

(अ) स्वतःकडे घटक सरकारचीं सर्व अगर कांहीं कार्यें घेईल, तसेंच जे अधिकार प्रमुख, अगर त्या घटकांतील कायदेमंडळ सोडून अन्य अधिकारी व अन्य संस्था यांना असतील अगर ते वापरत असतील, ते सर्व अगर कांहीं तो स्वतःकडे घेईल;

(ब) घटक कायदेमंडळाचे अधिकार पार्लमेंटला दिले आहेत असें जाहीर करील; आणि या घोषणेंत घोषणेच्या उद्देशपूर्तीसाठीं त्याला ज्या जरूर अगर इष्ट वाटतील अशा, सर्व अवश्य व आनुषंगिक तरतुदी असतील व यांत घटकांतील संस्था अगर अधिकाऱ्यांबाबत या घटनेंत जी व्यवस्था असेल, ती पूर्णपणें अगर अंशतः तहकूब करण्याच्याही व्यवस्थेचा समावेश आहे;

मात्र या कलमानें अध्यक्षाला, जे अधिकार मुख्य कोर्टाला आहेत अगर मुख्य कोर्ट जे अधिकार वापरतें, त्यांपैकीं एकही आपणाकडे घेण्याची सत्ता येत नाहीं, तसेंच मुख्य कोर्टासंबंधीं जी व्यवस्था घटनेंत आहे, ती पूर्णपणें अगर अंशतः सुद्धां त्याला तहकूब करतां येणार नाहीं.

( २ ) याप्रमाणें काढलेली घोषणा मागाहून दुसरी घोषणा काढून रद्द करतां येईल.

( ३ ) या कलमान्वयें काढलेली घोषणा

( अ ) पार्लमेंटच्या प्रत्येक सभागृहापुढें ठेवली जाईल.

( ब ) पूर्वीची घोषणा रद्द करणारी घोषणा नसेल, तर सहा महिने होतांच ती रद्द होईल.

मात्र जर आणि जितक्या वेळां, ही घोषणा चालू राहावी हें पसंत करणारा ठराव पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांनीं पास केला असेल तर, ही घोषणा रद्द न केल्यास या कलमाखालीं जेव्हां ती संपते, त्या तारखेपासून पुढें बारा महिने चालू राहील, पण कोणत्याही परिस्थितींत ही घोषणा तीन वर्षांपेक्षां अधिक काल अमलांत राहणार नाहीं.

( ४ ) जेव्हां ( १ ) प्रमाणें घोषणा झाली असेल व त्यांत घटक कायदेमंडळाचे अधिकार पार्लमेंटला दिले आहेत, असें जाहीर झालें असेल तेव्हां

( अ ) पार्लमेंटला कायदा करून हिंदुस्थान सरकारला अगर त्याच्या अधिकाऱ्यांना अगर शासन संस्थांना अधिकार देतां येतील व त्यांजवर कर्तव्यें लादतां येतील अगर अधिकार देण्याची व कर्तव्यें लादण्याची सत्ता बहाल करतां येईल.

( ब ) अध्यक्षाला कलम १०२ प्रमाणें जेव्हां पार्लमेंट चालू नसेल, तेव्हां वटहुकुम काढतां येतील.

( ५ ) वरीलप्रमाणें घोषणा नसतां जो कायदा पार्लमेंटला करतां आला नसता तो कायदा जेवढ्या प्रमाणांत पार्लमेंटच्या सामान्य अधिकाराबाहेर तो असेल, तेवढ्या प्रमाणांत घोषणा रद्द झाल्यापासून एक वर्ष होतांच रद्द होईल; मात्र ही मुदत संपण्यापूर्वीं ज्या गोष्टी

**झाल्या असतील अगर केल्या नसतील, त्यांना बाध येणार नाहीं; तसेंच ही मुदत संपण्यापूर्वी जर रद्द होणारीं कलमें आधींच जशींच्या तशीं अगर कांहीं दुरुस्त्या करून घटक कायदेमंडळानें कायदा करून रद्द केलीं असतील, अगर पुन्हा कायम केलीं असतील तर त्याप्रमाणें होईल.**

कलम १८८ प्रमाणें, प्रांतांत शांतता व सुव्यवस्था यांना धोका उत्पन्न झाला तर प्रमुखाला घोषणा करून राज्यकारभार स्वतःकडे सर्व अगर अंशतः घेतां येतो. त्या कलमाप्रमाणें घोषणा दोन आठवडे अमलांत राहते. घोषणा केल्याबरोबर ती अध्यक्षाला कळविण्यांत येते. आणि जर अध्यक्षाला वाटलें कीं, प्रांतांतील कारभार घटनेला धरून चालणें अशक्य आहे, तर या कलमाप्रमाणें तो घोषणा करून राज्यकारभार त्याला वाटेल त्या प्रमाणांत स्वतःकडे घेईल. कार्यकारी सत्ता तो स्वतः उपयोगांत आणील. तसेंच घटक कायदेमंडळाचे अधिकार तो पार्लमेंटला देईल. जी जरूर व इष्ट ती सर्व व्यवस्था तो घोषणेंत जाहीर करील. फक्त मुख्य कोर्टाचे अधिकार त्याला घेतां येणार नाहींत अगर त्याबाबतचीं कलमें तहकूब करतां येणार नाहींत. ही घोषणा पार्लमेंटपुढें तो ठेवील; तेथें त्यावर चर्चा होईल. लोकमताचें प्रदर्शन अशा वेळीं होऊं शकतें. पार्लमेंटनें ठराव करून घोषणा चालू राहावी, असें ठरविल्यास ती सामान्यतः जेव्हा संपते, त्यापासून आणखी बारा महिने चालू राहील. कांहीं झालें तरी तीन वर्षांपेक्षां अधिक काळ ही घोषणा अमलांत राहणार नाहीं. अध्यक्षाला सुरुवातीस घोषणा करण्याचा अधिकार असला, तरी पार्लमेंटनें मान्यता दिल्यासच अधिक काळ ती अमलांत राहील. पार्लमेंट सहजासहजीं मान्यता देणार नाहीं. खरोखरच बिकट परिस्थिति असेल, तरच ही मान्यता मिळेल. पार्लमेंटनें मान्यता दिल्यानंतर अध्यक्षाला दोष देणें योग्य नाहीं. शिवाय पार्लमेंटला घोषणा चालू असतां घटकाबाबत कायदे करण्याचा अधिकार या कलमांत आहे. यामुळें हा प्रश्न वारंवार सभागृहापुढें येईल. परिस्थिति निवळल्यास अध्यक्ष लोकमत लक्षांत घेऊन घोषणा रद्द करील, हें स्पष्ट आहे.

एकदां घोषणा केली कीं, अवश्य ते कायदे पार्लमेंट पास करील. तसेंच पार्लमेंट चालू नसेल तेव्हां कलम १०२ प्रमाणें अध्यक्ष वटहुकुमही काढूं शकेल. तात्पर्य, राज्यकारभार नीट चालावा म्हणून अध्यक्षाला जरूर ती सत्ता तसेंच पार्लमेंटला जरूर ती सत्ता या कलमांत दिली आहे. घटनेबरहुकुम जेव्हां घटकांचा कारभार चालू शकत नाहीं, अशा वेळीं केवळ लोकशाही पाहिजे असें म्हणून चालणार नाहीं. मुख्य गोष्ट म्हणजे राज्यकारभार चालला पाहिजे. राज्यकारभाराचा पाया शांतता व सुव्यवस्था आहे. शांतता नसेल, तर व्यापार चालू राहणार नाहीं, प्रगति

होणार नाहीं; सुव्यवस्था नसेल तर उद्योग व व्यवहार चालणार नाहींत; त्यांत विश्वास राहणार नाहीं. म्हणून, प्रत्येक राज्याचें आद्य व मुख्य कर्तव्य शांतता व सुव्यवस्था ठेवणें हें आहे. हिंदी राज्यघटना लोकशाहीयुक्त आहे, पण कांहीं प्रसंगीं लोकशाही निष्फल ठरली, तर राज्यकारभार थांबतां कामा नये. तो चालूच ठेवला पाहिजे. कांहीं काळ घटना तेवढ्यापुरती तहकूब राहील. अराजकता व अस्वस्थता झाली तर राज्यच बुडेल; म्हणून राज्य योग्य कारभारानें राखिलें पाहिजे. हेंच या कलमाचें तत्त्व व धोरण आहे. अपवाद म्हणून हें आहे, नियम म्हणजे घटनेप्रमाणें कारभार होय.

**कलम १३ मधील व्यवस्था आणीबाणीच्या वेळीं तहकूब**

**२७९. आणीबाणीची घोषणा अमलांत असेपर्यंत, घटनेच्या भाग ३, कलम १३ मधील व्यवस्थेनें त्या भागांत घटकाला जो कायदा करण्याचा अधिकार आहे, अगर त्याच्या कार्यकारी सत्तेला जें करण्याचा अधिकार आहे, त्या अधिकारांवर कांहींही बंधन येणार नाहीं.**

जेव्हां आणीबाणीची घोषणा होते, तेव्हां त्याचा अर्थ नेहमीची परिस्थिति राहिलेली नाहीं, हा आहे. कलम १३ मध्यें मौलिक हक्क अगर नागरिक स्वातंत्र्यें यांबाबत व्यवस्था आहे. मुद्रणस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य या सर्व गोष्टी सामान्य परिस्थितींत असल्या पाहिजेत. पण यांचा उपभोग नीट मिळावा म्हणून राज्य पाहिजे. तसेंच त्या राज्यांत शांतता पाहिजे, सुव्यवस्था पाहिजे. जेथें राज्याच्या अस्तित्वावरच हल्ला असेल, परचक्र आलें असेल, अगर गुंडांनीं अशांतता माजवून अराजक उत्पन्न केलें असेल, या वेळीं पहिली गोष्ट केली पाहिजे ती म्हणजे शांतता व सुव्यवस्था कायम करणें ही. हें पहिलें कर्तव्य आहे. देशाचें स्वातंत्र्य राहिलें पाहिजे, मग नागरिक स्वातंत्र्यावर संकटकालीं कांहीं तात्पुरतीं बंधनें आलीं तर तीं नागरिकांनीं दूरदृष्टीनें मानलीं पाहिजेत. स्वातंत्र्य राखण्यासाठीं, देशाच्या संरक्षणासाठीं, शांततेसाठीं, सरकारला पूर्ण वाव मिळाला पाहिजे व तेवढ्यापुरतीं नागरिक स्वातंत्र्यें मर्यादित होतील अगर तहकूबही होतील. हें करण्याचा अधिकार या कलमांत दिला आहे. शिर राहिलें तर पंचवीस पगड्या मिळतील; या न्यायानें स्वातंत्र्य राखलें पाहिजे, देश संरक्षिला पाहिजे व त्यासाठीं थोडा त्याग, थोडें बंधन नागरिकांनीं स्वीकारलें पाहिजे.

**२८०.** आणीबाणीची घोषणा अमलांत असतांना अध्यक्ष हुकुम काढून, जे हक्क कलम २५ प्रमाणें ग्वाहित (Guaranteed) आहेत, ते घोषणा रद्द झाल्यापासून सहा महिन्यांच्या कालपर्यंत तहकूब राहतील, असें जाहीर करूं शकेल.

कलम २५ मधील हक्क आणीबाणीच्या प्रसंगीं तहकूब

ज्याप्रमाणें कलम २७९ प्रमाणें कलम १३ मधील हक्कांवर आणीबाणीची घोषणा झाली म्हणजे परिणाम होतो व त्या बाबतींत घटकाला जरूर ते कायदे अगर जरूर तें कार्यकारी कृत्य करतां येतें, तसेंच या कलमानें, घटनेचें कलम २५ मध्यें नागरिकाला प्रमुख न्यायालयाकडे जाऊन, मौलिक हक्कांचें अतिक्रमण झालें तर दाद मागण्याचा जो हक्क आहे, त्याला मर्यादा बसते. म्हणजे अध्यक्ष हा हक्क कांहीं काळ तहकूब करूं शकतो. घोषणा रद्द होऊन सहा महिनेपर्यंत ही काल-मर्यादा त्याला ठेवतां येईल. या मुदतींत प्रमुख अगर दुसरें कोणतेंही कोर्ट दाद घेणार नाहीं. परचक्र आलें, देशांत बंडाळी सुरू झाली म्हणजे सरकारला सभा बंद कराव्या लागतील, जमावांना बंदी करावी लागेल, संशयितांना खटल्याशिवाय अटकेंत ठेवावें लागेल. तात्पर्य, या विशेष परिस्थितींत नागरिक स्वातंत्र्यें मर्यादित होतील. आणि या वेळीं जर प्रमुख न्यायालय अगर अन्य कोर्टें नागरिक स्वातंत्र्याच्या तात्विक कल्पनेनें निकाल देऊं लागलीं, तर कार्यकारी सत्तेला संकट निवारण करणें कठीण होईल. मुद्रणस्वातंत्र्याच्या नांवाखालीं खोट्या बातम्या देणें, जनतेची हिंमत खचेल अशा रीतीनें प्रचार करणें, अगर सैन्यभरतीस तात्विक मतभेद म्हणून सारखा विरोध करणें अशा गोष्टी चालूं दिल्यास राज्य कोसळेल व राज्याबरोबर स्वातंत्र्य व नागरिक स्वातंत्र्येंही खलास होतील. म्हणून संकटकालीं थोडी मर्यादा बसविल्यास त्यानें लोकशाही खतम् होत नाहीं. किंबहुना शरीर जेव्हां निरामय नसेल, तेव्हां उपवास उपकारक ठरतो; तोच थोडासा न्याय येथें लागू पडतो. या कलमांत जेव्हां आणीबाणीची घोषणा अध्यक्ष काढील, तेव्हांच हें होणार; प्रांतांत प्रमुखानें घोषणा काढली, तर हें कलम लागू नाहीं. जरूर तेवढ्या प्रसंगापुरतीच ही व्यवस्था आहे.

# भाग १२

## संघ आणि घटक यांतील नोकर वर्ग

## प्रकरण १ लें–नोकर वर्ग

या भागांतील शब्दार्थ

२८१. संदर्भानें अन्यथा अभिप्रेत नसेल, तर या भागांत 'घटक' याचा अर्थ परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटक होय.

संघ अथवा घटक यांतील नोकरांची भरती व नोकरी-बाबतच्या अन्य शर्ती यांबाबत

२८२. (१) संघाच्या अगर घटकाच्या कामासंबंधांत जो नोकरवर्ग नेमला जाईल, अगर ज्या जागा भरल्या जातील त्यांसंबंधीं भरतीच्या व नोकरीच्या शर्तींचें नियमन, (२) यांतील व्यवस्था पाळून, संबंधी कायदेमंडळाच्या कायद्यांनीं केलें जाईल.

(२) जो इसम संघाच्या अगर घटकाच्या मुलकी नोकरींत आहे अगर मुलकी जागेवर आहे, त्याला कामावरून दूर करावयाचें अगर काढून टाकावयाचें अगर त्याचा दर्जा कमी करावयाचा असल्यास तें कां करूं नये याबाबत कारण दाखविण्याची त्याला योग्य संधि दिल्याशिवाय तसें करतां येणार नाहीं.

मात्र

(अ) जेव्हां एकाद्या इसमावर त्याच्या वर्तनाबद्दल फौजदारी आरोप होऊन त्याबाबत तो दोषी ठरला असेल व त्या कारणासाठीं जर त्याला कमी केलें असेल, दूर केलें असेल अगर त्याचा दर्जा कमी केला असेल, अगर

(ब) ज्या अधिकाऱ्याला त्याला कमी करण्याचा, कामावरून दूर करण्याचा, अगर त्याचा दर्जा कमी करण्याचा अधिकार असेल, त्या अधिकाऱ्याला जर समाधानकारकपणें वाटलें, कीं अशा कमी केलेल्या नोकराला कारण दाखविण्याची संधि देणें कांहीं कारणाकरितां सयुक्तिकपणें व्यवहार्य नाहीं व तें कारण त्या अधिकाऱ्यानें नोंदलें असेल,

तर हें कलम लागू पडणार नाहीं.

घटकाचें कायदेमंडळ आपल्या क्षेत्रांतील सरकारी नोकरांबाबत कायदे करून त्यांची भरती व त्यांच्या नोकरीच्या शर्ती यांचें नियमन करील. तसेंच पार्लमेंट संघाच्या नोकरांसंबंधीं कायदे करून नियमन करील. कोणत्याही सरकारी नोकराला कामावरून काढणें झाल्यास अथवा कमी करणें झाल्यास अगर त्याचा दर्जा कमी करणें झाल्यास, त्याला त्याचें म्हणणें मांडण्यास योग्य संधि दिली जाईल. ज्या वर्तनाबद्दल तो गुन्हेगार ठरला आहे, त्या कारणासाठीं जेव्हां त्याला कमी करावयाचें असेल, अगर काढावयाचें असेल अगर दर्जा कमी करावयाचा असेल, तेव्हां त्याला त्याचें म्हणणें मांडण्याची संधि देण्याचें कारण नाहीं. कोर्टापुढें त्याला ही संधि मिळाली होती. त्याचा गुन्हा शाबित झाला; मग पुन्हां संधीची जरूरी नाहीं. तसेंच त्याला काढून टाकणाऱ्या अधिकारी इसमाला, अशी संधि त्याला देणें व्यवहार्य नाहीं असें वाटलें व तसें त्यानें लेखी नमूद केलें असेल, तर ही संधि देण्याचें कारण नाहीं. पुष्कळ वेळां अशी संधि देणें व्यवहार्य नसतें, त्यापायीं अनेक भानगडी व गोंधळ उत्पन्न होतो. तथापि या व्यवस्थेंत थोडा अन्याय आहे. अपराधी इसमास त्याची बाजू मांडण्यास कांहीं तरी संधि ही मिळालीच पाहिजे. निदान जो हुकुम होईल, त्याविरुद्ध योग्य अधिकाऱ्याकडे तक्रार करण्याची तरी व्यवस्था असावी. अपिलाचा तरी हक्क असावा. केवळ संधि देणें व्यवहार्य नाहीं, एवढें म्हणून साऱ्याच प्रकरणाचा अखेरचा निकाल होऊं नये.

**संधिकालीन व्यवस्था**

२८३. घटनेप्रमाणें या बाबतींत अन्य व्यवस्था होईपर्यंत, जी सरकारी नोकरी अगर जागा घटना सुरू झाल्यानंतरही संघ अगर घटक यांत चालू आहे, त्यांना जे नियम

घटना अमलांत येण्यापूर्वी लागू होतें, तेच घटनेशीं सुसंगत असल्यास लागू राहतील.

कांहीं नोकऱ्या व कांहीं जागा घटना अमलांत आल्यानंतर संघाच्या अगर घटकाच्या म्हणून चालू राहतील. त्यांच्याबाबत घटनेप्रमाणें नवीन नियम होईपर्यंत जुने नियम जे घटनेपूर्वी चालू होते, तेच लागू पडतील. मात्र अशा नियमांत घटनेशीं विसंगत होईल, अशी शर्त असतां कामा नये.

## प्रकरण २ रें–सरकारी नोकर–निवडमंडळें

( Public Service Commissions )

संघ व घटक यांसाठीं नोकर-निवडमंडळें

२८४. ( १ ) या कलमांतील व्यवस्थेस अनुसरून, संघासाठीं एक व प्रत्येक घटकासाठीं एक याप्रमाणें सरकारी नोकर-निवडमंडळ असेल.

( २ ) दोन किंवा अधिक घटक यांना करार करून—

( अ ) त्या गटाचें म्हणून एक सरकारी नोकर-निवड-मंडळ असावें; अगर

( ब ) एका घटकाच्या सरकारी नोकर-निवडमंडळानें सर्व घटकांचें त्याबाबतचें काम करावें,

असें ठरवितां येईल;

आणि या करारांत कराराच्या उद्देशपूर्तीसाठीं ज्या आनुषंगिक गोष्टी इष्ट अगर आवश्यक वाटतील, त्यांचा समावेश केला जाईल आणि जेव्हां गटाचें म्हणून एक निवडमंडळ करारानें ठरलें असेल, तेव्हां घटनेच्या या भागांत जीं कामें प्रमुखानें करावयाचीं आहेत, तीं कामें कोणत्या प्रमुखानें अगर प्रमुखांनीं करावींत याचा उल्लेख त्या करारांत असला पाहिजे.

(३) संघाचें सरकारी नोकर-निवडमंडळ याला घटकाच्या प्रमुखानें विनंति केल्यास व अध्यक्षानें संमति दिल्यास घटकाचीं या बाबतींतील सर्व अगर कांहीं कामें करतां येतील.

(४) संदर्भानें अन्यथा अभिप्रेत नसेल तर या घटनेंत जेथें संघ सरकारी नोकर-निवडमंडळ अगर घटक सरकारी नोकर-निवडमंडळ असा उलेख असेल, तेथें तो विचारासाठीं पुढें असलेल्या विशिष्ट बाबतींत संघाचें काम करणारें निवडमंडळ अगर घटकाचें काम करणारें निवडमंडळ यांना अनुलक्षून असल्याचें मानण्यांत येईल.

राज्यकारभार चांगला किंवा वाईट चालणें हें साऱ्या सरकारी नोकरांवर अवलंबून आहे. जेथें राज्य लोकशाही स्वरूपाचें आहे, व प्रधानमंडळें आज आहेत, उद्यां दुसरीं येत आहेत अशी परिस्थिति आहे, अशा ठिकाणीं राज्यकारभार चोख व व्यवस्थित चालवावयाचा असेल, तर मुलकी नोकर वर्ग लायक, दक्ष व प्रामाणिक पाहिजे. नोकरांची भरती कशी व्हावी, त्यांची बढतीबहाली कशी व्हावी, त्यांना वेतन काय असावें, तसेंच त्यांचें वर्तन कसें असावें, राजकारणांत त्यांनीं भाग घ्यावा कीं नाहीं, लायकी कशी ठरवावी, नोकरींत प्रवेश वशिल्यानें का गुणानें मिळावयाचा? गुण कसे पारखावयाचे? पुरस्कार (Patronage) असावा, का सर्व जागा गुणावर, लायकीवर भरल्या जाव्यात? जर लायकीवर, तर ती कोणती ठरवावयाची? तसेंच एखादी समिति अगर मंडळ नेमून त्याकडे हें नोकरांच्या निवडीचें काम दिलें, तर त्यांत कार्यकारी सत्तेनें हस्तक्षेप करावा का नाहीं? तसेंच मंडळाच्या शिफारसी तशाच मानाव्या का सरकारला त्या दूर सारण्याचा अधिकार असावा, हे सगळे प्रश्न महत्त्वाचे आहेत. या प्रकरणांत याबाबत थोडासा विचार केला आहे. या कलमांत नोकरनिवडीसाठीं निवडमंडळें असतील असें सांगितलें आहे. संघाचें एक व प्रत्येक घटकाचें एक अशीं हीं निवडमंडळें असतील; पण अनेक घटकांना करार करून या व्यवस्थेंत बदल करतां येईल. कसेंही असलें, तरी घटकासाठीं निवडमंडळ हें, या नाहीं त्या स्वरूपांत राहीलच.

**निवडमंडळाची संघटना व त्याचा नोकरवर्ग**

२८५. (१) संघाच्या निवडमंडळाचा सभापति व अन्य सभासद अध्यक्ष नेमील व घटक निवडमंडळाचा सभापति व अन्य सभासद प्रमुख नेमील व ही बाब त्याच्या मर्जीच्या अधिकारांतील आहे:

मात्र प्रत्येक निवडमंडळाच्या एकंदर सभासदांपैकीं निम्मे असे असले पाहिजेत कीं, नेमणुकीच्या वेळीं प्रत्येकानें हिंदुस्थान सरकारांत अगर घटक सरकारांत निदान दहा वर्षें नोकरी केलेली असेल आणि हीं दहा वर्षें मोजतांना घटना अमलांत येण्यापूर्वीं ब्रिटिश राजवटींत केलेली नोकरी जमा धरली जाईल.

( २ ) संघाच्या निवडमंडळाच्या बाबतींत अध्यक्ष व घटकाच्या निवडमंडळाबाबतींत प्रमुख आपल्या मर्जीच्या अखत्यारांत

( अ ) निवडमंडळाचे सभासद किती असावेत, त्यांची मुदत किती असावी आणि नोकरीच्या शर्ती काय असाव्यात आणि

( ब ) निवडमंडळाचे नोकर किती असावेत आणि त्यांची नोकरी कोणत्या शर्तींवर असावी,

हें नियम करून ठरवूं शकेल.

( ३ ) अधिकारपद सोडतांच—

( अ ) संघाच्या निवडमंडळाचा सभापति हिंदुस्थान सरकारांत अगर घटक सरकारांत कुठेंही नोकरीला पात्र राहत नाहीं;

( ब ) घटक निवडमंडळाचा सभापति, संघाच्या निवडमंडळाचा सभापति अगर सभासद, अगर दुसऱ्या घटक निवडमंडळाचा सभापति होण्याला पात्र आहे; पण दुसरी कोणतीही नोकरी हिंदुस्थान सरकारांत अगर घटक सरकारांत करण्याला तो पात्र नाहीं.

( क ) संघाच्या निवडमंडळाचा अन्य सभासद, तसेंच घटकाच्या निवडमंडळाचा अन्य सभासद हिंदु-

स्थान सरकारांत अगर घटक सरकारांत, एकाद्या जागेवर नेमणूक होण्यास, जर ती जागा घटकाच्या कारभारासंबंधीं असेल, तर घटकाच्या प्रमुखाच्या संमतीशिवाय व अन्यत्र अध्यक्षाच्या परवानगीशिवाय पात्र होणार नाहीं.

निवडमंडळावरील सभासद अध्यक्ष व प्रमुख आपल्या मर्जीत नेमील. मर्जीत नेमणें याचा अर्थ मंत्रिमंडळाचा सल्ला घेण्याचें बंधन त्याजवर नाहीं. निम्मे सभासद तरी दहा वर्षांवर सरकारी नोकरी केलेले असले पाहिजेत; म्हणजे सरकारी नोकरींत अनुभवी पाहिजेत. उमेदवार कसे असावेत याची कल्पना व अनुभव सभासदांना आहे असा विश्वास या योजनेंत आहे. सभासदांची संख्या, नोकरीची मुदत व अन्य शर्ती यांबाबत अध्यक्ष व प्रमुख नियम करतील. या नोकरीवरून बाजूला होतांच सभासदांना अन्यत्र नोकरी अर्थात् सरकारी, सामान्यत: करतां येणार नाहीं. कोणाला कोठें करतां येऊं शकेल हें कलमांत सांगितलें आहे. सभासदांना पुन्हां नोकरीस अपात्र ठरविणें हें अगदी युक्त आहे. यामुळें कांहीं स्वार्थी दृष्टि ठेवून सभासद कमिशनवर काम करणार नाहींं: नोकरीची आशा असल्यास तेवढा नि:स्पृहपणा कमी होतो. अशीच व्यवस्था सरहिशोबतपासनीस यांच्या बाबतींत आहे.

**नोकर-निवड-मंडळाचीं कार्यें**

२८६. (१) घटक-राज्याच्या तसेंच संघराज्याच्या नोकरींत नेमण्याकरितां उमेदवारांची परीक्षा घेणें हें निवड-मंडळांचें कर्तव्य आहे.

(२) दोन अगर अधिक घटकांनीं विनंति केल्यास विशेष पात्रता अवश्य असणाऱ्या जागांसाठीं उमेदवारांची भरती करणारी संयुक्त योजना तयार करण्याच्या कामीं व ती अमलांत आणण्याच्या कामीं सदर घटकांना मदत करणें हेंही संघाच्या निवड-मंडळाचें कर्तव्य आहे.

(३) अखिल हिंदुस्थानच्या नोकऱ्यांबाबत, तसेंच संघाच्या अन्य नोकऱ्या अगर जागांबाबत अध्यक्ष, व घटकाच्या अन्य नोकऱ्या अगर जागांबाबत प्रमुख हा ज्या नोकऱ्यांमध्यें सामान्यपणें, अगर

विशिष्ट प्रकारच्या नोकरीबाबत, अगर विशिष्ट परिस्थितींत नोकरमंडळाला न विचारतां नेमणुका करावयाच्या आहेत, त्यांसंबंधीं नियम करील. पण हे नियम पाळून, तसेंच पुढील कलमांत दिलेल्या व्यवस्थेचें पालन करून संघाच्या निवडमंडळाचा अगर घटकाच्या निवडमंडळाचा, जसें असेल तसें, खालील बाबतींत सल्ला घेतलाच जाईलः

(अ) मुलकी नोकऱ्या व मुलकी जागा यांमध्यें भरती करण्याच्या पद्धतीसंबंधीं सर्व बाबी;

(ब) कोणत्या तत्त्वावर मुलकी नोकऱ्या व जागा यांवर नेमणुका व्हाव्यात, तसेंच नोकरींत बढती व एका नोकरीपासून दुसऱ्या नोकरींत बदली कोणत्या तत्त्वावर व्हावी, तसेंच नेमणूक, बढती व बदली यांबाबत उमेदवारांची योग्यता कशी ठरवावी या बाबी;

(क) हिंदुस्थान सरकारांत अगर घटक सरकारांत नोकर असलेल्या इसमांच्या शिस्तविषयक बाबी, ज्यांत एतद्विषयक अर्ज व प्रार्थनापत्रेंही येतात;

(ड) हिंदुस्थान सरकारच्या अगर घटक सरकारच्या अगर ब्रिटिश राजवटींत मुलकी नोकरींत असतांना कर्तव्य या नात्यानें जें केलें, अगर त्या उद्देशानें केलें, त्यासंबंधीं कोर्टांत बचाव करीत असतांना जो खर्च आला, तो हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नांतून अगर घटक सरकारच्या उत्पन्नांतून, जसें असेल तसें, मिळावा म्हणून एखाद्यानें अगर एखाद्यासाठीं मागणी केली, तर ती बाब;

( ३ ) हिंदुस्थान सरकारची अगर घटक-राज्याची अगर ब्रिटिश राजवटीची मुलकी नोकरी करीत असतां इजा झाली म्हणून पेन्शनची मागणी व असल्या मागणीच्या रकमेसंबंधींचा प्रश्न,

आणि वरील बाबतींत, अगर अध्यक्ष अगर प्रमुख जी अन्य बाब निवड-मंडळाकडे विचारार्थ धाडील, त्यासंबंधीं सल्ला देणें हें त्याचें कर्तव्य आहे.

( ४ ) नेमणुका अगर जागा संघांत अगर घटकांत जातिदृष्ट्या कशा वांटल्या जाव्यात, यासंबंधीं निवडमंडळाचा सल्ला घेतला जाणार नाहीं.

सरकारी नोकऱ्यांत भरती करावयाच्या उमेदवारांची परीक्षा घेणें, तज्ज्ञ अधिकाऱ्यांच्या भरतीबाबत संयुक्त योजना करणें हीं कामें व तसेंच ज्या नोकऱ्या अगर जागा अध्यक्ष अगर प्रमुख नियम करून निवडमंडळांकडे सोंपविणार नाहीं, त्या सोडून सर्व मुलकी जागांसाठीं निवड करण्याचें काम निवडमंडळाकडे राहील. कांहीं जागांवर येणारे इसम परीक्षेस बोलविणें इष्ट नसतें. तसेंच कांहीं तात्पुरत्या जागा निवडमंडळाकडे सोपविण्यास गैरसोय होते. नोकरीबाबतची जाहिरात देऊन व नंतर परीक्षा व भेट घेऊन शिफारसी करणें या उपचारांत वेळ जातो, म्हणून तात्पुरती नेमणूक करण्याचा अधिकार कार्यकारी सत्तेला देणें योग्य ठरतें. कायम नेमणूक मात्र निवडमंडळाच्या मार्फत होणेंच अवश्य आहे व तशी व्यवस्था या कलमांत केली आहे. नोकरांच्या भरतीची पद्धत, नेमणूक, बढती, बदली वगैरे तसेंच त्याबाबत उमेदवाराची योग्यता, नोकरींतील शिस्तयोजना, नोकरांनीं कर्तव्य बजावीत असतां बचावासाठीं झालेल्या खर्चाची मागणी, तसेंच इजा झाली म्हणून पेन्शनची मागणी, कोर्टांत त्यावर खटला झाल्यास त्याबाबत खर्चाची रक्कम या सर्व बाबतींत निवडमंडळाचा सल्ला विचारला जाईल. तसेंच अन्य बाबी देखील अध्यक्ष अगर प्रमुख विचारार्थ निवडमंडळांकडे धाडूं शकेल. नोकरींत जातिविषयक प्रमाण काय असावें हा प्रश्न मात्र निवडमंडळाकडे येणार नाहीं. कारण हा राजकीय धोरणाचा प्रश्न आहे.

**निवडमंडळाच्या अधिकारांत वाढ**

२८७. या कलमांतील व्यवस्थेस अनुसरून, पार्लमेंटला अगर घटक कायदेमंडळाला कायदा करून अनुक्रमें संघाच्या निवडमंडळाच्या अधिकारांत अगर घटकाच्या निवडमंडळाच्या अधिकारांत वाढ करतां येईल.

**मात्र जेथें घटक कायदेमंडळानें कायदा केला असेल, तेथें जो इसम त्या घटकांतील नोकरवर्गांतला नाहीं त्याच्या बाबतींत अध्यक्षाच्या संमतीशिवाय त्या कायद्याचा कांहीं अंमल होणार नाहीं, अशी शर्त त्या कायद्यांत असेल.**

निवडमंडळाच्या अधिकारांत वाढ संबंधित कायदेमंडळाला करतां येईल. मात्र घटक कायदेमंडळानें अधिकारवाढीचा कायदा केल्यास, त्याच्या नोकरवर्गांत नसलेल्या, पण घटकांत तूर्त नोकरी करीत असलेल्या इसमाबाबत कांहीं अधिकार देणें झाल्यास त्याला अध्यक्षाची संमति लागेल, अशी शर्त त्या कायद्यांत ठेवली पाहिजे. प्रत्येक घटकाचा एक नोकरवर्ग (Cadre) असेल. तसेंच अखिल हिंदुस्थानची जी नोकरी असेल त्या त्या नोकऱ्यांतीलही एकेक नोकरवर्ग असेल. जसें अखिल हिंदुस्थान पोलिस नोकरी. या नोकरवर्गांतील इसमास हिंदुस्थानभर नोकरी केली पाहिजे; वरिष्ठ जेथें सांगतील तेथें त्याला गेलें पाहिजे. मुंबई मुलकी नोकरवर्गांतील इसमास मुंबई प्रांतांत कोठेंही नोकरी केली पाहिजे. एका प्रांतांतील नोकर दुसऱ्या प्रांतांत तूर्त आला असता त्याबाबत अधिकार चालविण्यासंबंधीं अधिक सत्ता निवडमंडळाला देणें झाल्यास अध्यक्षाची संमति आवश्यक केली आहे, आणि तें इष्टच आहे.

**निवडमंडळाचा खर्च**

**२८८. संघाच्या निवडमंडळाचा अगर घटकाच्या निवडमंडळाचा, पगार, भत्ता, पेन्शन, जें कांहीं त्याच्या नोकरवर्गाला द्यावें लागेल त्यासुद्धां, होणारा खर्च हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नावर अगर घटकाच्या उत्पन्नावर, जसें असेल तसें, बोजा म्हणून राहील.**

निवडमंडळाचा खर्च उत्पन्नावर बोजा समजला जाईल, याचा अर्थ त्यावर संबंधित कायदेमंडळांत मतदान होणार नाहीं. चर्चा मात्र जरूर करतां येईल.

## भाग १३

# निवडणुका

२८९. (१) पार्लमेंटच्या निवडणुका तसेंच अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्या निवडणुका ज्या या घटनेप्रमाणें व्हावयाच्या आहेत, त्याबाबत देखरेख, मार्गदर्शन व नियंत्रण करण्यासाठीं एक निवडणूक-मंडळ अध्यक्ष नेमील व त्याला हे अधिकार असतील. यांत पार्लमेंटच्या निवडणुकांसंबंधांत उत्पन्न झालेले तंटे अगर शंका यांचा निकाल करण्यासाठीं निवडणूक-कोर्टांच्या नेमणुका करण्याच्या अधिकाराचाही समावेश होतो.

**निवडणुकांबाबतची देखरेख, मार्गदर्शन व नियंत्रण निवडणूक-मंडळाकडे राहील**

(२) परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटक कायदेमंडळाच्या निवडणुका, तसेंच प्रमुख व उपप्रमुख यांच्या निवडणुका, तसेंच घटकाचा प्रमुख नेमण्याबाबत जें पॅनेल घटनेप्रमाणें निवडावयाचें त्याची निवडणूक, यांबाबत देखरेख, मार्गदर्शन व नियंत्रण करण्यासाठीं एक निवडणूक-मंडळ घटक-प्रमुख नेमील व त्याला हे अधिकार असतील. यांत घटक कायदेमंडळाच्या निवडणुकांसंबंधांत उत्पन्न झालेले तंटे अगर शंका यांचा निकाल करण्यासाठीं निवडणूक-कोर्टें नेमण्याबाबतच्या अधिकाराचाही समावेश होतो.

लोकशाही म्हणजे निवडणुका, पुनः पुनः निवडणुका. निवडणूक म्हणजे मतदाराची पात्रता, मतदारांची यादी, उमेदवारांचे अर्ज, त्यांची छाननी, निवडणुकीचा दिवस व वेळ, निवडणुकींचे निकाल, उपस्थित तक्रारींची दाद इत्यादि गोष्टी होत. या सर्व व्यवस्थितपणें व नियमांना धरून झाल्या पाहिजेत. यासाठीं कायम व्यवस्था असणें अगदीं जरूर आहे. ही व्यवस्था या कलमांत सांगितली आहे. पार्लमेंटच्या व अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्या निवडणुकांबाबत अध्यक्ष एक निवडणूक-मंडळ नेमील. हें मंडळ या निवडणुकांबाबत सर्व प्रकारें देखरेख, मार्गदर्शन व

नियंत्रण करील. तसेंच पार्लमेंटच्या निवडणुकांबाबत तंटे अगर शंका निर्माण झाल्यास त्यांचा निकाल देण्यासाठीं हें मंडळ निवडणूक-कोर्ट नेमील. तीच व्यवस्था घटकाच्या संबंधांतही आहे. घटक-प्रमुख घटकापुरतें निवडणूक-मंडळ नेमील व तें वरीलप्रमाणें सर्व अधिकार चालवील. जेथें प्रमुखाच्या निवडणुकासाठीं पॅनेल निवडावें म्हणून योजना आहे, तेथें पॅनेलच्या निवडणुकीबाबतही या मंडळाला अधिकार असतील. प्रमुख प्रत्यक्षपणें निवडला जावा, का एक पॅनेल प्रथम निवडावें व त्यांतून घेतला जावा हें अद्याप ठरावयाचें आहे. तें ठरेल त्याप्रमाणें घटनेंत जरूर तेथें बदल करण्यांत येईल.

पार्लमेंटच्या निवडणुका

**२९०. या घटनेला अनुसरून, पार्लमेंट वेळोवेळीं कायदा करून पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांच्या निवडणुकीसंबंधींच्या बाबतींत व्यवस्था करील. यांत दोन्ही सभागृहें योग्य तऱ्हेनें संघटित होण्यास अवश्य असलेल्या सर्व गोष्टी व मतदार संघांची विभागणी याही गोष्टींचा समावेश होतो.**

पार्लमेंटच्या सभागृहाचे सभासद किती असावेत, तसेंच मतदारसंघ कसे आंखावे वगैरे गोष्टी धरून पार्लमेंटच्या निवडणुकीबाबत जरूर ती व्यवस्था पार्लमेंट वेळोवेळीं कायदे पास करून करील. घटनेप्रमाणें लोकसंख्येवर प्रतिनिधित्वाचें प्रमाण अवलंबून ठेवलें आहे. त्याबाबत कमाल मर्यादा आहे, म्हणून लोकसंख्या वाढली तर प्रमाण बदलावें लागेल. तसेंच अधिक प्रदेश हिंदुस्थानांत सामील झाला तर बदल करावा लागेल. तात्पर्य, या घटनेला अनुसरून पार्लमेंट याबाबत कायदे करून व्यवस्था करील.

घटक कायदेमंडळांच्या निवडणुका

**२९१. या घटनेला अनुसरून, परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाचें कायदेमंडळ वेळोवेळीं कायदा करून कायदे-मंडळाच्या एक अगर दोन सभागृहांच्या निवडणुकी-संबंधींच्या बाबतींत व्यवस्था करील. यांत सभागृह योग्य तऱ्हेनें घटित होण्यासाठीं व मतदार संघाची विभागणी करण्या-साठीं अवश्य असलेल्या गोष्टींचाही समावेश होतो.**

२९० कलमानें पार्लमेंटला जे अधिकार दिले आहेत, ते या कलमानें घटक कायदेमंडळाला दिले आहेत, व जरूर तेथें घटनेला अनुसरून कायदा करून घटक कायदेमंडळ याबाबत व्यवस्था करील.

## भाग १४

# अल्पसंख्यांकांबाबत खास तरतूद

२९२. लोकसभेमध्यें राखीव जागा—

लोकसभेंत अल्प-संख्यांकांसाठीं राखीव जागा

(अ) मुसलमान व परिशिष्टांतील जाती (हरिजन) याकरितां असतील;

(ब) परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटक प्रदेशांत असणाऱ्या परिशिष्टांतील वन्य जाति (tribes) याकरितां असतील; आणि

(क) मुंबई व मद्रास या घटक-राज्यांतील ख्रिश्चन यासाठीं असतील.

आणि या जागांची संख्या कलम ६७, पो. क. (५) (ब) यांत सांगितलेल्याप्रमाणें असेल.

हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत अल्पसंख्यांकांचा प्रश्न अत्यंत भानगडीचा झाला आहे. या देशांत अनेक जाती व धर्म असून शिवाय कांहीं प्रदेश अत्यंत मागासलेले असून त्यांतील रहिवासी वन्य जातीचे आहेत. ब्रिटिश राजनीतीनें जातीय वादाचें विष फार खोलपर्यंत रुजवलें होतें, व त्याचेंच पर्यवसान पाकिस्तानच्या निर्मितींत झालें. भिन्न मतदारसंघ निर्माण करून गेल्या ४० वर्षांत हा वाद व हें विष सरसें फैलावण्याचा प्रयत्न झाला. धर्मावर राष्ट्र आधारणें हा खोटा व अनैतिहासिक सिद्धांत आहे. पण आज तें पाकिस्तानांत घडून आलें आहे. हिंदुस्थान हें लौकिक राज्य (Seculer) आहे. तसा स्पष्ट उल्लेख घटनेंत आहे. तथापि व्यवहार या दृष्टीनें, मुरलेला जातीय वाद काढतांना कोठें कोठें मुरड घालावी लागते. या भागांत कांहीं जागा राखीव ठेवल्या आहेत व त्यांचें प्रमाण कलम ६७ (५) (ब) प्रमाणें राहणार आहे. अल्पसंख्यांक म्हणून मुसलमान व हरिजन यांना मानलें आहे, तसेंच वन्य जातीसाठीं राखीव जागा आहेत. मात्र निवडणुका एकाच संयुक्त मतदारसंघाकडून व्हावयाच्या आहेत. त्यांत भिन्नत्वाला थारा दिलेला नाहीं. उमेदवार कोणत्याही

जातीचा असो, अगर मतदार कोणत्याही जातीचे असोत, कोणत्याही उमेदवारांना मतें देण्याचा त्यांना अधिकार आहे. राखीव जागा ठेवण्याच्या आवश्यकतेमुळें मतदारसंघ एकापेक्षां अधिक जागेचा ठेवावा लागेल व त्यापैकीं, एक अगर अधिक जागा राखीव असेल. या व्यवस्थेनें भिन्न भिन्न जातीच्या उमेदवारांना सर्व जमातींकडे मतांची याचना करावी लागेल, त्यामुळें त्यांच्यांत सलोख्याचे व स्नेहभावाचे संबंध उत्पन्न होतील, व जातीयता कमी होईल. निवडून येणारा उमेदवार राखीव जागेसाठी त्या त्या अल्पसंख्यांक जमातीचा पाहिजे हें जरी खरें, तरी संयुक्त मतदार संघ असल्यानें केवळ जातीच्या मतावर तो निवडून येणें अशक्य आहे. कलम ३०५ प्रमाणें कांहीं काल—१० वर्षें ही व्यवस्था अमलांत ठेऊन नंतर ती रद्द करण्याचा उद्देश आहे. अल्पसंख्यांकांचा विश्वास संपादन करण्याचा हा एक मार्ग आहे. ते पुढारले म्हणजे असल्या संरक्षणाची जरूरी त्यांना राहणार नाहीं, तसेंच अविश्वास नाहींसा झाला, म्हणजे पण असल्या व्यवस्थेची जरूरी राहणार नाहीं. अभिजात व संपूर्ण अशा लोकशाहीची ही व्यवस्था नाहीं हें खरें, तथापि देशाच्या जीवनांत भिनलेलें विष हळूहळू काढणें श्रेयस्कर असल्यामुळें ही व्यवस्था करावी लागली आहे.

**लोकसभेंत अँग्लो-इंडियनांसाठीं खास प्रतिनिधित्व**

**२९३. कलम ६७ मध्यें कांहींही असलें, तरी अध्यक्षाला जर असें वाटलें कीं, अँग्लो-इंडियन जमातीचे लोकसभेंतील प्रतिनिधि अपुरे आहत, तर दोनपेक्षां अधिक नव्हे एवढे त्या जमातीचे इसम तो लोकसभेचे सभासद म्हणून नेमील.**

लोकसभा ही निवडून आलेल्या प्रतिनिधींची आहे. अँग्लो-इंडियन जमातीच्या लोकांची संख्या देशांत सुमारें १ लाख आहे, पण ती देशभर पसरलेली आहे. त्यामुळें कोणत्याही एका मतदार संघांतून केवळ जातीच्या मतावर त्यापैकीं कोणी निवडून येणार नाहीं. हिंदच्या भावी लोकशाहींतील पक्ष, धर्म अगर जाती यांवर आधारले जाणार नाहींत. आर्थिक अगर राजकीय कार्यक्रम यांवर पक्षरचना राहील. मग त्या त्या पक्षांत जाति, धर्म यांकडे न पाहतां त्या पक्षाच्या राजकीय मताचेच लोक येतील, व राजकीय मतभेदावर आधारलेल्या पक्षांचेच उमेदवार निवडणुकीला उभे केले जातील. पक्षनिष्ठ राजकारण झालें, म्हणजे निवडणुकींत पक्षाला मतें मिळतात, उमेदवाराचें व्यक्तिमत्व कमी महत्त्वाचें ठरतें. या दृष्टीनें अँग्लो-इंडियन कुठल्या तरी राजकीय पक्षांतून निवडून येणें अशक्य नाहीं. तथापि जेव्हां त्या जमातींतून अगदीं थोडे अगर कोणीच निवडून न आले, तर या कलमांत सांगितल्याप्रमाणें अध्यक्ष दोनपर्यंत त्या जमातींतील इसम सभासद म्हणून नेमील. अपवाद म्हणूनच ही व्यवस्था आहे.

२९४. (१) राखीव जागा—

घटक कायदेमंडळांत अल्पसंख्यांकांना राखीव जागा

(अ) परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकाच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत, मुसलमान, परिशिष्टांतील जाती, परिशिष्टांतील वन्य जाति (आसाममधील स्वयंशासित जिल्ह्यांतील वन्य जाति सोडून) आणि

(ब) मुंबई व मद्रास या घटकांतील असेंब्लीमध्यें ख्रिश्चन

यांच्यासाठीं कलम १४९ (३) यांत सांगितलेल्या प्रमाणांत ठेवल्या जातील.

(२) आसाममधील स्वयंशासित जिल्ह्याकरितां राखीव जागा ठेवल्या जातील.

(३) कुठल्याही जातीसाठीं ज्या राखीव जागा परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाच्या असेंब्लींत असतील, त्यांचें असेंब्लींतील एकंदर जागांशीं प्रमाण, त्या जातीच्या संख्येचें जें प्रमाण त्या घटकांतील एकंदर लोकसंख्येशीं असेल, त्या मानानें राहील.

खुलासा—घटकांतील सर्व परिशिष्टांतील जाति या कलमासाठीं एक जात समजली जाईल; तसेंच घटकांतील वन्य जाति एक जात समजली जाईल.

(४) आसामच्या स्वयंशासित जिल्ह्याला त्याच्या लोकसंख्येचें जें प्रमाण आसामच्या लोकसंख्येशीं आहे, त्यापेक्षां कमी प्रमाणांत राखीव जागा आसाम असेंब्लींत असणार नाहींत.

(५) आसामच्या स्वयंशासित जिल्ह्यांतील मतदारसंघांत त्याबाहेरचा प्रदेश येणार नाहीं.

( ६ ) शिलांग नगरपालिका व कॅन्टोन्मेंट हा मतदार संघ सोडून आसाम घटकांतील स्वयंशासित जिल्ह्यांतील मतदार संघामार्फत आसाम असेंब्लीसाठीं त्या जिल्ह्यांतील परिशिष्टांतील वन्य जातीच्या इसमाशिवाय कोणालाही उभें राहतां येणार नाहीं.

या कलमांत घटक कायदेमंडळांत अल्पसंख्यांकांसाठीं काय व्यवस्था आहे, हें सांगितलें आहे. अल्पसंख्यांकांसाठीं ज्या राखीव जागा ठेवावयाच्या त्या, त्या त्या जातीच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत असतील. आसाममध्यें कांहीं जिल्हे घटनेप्रमाणें स्वयंशासित ठरविले आहेत. त्यांतील कारभार बराचसा स्वायत्त असा आहे. तेथें त्यांनाही प्रादेशिक दृष्टीनें, ( जातिविषयक नव्हे, ) राखीव जागा ठेवल्या आहेत.

**घटक-कायदेमंडळांत अँग्लो-इंडियनांसाठीं खास प्रतिनिधित्व**

२९५. कलम १४९ मध्यें कांहींही असलें तरी, जर प्रमुखाला असें वाटलें कीं, अँग्लो-इंडियन जमातीचे पुरेसे प्रतिनिधि असेंब्लींत निवडून आले नाहींत, तर त्याला योग्य वाटेल तितके इसम त्या जमातींतून सभासद म्हणून तो नेमील.

वरील कलमांतल्याप्रमाणें जेव्हां नेमणुकीचा प्रसंग येईल, त्या वेळीं किती प्रतिनिधि नेमावे, या प्रश्नाचा विचार करतांना त्या जमातीची त्या घटकांतील लोकसंख्या ही साहजिकच मुख्यतः विचारांत घेतली जाईल. सामान्यतः याबाबत हीच कसोटी असेल. प्रसंगीं अन्य गोष्टींचाही विचार होईल. पण या घटनेंत अधिक प्रतिनिधित्वाचें ( Weightage ) तत्त्व स्वीकारलेलें नाहीं, ही गोष्ट स्पष्ट आहे. अधिक प्रतिनिधित्व म्हणजे लोकसंख्येपेक्षां अधिक प्रमाणांत तें असणें. पूर्वीच्या अमदानींत तें अनेक ठिकाणीं स्वीकारलेलें होतें, व त्याचे फायद्यापेक्षां तोटेच अधिक झालेले अनुभवाला आले.

**अल्पसंख्यांक व नोकऱ्या**

२९६. परिशिष्ट एक, भाग १ मधील घटक व संघ यांतील नोकऱ्यांत व अधिकाराच्या जागांवर राज्यकारभारांतील कार्यक्षमतेला हानि न पोहोंचेल याची दक्षता घेऊन व पुढें दिलेली व्यवस्था पाळून सर्व अल्पसंख्यांकांचे हक्क विचारांत घेतले जातील.

राज्यकारभारांतील जागा व नोकऱ्या या खरोखर गुणानें मिळाल्या पाहिजेत. निव्वळ पुरस्कार अगर जातितत्त्वावर त्या देणें हें लोकशाहीच्या विरुद्ध आहे, तसेंच कारभाराच्या कार्यक्षमतेच्या दृष्टीनेंही ही प्रथा योग्य नाहीं. तथापि ज्या दृष्टीनें अल्पसंख्यांकांसाठीं राखीव जागांना मान्यता दिली आहे, तीच दृष्टि ठेऊन या कलमांतील योजना केली आहे. जे मागासलेले आहेत, त्यांना थोडा पुरस्कार देणें आजच्या परिस्थितींत उचित आहे. तसेंच या देशांतील समाजांतील लोकांची जन्मजात कर्तव्यें व व्यवसाय ठरींव होते. त्यामुळें कांहीं जातींत पिढ्यानूपिढ्या एकच व्यवसाय चालू असे, व चालत आहे. कांहीं जाती केवळ सरकारी नोकरीवर अवलंबून असत. आजच्या कालांत व्यवसायस्वातंत्र्य असलें पाहिजे. प्रत्येकाला, मग तो कोणत्याही जातीचा असो, अथवा त्याचा पूर्वापार पेशा कांहींही असो, त्याच्या अंगांत कर्तृत्व असेल, तर त्याला समान संधि मिळाली पाहिजे. परीक्षेच्या वेशींतूनच नोकरींत प्रवेश मिळावा हें तत्त्व ग्राह्यच आहे, पण त्यामुळें सर्वांनाच समान संधि मिळेल अशी आजची समाजपरिस्थिति नाहीं. म्हणूनच वरील कलमांतील व्यवस्था आहे. कारभारांत न्यूनता न येतां अल्पसंख्यांकांचे हक्क विचारांत घेणें याचा अर्थ थोडें तरी पुरस्काराचें तत्त्व स्वीकारणें हा आहे. लायकीनें कोणी येईल त्याबद्दल वाद नाहीं. अल्पसंख्यांक म्हणून लायकीचें मान कमी करून त्याला घेणें, हेंही सामान्यतः इष्ट नाहीं. तथापि आज व्यवहाराच्या दृष्टीनें व अल्पसंख्यांकांचा विश्वास संपादन करण्याच्या दृष्टीनें हें अपवाद म्हणून जरूर झालें आहे. कांहीं काळ तरी ही व्यवस्था राहणें अपरिहार्य आहे.

**अँग्लो-इंडियन व नोकरीची खास सोय**

**२९७. ( १ ) रेल्वे, कस्टम, पोस्ट व तार या खात्यांत, १५ ऑगस्ट १९४७ पूर्वी ज्या प्रमाणांत अँग्लो-इंडियन यांची तेथें भरती केली जात होती, तेंच प्रमाण ही घटना सुरू झाल्यानंतर पहिलीं दोन वर्षें त्यांची वरील खात्यांत भरती करतांना राहील.**

**नंतर पुढें प्रत्येक दोन वर्षांनीं मागील दोन वर्षांत सदर जातीसाठीं राखीव जागांचें जें प्रमाण होतें, त्यांत साधारणतः १० टक्के कमी याप्रमाणें भरती होत जाईल. मात्र घटना सुरू झाल्यापासून १० वर्षांच्या शेवटीं राखीव जागा ठेवणें संपूर्णपणें बंद होईल.**

**(२) मात्र (१) यानें अँग्लो-इंडियनांना त्यांच्या राखीव जागांव्यतिरिक्त दुसऱ्या जागीं नेमण्यास प्रतिबंध येत नाहीं; तसेंच (१) यांतील नोकऱ्यांत अधिक जागा त्यांना मिळण्यास प्रतिबंध नाहीं; मात्र या त्यांनीं आपल्या पात्रतेनें मिळविल्या पाहिजेत.**

फार वर्षांपासून अँग्लो-इंडियन जमातींतील लोकांची भरती रेल्वे, कस्टम, तार व टपाल या खात्यांत मोठ्या प्रमाणांत होती. १९३५ च्या कायद्यानें यापैकीं कांहीं खात्यांत त्याचें प्रमाण निश्चित केलें आहे व तें त्यांच्या लोकसंख्येच्या मानानें अवास्तव आहे. या कलमानें कांहीं काळ त्यांच्या या राखीव नोकऱ्या राहतील; मात्र त्याचें प्रमाण कमी कमी होत जाऊन १० वर्षांनीं राखीव जागा ठेवणें बंद होईल. हीही व्यवस्था लोकशाही तत्वाविरुद्ध आहे. अँग्लो-इंडियन हे कांहीं शिक्षणानें मागासलेले नाहींत. तथापि हें कलम म्हणजे राजकारणांतील औदार्याचा नमुना आहे. जसें 'सर्वेषामविरोधेन यत्नकर्म समारभेत' तसेंच सर्वांचा विरोध टाळून स्वातंत्र्याची सुरुवात करावयाची या उद्देशानें ही व्यवस्था आहे !

**अँग्लो-इंडियन व शिक्षणाची खास सोय**

**२९८. संघ अगर परिशिष्ट एक, भाग १ मधील घटक यांनीं ३१-३-४८ रोजीं संपणाऱ्या जमाखर्चाच्या वर्षांत अँग्लो-इंडियनांच्या शिक्षणासाठीं जी मदत ( Grants ) दिली असेल तितकीच ती घटना सुरू झाल्यानंतर पहिल्या तीन वर्षांत चालू राहील.**

**नंतर दर तीन वर्षांनीं, मागील तीन वर्षांत जी मदत मिळाली असेल, तींत साधारणतः १० टक्के कमी होत जाईल.**

**मात्र घटना सुरू झाल्यानंतर दहा वर्षें संपतांच जेवढी खास मदत म्हणून मिळत असेल, ती बंद होईल.**

**मात्र या कलमाप्रमाणें मदत मिळविणें झाल्यास अँग्लो-इंडियन शिक्षण-संस्थांनीं निदान ४० टक्के विद्यार्थी अन्य जमातीचे घेण्याची सोय केली पाहिजे.**

अँग्लो-इंडियनांना राखीव प्रतिनिधित्व, राखीव नोकऱ्या यांबरोबरच या कलमानें शिक्षणासाठीं खास मदत देण्याचीही व्यवस्था केली आहे ! अँग्लो-इंडियन जमातीला

किती सवलती ब्रिटिश राजवटींत होत्या, याची यावरून कल्पना येईल. या कलमानें जी खास मदत मिळेल, ती १० वर्षांपुढें राहणार नाहीं. या मुदतींत कलमांत सांगितल्याप्रमाणें ती कमी कमी होत जाईल. या मुदतींत ही खास मदत मिळविणें झाल्यास त्या शिक्षण-संस्थांनीं ४० टक्के अन्य जातीचे विद्यार्थी घेण्याची सोय केली पाहिजे. या मुदतीनंतर अन्य शिक्षण-संस्थांना जी मदत मिळेल व ज्या शर्तीवर मिळेल त्याप्रमाणेंच ती याही संस्थांना मिळेल; सर्व खास व्यवस्था रद्द होईल.

अल्पसंख्यांकांचें हित पाहण्यासाठीं संघ व घटक यांत खास अधिकारी

२९९. (१) संघासाठीं म्हणून अल्पसंख्यांकांकरितां एक खास अधिकारी राहील व त्याची नेमणूक अध्यक्ष करील; तसेंच परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांतील अल्पसंख्यांकांसाठीं एक खास अधिकारी राहील व त्याची नेमणूक त्या त्या घटकाचा प्रमुख करील.

(२) संघाच्या खास अधिकाऱ्याचें कर्तव्य म्हणजे, या घटनेप्रमाणें अल्पसंख्यांकांना जें संरक्षण व ज्या सवलती दिल्या आहेत, त्यांबाबत जेवढा त्यांचा संघाशीं संबंध येतो, तेवढ्याबाबत चौकशी करून तीं संरक्षणें कशीं चालू आहेत याचा, अध्यक्ष आदेश देईल त्या त्या मुदतीचा रिपोर्ट अध्यक्षाला देणें हें आहे; अध्यक्ष हे रिपोर्ट पार्लमेंटपुढें ठेवील.

(३) घटकाच्या खास अधिकाऱ्याचें कर्तव्य म्हणजे, या घटनेप्रमाणें घटकाच्या संबधांत जीं संरक्षणें अल्पसंख्यांकांना दिलीं आहेत, त्यांची चौकशी करणें व तीं कशीं चालू आहेत याचा, त्या घटकाचा प्रमुख आज्ञा करील, त्या त्या मुदतीचा रिपोर्ट प्रमुखाला देणें हें आहे; प्रमुख हे रिपोर्ट घटकाच्या कायदेमंडळापुढें ठेवील.

संरक्षणें व सवलती घटनेंत दिल्या म्हणजे त्या कागदावर राहतां कामा नये. त्याप्रमाणें प्रत्यक्ष घडतें कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. ही व्यवस्था या कलमांत आहे. अल्पसंख्यांकांच्या संरक्षणाबाबत देखरेख ठेवण्यासाठीं खास अधिकारी राहतील, ते याबाबत चौकशी करतील व अध्यक्षाला त्याबाबत वारंवार रिपोर्ट देतील. हे रिपोर्ट पार्लमेंट व कायदेमंडळें यांपुढें ठेवण्यांत येतील. तेथें त्यावर चर्चा होईल. तात्पर्य, जें दिलें आहे तें पदरांत पडेल अशी दक्षता या कलमानें घेतली आहे.

३००. (१) परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांतील परिशिष्टांतील वन्य प्रदेशांचा कारभार व वन्य जातींचें कल्याण यांबाबत रिपोर्ट करण्यासाठीं अध्यक्ष केव्हांही व घटना सुरू झाल्यानंतर १० वर्षांनीं निश्चितपणें एक समिति नेमील व त्याबाबत जरूर तो हुकुम काढील.

**परिशिष्ट एक भाग १ यांतील घटकांतील परिशिष्टांतील वन्य जाती व प्रदेश यांवरील संघाचें नियंत्रण**

या हुकुमांत समितीची घटना, अधिकार, कामकाज करण्याची रीत यांबाबत स्पष्ट उलेख असून शिवाय ज्या आनुषंगिक गोष्टी अध्यक्षाला इष्ट अगर आवश्यक वाटतील, त्यांचाही समावेश असेल.

(२) घटकांतील परिशिष्टांतील वन्य जातीच्या कल्याणासाठीं आवश्यक योजना तयार करणें व त्या सिद्धीला नेणें यांबाबत संघाच्या कार्यकारी सत्तेला त्या घटकाला आदेश देण्याचा अधिकार आहे.

वन्य प्रदेश व वन्य जाती ही खास जबाबदारी संघावर आहे. म्हणून त्याबाबत समिति नेमून, रिपोर्ट मागवणें ही बाब अध्यक्षाच्या कर्तव्यांत येते. त्यांच्या प्रगतीच्या योजना करण्याबाबत व त्या पुऱ्या करण्याबाबत आदेश देण्याचा अधिकार संघ सरकारला आहे. याचा अर्थ, यांबाबत जरूर तें नियंत्रण व मार्गदर्शन मध्यवर्ती सत्ता करणार हें उघड आहे.

३०१. (१) शिक्षण दृष्ट्या व सामाजिक दृष्ट्या हिंदुस्थानांतील मागासलेल्या वर्गांच्या परिस्थितीची पाहणी करण्यासाठीं व त्या वर्गांच्या अडचणींची चौकशी करून त्या दूर करण्यासाठीं संघानें अगर घटकांनीं काय उपाययोजना करावी यांबाबत शिफारसी करण्यासाठीं अध्यक्ष हुकुम काढून त्याला योग्य वाटेल त्या इसमांची समिति नेमील; ही समिति या वर्गांची सुधारणा व्हावी म्हणून संघानें अगर घटकांनीं काय मदत (grants) करावी व कोणत्या शर्तींवर करावी याहीबाबत

**मागासलेल्या वर्गांच्या परिस्थिती-बाबत चौकशी करण्यासाठीं समिति**

शिफारसी करील. समिति नेमावयाच्या हुकुमांत समितीचें काम कसें चालवें याबाबत निर्देश असेल.

( २ ) याप्रमाणें नेमलेली समिति, तिजकडे सोंपविलेल्या बाबींची चौकशी करून वस्तुस्थितीबद्दल कथन करून तिला योग्य वाटतील त्या शिफारसींसह आपला रिपोर्ट अध्यक्षाला सादर करील.

( ३ ) अध्यक्ष त्याला सादर केलेला रिपोर्ट व त्यानें त्यावर केलेली कामगिरी यांबाबतचें निवेदन अशीं दोन्ही पार्लमेंटपुढें ठेववील.

या कलमांत, शिक्षण व समाज या दृष्टीनें जे वर्ग या देशांत मागासलेले आहेत, त्यांच्या अडीअडचणी काय आहेत हें पाहून त्या दूर कशा कराव्यात, त्यासाठीं संघानें व घटकांनीं काय मदत करावी याबाबत शिफारसी करण्यासाठीं अध्यक्षानें समिति नेमण्याची व्यवस्था आहे. तिचा रिपोर्ट आला म्हणजे त्यावर त्याला योग्य वाटेल ती कारवाई तो करील. रिपोर्ट व त्यावरील कारवाई यांबाबतचे निवेदन अशीं दोन्ही पार्लमेंटपुढें येतील. त्यावर चर्चा होईल व मागासलेल्यांना योग्य न्याय व संधि मिळाली कीं नाहीं हें पार्लमेंट पाहील.

# भाग १५

## किरकोळ

अध्यक्ष व प्रमुख यांना संरक्षण

३०२. (१) आपल्या पदाचा अधिकार चालवीत असतां अगर कर्तव्यें करीत असतां अध्यक्ष अगर घटकाचा प्रमुख यांनीं जें कांहीं केलें असेल, अगर करण्याच्या उद्देशानें केलें असेल, त्याबद्दल अगर अधिकार चालविल्याबद्दल अगर कर्तव्य केल्याबद्दल तो—अध्यक्ष अगर घटकाचा प्रमुख–कुठल्याही न्यायालयाला जाब देण्यास जबाबदार नाहीं.

मात्र घटनेचें कलम ५० याप्रमाणें जर पार्लमेंटनें त्यावर आणलेल्या आरोपाची चौकशी करण्याकरतां कोर्ट, समिति अगर मंडळ नेमलें असेल, अगर योजलें गेलें असेल, तर त्याच्या वर्तनाची तें कोर्ट, समिति अगर मंडळ यांजकडून चौकशी होईल. तसेंच घटनेचा भाग १०, प्रकरण ३ मध्यें ज्यांचा उल्लेख आहे असे दावे हिंदुस्थान सरकार अगर घटक सरकार यांच्याविरुद्ध आणण्याचा कोणाही व्यक्तीचा हक्क या कलमानें मर्यादित होत नाहीं.

(२) अध्यक्ष अगर प्रमुख अधिकारावर असेपर्यंत त्याच्याविरुद्ध कोणत्याही न्यायालयांत कुठलेंही फौजदारी काम दाखल होणार नाहीं अगर चालू राहणार नाहीं.

(३) अध्यक्ष अगर प्रमुख अधिकारावर असेपर्यंत त्याला अटक अगर बंदींत ठेवण्याबाबत कुठल्याही कोर्टाला हुकुम काढतां येणार नाहीं.

(४) जेंव्हां अध्यक्ष अगर प्रमुख याच्याविरुद्ध, त्यानें वैयक्तिक नात्यानें केलेल्या अगर त्या उद्देशानें केलेल्या गोष्टीबाबत मग ती गोष्ट

तो अधिकारावर येण्यापूर्वी अगर नंतर झालेली असो, ज्या दिवाणी दाव्यांत दाद मागितली असेल तो दावा, अध्यक्ष अगर प्रमुख अधिकारावर असेल त्या मुदतींत, जींत दावा आणणाऱ्या इसमाचें नांव, दाव्याचें स्वरूप, दाव्याचें कारण आणि मागितलेली दाद यांबाबत उल्लेख असेल अशी, लेखी नोटिस, अध्यक्ष अगर प्रमुख, जसें असेल तसें, याला देऊन अगर त्याच्या कचेरींत दाखल करून दोन महिने पुरे झाल्याशिवाय, आणतां येणार नाहीं.

अध्यक्ष अगर प्रमुख हें राज्यसत्तेचें प्रतीक व प्रमुख भूषण आहे. वाटेल त्यानें उठावें व चार ओळी खरडून दिवाणी अगर फौजदारी काम त्याजविरुद्ध सुरू करावें यांत लोकशाही नाहीं, समानताही नाहीं किंवा न्यायाबाबत पूर्ण सोय आहे, असेंही म्हणतां येणार नाहीं. राज्याचा पाया जनसंमति आहे, तसेंच राज्यप्रमुखाबद्दल आदर हा त्याचा प्राण आहे. तो उत्कृष्ट चारित्र्यवान्, शीलसंपन्न असावा म्हणून दक्षता घ्यावी. पण एकदा अधिकारावर त्याची स्थापना केल्यानंतर त्याबाबत योग्य तो आदर व त्याचा योग्य तो सन्मान राखिला पाहिजे. घटनेप्रमाणें त्याची चौकशी व्हावी. पण वाटेल त्या कोर्टानें त्याच्याविरुद्ध काम चालवावें व तशा प्रसिद्धीनें त्याच्याबद्दल आदर कमी व्हावा हें इष्ट नाहीं. या कलमांतील व्यवस्था ही यामुळें इष्ट अशीच आहे. अध्यक्ष अगर प्रमुख यांनीं जें जें अधिकारपरत्वें केलें असेल, त्याबद्दल कोर्ट जाब मागणार नाहीं. अध्यक्षाच्या वर्तनाबद्दल पार्लमेंट कलम ५० प्रमाणें उपाययोजना करूं शकेल. प्रस्तुत कलमानें हिंदुस्थान सरकार अगर घटक सरकार याविरुद्ध दावा आणण्याच्या भाग १० प्रकरण ३ यांतील हक्कास बाध येणार नाहीं. अध्यक्ष अगर प्रमुख यांवर फौजदारी काम सुरू होणार नाहीं अगर चालू राहणार नाहीं. अर्थात् हा प्रतिबंध तो अधिकारावर असेपर्यंतच आहे. वैयक्तिक बाबीबद्दल दावा आणणें झाल्यास २ महिन्यांची नोटिस दिली पाहिजे. त्या नोटिशींत सर्व तपशील असला पाहिजे. या मुदतींत आपसांत निकाल होणें शक्य होईल. तात्पर्य, यथोचित संरक्षण या कलमांत अध्यक्ष व प्रमुख यांना दिलें आहे.

अर्थ लावणें इत्यादि

३०३. (१) संदर्भानें दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल, तर या घटनेंत पुढें दिलेल्या पदांचा अर्थ, जो त्यांना येथें दिला आहे तो मानला जाईल :—

(अ) ' शेतीचें उत्पन्न ' म्हणजे प्राप्ति-कराबाबतच्या हिंदुस्थान सरकारच्या कायद्यांत शेतीचें उत्पन्न म्हणून ज्याची व्याख्या दिली आहे तें;

(ब) ' अँग्लो-इंडियन म्हणजे ज्याचा बाप अगर ज्याचा अन्य पुरुष पूर्वज हा युरोपियनाचा वंशज आहे अगर होता, पण जो हिंदुस्थानचा रहिवासी आहे, आणि तात्पुरते नव्हे, पण कायम रहिवासी म्हणून जे हिंदुस्थानांत राहत असत, अशा आई-बापाच्या पोटीं जो हिंदुस्थानांत जन्मला आहे अगर होता, तो;

(क) ' हिंदी ख्रिश्चन ' म्हणजे जो, ख्रिश्चन धर्म, मग तो कोणत्याही प्रकारचा असो, मानतो व जो युरोपियन नाहीं अगर अँग्लो-इंडियन नाहीं, तो;

(ड) ' कर्ज काढणें ' यांत रकमा घेऊन त्यांची वार्षिक हप्त्यानें फेड करणें हीही पद्धत येते; तसेंच ' कर्ज ' याचा अर्थही या दृष्टीनें होईल;

(इ) ' मुख्य न्यायाधीश ' मुख्य कोर्टाचा म्हणून जेथें समजला जाईल, तेथें ' मुख्य जज्ज ', याचाही समावेश त्यांत होईल;

(फ) ' संस्था-कर ' म्हणजे संस्थांनीं अगर कंपन्यांनीं उत्पन्नावर द्यावयाचा कर आणि ज्या कराच्या बाबतींत खालील शर्ती पुऱ्या झाल्या असतील—

(१) जो शेती-उत्पन्नावर असणार नाहीं;

(२) कंपन्यांकडून व्यक्तींना दिल्या जाणाऱ्या नफ्यांतून अगर डिव्हिडंडमधून कुठ-

त्याही कायद्यानें त्या करावाबत कांहींही रक्कम कमी केली जाणार नाहीं;

( ३ ) अशा व्यक्तीनें द्यावयाचा प्राप्ति-कर अगर त्याला त्याबाबत कांहीं रक्कम परत मिळणें ( refund ) असेल, ती, या दोन्ही गोष्टी ठरवितांना, अगर प्राप्ति-करासाठीं अशा व्यक्तीच्या एकंदर उत्पन्नाचा हिशोब करावयाचा असेल, तेव्हां हा संस्था-कर जो भरला असेल, तो विचारांत घेण्याबद्दल व्यवस्था नसावी;

( ग ) ' संबंधी घटक ' अगर ' संबंधी प्रांत ' म्हणजे जेव्हां घटक अगर प्रांत याबद्दल शंका उत्पन्न होईल, तेव्हां अध्यक्ष त्या विशिष्ट प्रश्नापुरते जो संबंधी घटक अगर संबंधी प्रांत ठरवील तो;

( ह ) ' देणें ' यांत वार्षिक हप्त्यानें मूळ रक्कम देण्याची जी जबाबदारी स्वीकारली असेल, ती पार पाडण्याची जबाबदारी व तसेंच ग्वाहीत रक्कम परत देण्याची जबाबदारी हीं येतात आणि ' देण्याचा बोजा ' याचा अर्थ वरील गोष्टी लक्षांत ठेऊन केला जाईल;

( ई ) ' विद्यमान कायदा ' म्हणजे कायदा, वटहुकुम हुकुम, पोटनियम, नियम, कानून जे ही घटना सुरू होण्यापूर्वी अधिकार असलेल्या कायदेमंडळानें, व्यक्तीनें अगर शासनसंस्थेनें केले आहेत ते सर्व;

( ज ) ' फेडरल कोर्ट ' म्हणजे १९३५ च्या कायद्यानें जें फेडरल कोर्ट स्थापन केलें आहे तें;

( के ) ' माल ' म्हणजे सर्व सामुग्री, पदार्थ व वस्तु;

( ल ) ' ग्वाही ' यांत विशिष्ट रकमेपेक्षां एखाद्या कारखान्याला कमी नफा झाल्यास जी रक्कम देण्याचें घटनारंभापूर्वी कबूल केलें असेल, ती देण्याची जबाबदारीही समाविष्ट होते;

( म ) 'पेन्शन' म्हणजे पेन्शन, मग ती वर्गणीपद्धतीची अगर अन्यथा कुठल्याही स्वरूपाची असो, जी एखाद्या इसमास अगर एखाद्या इसमाबाबत द्यावयाची आहे व तींत निवृत्ति-वेतन जें देणें आहे, ग्रॅच्युटी जी देणें आहे, व प्रॉव्हिडंड फंडाची रक्कम त्यांत घालावी लागणारी भर, त्यावरील व्याजासह अगर व्याजाशिवाय, या सर्वांचा समावेश होतो;

( न ) ' जाहीर निवेदन ' म्हणजे हिंदुस्थान सरकारचें अगर घटक सरकारचें, जसें असेल तसें, गॅझेटांत प्रसिद्ध झालेलें निवेदन होय;

( ओ ) ' रोखे ' यांत भागांचा ( Stocks ) पण समावेश होतो;

( प ) ' करभार ' यांत साधारण अगर स्थानिक अगर खास कर अगर पट्टी यांचा समावेश होतो व या दृष्टीनें ' कर ' याचा अर्थ केला जाईल;

( क ) प्राप्तीवरील कर यांत जादा नफ्यावरील कराच्या स्वरूपाचा कर समाविष्ट होतो;

(र) 'रेल्वे' यांत जी सर्वस्वीं म्युनिसिपालिटीच्या क्षेत्रांत नाहीं अशा ट्रॅम्वेंचाही समावेश होतो;

(स) 'संघ रेल्वे' यांत हिंदी संस्थान रेल्वेचा समावेश होत नाहीं, पण वर सांगितलेली बाब वगळतां दुय्यम रेल्वेचा समावेश नसलेल्या कोणत्याही रेल्वेंचा समावेश होतो;

(ट) 'हिंदी संस्थान रेल्वे' म्हणजे परिशिष्ट एक, भाग ३ यांत नमूद केलेल्या कोणत्याही संस्थानाच्या मालकीची आणि त्या संस्थानानें अगर त्याच्या तर्फे हिंद सरकार अगर संघ रेल्वे चालविणारी कंपनी यांच्याशीं करार न करतां चालविली जाणारी रेल्वे;

(य) 'दुय्यम रेल्वे' म्हणजे जी सर्वस्वीं एका घटकांत पसरली असून त्याच मापाच्या (Guage) अगर अन्य मापाच्या संघ-रेल्वेशीं सलग असा रेल्वे मार्ग न करणारी रेल्वे;

(व्ह) 'परिशिष्ट' म्हणजे या घटनेंतील परिशिष्ट;

(व) 'परिशिष्टांतील जाति' म्हणजे हिंदुस्थान सरकारच्या १९३५ च्या (परिशिष्टित जाति) हुकुमांत, १९३५ च्या कायद्याचें परिशिष्ट ५ व ६ यासाठीं ज्या प्रांतांत ज्या जाति, वंश अगर वन्य जाति (Tribes) अगर त्या जाति, वंश अगर वन्य जाति यांतील गट अथवा पोटजाति परिशिष्टांतील जाति म्हणून नमूद केल्या आहेत, त्या त्या प्रांतांशीं संबंधित असलेल्या

परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकाच्या संबंधां-तील परिशिष्टांतील जाति होत.

( क्ष ) परिशिष्टांतील वन्य जाति म्हणजे परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकाच्या संबंधांत परिशिष्ट आठ यांतील भाग १ ते ९ हे जेथें लागू असतील, तेथें त्या भागांत नमूद केलेल्या वन्य जाति व जमाती या होत;

( २ ) संदर्भांत अन्य अर्थ अभिप्रेत नसेल, तर जनरल क्लॉजिस ॲक्ट १८९७ ( १८९७ चा १० ) या घटनेचा अर्थ लावण्यास लागू पडेल.

( ३ ) जेथें या घटनेंत पार्लमेंटचे अगर पार्लमेंटनें केलेले कायदे अगर कानून अगर घटक कायदेमंडळाचे अगर कायदेमंडळानें केलेले कायदे अगर कानून असा उल्लेख असेल, तेथें अध्यक्ष अगर प्रमुख, जसें असेल तसें, यानें काढलेल्या वटहुकुमाचाही उल्लेख त्यांत आहे, असें मानलें जाईल.

प्रत्येक कायदा नीट लागू व्हावा, नीट समजला जावा, म्हणून त्यांतील पदांचा अर्थ निश्चित असला पाहिजे. विविध अर्थ जर त्यांतून निघूं लागले, तर अनर्थ होईल. कायद्याचें मुख्य लक्षण तो निश्चित पाहिजे. यासाठीं प्रत्येक कायद्यांत त्यांत वापरलेल्या शब्दांबद्दल, पदांबद्दल काय अर्थ समजावा याचें स्पष्टीकरण असतें. कायद्याच्या सुरवातीसच व्याख्या दिल्या जातात. या घटनेंत अनेक पदें अगर शब्दसमूह आले आहेत, त्यांचा अर्थ या कलमांत स्पष्ट केला आहे. तो अर्थ जर संदर्भानें अन्य अर्थ अभिप्रेत नसेल तर मानला जाईल. बहुतेक व्याख्या स्पष्ट आहेत. जेथें हायकोर्ट आहे, तेथील मुख्य न्यायाधिशाला मुख्य अगर सरन्यायाधीश म्हणतात. पण कांहीं प्रांतांत अगर घटकांत हायकोर्ट नसेल, पण प्रांतासाठीं एक अपील-कोर्ट असेल तर त्याच्या मुख्य जज्जाला मुख्य न्यायाधीश अगर सरन्यायाधीश न म्हणतां मुख्य जज्ज म्हटलें आहे. हायकोर्ट हें अधिक श्रेष्ठ दर्जाचें मानलें आहे. संस्था-कर म्हणजे ज्या व्यापारी कंपन्या अगर संघ आहेत, त्यांच्या प्राप्तीवरील कर; तो कंपनीच्या प्राप्तींतून

दिला जातो व त्याचें लक्षण व कोणत्या परिस्थितींत तो संस्था-कर समजला जाईल हें (फ) (१), (२), (३) मध्यें स्पष्ट केलें आहे. 'देणें' यांत ग्वाहीमुळें उत्पन्न झालेली आर्थिक जबाबदारी येते. तसेंच 'विद्यमान' कायदा यांत नियम, कानून, वटहुकुम जे जे अधिकृत आहेत ते सर्व येतात. 'पेन्शन' यांत निवृत्तीनंतर सरकारला सदरहू इसमास अगर त्याच्या संबंधांत जें जें द्यावें लागेल तें तें सर्व येतें. परिशिष्टांतील जाती म्हणजे १९३६ च्या तद्विषयक हुकुमांत ज्या जाती ज्या प्रांताबाबत त्या स्वरूपाच्या मानल्या आहेत, त्या त्या प्रांतांचा जो आतां घटक झाला असेल त्याच्या संबंधांत तशा मानल्या जातील. कायदा कितीही दक्षतेनें केला, तरी पुष्कळ शब्दांचा स्पष्ट अर्थ होत नाहीं. सामान्यतः सर्व कायद्यांतून कांहीं शब्द अगर पदें हीं समान असतात. कांहीं संकेत समान असतात. या सर्वांचा परामर्श एका कायद्यांत केला आहे व त्याला जनरल क्लॉजिस ॲक्ट म्हणतात. या कायद्यांत शब्द व पदें यांचे अर्थ दिले आहेत. जेव्हां एखादा कायद्याचा अर्थ लावावयाचा असेल, व जर एखादा शब्द अगर पद तेथें स्पष्ट नसेल, तर त्या शब्दाचा अगर पदाचा जो अर्थ या ॲक्टांत दिला असेल, तो मानावा असें या कलमांत सांगितलें आहे. तात्पर्य, कायद्यांतील पदांचे अर्थ निश्चित करण्याच्या दृष्टीनें ही योजना आहे.

# भाग १६

## घटनादुरुस्ती

घटनेंत दुरुस्ती करण्याची रीत

३०४. (१) घटनादुरुस्तीचें बिल पार्लमेंटच्या कोणत्याही सभागृहांत दाखल करून घटनादुरुस्तीचें काम सुरू करतां येईल; आणि तें बिल प्रत्येक सभागृहानें त्याच्या एकंदर संख्येच्या बहुमतानें व त्या सभागृहांत हजर असणाऱ्या व मत देणाऱ्या सभासदांनीं $\frac{2}{3}$ बहुमतानें पास केलें, म्हणजे तें अध्यक्षाकडे संमतीसाठीं सादर केलें जाईल वअध्यक्षानें संमति दिल्याबरोबर त्या बिलाबरहुकुम घटना दुरुस्त होईल; मात्र जर दुरुस्तीनें

(अ) परिशिष्ट सात यांतील यादींत फरक होणार असेल;

(ब) पार्लमेंटमधील घटकांच्या प्रतिनिधित्वांत फरक होणार असेल; अगर

(क) प्रमुख न्यायालयाच्या अधिकारांत फरक होणार असेल,

तर ती दुरुस्ती परिशिष्ट एक, भाग १ मधील निदान निम्या घटकांच्या कायदेमंडळांनीं व त्याच परिशिष्टांतील भाग ३ मधील निदान एकतृतीयांश संस्थानांच्या कायदेमंडळांनीं मंजूर केली पाहिजे.

(२) (१) यांत कांहींही असलें, तरी प्रमुखाची निवड करण्यासंबंधीं अगर परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांतील कायदे-मंडळांच्या सभागृहांच्या संख्येसंबंधीं कांहीं दुरुस्ती करावयाची असेल

तर तत्संबंधींचें दुरुस्ती बिल त्या घटकाच्या असेंब्लींत अगर दोन सभागृहें असतील तर कोणत्याही सभागृहांत दाखल करून कामास सुरुवात करतां येईल; आणि तें दुरुस्ती बिल असेंब्लींत अगर जेथें दोन सभागृहें असतील तेथें दोन्हींत प्रत्येक ठिकाणीं त्या त्या सभागृहांतील एकंदर सभासदांच्या संख्येच्या बहुमतानें पास झाल्यानंतर मान्यतेसाठीं पार्लमेंटकडे सादर केलें जाईल आणि पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांनीं आपआपल्या एकंदर सभासदांच्या संख्येच्या बहुमतानें तें बिल मंजूर केल्यानंतर तें अध्यक्षाकडे संमतीसाठीं सादर केलें जाईल व त्याची संमति मिळतांच बिलाप्रमाणें घटनेंत दुरुस्ती होईल.

खुलासा—परिशिष्ट एक, भाग ३ यांत जेव्हां संस्थानांचा गट म्हणून निर्देश केला असेल, तेव्हां या कलमाचें पोटकलम (१) याकरतां तो गट एक घटक समजला जाईल.

राखींव जागा १० वर्षेंपर्यंत राहतील

३०५. कलम ३०४ मध्यें कांहींही असलें, तरी मुसलमान, परिशिष्टांतील जाति, परिशिष्टांतील वन्य जाति अगर हिंदी ख्रिश्चन यांना पार्लमेंटमध्यें अगर परिशिष्ट एक, भाग १ यांतील घटकांच्या कायदेमंडळांत राखीव जागा देण्यासंबंधीं जी व्यवस्था घटनेंत आहे, तींत घटना सुरू झाल्यापासून १० वर्षेंपर्यंत कांहींही दुरुस्ती करतां येणार नाहीं व ही मुदत संपतांच, ही व्यवस्था पुढें चालू राहावी अशी घटनेंत दुरुस्ती न झाल्यास ती संपुष्टांत येईल.

या दोन कलमांत घटनादुरुस्तीसंबंधीं विचार केला आहे. घटना कायदा हा मामुली कायदा नव्हे. सामान्य कायदा व संघटनात्मक कायदा असे कायद्याचे दोन प्रकार मानले आहेत, सामान्य कायद्यांत दुरुस्ती करावयाची असल्यास सरळ बिल आणून तें पास झालें म्हणजे दुरुस्ती होते. तें बिल सामान्य बहुमतानें पास होतें. कांहीं देशांतील राज्यव्यवस्थेंत सामान्य व संघटनात्मक कायदा असा भेद नाहीं. कारण तेथें घटना एका विशिष्ट कायद्यानें स्थापित झालेली नसते. उदाहरणार्थ, इंग्लंडची

घटना अमुक एका कायद्यांत आहे असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून इंग्लंडमध्यें घटनेशीं अगर मौलिक बाबीशीं संबंध येणारा कायदा व गौण बाबीशीं संबंध येणारा कायदा यांत फरक नाहीं. दोन्हींत एकाच रीतीनें बदल करतां येतो. पण रीत एक असली तरी पहिल्या तऱ्हेचा कायदा पास करणें सोपें नसतें हें उघड आहे. याच्या उलट अनुभव जेथें राज्यव्यवस्था घटना कायदा होऊन प्रस्थापित झाली आहे, तेथें येतो. घटना कायद्यांत दुरुस्ती करण्यासाठीं विशिष्ट व्यवस्था असते. सामान्य कायद्यांत जशी दुरुस्ती होते, तशी याबाबत होणार नाहीं. विशिष्ट बहुमत असल्याशिवाय दुरुस्ती-बिल पास होणार नाहीं. अगर दुरुस्ती बिल पार्लमेंटमध्यें पास झालें, तरी पुन्हां सार्वमतानें पास झालें पाहिजे. तसेंच दुरुस्ती सुचविण्याचा अधिकार सामान्य जनतेलाही कित्येक ठिकाणीं दिला आहे. जेथें संयुक्त राज्य आहे, तेथें दुरुस्ती मध्यवर्ती कायदेमंडळांत विशिष्ट बहुमतानें पास होऊन पुन्हां घटक कायदेमंडळांत ती पास झाली पाहिजे. एकानें जरी ती नामंजूर केली, कीं दुरुस्ती होऊं शकत नाहीं. तात्पर्य, घटना दुरुस्तीची रीत कित्येक देशांत क्लिष्ट व अवघड केलेली आहे.

या देशांतील राज्यव्यवस्था घटना कायदा करून अमलांत येणार आहे. या देशाची घटना लेखनिष्ठ आहे. म्हणून सामान्य कायदा व संघटनात्मक कायदा ( Ordinary and Organic ) असा भेद साहजिक येथें झाला आहे. म्हणून घटना कायदा दुरुस्त करणें झाल्यास त्यासंबंधीं खास रीत या कलमांत सांगितली आहे. घरांत किरकोळ दुरुस्ती आपण सहज करतों. पण त्यांत मजला चढवावयाचा असल्यास अगर घराचें तोंड बदलावयाचें असल्यास अगर पायांत दुरुस्ती करावयाची असल्यास आपण अधिक काळजी घेतों. या दृष्टीनें घटना कायदा हा राज्यव्यवस्थेचा पाया आहे. त्यांत वारंवार व सहज बदल होणें इष्ट नाहीं. तसेंच राष्ट्राचें जीवन हें केवळ घटनेच्या कलमांत कोंडलें जातां कामा नये. घटनेसाठीं लोक नाहींत, लोकांसाठीं घटना आहे. सारासार विचार व विवेक करून राष्ट्राच्या जीवनाला प्रगतिपर वाव मिळेल अशा दुरुस्त्या होणें इष्ट आहे. त्या करतांना भयंकर अडचणी पण असूं नयेत. या दृष्टीनें विचार केल्यास या कलमांतील व्यवस्था सुलभ नाहीं व अवघडही नाहीं. घटनादुरुस्तीचें बिल पार्लमेंटच्या प्रत्येक सभागृहांत पास झालें पाहिजे. मात्र तें एकंदर सभासदांच्या संख्येच्या बहुमतानें व हजर असून मत देणाऱ्या सभासदांच्या $\frac{2}{3}$ संख्येनें पास झालें पाहिजे. उद्देश एवढाच कीं, त्याबाबत लोकमत तीव्र असलें पाहिजे. समजा, सभागृहाची एकंदर सभासद संख्या १०० आहे. मग प्रथम ५१ सभासदांनीं दुरुस्तीच्या बाजूनें मत दिलें पाहिजे. पण एवढ्यानेंच भागणार नाहीं. समजा, त्या वेळीं ९० सभासद हजर आहेत, तर त्या सर्वांनीं मतें दिल्यास, निदान त्यांतील $\frac{2}{3}$ म्हणजे ६० नीं दुरुस्तीच्या बाजूनें मत दिलें पाहिजे. तसें न झालें, तर तें बिल पास झालें

असें होणार नाहीं. या रीतीनें बिल पास झाल्यावर अध्यक्षाकडे तें संमतीसाठीं जाईल. संमति मिळतांच घटना त्या बिलाप्रमाणें दुरुस्त होईल. मात्र जर दुरुस्तीनें सातव्या परिशिष्टांतील यादींत, घटकांच्या पार्लमेंटमधील प्रतिनिधित्वांत, अगर प्रमुख न्यायालयाच्या अधिकारांत फरक होणार असेल, तर त्या बिलाला घटक कायदेमंडळांपैकीं, निदान १/२ नीं मान्यता दिली पाहिजे. कारण या सर्व महत्त्वाच्या बाबी असून त्यावर घटक कायदेमंडळांनीं विशेष विचार करणें अगदीं आवश्यक आहे. तसेंच भाग ३ मधील संस्थानांतील कायदेमंडळांपैकीं १/३ नींही या दुरुस्तीला मान्यता दिली पाहिजे. हीही व्यवस्था त्याच दृष्टीनें यथोचित आहे. याबाबत सार्वमत घेणें फार जिकीरीचें व विलंब करणारें ठरेल. म्हणून घटक कायदेमंडळांकडे मंजुरी ठेवली आहे. हा मधला मार्ग ठीक आहे. प्रमुखाची निवड व सभागृहांची संख्या ठरविणें यांबाबतची घटनादुरुस्ती त्या त्या घटक कायदेमंडळानें करणें हें योग्य आहे. हा एका अर्थानें स्थानिक प्रश्न आहे. ही दुरुस्ती घटक कायदेमंडळानें पास केली म्हणजे पार्लमेंट ती मंजूर करील व ती तिनें मंजूर केल्यावर अध्यक्षानें संमति दिली म्हणजे तशी दुरुस्ती घटनेंत होईल. घटक कायदेमंडळांत त्यांतील सभासदांच्या संख्येच्या बहुमतानें तें बिल पास झालें पाहिजे. त्याच बहुमतानें पार्लमेंटमध्यें तें पास झालें पाहिजे. अधिक महत्त्वाच्या दुरुस्तीसाठीं बहुमत दोन कसोटीचें ठेवलें आहे; कमी महत्त्वाच्या दुरुस्तीसाठीं एकाच कसोटीचें आहे. पण निव्वळ बहुमतानें म्हणजे हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांच्या बहुमतावर घटनादुरुस्तीची कोणतीही बाब अवलंबून ठेवलेली नाहीं.

कांहीं घटनांत कांहीं बाबतींत केव्हांही दुरुस्ती करतां येत नाहीं. उदाहरणार्थ, राज्याचें स्वरूप अगर कांहीं मौलिक हक्क याबाबतींत दुरुस्ती करतां येत नाहीं. प्रस्तुत घटनेंत तसा प्रतिबंध नाहीं. पार्लमेंट घटनेनुसार पूर्ण सत्ताधीश अगर प्रभुत्वपूर्ण आहे. घटनेप्रमाणें वाटेल ती दुरुस्ती होऊं शकेल. फक्त कलम ३०५ मधील प्रतिबंध हा अपवाद आहे. पण तोही १० वर्षांसाठीं आहे. पहिल्या १० वर्षांत त्या कलमांत सांगितल्याप्रमाणें अल्पसंख्यांकांच्या राखीव जागेबाबत कांहींही बदल करतां येणार नाहीं. व्यवहार दृष्ट्या हें ठीक आहे. तात्पर्य, या घटनेंप्रमाणें घटनादुरुस्तीवर मर्यादा नाहीं. ती करण्याची रीत सहज सुलभ नाहीं हें खरें, पण अगदीं विलंबकारक, क्लिष्ट व प्रक्षोभक अशीही नाहीं. परिवर्तनक्षम ती आहे. वाढत्या लोकमताला संवादी अशी ती होऊं शकते.

# भाग १७

## तात्पुरती व संक्रमणकालीन व्यवस्था

घटक-यादींतील कांहीं बाबी समान यादींतील समजून पार्लमेंटला त्याबाबत कायदे करण्याचा तात्पुरता हक्क

३०६. घटनेंत कांहींही असलें, तरी पार्लमेंटला घटना सुरू झाल्यानंतर पांच वर्षेंपावेतों खालील बाबीसंबंधांत त्या जणूं कांहीं समान यादींत आहेत, असें मानून कायदे करण्याचा अधिकार आहेः—

(अ) कापूस आणि लोकर यापासूनचा कपडा, कागद (वर्तमानपत्राचा धरून), अन्नधान्य (खाण्याचें तेल व गळित धान्य धरून) पेट्रोल व तद्जन्य पदार्थ, यंत्रानें फिरणाऱ्या चाकांचे सुटे भाग, कोळसा, लोखंड, पोलाद, आणि अभ्रक या पदार्थांचें उत्पादन, पुरवठा, वांटप व त्या संबंधांतील एखाद्या घटकांतील व्यापार उदीम;

(ब) निर्वासितांना मदत व त्यांची पुनर्स्थापना;

(क) (अ) व (ब) यांत नमूद केलेल्या बाबीसंबंधांत केलेल्या कायद्याखालील गुन्हे, त्यासंबंधांत चौकशी व आंकडे, प्रमुख न्यायालय सोडून सर्व कोर्टांचें यांसंबंधांतील अधिकारक्षेत्र व अधिकार, तसेंच या बाबतींतील, कोर्टांत घेतली जाणारी फी वगळून इतर फी;

पण, हें कलम नसतें, तर पार्लमेंटनें केलेल्या कायद्यांत जेवढें अनधिकृत झालें असतें, तेवढें वरील मुदत संपतांच संपुष्टांत येईल; मात्र मुदतीपूर्वी जें केलें अगर न केलें, त्याला बाध येणार नाहीं.

घटनेला सुरुवात झाल्यापासून देशांत पांच वर्षें स्थिरस्थावर होणार नाहीं, राज्यकारभाराची घडी नीट बसणार नाहीं, म्हणून पार्लमेंटला तात्पुरती सत्ता घटक-यादीबाबत दिली आहे. म्हणजे या बाबी समान यादींतील समजून कायदे केले जातील. या बाबी अनेक दृष्टींनीं महत्त्वाच्या अशाच आहेत. या बाबींबाबत कांहीं वर्षें तरी देशभर धोरणांत सूत्रबद्धता असली पाहिजे. कापड, अन्नधान्य, व पेट्रोल व यंत्रसामुग्री या आवश्यक व अत्यंत महत्वाच्या बाबी आहेत. तीच गोष्ट निर्वासितां-बाबत आहे. हा प्रचंड प्रश्न आहे. पांच वर्षांच्या मुदतीनंतर, हें कलम नसतें तर जी अनधिकृत व्यवस्था झाली असती, ती संपुष्टांत येईल. म्हणजे अडचणीच्या परिस्थितीचा कायम फायदा घेऊन प्रांतांच्या हक्कावर गदा आणली जाणार नाहीं.

**विद्यमान कायदे चालू ठेवणें अगर मान्य करणें.**

३०७. (१) या घटनेंतील अन्य व्यवस्थेला अनुसरून ही घटना सुरू होण्यापूर्वीं हिंदुस्थानांत जो कायदा जारी होता, तो अधिकारी कायदेमंडळ अगर शासक दुरुस्त अगर रद्द अगर त्यांत बदल करीपर्यंत जारी राहील.

(२) अध्यक्षानें काढलेल्या हुकुमानें हुकुमांत सांगितलेल्या तारखे-पासून हिंदुस्थानांत अगर त्याच्या भागांत जारी असलेला एखादा कायदा, अधिकारी कायदेमंडळ अगर शासक यांनीं रद्द अगर दुरुस्त करीपर्यंत या घटनेंतील व्यवस्थेशीं तो कायदा सुसंगत करण्याच्या दृष्टीनें त्याला आवश्यक अगर इष्ट वाटेल असे जे फेरफार व जी स्वीकृति तो करील-मग ती दुरुस्तीनें अगर रद्दबातल करून होवो, त्यांना अनुसरून अमलांत राहील व हे फेरफार व ही स्वीकृति यांबाबत कोणत्याही कोर्टाला दखल घेतां येणार नाहीं.

खुलासा १—'जारी असलेला कायदा' यांत जो कायदा घटना सुरू होण्यापूर्वीं हिंदुस्थानांतील अधिकारी कायदेमंडळानें अगर शासकानें पास केला होता, अगर जारी केला होता, आणि जो पूर्वींच रद्द झाला नाहीं, त्याचा समावेश होतो, मग तो कायदा पूर्णपणें अगर भागानें कुठेंही अगर कांहीं विशिष्ट क्षेत्रांत अमलांत आला नसला तरी हरकत नाहीं.

खुलासा २—घटना सुरू होण्यापूर्वी हिंदुस्थानांतील अधिकारी कायदेमंडळानें अगर शासकानें एखादा कायदा पास केला असेल अगर जारी केला असेल व जर त्याचा अंमल हिंदुस्थानांत व हिंदुस्थानाबाहेर असेल, तर वर सांगितलेल्या फेरफारांना व स्वीकृतींना अनुसरून देशाबाहेर सुद्धां त्याचा अंमल जारी राहील.

खुलासा ३—या कलमानें, जो कायदा तात्पुरता म्हणून केला असेल त्याची मुदत संपल्यानंतर तो अमलांत राहणार नाहीं.

घटनारंभापूर्वी जारी असलेले कायदे जारी राहतील. त्यांत जेव्हां अधिकारी कायदेमंडळ अगर शासक बदल करील, अगर ते रद्द करील, तोंपर्यंत ते अमलांत राहतील. तसेंच घटना व चालू कायदे यांतील विसंगति दूर करण्यासाठीं अध्यक्ष जरूर ती दुरुस्ती अगर स्वीकृति करून ते चालू कायदे चालू ठेवील. अधिकारी कायदेमंडळ अगर शासक त्यांत बदल करीपर्यंत ते चालू राहतील. तात्पुरते कायदे मात्र मुदत संपतांच संपुष्टांत येतील. या कलमांतील व्यवस्था जुन्या जमान्यांतून नव्या जमान्यांत जातांना व जातांच शक्य तेवढी अनिश्चितता, अस्थिरता कमी व्हावी व संक्रमण शांततेनें व्हावें, या दृष्टीनें केली आहे.

**फेडरल कोर्टाचे न्यायाधीश प्रमुख न्यायालयाचे न्यायाधीश होतील व त्या न्यायालयापुढें फेडरल कोर्टापुढील व तशींच प्रिव्हि कौन्सिलपुढील कामें चालू राहतील**

३०८. (१) घटना सुरू होण्याच्या तारखेस फेडरल कोर्टाचे जे न्यायाधीश असतील त्यांनीं अन्य मार्ग न स्वीकारला तर ते घटना सुरू होण्याच्या तारखेपासून प्रमुख न्यायालयाचे न्यायाधीश म्हणून समजले जातील आणि कलम १०४ मध्यें प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशांचें वेतन, भत्ता आणि रजा व पेन्शन यांसंबंधीं जी व्यवस्था आहे ती त्यांना लागू होईल.

(२) घटना सुरू होण्याच्या वेळीं जे दिवाणी अगर फौजदारी दावे, अपिलें अगर अन्य कामें फेडरल कोर्टापुढें चालू असतील, तीं प्रमुख न्यायालयापुढें येतील आणि प्रमुख न्यायालयाला तीं ऐकण्याचा व त्यांचा निकाल करण्याचा पूर्ण अधिकार राहील आणि फेडरल कोर्टानें घटना सुरू

होण्यापूर्वी दिलेले निकाल व हुकुम हे जणूं कांहीं प्रमुख न्यायालयानें दिले आहेत असें समजून ते तितके प्रभावी व परिणामकारक असतील.

( ३ ) घटना सुरू होतांच त्यानंतर प्रिव्हि कौन्सिलचा, हिंदुस्थानांतील कोणत्याही कोर्टाच्या निकालाविरुद्ध अगर हुकुमाविरुद्ध अपील दाखल करून त्याचा निकाल करण्याचा हक्क नष्ट होईल, त्याजबरोबर राजेसाहेब यांचा फौजदारी बाबतींत जो खास अधिकार आहे, तोही संपुष्टांत येईल व घटना सुरू होण्याच्या तारखेस प्रिव्हि कौन्सिलपुढें चालूं असलेलीं कामें प्रमुख न्यायालयाकडे वर्ग होतील व तें न्यायालय त्यांचा निकाल करील.

( ४ ) या कलमांतील व्यवस्था अमलांत आणण्यासाठीं अधिक तजवीज पार्लमेंट कायदा करून करील.

स्वतंत्र झाल्यानंतर देशाबाहेरील कुठल्याही न्यायालयाला अधिकार ठेवणें म्हणजे स्वातंत्र्य त्या मानानें कमी करणें आहे. आतांपर्यंत हिंदुस्थानचें अखेरचें कोर्ट म्हणजे इंग्लंडमधील प्रिव्हि कौन्सिल हें होतें. या कलमानें प्रिव्हि कौन्सिल व राजेसाहेबांचा फौजदारी कामें पाहण्याचा खास हक्क नष्ट केला आहे. त्या प्रिव्हि कौन्सिलपुढील हिंदुस्थानकडून गेलेलीं चालू कामें प्रमुख न्यायालयापुढें येतील. हल्लीं जें फेडरल कोर्ट आहे, त्याची जागा प्रमुख न्यायालय घेईल. त्याचे न्यायाधीश प्रमुख न्यायालयाचे न्यायाधीश होतील. त्या कोर्टापुढील चालू कामें या न्यायालयापुढें चालू राहतील. फेडरल कोर्टाचे पूर्वीचे निकाल या कोर्टाच्या निकालाप्रमाणें मानले जातील. या कलमांतील व्यवस्था अमलांत आणण्यासाठीं, पार्लमेंट कायदा करून तजवीज करील. प्रिव्हि कौन्सिलपुढील चालू कामें घटना सुरू होईपर्यंत न संपल्यास अध्यक्ष हुकुम काढून तीं प्रमुख न्यायालयाकडे वर्ग करील. हा अधिकार त्याला ३१३ कलमाप्रमाणें आहे. तात्पर्य, न्यायदानांतसुद्धां हिंदुस्थान पूर्ण स्वतंत्र राहील. यापुढें हिंदुस्थानचें अखेरचें न्यायदान करणारें न्यायालय म्हणजे प्रमुख न्यायालय होय.

घटनेनुसार सर्व कोर्ट, अधिकारी, शासक घटना सुरू झाल्यानंतर कामें चालू ठेवतील

३०९. दिवाणी, मुलकी व फौजदारी कोर्टें, तसेंच न्यायखात्यांतील, कार्यकारी व कारकुनी पेशाचे सर्व अधिकारी व शासक सर्व हिंदुस्थानांत या घटनेंतील व्यवस्थेस अनुसरून आपआपलीं कामें चालू ठेवतील.

एक जमाना संपून दुसरा सुरू होतांना राज्यकारभारांत खीळ येऊं नये, खंड पडूं नये व संक्रमण नीट व्हावें यासाठीं योग्य ती व्यवस्था करावी लागते. सर्व शासन संस्था व अधिकारी आपआपलीं कामें घटना सुरू झाल्यानंतरही तशींच चालू ठेवतील. फरक एवढाच कीं, तीं कामें ते या नवीन घटनेच्या व्यवस्थेला अनुसरून करतील. घटना सुरू झाली म्हणजे सर्व कोर्टें बंद होणार नाहींत, तसेंच अधिकारी स्वस्थ बसणार नाहींत. एका घराण्यांतून मुलगा दुसऱ्या घराण्यांत दत्तक दिला, म्हणजे नांव बदलेल, पण त्या मुलाचे गुण अगर शरीर बदलणार नाहीं. नव्या शिस्तींत तो येतो, एवढेंच. तसेंच येथें होणार. अशा रीतीनें ही सांधजोड केली आहे. अगदीं अलद अशी, गाडी एका रूळावरून दुसऱ्यावर नेली आहे.

३१०. कुठल्याही प्रांतांतील मुख्य कोर्टाचे ( High Court ) जे न्यायाधीश घटना सुरू होण्याच्या दिवशीं कामावर असतील, ते त्यांनीं अन्य मार्ग न स्वीकारल्यास त्या तारखेपासून संबंधी घटकाच्या मुख्य कोर्टाचे न्यायाधीश होतील व कलम १९७ मध्यें न्यायाधिशांचें वेतन, भत्ता, तसेंच रजा व पेन्शनसंबंधीं जी व्यवस्था सांगितली आहे, ती यांना लागू होईल.

**मुख्य कोर्टाच्या न्यायाधिशांबाबत**

फेडरल कोर्टाच्या जागीं प्रमुख न्यायालय नवीन घटनेनें आलें; त्यामुळें अवश्य ती व्यवस्था कलम ३०८ प्रमाणें केली आहे. आतां प्रांत नवीन घटनेप्रमाणें घटक-राज्यें होणार, म्हणून त्या त्या प्रांतांतील मुख्य कोर्टाचे न्यायाधीश त्या त्या घटकाचे मुख्य कोर्टाचे न्यायाधीश होतील व कलम १९७ मधील व्यवस्था त्यांना लागू पडेल. कलम १९७ मध्यें न्यायाधिशाचें वेतन, भत्ता, रजा, पेन्शन यांसंबंधींची व्यवस्था सांगितली आहे.

३११. ( १ ) पार्लमेंटचीं दोन्ही सभागृहें योग्य रीतीनें घटित होऊन त्यांना प्रथम अधिवेशनासाठीं या घटनेप्रमाणें आदेश मिळेपर्यंत, हिंदुस्थान वसाहतीची घटना-समिति ( Constituent Assembly ) पार्लमेंटला दिलेली सत्ता व बहाल केलेले अधिकार चालवील व पार्लमेंटनें करावयाचीं कर्तव्यें करील आणि विशेषकरून पार्लमेंटचीं दोन्हीं सभागृहें योग्य रीतीनें घटित होण्यासाठीं आणि त्यांच्या निवडणुकीसंबंधींच्या बाबतींत मतदार संघाची विभागणीविषयक

**संघाच्या तात्पुरत्या कायदेमंडळाबाबत तसेंच अध्यक्षाबाबत व्यवस्था**

व्यवस्था धरून, सर्व व्यवस्था करण्यासाठीं आणि या घटनेंतील व्यवस्थेला कार्यान्वित करण्याकरितां ज्या आनुषंगिक अगर अनुवर्ती (consequential) गोष्टी करणें अवश्य आहे, त्या बाबतींत करावा लागणारा कायदा करील.

खुलासा:—या कामासाठीं हिंदुस्थान वसाहतीची घटना-समिति म्हणजे त्या समितींत आकस्मिकपणें रिकाम्या झालेल्या जागांवर तिनें केलेल्या नियमानुसार निवडून आलेले सभासद यांना धरून समजावी. मात्र परिशिष्ट एक, यांत नसलेल्या प्रदेशांच्या प्रतिनिधींचा समावेश तींत होणार नाहीं.

(२) घटना-समिति १९३५ च्या हिंदुस्थान सरकारबाबतच्या कायद्याप्रमाणें कायदेमंडळ म्हणून काम करीत असतांना जो तिचा सभाप्रमुख असेल, तोच या कलमांतील (१) प्रमाणें घटना-समिति काम करीत असतांना सभाप्रमुख राहील.

(३) हिंदुस्थान वसाहतीची घटना-समिति ज्याला निवडील तो तात्पुरता अध्यक्ष होईल व भाग ५, प्रकरण १ प्रमाणें अध्यक्ष निवडून येऊन अधिकार स्वीकारीपर्यंत तो अध्यक्षाचें काम पाहील.

(४) घटना सुरू होण्यापूर्वी जे हिंदुस्थान वसाहतीचे मंत्री म्हणून असतील, ते घटना सुरू झाल्यानंतर, तात्पुरत्या अध्यक्षाच्या मंत्रिमंडळाचे सभासद होतील.

ही घटना घटनासमितीनें पास करतांच ती अमलांत येईल. तथापि पार्लमेंटची निवडणूक, तसेंच अध्यक्षाची निवडणूक या गोष्टी होण्यास वेळ लागेल. म्हणून संक्रमण कालासाठीं या कलमांत व्यवस्था केली आहे. सांप्रत हिंदुस्थान हें 'हिंदुस्थान वसाहत' आहे, ती त्याची राजकीय भूमिका घटना अमलांत आल्यानंतर जाईल. त्या जागीं हिंदुस्थान संघराज्य ही भूमिका येईल. नवीन पार्लमेंट निवडून येऊन तिचें पहिलें अधिवेशन बोलाविलें जाईपर्यंत घटनासमिति, जी आज मध्यवर्ती विधिमंडळ अगर पार्लमेंट म्हणून काम करीत आहे, तीच चालू राहील. तिला सदहू मुदतीपर्यंत नवीन घटनेंत पार्लमेंटला जे अधिकार दिले आहेत, ते सर्व असतील. थोडक्यांत

म्हणजे घटनासमिति तात्पुरती पार्लमेंट बनेल व तेवढ्यापुरते सर्व अधिकार तिला असतील. मतदार संघ तयार करणें, निवडणुकीसंबंधीं अन्य बाबी याबाबत ती कायदे करील. या घटना-समितींत, त्यांतील जागा मध्यंतरी रिकाम्या झाल्या व त्या निवडणूक होऊन भरल्या, तर जे नवीन प्रतिनिधि येतील तेही असतील. मात्र हिंदुस्थानच्या बाहेरच्या प्रदेशांचा प्रतिनिधि तींत असणार नाहीं.

१५ ऑगस्ट १९४७ नंतर पूर्वीचें मध्यवर्ती विधिमंडळ ( Central Assembly ) शिल्लक राहिली नाहीं. घटना तयार करण्याकरितां जी समिति निवडून आली, तीच मध्यवर्ती कायदेमंडळ झाली. या घटना-समितीचीं दोन स्वरूपें आहेत; एक घटना तयार करणारी, व एक कायदेमंडळ म्हणून काम करणारी, अशी ती द्विविध स्वरूपी समिति आहे. घटनेचें काम संपतांच तिचे तें स्वरूप संपेल व त्यानंतर ती फक्त कायदेमंडळ म्हणून राहील, व ही तिची भूमिका या कलमांत लक्षांत घेऊन तिला तात्पुरतें पार्लमेंट ही भूमिका दिली आहे. कायदेमंडळ म्हणून काम करीत असतांना जो तिचा सभाप्रमुख ( Speaker ) असेल, तोच या तात्पुरत्या पार्लमेंटचा सभाप्रमुख राहील.

घटना अमलांत येतांच सध्याच्या कायद्याप्रमाणें गव्हर्नर जनरल जो कार्यकारी सत्तेचा मुख्य आहे, तो मग राहणार नाहीं. घटना अमलांत येतांच तात्पुरता अध्यक्ष निवडणें अवश्य आहे. म्हणून ( ३ ) मध्यें व्यवस्था आहे. घटनेप्रमाणें भाग ५, प्रकरण १ यांतील व्यवस्थेप्रमाणें अध्यक्ष निवडून येऊन कामावर येईपर्यंत तात्पुरता अध्यक्ष नेमणें अवश्य आहे, तो घटनासमिति निवडील. या रीतीनें संक्रमण कालांत व्यवस्था होईल. कांहींच्या मतें घटना-समितीचा अध्यक्ष हाच तात्पुरता अध्यक्ष असावा. तथापि घटना-समितीनें अध्यक्षाची निराळी निवड करावी हें योग्य दिसतें. घटना सुरू होतांच हिंदुस्थान वसाहतीचें मंत्रिमंडळ संपुष्टांत येईल. दुसरें मंत्रिमंडळ म्हणजे कायम अध्यक्षाची निवड होऊन व पार्लमेंटची निवड होऊन जें यावयाचें तें येण्यास वेळ लागेल. म्हणून घटना सुरू होण्यापूर्वीचें मंत्रिमंडळ तात्पुरत्या अध्यक्षाचें तात्पुरतें मंत्रिमंडळ होईल. अशा रीतीनें कारभारांत कोठेंही खंड येणार नाहीं.

**परिशिष्ट एक, भाग १ मधील घटकाचे प्रमुख व कायदेमंडळ यांबाबत तात्पुरती व्यवस्था**

३१२. ( १ ) परिशिष्ट एक, भाग १ यांतील प्रत्येक घटकाचें कायदेमंडळ—मग तें एक अगर दोन सभागृहांचें असो, या घटनेप्रमाणें योग्य रीतीनें घटीत होऊन पहिल्या अधिवेशनासाठीं बोलविलें जाईपर्यंत, संबंधी प्रांताचें कायदेमंडळ-मग तें एक अगर दोन सभागृहांचे असो, जें घटना सुरू होण्यापूर्वीं काम करीत असेल,

तें या घटनेप्रमाणें सदर्हू घटकाच्या कायदेमंडळाला जे अधिकार दिले असतील, ते चालवील व जीं कर्तव्यें सांगितलीं असतील, तीं करील.

( २ ) घटना सुरू होण्यापूर्वी असलेला प्रांतांतील असेंब्लीचा सभाप्रमुख अगर कौन्सिलचा सभापति घटना सुरू झाल्यानंतर संबंधी घटकांतील असेंब्लीचा सभाप्रमुख अगर कौन्सिलचा सभापति, जसें असेल तसें, जोंपर्यंत ती असेंब्ली अगर कौन्सिल या कलमांतील ( १ ) प्रमाणें काम करीत राहील, तोंपर्यंत राहील.

( ३ ) जो इसम घटना सुरू होण्यापूर्वी प्रांताचा प्रमुख होता, तो घटना सुरू होतांच परिशिष्ट एक, भाग एक यांतील संबंधी घटकाचा तात्पुरता प्रमुख होईल व भाग ६ प्रकरण २ यांत सांगितल्याप्रमाणें प्रमुख निवडून अगर नेमला जाऊन कामावर रुजू होईपर्यंत काम पाहील.

( ४ ) घटना सुरू होण्यापूर्वी प्रांतांत जे मंत्री होते, ते घटना सुरू होतांच परिशिष्ट एक भाग एक, यांतील संबंधी घटकाच्या तात्पुरत्या प्रमुखाच्या मंत्रिमंडळाचे सभासद होतील.

या कलमांत घटकाबाबत तात्पुरती व्यवस्था सांगितली आहे. प्रांताचें कायदेमंडळ घटकाचें तात्पुरतें कायदेमंडळ होईल, प्रांताचा प्रमुख घटकाचा प्रमुख होईल, प्रांताचे मंत्री घटकाच्या मंत्रिमंडळांत येतील; व या सर्वांना नवीन घटनेप्रमाणें अधिकार असतील. प्रमुखाची निवड होणार नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. याचा उद्देश संक्रमण कालांत भानगडी नकोत हा आहे. निवडणूक म्हणजे चुरस व मग, त्या धकाधकींत नको असलेली अस्थिरता तात्काळ निर्माण होण्याचा संभव आहे.

**अडचणी दूर करण्याचा अध्यक्षाचा अधिकार**

३१३. ( १ ) कलम ३११ ( १ ) यांतील व्यवस्थेस अनुसरून, अडचणी दूर करण्यासाठीं आणि विशेषें-करून हिंदुस्थान सरकारबाबत १९३५ च्या कायद्याच्या व्यवस्थेंत होणाऱ्या संक्रमणाच्या संबंधांतील अडचणी दूर करण्यासाठीं, अध्यक्ष हुकुम काढून, हुकुमांत दर्शविलेल्या मुदतीपर्यंत ही घटना, त्याला जे फेरफार, अगर अधिकउणें तींत करणें

**इष्ट अगर आवश्यक वाटेल त्यांसह अमलांत राहील, असा आदेश देईल. मात्र असा हुकुम भाग ५, प्रकरण २ यांतील योजनेप्रमाणें पार्लमेंट योग्य प्रकारें घटित होऊन त्याची पहिली बैठक सुरू झाल्यानंतर काढतां येणार नाहीं.**

**(२) वर (१) प्रमाणें काढलेला प्रत्येक हुकुम पार्लमेंटपुढें ठेवला जाईल.**

जितकी व्यवस्था संक्रमणकालाबाबत करणें शक्य होतें, तेवढी या भागांत केली आहे. तथापि कित्येक अडचणी प्रत्यक्ष घटना सुरू झाल्यावर लक्षांत येतील. कांहीं व्यवस्था अपुरी पडेल, अगर कांहीं अधिक व्यापक करावी लागेल. या गोष्टींसाठीं कलम ३११ (१) यांत सांगितल्याप्रमाणें तात्पुरतें पार्लमेंट कांहीं योजना करील. तथापि त्याची बैठक चालू नसतांना, अगर अन्यथा कांहीं व्यवस्था करणें इष्ट अगर अवश्य वाटलें, तर अध्यक्षाला ती करण्याचा अधिकार या कलमानें दिला आहे. अर्थात् एकदा घटनेप्रमाणें नवीन पार्लमेंट भरलें, कीं असा हुकुम अध्यक्षाला काढतां येणार नाहीं. संक्रमणकालापुरती व त्या दृष्टीनेंच उपयोगांत आणावयाची अशी ही सत्ता आहे. गोदींत तयार झालेलें जहाज सर्व दृष्टींनीं पाहून तपासून मग तें दर्यांत सोडतात, पण त्याबरोबर जरूर ती व्यवस्था करण्याकरतां इंजिनीयर तयार असतो; तशीच घटना व्यवस्थितपणें तयार करून, येणाऱ्या अडचणी हेरून, संभाव्य पेंचप्रसंग डोळ्यांपुढें ठेऊन अंमलांत आणण्याच्या दृष्टीनें सज्ज केली आहे. तथापि चुकलेंमुकलें सुधारून घेण्यासाठीं तात्पुरती सत्ता कुणाला तरी द्यावी लागणार, हें जाणून राज्यप्रमुख म्हणजे अध्यक्ष यास ती दिली आहे. सारासार विचार करून परिस्थितीला जुळवून घेण्यापुरते फेरफार घटनेंत तो करूं शकेल. पण तेही अल्पकालापुरते असतील. ३११ (१) प्रमाणें पार्लमेंट त्याकडे लक्ष देण्यास आहेच, शिवाय जे हुकुम तो करील, ते पार्लमेंटपुढें येतील, त्यावर चर्चा होईल. त्यांत अनावश्यक अगर अनिष्ट अगर अनियंत्रित असें कांहीं असल्यास लोकमत तें सहन करणार नाहीं. परिश्रमानें दीर्घ चर्चा व विचारविनिमय करून तयार केलेली घटना क्षणभर कां होईना, एका व्यक्तीनें स्थगित करावी, हें प्रथम दर्शनीं नीट वाटत नाहीं, लोकशाहीविरुद्ध दिसतें; तथापि हें कलम कां आवश्यक आहे, हें वर सांगितलेंच आहे.

# भाग १८

## घटनाप्रारंभ व विघटनक्रिया

३१४. ही घटना..........पासून अमलांत येईल.

घटना प्रारंभ

३१५. हिंदी स्वातंत्र्य कायदा १९४७, आणि हिंदुस्थान सरकारबाबतचा कायदा १९३५ तसेंच हिंदुस्थान (मध्यवर्ती सरकार व कायदे मंडळ) कायदा १९४६, आणि हिंदुस्थान सरकारबाबतचा १९३५ चा कायदा दुरुस्त करणारे अगर त्यांना पूरक असणारे सर्व कायदे हे प्रभावशून्य होतील.

कोणते कायदे रद्द होतील ?

प्रत्येक कायद्यांत सरनामा, व्याख्या, मुख्य कलमें, परिशिष्टें, तो अमलांत केव्हां व कसकसा येणार यांबाबत निर्देश, तसेंच तो कायदा होगार म्हणून कोणते कायदे व किती प्रमाणांत व केव्हांपासून रद्द होणार याचा निर्देश, अशा सर्व गोष्टींचा प्रपंच केलेला असतो. तात्पर्य, कायदा करण्याच्या क्रियेबाबत कांहीं सिद्धांत आहेत, कांहीं नियम आहेत. घटना झाली तरी ती कायद्याच्या स्वरूपांत असणार; नुसत्या ठरावानें घटना होत नाहीं. ठरावानें कोणत्या तत्त्वावर ती असावी एवढें ठरेल. पण तत्त्वांची गोंवणी योग्य पद्धतीनें कलमांत करून घटना कायदा बनवावा लागतो. तो संपूर्ण शक्य तेवढा निर्दोष व निश्चित पाहिजे. म्हणून घटना केव्हां अमलांत येणार याचा उल्लेख स्पष्टपणें कलमांत होणें इष्ट आहे. कलम ३१४ यांत ती व्यवस्था आहे. त्यांत तारीख घातली नाहीं. ती घटनासमिति घालील. सामान्य कायद्यांत साधारणपणें 'हा कायदा ताबडतोब अमलांत येईल' अगर 'हा कायदा राज्यप्रमुख' मग तो गव्हर्नर जनरल असो अगर अन्य असो 'मान्यता देतांच अमलांत येईल.' असा उल्लेख असतो. येथें बाह्य मान्यतेचा सवाल नाहीं. घटनासमिति सार्वभौम अगर प्रभुत्वपूर्ण आहे. घटनेबाबत ती जें ठरवील तें अखेरचें. म्हणून जी तारीख घटनासमिति या कलमांत घालील, त्या दिवशीं ही घटना सुरू होईल. व ज्या दिवशीं घटना सुरू होईल, त्या दिवशीं जे कायदे निरुपयोगी अगर निष्प्रभ ठरतील, ते रद्द होतील. कलम ३१५ यांत ही यादी आहे. जुनीं वस्त्रें फेकून नवें वस्त्र ग्रहण करणें अशी ही क्रिया आहे. जुन्या कायद्यांत समाविष्ट झालेलें राज्य नव्या कायद्यांत प्रवेश केल्यानें जुने कायदे नष्ट होणार. जुनी वास्तु सोडून नव्या वास्तूंत प्रवेश असें हें आहे. ही युगप्रवर्तक गोष्ट आहे. जुना जमाना संपला, नवा सुरू झाला.

शुभं भवतु

# परिशिष्ट पहिलें

## ( कलमें १ व ४ )

## हिंदुस्थानचे घटक व प्रदेश

## भाग १

ही घटना अमलांत येण्याच्या आधीं गव्हर्नरचे प्रांत म्हणून ओळखले जाणारे प्रदेश:—

१ मद्रास
२ मुंबई
३ पश्चिम बंगाल
४ संयुक्त प्रांत
५ बिहार
६ पूर्व पंजाब
७ मध्यप्रांत आणि वऱ्हाड
८ आसाम
९ ओरिसा

## भाग २

ही घटना अमलांत येण्यापूर्वी चीफ कमिशनरचे प्रांत म्हणून ओळखले जाणारे प्रदेश :

१ दिल्ली
२ अजमीर-मारवाड पंथ–पिपलोदासह
३ कूर्ग

## भाग ३

## विभाग अ

खालील हिंदी संस्थानें—

१ म्हैसूर
२ काश्मीर
३ ग्वाल्हेर
४ बडोदें
५ त्रावणकोर
६ कोचीन
७ उदेपूर
८ जयपूर
९ जोधपूर
१० बिकानेर
११ अलवार
१२ कोटा
१३ इंदूर
१४ भोपाळ
१५ रेवा
१६ कोल्हापूर
१७ पतियाळा
१८ मयूरभंज
१९ संयुक्त काठेवाड

## विभाग ब

ही घटना अमलांत येण्यापूर्वी हिंदी संघराज्यांत असलेलीं इतर सर्व हिंदी संस्थानें.

## भाग ४

अंदमान व निकोबार बेटें

# परिशिष्ट दुसरें

## ( कलमें ४८ ( ३ ), ६२ ( ६ ), ९९, १०४, १२४ ( २ ), १३५ ( ३ ), १४५ ( ५ ), १६३ आणि १९७ )

## भाग १

**अध्यक्ष व पहिल्या परिशिष्टाच्या भाग १ मध्यें नमूद केलेल्या घटकराज्यांचे प्रमुख यांविषयीं.**

१ अध्यक्ष आणि प्रथम परिशिष्टाच्या भाग १ मध्यें नमूद केलेल्या घटक प्रांतांचे प्रमुख यांना दरमहा पुढीलप्रमाणें तनखा मिळेल :—

| | |
|---|---|
| अध्यक्ष | ५,५०० रुपये |
| प्रमुख | ४,५०० रुपये |

२ अध्यक्ष व प्रमुख यांना ते अधिकारावर असल्या मुदतींत आपलें कर्तव्य सुलभ रीतीनें आणि योग्य इभ्रतीनें पार पाडतां यावें यासाठीं शिवाय पुढीलप्रमाणें मासिक भत्ता मिळेल—

| | |
|---|---|
| अध्यक्ष | — रुपये. |
| प्रमुख | — रुपये. |

३ अध्यक्ष व प्रमुख यांना त्यांच्या अधिकाराच्या जागेवर रुजू होण्यासाठीं ते स्वतः आणि त्यांचे कुटुंबीय जातांना व त्यांचें सामानसुमान नेण्यास जो प्रत्यक्ष खर्च होईल तेवढी रक्कम भत्ता देण्यांत येईल.

४ अध्यक्ष व प्रमुख यांना ते त्या अधिकाराच्या जागेवर असल्या मुदतींत भाडें न देतां त्यांच्यासाठीं राखलेलें सरकारी निवासस्थान, रेल्वेचे खास डबे, खास नौका व मोटरी यांचा उपभोग घेण्याचा हक्क राहील व त्याबद्दलचा इतर कोणताही खर्च व्यक्तिशः त्यांच्यावर पडणार नाहीं.

५ ज्या वेळीं उपाध्यक्ष किंवा इतर कोणी अध्यक्षाचें काम पाहत असतील किंवा कोणी इसम प्रमुखाचें काम पाहत असेल, त्या वेळीं अशा व्यक्तीला या परिशिष्टाच्या पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदांत सांगितलेला पगार व भत्ता मिळेल आणि त्या मुदतींत चवथ्या परिच्छेदांत उल्लेखिलेली सवलत त्याला मिळेल; पण तिसऱ्या परिच्छेदाचा फायदा त्यास मिळणार नाहीं.

## भाग २

**संघराज्याचे प्रधान आणि या परिशिष्टाच्या पहिल्या भागांत दर्शविलेल्या घटकराज्यांचे प्रधान यांविषयीं.**

६ संघराज्याचे पंतप्रधान आणि इतर मंत्री यांना ही घटना अमलांत येण्यापूर्वी वसाहतीचे पंतप्रधान व इतर मंत्री यांना जो पगार व भत्ता मिळत असे, तोच पगार व भत्ता मिळेल.

७ पहिल्या परिशिष्टाच्या पहिल्या भागांत निर्देशिलेल्या घटक-राज्याच्या मंत्र्यांना ही घटना अमलांत येण्यापूर्वी त्या प्रांताच्या मंत्र्यांना जो पगार व भत्ता मिळत असे, तोच पगार व भत्ता मिळेल.

## भाग ३

### लोकसभेचे सभाप्रमुख व उप-सभाप्रमुख, वरिष्ठ कौन्सिलचे सभापति व उप-सभापति, पहिल्या परिशिष्टाच्या पहिल्या भागांतील घटकराज्यांच्या असेंब्ली सभागृहांचे सभाप्रमुख व उप-सभाप्रमुख आणि घटकराज्याच्या कौन्सिलचे सभापति व उप-सभापति यांविषयीं.

८ लोकसभेचे सभाप्रमुख आणि वरिष्ठ कौन्सिलचे सभापति यांना ही घटना अमलांत येण्यापूर्वी घटना समितीच्या सभापतींना ( स्पीकर ) जो पगार व भत्ता मिळत असे तोच पगार व भत्ता मिळेल; आणि लोकसभेचे उप-सभाप्रमुख आणि वरिष्ठ कौन्सिलचे उप-सभापति यांना १५ ऑगस्ट १९४७ पूर्वी अनुक्रमें लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे उपाध्यक्ष आणि कौन्सिल ऑफ स्टेटचे उपाध्यक्ष यांना जो पगार व भत्ता मिळत असे, तितकाच पगार व भत्ता मिळेल.

९ पहिल्या परिशिष्टाच्या पहिल्या भागांत दर्शविलेल्या घटक-राज्यांच्या असेंब्लीचे सभाप्रमुख आणि उप-सभाप्रमुख आणि घटक-राज्यांच्या कौन्सिलचे सभापति आणि उप-सभापति यांना ही घटना अमलांत येण्यापूर्वी त्या प्रांताच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे स्पीकर व डेप्युटी स्पीकर आणि लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष व उपाध्यक्ष यांना जो पगार व भत्ता मिळत असे तेवढाच पगार व भत्ता अनुक्रमें मिळेल. ही घटना अमलांत येण्यापूर्वी ज्या प्रांतांत वरिष्ठ कायदेमंडळ अस्तित्वांत नव्हतें अशा घटक-राज्यांत कौन्सिलच्या सभापति व उपसभापतींना त्या घटक-राज्याचे प्रमुख जो पगार व भत्ता ठरवितील तो पगार व भत्ता देण्यांत येईल.

## भाग ४

### प्रमुख न्यायालय आणि मुख्य न्यायालयें यांच्या न्यायाधिशां-विषयीं—

१० प्रमुख न्यायालय आणि पहिल्या परिशिष्टाच्या तिसऱ्या भागांत दर्शविलेलीं हिंदी संस्थानें यांचा भाग सोडून बाकीच्या प्रदेशांतील मुख्य न्यायालयें यांच्या न्याया-

धिशांना प्रत्यक्ष अधिकारावर असलेल्या मुदतीबद्दल दरमहा पुढीलप्रमाणें पगार देण्यांत येईल.—

| | |
|---|---|
| प्रमुख न्यायालयाचे सरन्यायाधीश | ५,००० रु. |
| प्रमुख न्यायालयाचे न्यायमूर्ति | ४,५०० रु. |
| मुख्य न्यायालयाचे सरन्यायाधीश | ४,००० रु. |
| मुख्य न्यायालयाचे न्यायमूर्ति | ३,५०० रु. |

मात्र प्रमुख न्यायालयावर नेमणूक होण्याच्या वेळीं कोणा न्यायाधिशाला ( जखम अगर व्यंग यांसाठीं मिळणारें पेन्शन सोडून ) कांहीं पेन्शन, हिंदुस्थान सरकार अगर घटकराज्य अगर पहिल्या परिशिष्टाच्या पहिल्या भागांत निर्देशिलेले प्रदेश यांतील आजी व माजी सरकार यांच्या कोणत्याही नोकरीबद्दल मिळत असेल, तर प्रमुख न्यायालयाचा न्यायाधीश म्हणून त्याला मिळावयाचा त्याचा पगार त्या पेन्शनच्या रकमेपुरता तेवढा कमी करण्यांत येईल.

११ प्रमुख न्यायालयाचे सरन्यायाधीश व इतर न्यायमूर्ति व पहिल्या परिशिष्टाच्या तिसऱ्या भागांत दर्शविलेलीं संस्थानें सोडून बाकीच्या हिंदुस्थानच्या प्रदेशांतील मुख्य न्यायालयांचे सरन्यायाधीश आणि इतर न्यायमूर्ति यांना त्यांच्या कामासाठीं हिंदुस्थानांत प्रवास करावा लागल्यास त्यासाठीं योग्य त्या सवलती व प्रवासखर्चाबद्दल योग्य भत्ता देण्यांत येईल. हा प्रवासभत्ता आणि प्रवासाच्या सवलती प्रमुख न्यायालयाचे सरन्यायाधीश व इतर न्यायमूर्ति यांच्या बाबतींत अध्यक्ष वेळोवेळीं ठरवील आणि मुख्य न्यायालयाचे सरन्यायाधीश व इतर न्यायमूर्ति यांच्या बाबतींत घटकराज्यप्रमुख वेळोवेळीं ठरवतील.

१२ (१) प्रमुख न्यायालयांचे सरन्यायाधीश व इतर न्यायमूर्ति यांची रजा अगर सेवानिवृति यांबाबतचे हक्क फेडरल कोर्टाच्या न्यायाधिशांच्या बाबतींत जे होते तेच राहतील.

(२) मुख्य न्यायालयांचे सरन्यायाधीश आणि इतर न्यायमूर्ति यांच्या रजा व सेवानिवृत्ति यांबाबतचे हक्क ही घटना अमलांत येण्यापूर्वी त्या हायकोर्टाच्या सध्याच्या न्यायाधिशांना त्याबाबत जे हक्क आहेत तेच राहतील.

(३) या परिच्छेदासाठीं, ही घटना अमलांत येण्याच्या वेळीं हंगामी न्यायाधीश, जादा न्यायाधीश किंवा साधा ( Ad hoc ) न्यायाधीश या जागेवर काम करणारी व्यक्ति न्यायाधीश म्हणून मानली जाईल. मात्र अशा व्यक्तीची कायम न्यायाधीश म्हणून नेमणूक होईतों ती व्यक्ति हंगामी न्यायाधीश, जादा न्यायाधीश वा साधा न्यायाधीश या जागेवर अखंडपणें काम करीत असली पाहिजे.

१३ या भागांत संदर्भ प्रतिकूल नसल्यास—

( अ ) 'सरन्यायाधीश' यांत हंगामी सरन्यायाधीश समाविष्ट आहे, आणि 'न्यायाधीश' यांत साधा न्यायाधीश, हंगामी न्यायाधीश व जादा न्यायाधीश समाविष्ट आहे.

( ब ) 'प्रत्यक्ष नोकरी' यांत खालील बाबी समाविष्ट आहेत—

(१) एकादा न्यायाधीश, न्यायाधीश या अधिकारावर अथवा अध्यक्ष वा घटकप्रमुख यांनीं नेमून दिलेल्या कामगिरीवर किंवा या घटनेचें कलम २८९ या अन्वयें नेमलेल्या कमिशननें सोंपविलेल्या कामगिरीवर असतांनाचा काळ.

(२) रजेची मुदत सोडून सुट्या; आणि

(३) एका मुख्य न्यायालयांतून दुसऱ्या मुख्य न्यायालयाकडे किंवा मुख्य न्यायालयांतून प्रमुख न्यायालयावर बदली झाल्यावर नव्या जागीं रुजू होण्यासाठीं लागणारा काळ.

## भाग ५

## हिंदुस्थानच्या सर हिशोबतपासनिसासंबंधीं

१४ हिंदुस्थानच्या सर हिशोबतपासनिसाला दरमहा ४,००० रुपयेप्रमाणें पगार मिळावा.

१५ हिंदुस्थानच्या सर हिशोबतपासनिसाला रजा व पेन्शनच्या बाबतींत ही घटना अमलांत येण्यापूर्वींच्या काळांत हिंदुस्थानच्या सर हिशोबतपासनिसाला जे हक्क होते तेच हक्क राहतील आणि त्या हक्कांसंबंधांत गव्हर्नर-जनरलचा जेथें जेथें उल्लेख करण्यांत आला आहे, ते ते उल्लेख अध्यक्षांना आहेत असें समजलें जाईल.

# परिशिष्ट तिसरें

## ( कलम ६२ ( ४ ), ८१, १०३ ( ६ ), १४४ ( २ ) १६५ व १९५ )

### प्रतिज्ञापत्रें

१

संघराज्य-मंत्र्यानें अधिकारस्वीकाराची घ्यावयाची शपथ—

" मी......गंभीरपणें अशी प्रतिज्ञा करतों कीं ( शपथ घेतों कीं ) मी कायद्यानें प्रस्थापित झालेल्या हिंदुस्थानच्या घटनेबद्दल पूर्ण श्रद्धा व निष्ठा बाळगीन, संघमंत्रि या नात्यानें आपलें कर्तव्य सदसद्विवेकबुद्धीनें आणि चोखपणें बजावीन आणि भीति अगर लालुच किंवा प्रेम अगर द्वेष यांची तमा न धरतां घटना आणि कायदा यांना अनुसरून सर्व तऱ्हेच्या लोकांचें कल्याणच करीन."

२

संघ-मंत्र्यानें घ्यावयाची गोप्यपालनाची शपथ—

" मी......गंभीरपणें अशी प्रतिज्ञा करतों कीं ( शपथ घेतों कीं ) संघमंत्रि या नात्यानें माझ्यासमोर ज्या बाबी येतील किंवा ज्या गोष्टी मला ज्ञात होतील, त्यांतील मंत्रि या नात्यानें माझें कर्तव्य योग्य प्रकारें पार पाडण्याखेरीजच्या वेळेखेरीज करून इतर वेळीं कोणत्याही बाबींबद्दल मी कोणाजवळ प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें बोलणार नाहीं वा त्या उघड करणार नाहीं. "

३

विधिमंडळाच्या सदस्यानें करावयाची घोषणा—

" मी......वरिष्ठ कौन्सिल ( वा लोकसभा ) याचा लोकनियुक्त ( वा सरकार-नियुक्त ) सभासद गंभीरपणें आणि प्रामाणिकपणें असें वचन घोषित करतों कीं कायद्यानें प्रस्थापित झालेल्या हिंदुस्थानच्या घटनेबद्दल मी पूर्ण श्रद्धा व निष्ठा बाळगीन आणि मजवरील जबाबदारी कसोशीनें पार पाडीन. "

४

प्रमुख न्यायालयाच्या न्यायाधिशांनीं करावयाची घोषणा:—

" मी......हिंदुस्थानच्या प्रमुख न्यायालयाचा सरन्यायाधीश ( वा न्यायाधीश ) म्हणून नियुक्त झालेला असल्यानें गंभीरपणें आणि प्रामाणिकपणें असें वचन घोषित करतों कीं कायद्यानें प्रस्थापित झालेल्या हिंदुस्थानच्या घटनेबद्दल मी पूर्ण श्रद्धा व निष्ठा बाळगीन आणि मी, माझी शक्ति, ज्ञान व सारासार विचार यांना अनुसरून योग्य रीतीनें व प्रामाणिकपणें, भय वा लालुच किंवा प्रेम वा द्वेष यांची तमा न धरतां आपलें कर्तव्य बजावीन व घटना व कायदा राखीन."

५

प्रथम परिशिष्टाच्या पहिल्या विभागांत दर्शविलेल्या घटक-राज्याच्या मंत्र्यानें घ्यावयाची अधिकारस्वीकाराची शपथ—

"मी......गंभीरपणें प्रतिज्ञा करतों कीं ( शपथ घेतों कीं ) कायद्यानें प्रस्थापित झालेल्या हिंदुस्थानच्या घटनेबद्दल मी पूर्ण श्रद्धा व निष्ठा बाळगीन आणि घटक राज्याचा मंत्री या नात्यानें मी आपलें कर्तव्य प्रामाणिकपणें व चोखपणें बजावीन आणि भीति वा लालुच आणि प्रेम वा द्वेष यांची तमा न धरतां कायदा व घटना यांना अनुसरून सर्व जनतेचें कल्याणच करीन."

६

प्रथम परिशिष्टाच्या पहिल्या विभागांत दर्शविलेल्या घटक-राज्याच्या मंत्र्यानें घ्यावयाची गोप्यपालनाची शपथ—

"मी......गंभीरपणें प्रतिज्ञा करतों कीं ( शपथ घेतों कीं )......चा मंत्री या नात्यानें माझ्यासमोर ज्या बाबी येतील किंवा ज्या गोष्टी मला ज्ञात होतील त्यांतील, मंत्री या नात्यानें माझें कर्तव्य पार पाडण्याला जरूर किंवा घटकराज्य-प्रमुखानें त्याच्या खास अखत्यारांतील बाबींसंबंधीं दिलेल्या खास परवान्याच्या बाबी वगळून, इतर बाबीं-संबंधीं मी कोणाहीजवळ प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें बोलणार नाहीं किंवा त्या उघड करणार नाहीं."

७

प्रथम परिशिष्टाच्या पहिल्या भागांत दर्शविलेल्या घटकराज्याच्या विधिमंडळाच्या सभासदानें करावयाची घोषणा—

"मी......असेंब्ली ( वा कौन्सिल ) याचा लोकनियुक्त ( वा सरकारनियुक्त ) सभासद गंभीरपणें आणि प्रामाणिकपणें असें वचन घोषित करतों कीं कायद्यानें प्रस्थापित झालेल्या हिंदुस्थानच्या घटनेबद्दल मी पूर्ण श्रद्धा व निष्ठा बाळगीन आणि प्रामाणिकपणें माझें कर्तव्य बजावीन."

८

मुख्य न्यायालयाच्या न्यायाधिशानें करावयाची घोषणा—

"मी......च्या मुख्य न्यायालयाचा सरन्यायाधीश ( वा न्यायाधीश ) म्हणून नियुक्त झालेला असल्यानें गंभीरपणें आणि प्रामाणिकपणें असें वचन घोषित करतों कीं कायद्यानें प्रस्थापित झालेल्या हिंदुस्थानच्या घटनेबद्दल मी पूर्ण श्रद्धा व निष्ठा बाळगीन आणि माझी शक्ति, ज्ञान व सारासार विचार यांना अनुसरून योग्य रीतीनें व प्रामाणिकपणें, भय वा लालुच किंवा प्रेम वा द्वेष यांची तमा न धरतां आपलें कर्तव्य बजावीन व घटना व कायदा राखीन."

# परिशिष्ट चवथें

## ( कलम १४४ ( ४ ) )

**प्रथम परिशिष्टाच्या पहिल्या भागांतील घटक-राज्याच्या प्रमुखांना सूचना.**

१ या सूचनांत, संदर्भाला विसंगत नसेल तर ' प्रमुख ' या शब्दांत त्या काळ-पुरता या घटनेनुसार प्रमुखाचें काम पाहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा समावेश होतो.

२ आपल्या मंत्रिमंडळाची नेमणूक करतांना मंत्र्यांची निवड पुढील पद्धतीनें करण्याची प्रमुख कसोशी करील. प्रमुखाच्या मताप्रमाणें जो विधिमंडळांत स्थिर बहुसंख्यत्व संपादन करण्याचा अधिकांत अधिक संभव आहे, अशा व्यक्तीच्या सल्ल्यानें प्रमुखानें सामुदायिक रीत्या विधिमंडळाचा विश्वास संपादन करूं शकतील अशा इसमांची ( त्यांत शक्य तों मुख्य अल्पसंख्य जमातींचे प्रतिनिधी असावेत ) नेमणूक करावी. असें करतांना आपल्या मंत्र्यांमध्यें संयुक्त जबाबदारीची भावना जोपासणें जरूर आहे हें प्रमुखानें सतत मनांत बाळगावें.

३ या घटनेनुसार सोंपविलेल्या प्रमुखाच्या खास बाबींखेरीज, घटकराज्याच्या कार्यकारी सत्तेखालील सर्व बाबतींतील आपले अधिकार, प्रमुख मंत्र्यांच्या सल्ल्यानुसार वर्तवील.

४ उत्तम राज्यकारभाराचीं मूल्यें पाळलीं जातील. नैतिक, सामाजिक आणि आर्थिक उन्नतीसाठीं आणि राज्यव्यवस्था आणि सार्वजनिक जीवन यांत सर्व प्रकारच्या नागरिकांना आपली योग्य जबाबदारी स्वीकारण्याकरितां तयार केलें जाण्यासाठीं सर्व कांहीं केलें जाईल; आणि सर्व वर्गांत सहकार्य, सद्भावना आणि परस्परांच्या धार्मिक समजुती व भावना यांबद्दल आदरभाव राहील, यासाठीं प्रमुख त्याला शक्य तें सर्व कांहीं करील.

## परिशिष्ट पांचवें

[ कलम १८९ ( अ ) आणि १९० ( १ ) ]

**परिशिष्टित मुलख आणि परिशिष्टित जाति यांच्या शासन-व्यवस्थेबाबत.**

## भाग १ ला

### साधारण

**१. परिशिष्टित मुलुखाबाबत घटकराज्याची कार्यकारी सत्ता :—** या परिशिष्टांत नमूद असलेली व्यवस्था पाळून प्रथम परिशिष्टाच्या पहिल्या भागांत दर्शविलेल्या घटकराज्याची कार्यकारी सत्ता त्या राज्यांतील परिशिष्टित मुलुखावर राहील.

**२. परिशिष्टित मुलुखाच्या राज्यकारभाराबाबत प्रमुखानें भारत सरकारकडे पाठवावयाचा अहवाल :—** ज्या घटकराज्यांत परिशिष्टित मुलुख सामील असेल त्या घटकराज्याच्या प्रमुखानें, दरवर्षी किंवा भारत सरकार तशी मागणी करील त्या वेळीं, आपल्या राज्यांतील परिशिष्टित मुलुखाच्या कारभारासंबंधीं अहवाल भारत सरकारला सादर करील. अशा परिशिष्टित मुलुखांच्या कारभाराबाबत घटकराज्याला सूचना करण्याची सत्ता संघराज्याच्या कार्यकारी सत्तेला राहील.

## भाग २ रा

**मद्रास मुंबई, पश्चिम बंगाल, बिहार, मध्यप्रांत व वऱ्हाड आणि ओरिसा.**

**३. भाग २ लागू—** हा भाग मद्रास, मुंबई, पश्चिम बंगाल, बिहार, मध्यप्रांत व वऱ्हाड आणि ओरिसा यांना लागू आहे.

**४. वन्य जाति सल्लागार-समिति—** ( १ ) ही घटना अंमलांत आल्यावर शक्य तितक्या लवकर मद्रास, मुंबई, पश्चिम बंगाल, बिहार, मध्यप्रांत व वऱ्हाड आणि ओरिसा या घटकराज्यांत एकेक वन्यजाति सल्लागार समिति स्थापन करण्यांत येईल. या समितीची सभासदसंख्या किमान १० व कमाल २५ राहील व त्यांतील तीन-चतुर्थांश, किंवा शक्य तेवढे त्याजवळपास, सभासद घटक असेंब्लींतील लोकनियुक्त वन्य जातीचे प्रतिनिधी असतील.

( २ ) परिशिष्टित मुलुखाच्या कारभाराबाबत आणि वन्य जातींच्या इतर सुख-सोयींबाबत सरकारला वेळोवेळीं सल्ला देणें हें या वन्यजाति सल्लागार समितीचें काम राहील.

( ३ ) घटकराज्यप्रमुख खालील बाबतींत नियम करूं शकेल—

( अ ) समितीची सभासदसंख्या निश्चित करणें आणि त्यांची नेमणूक कशी करावी, समितीचा अध्यक्ष कसा नेमावा आणि समितीचे इतर पदाधिकारी व नोकर कसे नेमावे.

( ब ) सभानियमन व इतर साधारण कार्यपद्धति;

( क ) घटकराज्याचा अधिकारी वर्ग व स्थानिक संस्था यांजबरोबर समितीचे संबंध;

( ड ) इतर तद्विषयक बाबी.

**५. परिशिष्टित मुलुखाचे कायदे** :—( १ ) वन्य जाति सल्लागार-समितीचें तसें मत पडल्यास घटकराज्यप्रमुख जाहीरनामा काढून केंद्रीय विधिमंडळाचा किंवा घटक विधिमंडळाचा एकादा कायदा परिशिष्टित मुलुखास किंवा त्याच्या कांहीं भागास लागू होणार नाहीं किंवा लागू होईल असें घोषित करूं शकेल. अशा कायद्यांत समितीच्या सल्ल्यानें फेरबदल अगर अपवाद करून ते प्रमुख जाहीर करूं शकेल.

मात्र असा कायदा जर खालील बाबींसंबंधींचा असला—

( अ ) लग्न;

( ब ) मालमत्तेचा वारसा;

( क ) वन्य जातींच्या सामाजिक चालीरीति;

( ड ) जमीन, १९२७ च्या जंगल कायद्यान्वयें राखीव असलेली जंगल जमीन सोडून, यांत कुळांचे हक्क, जमिनीची वांटणी आणि कांहीं कारणाकरितां जमीन राखून ठेवणें यांचा समावेश होतो:

( इ ) ग्रामपंचायतींची स्थापना व इतर ग्रामीण कारभाराबद्दलच्या बाबी:

तर सल्लागार समितीनें तसा सल्ला दिला तरच प्रमुख वरीलप्रमाणें हुकुम काढूं शकेल.

( २ ) वन्य जाति सल्लागार समितीशीं विचारविनिमय केल्यानंतर परिशिष्टित मुलुखांत त्या वेळीं जारी असलेल्या कायद्यांत व्यवस्था न केलेल्या बाबींबाबत घटकराज्यप्रमुख त्या भागाला लागू होण्याकरितां नियम करूं शकेल.

( ३ ) ज्या गुन्ह्यांना फाशी, जन्मठेप अगर पांच वर्षांवरील कैदेची शिक्षा आहे, अशांव्यतिरिक्त गुन्ह्यांबाबतचे खटले चालविण्याबाबत परिशिष्टित मुलुखासाठीं प्रमुख नियम करूं शकेल. त्याचप्रमाणें या नियमांत उल्लेख नसलेल्या कायद्यासंबंधीं तंटे असतील त्याबाबतही प्रमुख नियम करूं शकेल व असे नियम करून ग्रामपंचायत किंवा ग्रामपुढारी यांना असे खटले चालविण्याचा अधिकार देऊं शकेल.

( ४ ) या परिच्छेदानुसार केलेले नियम ज्या वेळीं प्रमुख जाहीर करील, तेव्हां त्या नियमांना योग्य विधिमंडळानें अशा विभागाकरितां केलेल्या व या घटनेखालीं

अशा विधिमंडळास प्राप्त झालेल्या अधिकारान्वयें वर्तविलेल्या कायद्याचेंच महत्त्व प्राप्त होईल.

**६. अ-वन्यांना परिशिष्टित मुलुखांतील जमिनी देण्याबाबत.** (१) परिशिष्टित मुलुखांतील कोणतीही सरकारी जमीन परिशिष्टित जातीच्या कोणा इसमानें बिगरपरिशिष्टित जातीच्या इसमास देणें बेकायदेशीर होईल.

(२) एकाद्या घटक-राज्यांतील परिशिष्टित मुलुखांतील कोणतीही सरकारी जमीन बिगरपरिशिष्टित जातीच्या कोणाही इसमास वसाहतीसाठीं वा अन्य कारणासाठीं देतां येणार नाहीं. मात्र त्या घटक-राज्याच्या वन्य जाती सल्लागार समितीच्या संमतीनें तयार केलेल्या नियमांनुसार अशी जमीन बिगरपरिशिष्टित जातीच्या इसमास देतां येईल.

**७. परिशिष्टित मुलुखांतील सावकारीचें नियंत्रण** :—घटक राज्यानें खास अधिकार दिलेल्या अधिकाऱ्यानें परवाना दिल्याखेरीज परिशिष्टित मुलुखांत कोणीही सावकारीचा धंदा करूं नये असें घटकराज्य प्रमुखानें वाटल्यास स्वतःच्या इच्छेनें किंवा वन्यजाति सल्लागार समितीनें तसें सुचविल्यास निश्चितपणें जाहीर हुकुम काढून फर्मावावें. अशा हुकुमांत त्या आज्ञेचा भंग करणें हा गुन्हा आहे असें जाहीर करून त्या गुन्ह्याला ठेवण्यांत आलेली शिक्षाही जाहीर केली जावी.

**८. वार्षिक अंदाजपत्रकांत परिशिष्टित मुलुखाविषयींचा अंदाजो जमाखर्च स्वतंत्र दाखविण्याबाबत** :—या घटनेच्या १७७ कलमान्वयें घटक विधिमंडळापुढें जें वार्षिक अंदाजपत्रक ठेवावयाचें, त्यांत घटकराज्य-तिजोरींत जमा व्हावयाच्या किंवा त्या तिजोरींतून खर्ची पडावयाच्या परिशिष्टित मुलुखविषयक अंदाजी जमाखर्चाच्या रकमा स्वतंत्रपणें निर्दिष्ट केल्या जातील.

**९. बिगर परिशिष्टित मुलुखांना भाग २ लागू करणें**—(१) या विभागांतील एकादें कलम वा सर्वच्या सर्व कलमें एकाद्या तारखेपासून परिशिष्टित जातींची वसती असलेल्या बिगरपरिशिष्टित मुलुखाला परिशिष्टित मुलुखाप्रमाणेंच लागू होतील असे जाहीर हुकुम काढून केव्हांही फर्माविण्याचा प्रमुखाला अधिकार आहे. बिगर-परिशिष्टित मुलुखास असे कायदे लागू केले याचा बिनतोड पुरावा असें या हुकुमाचें प्रकाशन समजलें जाईल.

(२) वरील उपपरिच्छेद (१) याप्रमाणें हुकुम काढून ज्या भागाला एक वा सर्व कलमें लागू केलीं असतील, त्यांपैकीं एकाद्या विशिष्ट तारखेपासून एक वा सर्व कलमें लागू राहणें बंद केल्याचाही घटकराज्यप्रमुखाला वरीलप्रमाणेंच हुकुम काढतां येईल.

# भाग ३

## संयुक्त प्रांतविषयक तरतुदी

**१०. भाग ३ लागू करण्याविषयीं**—या भागांतील कलमें फक्त संयुक्त प्रांतापुरतींच लागू आहेत.

**११. परिशिष्टित मुलुख सल्लागार समिति :**—( १ ) ही घटना अमलांत आल्यावर शक्य तितक्या लवकर प्रमुख एक हुकुम काढून परिशिष्टित मुलुख सल्लागार समिति नेमील. या समितीचे दोन तृतीयांश सभासद परिशिष्टित जमातीचे असतील. या समितीची घटना, अधिकार आणि कार्यपद्धति यांचा या हुकुमांत उल्लेख करतां येईल. त्याचप्रमाणें प्रमुखाला जरूर वाटतील त्या आनुषंगिक तरतुदीही त्यांत समाविष्ट करतां येतील.

( २ ) घटकराज्यांतील परिशिष्टित मुलुखांची सुधारणा करण्याबाबतच्या सर्व गोष्टींत घटकराज्य सरकारला साधारण सल्ला देणें हें या समितीचें कर्तव्य राहील.

**१२. विशिष्ट प्रसंगीं कायदे करण्याचा प्रमुखाचा अधिकार :**—( १ ) देहान्त, जन्मठेप किंवा पांच वर्षे अगर त्यापेक्षां अधिक मुदतीची कारावासाची शिक्षा ज्याला सांगितली आहे, अशांखेरीज इतर गुन्ह्यांच्या चौकशीच्या खटल्यांबाबत घटकराज्यप्रमुख परिशिष्टित मुलुखांबद्दल कायदे करूं शकेल. कमी रकमेचे दावे किंवा सामान्य खटले यांबाबतही त्याला नियम करतां येईल. असे दावे व खटले चालविण्याचा अधिकार ग्रामनेता किंवा ग्रामपंचायत यांना त्या कायद्यान्वयें देतां येईल.

( २ ) परिशिष्टित मुलुखांतील जमीन परिशिष्टित जमातीच्या इसमानें बिगरपरिशिष्टित जमातीच्या इसमास देऊं नये असा कानू प्रमुखाला करतां येईल.

( ३ ) या परिच्छेदाखालीं केलेले कानू प्रमुखानें जाहीर केल्यावर त्यांना योग्य विधिमंडळानें या घटनेनुसार मिळालेल्या अधिकारान्वयें केलेल्या कायद्याचेंच महत्त्व व स्वरूप राहील.

**१३. वार्षिक अंदाजपत्रकांत परिशिष्टित मुलुखाविषयीं अंदाजी जमाखर्च स्वतंत्र दाखविण्याबाबत**—या घटनेच्या १७७ व्या कलमानुसार घटकविधिमंडळापुढें वार्षिक अंदाजपत्रक ठेवतांना त्यांत घटकराज्य-तिजोरींत जमा व्हावयाच्या किंवा त्या तिजोरींतून खर्ची पडावयाच्या परिशिष्टित मुलुखविषयक अंदाजी खर्चाच्या रकमा स्वतंत्रपणें दाखविल्या जातील.

# भाग ४

## पूर्व पंजाबविषयक तरतुदी

**१४. भाग ४ लागू करण्याबाबत :**—या भागांतील कलमें फक्त पूर्व पंजाबलाच लागू आहेत.

**१५. परिशिष्टित मुलुख सल्लागार-समितीची नेमणूक :**—( १ ) ही घटना अमलांत आल्यावर शक्य तितक्या लवकर प्रमुख एक हुकुम काढून परिशिष्टित मुलुख सल्लागार-समिति नेमील. समितीचे दोन तृतीयांश सभासद परिशिष्टित मुलुखाचे रहिवासी असले पाहिजेत. या कमिटीची घटना, अधिकार आणि कार्यपद्धति व त्याच-प्रमाणें प्रमुखास इष्ट व आवश्यक वाटणाऱ्या तद्विषयक इतर तरतुदी यांचा या हुकुमांत समावेश करतां येईल.

( २ ) घटक राज्यांतील परिशिष्टित मुलुखांच्या कारभाराबद्दल सर्व बाबतींत घटकसरकारला सल्लामसलत देणें हें या परिशिष्टित मुलुख सल्लागार-समितीचें कर्तव्य राहील.

**१६. परिशिष्टित मुलुखास पार्लमेंट किंवा घटक कायदेमंडळ यांचे कायदे लागू करण्याविषयीं :**—पार्लमेंट किंवा घटकराज्य कायदे-मंडळ यांचा एखादा कायदा एखाद्या परिशिष्टित मुलुखास लागू नाहीं अथवा असा मुलुख किंवा त्याचा थोडासा भाग यांना अमुकअमुक दुरुस्त्या किंवा अपवाद यांसह लागू होईल असें जाहिरनामा काढून प्रमुखाला फर्मावितां येईल.

**१७. नियम करण्याची प्रमुखाची सत्ता :**—( १ ) देहान्त, जन्मठेप किंवा पांच वर्षें अगर त्यापेक्षां अधिक काळ कारावासाची शिक्षा ज्यांना सांगितली आहे, अशांखेरीज इतर गुन्ह्यांचे खटले, किंवा विशिष्ट रकमेखालचे दावे अगर क्षुल्लक रकमेचे खटले यांबाबत परिशिष्टित मुलुखापुरते कानू प्रमुख जाहीर करूं शकेल व अशा कानूंन्वयें असे दावे व खटले ग्रामपुढारी अगर ग्रामपंचायत यांना चालविण्याचे अधिकार देतां येतील.

( २ ) परिशिष्टित जमातीच्या कोणाही इसमानें परिशिष्टित मुलुखांतील जमीन बिगरपरिशिष्टित जमातीच्या इसमास देण्यास मनाई करणारे कानू प्रमुख जारी करूं शकेल.

( ३ ) या परिच्छेदान्वयें केलेले कानू प्रमुखानें जाहीर केल्यावर त्यांना योग्य विधिमंडळानें या घटनेनुसार प्राप्त झालेल्या अधिकारांन्वयें केलेल्या कायद्याचेंच महत्त्व व स्वरूप राहील.

## भाग ५

## परिशिष्टित मुलुख

**१८. परिशिष्टित व मुलुख** ( १ ) खालील कोष्टकाच्या भाग १ ते ७ मध्यें दर्शविलेले प्रदेश या घटनेनुसार परिशिष्टित मुलुख समजले जातील. त्याचप्रमाणें या कोष्टकांत जेथें विभाग, जिल्हा, कारभारविभाग, तहशील अगर जमीनदारी मिळकत

यांचा उल्लेख आहे, तो उल्लेख ही घटना अमलांत येण्याच्या दिवशीं ते जे विभाग, जिल्हा, कारभारविभाग, तहशील अगर जमीनदारी मिळकत असतील, त्याविषयीं समजावे.

( २ ) अध्यक्षाला कोणत्याही वेळीं हुकूम काढून

( अ ) कोणताही सर्व वा विवक्षित भाग परिशिष्टित मुलुख म्हणून किंवा अशा मुलुखाचा एक भाग म्हणून समजला जाणार नाहीं असें जाहीर करतां येईल.

( ब ) सरहद्दींच्या फेरबदलानेंच फक्त एकादा परिशिष्टित मुलुख बदलतां येईल;

( क ) प्रथम परिशिष्टाच्या प्रथम भागांत निर्देशिलेल्या घटकराज्याच्या सरहद्दींत फेरबदल झाल्यास अगर प्रथम परिशिष्टाच्या पहिल्या भागांत, संघांत दाखल केल्यानें वा पार्लमेंटनें प्रस्थापित केल्यामुळें नवीन घटकराज्याची भर पडल्यास, अशा घटकराज्यांत पूर्वी उल्लेख न केलेला असा प्रदेश परिशिष्टित मुलुख झाला अगर होईल असें जाहीर करतां येईल;

आणि अशा हुकुमांत अध्यक्षाला योग्य व जरूर वाटतील अशा आनुषंगिक कायद्यानें तरतुदी केल्या जातील.

## कोष्टक

### १—मद्रास

लखदीव बेटें ( मिनिकॉयसह ) आणि अमिनिदिवी बेटें.

पूर्व गोदावरी एजन्सी व गव्हर्मेंट ऑफ इंडिया ( कॉन्स्टिटसूशन ऑफ ओरिसा ) ऑर्डर, १९३६, अन्वयें आरिसाला जोडला गेलेला नाहीं एवढा विझगापट्टम् एजन्सीचा भाग.

### २—मुंबई

पश्चिम खानदेश जिल्ह्यांतः—नवापूर पेटा, अकराणी महाल आणि मेहवासींचीं खालील गांवें: (१) काठी पार्वी, (२) नळ पार्वी, (३) सिंगपूर पार्वी; (४) गावहळी वाळवी, (५) चिखली वसावा आणि (६) नवलापूर पार्वी.

पूर्वखानदेश जिल्ह्यांतः–सातपुडा पर्वतांतील राखीव जंगल विभाग.

नासिक जिल्ह्यांतः–कळवण तालुका व पेंट पेटा.

ठाणें जिल्ह्यांत :—डहाणू व शहापूर तालुके व मोखाडा आणि उंबरगांव पेटे.

## ३—संयुक्तप्रांत

डेहराडून जिल्ह्यांतील जौनसार-बावर परगणा.

कैमूर रांगेच्या दक्षिणेस असलेला मिरझापूर जिल्ह्याचा भाग.

## ४—पूर्व पंजाब

कांग्रा जिल्ह्यांतील स्पिती व लहाउल.

## ५—बिहार

रांची व सिंगभूम जिल्हे आणि छोटा नागपूर विभागांतील पालमाऊ जिल्ह्यांतील लातेहार उपविभाग.

गोड्डा व देवगड सबडिव्हिजन वगळून संताळ परगण्यांचा जिल्हा.

## ६—मध्यप्रांत व वऱ्हाड

चांदा जिल्ह्यांत—सिरोंचा तहशिलींत अहिरी जमीनदारी आणि गरचिरोली तहशिलींतील धणोरा, दुधमाला, गेवरधा, झारपापरा, खुटगांव, कोटगल, मुरमगांव, पळसगढ, रांगी, शिरसुंडी-सोनसारी, चांदाला, गिलगांव, पै-मुरांडा आणि पोतेगांव जमिनदारी.

छिंदवाडा जिल्ह्यांतील हराई, गोरखघाट, गोरपाणी, बटकागढ, बरदगढ, परतबगढ ( पगारा ), आलमोद व सोनपूर जहागिरी आणि छिंदवाडा जिल्ह्यांतील पंचमढी जहागिरीचा भाग.

मंडला जिल्हा.

बिलासपूर जिल्ह्यांतील पेंडरा, केंदा, मातीन, लाफा, उपरोरा, छुरी व कोरबा जमीनदारी.

द्रुग जिल्ह्यांतील औंधी, कोराचा, पणबरास व अंबागढ चौकी जमीनदारी.

बालाघाट जिल्ह्यांतील बैहार तहशील.

अमरावती जिल्ह्यांतील मेलघाट तालुका.

बेतुल जिल्ह्यांतील भैंसदेही तहशील.

## ७—ओरिसा

खोंडमलसह गंजम एजन्सी प्रदेश. कोरापुट जिल्हा.

# परिशिष्ट सहावें

## [ कलमें १८९ ( ब ) आणि १९० ( २ ) ]

## आसामांतील वन्य प्रदेशांच्या राज्यकारभाराविषयीं

**१. स्वायत्त जिल्हे आणि स्वायत्त प्रदेश** :—( १ ) या परिशिष्टाच्या १९ व्या परिच्छेदास जोडलेल्या कोष्टकाच्या पहिल्या भागांतील प्रत्येक बाबींतील वन्य प्रदेश त्या भागांत समाविष्ट असेतोंपर्यंत, स्वायत्त जिल्हा समजला जाईल.

( २ ) एका स्वायत्त जिल्ह्यांत निरनिराळ्या वन्य जाती राहत असतील, तर प्रमुख एक जाहीरनामा काढून अशा जाति राहत असलेल्या मुलुखाचें स्वायत्त प्रदेशांत विभक्तीकरण करूं शकेल.

३ जाहीरनामा काढून प्रमुख

( अ ) या कोष्टकाच्या पहिल्या भागांत कोणताही मुलुख समाविष्ट करूं शकेल.

( ब ) नवीन स्वायत्त जिल्हा निर्माण करूं शकेल.

( क ) स्वायत्त जिल्ह्याच्या क्षेत्रफळांत भर टाकूं शकेल,

( ड ) कोष्टकाच्या पहिल्या भागांतून कोणताही भाग कमी करूं शकेल,

( इ ) स्वायत्त जिल्ह्याचें क्षेत्रफळ कमी करूं शकेल.

मात्र या उप-परिच्छेदाच्या कलम ( ब ) अगर कलम ( क ) याखालीं हुकुम करावयाचा असल्यास प्रमुख, या परिशिष्टाच्या १४ व्या परिच्छेदाच्या उप-परिच्छेद ( १ ) प्रमाणें नेमलेल्या कमिशनच्या रिपोर्टाचा विचार केल्याखेरीज असा हुकुम काढूं शकणार नाहीं.

त्याचप्रमाणें या उप-परिच्छेदाचें कलम ( ड ) अगर ( इ ) यांखालीं हुकुम काढावयाचा असल्यास अशा स्वायत्त जिल्ह्याच्या जिल्हा कौन्सिलनें तसा ठराव केल्याखेरीज प्रमुखाला तसा हुकुम काढतां येणार नाहीं.

**२. जिल्हा कौन्सिल व प्रदेश कौन्सिल यांची घटना**—( १ ) प्रत्येक स्वायत्त जिल्ह्याला एक जिल्हा कौन्सिल असेल. या कौन्सिलचे सभासद किमान वीस व कमाल चाळीस राहतील व त्यांपैकीं निदान तीन चतुर्थांश सभासद प्रौढ मतदान पद्धतीनें निवडलेले असतील.

( २ ) जिल्हा कौन्सिलच्या निवडणुकीसाठीं प्रादेशिक मतदारसंघ बनवितांना जिल्ह्यांतील निरनिराळ्या वन्य जातींची वसती असलेले विभाग व इतर वसती असलेले विभाग, तसे विभाग तेथें असल्यास, त्यांचा शक्य तों निरनिराळ्या मतदार संघांत समावेश केला जाईल.

मात्र ५०० पेक्षां कमी लोकसंख्या असलेल्या विभागाचा स्वतंत्र मतदारसंघ बनविला जाणार नाहीं.

( ३ ) या परिशिष्टाचा परिच्छेद ( १ ) उप-परिच्छेद ( २ ) याखालीं बनविलेल्या प्रत्येक स्वायत्त प्रदेशासाठीं स्वतंत्र प्रदेश-कौन्सिल बनविण्यांत येईल.

( ४ ) प्रत्येक जिल्हा कौन्सिल व प्रदेश कौन्सिल यांना अनुक्रमें ‘ ( जिल्ह्याचें नांव ) जिल्हा कौन्सिल ’ आणि ‘ ( प्रदेशाचें नांव ) प्रदेश कौन्सिल ’ असें संबोधण्यांत येईल. या संस्थांना कायम वारसा व एकच मुद्रा राहील व याच नांवानें त्यांच्यावर वा त्यांच्यातर्फे कोर्टदरबार करतां येईल.

( ५ ) या परिशिष्टांत नमूद असलेल्या बाबी पाळून प्रत्येक स्वायत्त जिल्ह्याचा कारभार, ज्या बाबींपुरता तो अशा जिल्ह्यांतील प्रदेश कौन्सिलकडे या परिशिष्टान्वयें सोंपविला गेला नसेल तेवढयापुरता त्या जिल्ह्याच्या कौन्सिलकडे राहील आणि स्वायत्त प्रदेशाचा कारभार त्या प्रदेशाच्या प्रदेश-कौन्सिलकडे राहील.

( ६ ) प्रदेश-कौन्सिलें असलेल्या स्वायत्त जिल्ह्यांत जिल्हा कौन्सिलला, प्रदेश-कौन्सिलच्या मुलुखाबाबत प्रदेश-कौन्सिलनें सोंपविले असतील ते अधिकार व या परिशिष्टान्वयें देण्यांत आलेले अधिकार एवढेच अधिकार असतील.

( ७ ) स्वायत्त जिल्हे व स्वायत्त प्रदेश यांतील विद्यमान वन्य कौन्सिलें किंवा इतर प्रातिनिधिक वन्य जातींच्या संस्था यांच्या सल्ल्यानें प्रमुखानें जिल्हा कौन्सिल व प्रदेश-कौन्सिल यांची पहिली घटना करण्याबाबतचे नियम तयार करावयाचे आहेत. हे नियम खालील बाबींसंबंधींचे असतील—

( अ ) जिल्हा कौन्सिल व प्रदेश-कौन्सिल यांची सभासद संख्या व जागांची विभागणी.

( ब ) या कौन्सिलांच्या निवडणुकीसाठीं मतदार संघ विभाग निश्चित करणें.

( क ) मतदारांच्या याद्या तयार करणें व मतदान लायकी ठरविणें.

( ड ) सभासद-लायकी ठरविणें.

( इ ) सभासद-निवडणूक वा सभासद-नियुक्ति यांविषयीं इतर बाबी.

( फ ) जिल्हा व प्रदेश-कौन्सिलांची कार्यपद्धति.

( ग ) जिल्हा व प्रदेश-कौन्सिलच्या नोकरवर्गाची नेमणूक.

( ८ ) या परिच्छेदाच्या सातव्या उप-परिच्छेदांत सांगितलेल्या बाबींसंबंधीं जिल्हा व प्रदेश-कौन्सिलें अस्तित्वांत आल्यावर त्यांनीं नियम करावे. त्याखेरीज पुढील बाबींसंबंधींही त्यांनीं नियम तयार करण्यास हरकत नाहीं—

( अ ) दुय्यम स्थानिक कौन्सिलें किंवा बोर्ड आणि त्यांची कार्यपद्धति; आणि

( ब ) जिल्हा व प्रदेश यांच्या कारभारविषयक इतर सर्वसाधारण बाबी:

मात्र या उप-परिच्छेदान्वयें जिल्हा वा प्रदेश-कौन्सिल नियम तयार करीपर्यंत, अशा कौन्सिलच्या निवडणुका, अधिकारी व नोकर यांची नेमणूक व कार्यपद्धति यांसंबंधांत प्रमुखानें या परिच्छेदाच्या उपपरिच्छेद ( ७ ) अन्वयें केलेले नियम जारी राहतील.

त्याचप्रमाणें मिकीर व उत्तर काचार पहाड विभागाचा डेप्युटी कमिशनर किंवा सब-डिव्हिजन ऑफिसर, या परिशिष्टाच्या १९ व्या परिच्छेदास जोडलेल्या कोष्टकाच्या पहिल्या भागांतील कलम ५ व ६ यांत उल्लेखलेल्या मुलुखांपुरता, जिल्हा कौन्सिलचा पदसिद्ध अध्यक्ष राहील, आणि त्याला, जिल्हा कौन्सिल अस्तित्वांत आल्यापासून सहा वर्षेपर्यंत केवळ प्रमुखाच्या ताबेदारीनुसार जिल्हा कौन्सिलचा एखादा ठराव वा निर्णय फिरविण्याचा किंवा रद्द करण्याचा किंवा जिल्हा कौन्सिलला जरूर त्या सूचना देण्याचा अधिकार राहील व कौन्सिलनें या सूचना पाळल्या पाहिजेत.

**३. जिल्हा कौन्सिल व प्रदेश कौन्सिल यांचे कायदे करण्याचा अधिकार** :—( १ ) स्वायत्त प्रदेशाच्या टापूसाठीं, प्रदेश कौन्सिलला व स्वायत्त जिल्ह्याच्या टापूसाठीं त्यांतील प्रदेशाच्या अधिकाराखालील टापू वगळून जिल्हा कौन्सिलला खालील बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार आहे.

( अ ) राखीव जंगलाखेरीज इतर जमीन शेती, गुरें-चराई, वसाहत अगर इतर बिगरशेती कामासाठीं किंवा एकाद्या गावांतील अगर शहरांतील रहिवाशांच्या हितसंवर्धनासाठीं देणें, कबजांत घेणें वा वापरणें किंवा राखून ठेवणें.

मात्र आसाम सरकारला अशी जागा ताब्यांत घेण्यासाठीं अधिकार देणारे कायदे अस्तित्वांत असतील, तर सार्वजनिक कामासाठीं कोणाच्या ताब्यांतील वा मोकळी जागा सक्तीनें ताब्यांत घेण्यास वरील कायद्यांची आडकाठी उरणार नाहीं:—

( ब ) राखीव जंगल नसलेल्या जंगलाची व्यवस्था;

( क ) शेतीसाठीं कालवा अगर पाट यांचा उपयोग;

( ड ) झुम पद्धति किंवा पिकांचा वर्ग करण्याचे इतर मार्ग;

( इ ) ग्राम किंवा शहर कमिट्या किंवा कौन्सिल यांची स्थापना व त्यांचे अधिकार;

( फ ) ग्राम अगर शहर पोलिस, सार्वजनिक आरोग्य व स्वच्छता यांसह ग्राम किंवा शहर कारभारविषयक इतर सर्व बाबी;

( ग ) ग्रामप्रमुखाची नेमणूक किंवा वारसा;

( ह ) मालमत्तेचा वारसा;

( य ) विवाह;

( ज ) सामाजिक चालीरीति.

( २ ) या परिच्छेदांतील 'राखीव जंगल' याचा अर्थ असा कीं १८९१ चा आसाम जंगल रेग्युलेशन किंवा त्या विभागांत त्या वेळीं जारी असलेला कोणताही कायदा याअन्वयें राखीव जंगल म्हणून नमूद केलेला टापू.

**४. स्वायत्त जिल्हे व स्वायत्त प्रदेश यांतील न्यायव्यवस्था:--**

( १ ) स्वायत्त प्रदेशांतील टापूसाठीं प्रदेश कौन्सिलला किंवा प्रदेश कौन्सिलच्या अमलाखालील टापू ( असल्यास ) सोडून बाकीच्या स्वायत्त जिल्ह्यांतील टापूसाठीं जिल्हा कौन्सिलला दावे आणि या परिशिष्टाच्या पांचव्या परिच्छेदाच्या उपपरिच्छेद (१) मधील व्यवस्था लागू असलेल्या कज्ज्याखेरीज इतर बाबींसंबंधींचे कज्जे चालविण्यासाठीं ग्रामकौन्सिल किंवा कोर्टें नेमतां येतील. या परिशिष्टाच्या परिच्छेद तीन याखालीं केलेल्या कानूंमधून उद्‌भवणारे कज्जे घटकराज्यांतील कोणत्याही कोर्टाकडे न जातां याच कोर्टांपुढें येतील. अशा ग्रामकौन्सिलचे सभासद व अध्यक्ष नेमणें किंवा त्याचप्रमाणें या परिशिष्टाच्या तिसऱ्या परिच्छेदानुसार केलेले कानू अमलांत आणण्यासाठीं जरूर तो नोकरवर्ग नेमणें या गोष्टीही जिल्हा कौन्सिल व प्रदेश कौन्सिल यांना त्यांच्या टापूपुरत्या करतां येतील.

( २ ) या घटनेंत कांहींही असलें, तरी स्वायत्त प्रदेशासाठीं प्रदेश-कौन्सिलला किंवा त्या कौन्सिलनें नेमलेल्या कोर्टाला किंवा एकाद्या स्वायत्त जिल्ह्याच्या टापूंत असें प्रदेश-कौन्सिल नसलेल्या टापूंपुरतें जिल्हा कौन्सिलला किंवा त्या कौन्सिलनें नेमलेल्या कोर्टाला, या परिशिष्टाच्या परिच्छेद ५ मधील उपपरिच्छेद ( १ ) ज्यांना लागू नाहींत असे कज्जे वगळून त्या टापूंतील वन्य जातींच्या पक्षकारांत चालू असलेल्या इतर सर्व कज्जांबाबत अपील कोर्टाचे अधिकार राहतील. घटकराज्यांतील कोणत्याही कोर्टाला याबाबत अपील चालविण्याचा अधिकार नाहीं आणि जिल्हा किंवा प्रदेश कौन्सिल किंवा कोर्ट यांचा याबाबतचा निर्णय अखेरचा समजला जाईल.

**५. १९४८ चा दिवाणी कामाचा कायदा व १८९८ चा फौजदारी कामाचा कायदा याखालील अधिकार, कांहीं दावे आणि फौजदारी कज्जे चालविण्यासाठीं जिल्हा व प्रदेश कौन्सिल आणि कांहीं कोर्टें व अधिकारी यांना देण्याविषयीं--**( १ ) एकादा स्वायत्त जिल्हा अगर प्रदेश यांत जारी असलेल्या व प्रमुखानें तसा निर्देश केला असेल अशा कायद्याखालील, किंवा इंडियन पिनल कोड अगर तो जिल्हा किंवा प्रदेश यांत त्या वेळीं अमलांत असलेला दुसरा कोणता कायदा याखालीं ज्याला फांशी, जन्मठेप किंवा पांच वर्षांच्या आंतील

नाहीं असा कारावास अशी शिक्षा असेल अशा गुन्ह्यांचे खटले चालविण्यासाठीं त्या जिल्ह्याचें किंवा प्रदेशाचें कौन्सिल, किंवा अशा कौन्सिलनें नेमलेलें कोर्ट किंवा त्यासंबंधांत प्रमुखानें खास नेमलेला कोणी अधिकारी यांना १९०८ चें सिव्हिल प्रोसीजर कोड किंवा १८९८ चें क्रिमिनल प्रोसीजर कोड याखालील जरूर ते अधिकार प्रमुख सुपूर्त करूं शकेल आणि त्यानंतर सदर कौन्सिल, कोर्ट किंवा अधिकारी यांनीं ते कज्जे, दावे किंवा गुन्हे चालविण्याचे आहेत.

( २ ) या परिच्छेदाच्या उप-परिच्छेद एकप्रमाणें कौन्सिल, कोर्ट अगर अधिकारी यांना दिलेले अधिकार काढून घेण्याचा किंवा त्यांत बदल करण्याचा प्रमुखाला अधिकार आहे.

( ३ ) या परिच्छेदांत स्पष्ट निर्देश केलेल्या बाबींखेरीज स्वायत्त जिल्हा अगर स्वायत्त प्रदेश यांतील कोणताही दावा, कज्जा किंवा गुन्हा यांच्या चौकशीला १९०८ चा दिवाणी कायदा व १८९८ चा फौजदारी कायदा लागू होणार नाहीं.

**६. प्राथमिक शाळा वगैरे स्थापण्याचा जिल्हा-कौन्सिलचा अधिकार :—**स्वायत्त जिल्ह्याच्या जिल्हा कौन्सिलला जिल्ह्यांत प्राथमिक शाळा, दवाखाने, बाजार, कोंडवाडे, नदीवरील तराफे, मच्छीमारी, रस्ते व पाटबंधारे स्थापन करणें, बांधणें आणि त्यांची व्यवस्था पाहणें या गोष्टी करतां येतील. विशेषतः जिल्ह्यांतील प्राथमिक शाळांतून शिक्षण कोणत्या भाषेंतून व कोणत्या तऱ्हेनें देण्यांत यावें हेंही त्यांना ठरवितां येईल.

**७. जिल्हा व प्रदेश निधि :—**( १ ) प्रत्येक स्वायत्त जिल्ह्यासाठीं एक जिल्हा निधि आणि प्रत्येक स्वायत्त प्रदेशासाठीं एक प्रदेश-निधि स्थापन करण्यांत येतील. जिल्हा कौन्सिलकडे जिल्ह्यांतून आणि प्रदेश-कौन्सिलकडे प्रदेशांतून या घटनेनुसार चालणाऱ्या कारभारासंबंधांत वेळोवेळीं ज्या रकमा आदा होतील, त्या त्या त्या निधींत जमा केल्या जातील.

( २ ) या निधींत भरावयाचे पैसे, काढावयाचे पैसे, तिजोरीची व्यवस्था व इतर तद्विषयक बाबींसंबंधांत जिल्हा कौन्सिलनें जिल्हानिधीसाठीं व प्रदेश कौन्सिलनें प्रदेश-निधीसाठीं नियम तयार करावे. मात्र अशा नियमांना प्रमुखाची मंजुरी पाहिजे.

**८. जमीनमहसूल ठरवणें व जमा करणें आणि कर आकारणें:—** ( १ ) स्वायत्त प्रदेशांतील सर्व जमिनीबाबत प्रदेश-कौन्सिलला आणि प्रदेश-कौन्सिलच्या अधिकारांतील टापू ( असल्यास ) वगळून स्वायत्त जिल्ह्यांतील इतर टापूमधील जमिनीबाबत जिल्हा कौन्सिलला, आसाममधील जमीनमहसुलाच्या बाबतींत सामान्यतः आसाम सरकार त्या वेळीं जें धोरण पाळीत असेल त्यानुसार, जमीनमहसूल ठरविणें व तो गोळा करणें याचे अधिकार राहतील.

(२) वर उल्लेखलेल्या टापूंबाबतच फक्त जिल्हा कौन्सिल व प्रदेश कौन्सिल यांना जमिनी व इमारती यांवर कर बसविणें व गोळा करणें आणि रहिवाशांवर डोईपट्टी बसविणें व वसूल करणें हे अधिकार राहतील.

(३) स्वायत्त जिल्ह्याच्या जिल्हा कौन्सिलला आपल्या जिल्ह्यांत खालीलपैकीं एक वा सर्व कर बसविण्याचा व वसूल करण्याचा अधिकार राहील—

(अ) धंदा, व्यापार, व्यवसाय व नोकरी यांवर कर;

(ब) जनावरें, वाहनें व नावा यांवर कर;

(क) बाजारांत विक्रीसाठीं येणाऱ्या मालाच्या आयातीवर कर आणि नावांतून वाहतुक होणारे लोक आणि माल यांवर डोईपट्टी; आणि

(ड) शाळा, दवाखाने व रस्ते यांची व्यवस्था ठेवण्यासाठीं कर.

(४) या परिच्छेदाचा उपपरिच्छेद (२) आणि (३) यांमध्यें नमूद केलेले कर बसविण्याकरितां व त्यांची वसुली करण्याकरितां प्रदेश कौन्सिल व जिल्हा कौन्सिल यांना आपापल्यासाठीं नियम करतां येतील.

**९. खनिज संपत्तीची पाहणी अगर उत्खनन करण्यासाठीं परवाना अगर खंड करार**—(१) स्वायत्त जिल्ह्याच्या टापूमध्यें खनिज संपत्तीची पाहणी अगर उत्खनन करावयाचें असल्यास त्या जिल्ह्याच्या जिल्हा कौन्सिलचा सल्ला घेतल्याशिवाय आसाम सरकार त्यासाठीं परवाना अगर खंड-चिठ्ठी देणार नाहीं.

(२) आसाम सरकारनें एखाद्या स्वायत्त जिल्ह्यांत खनिज संपत्तीची पाहणी अगर उत्खनन करण्याकरितां परवाना अगर खंडचिठ्ठी दिल्यास त्याबद्दल ठरलेल्या मालकीहक्काच्या रकमेपैकीं आसाम सरकार आणि त्या जिल्ह्याचें जिल्हा कौन्सिल यांच्यामध्यें ठरला असेल तेवढी वांट्याची रक्कम जिल्हा कौन्सिलला देण्यांत येईल.

(३) जिल्हा कौन्सिलच्या मालकी हक्काच्या रकमेच्या वांटणीबाबत कांहीं तंटा उद्भवल्यास प्रमुखाकडे तो वाद निर्णयार्थ सोंपविला जाईल आणि मग प्रमुख निश्चित करील ती रक्कम या परिच्छेदाचा उपपरिच्छेद (२) अन्वयें जिल्हा कौन्सिलला मिळावयाच्या वांट्याची रक्कम असें समजण्यांत येईल.

**१०. अ-वन्य लोकांनीं सावकारी व व्यापार करण्याबाबत कायदे करण्याचे जिल्हा कौन्सिलचे अधिकार**:—(१) जिल्ह्याच्या टापूंत राहत असलेल्या परिशिष्टित जातींखेरीज इतर जातीच्या लोकांनीं करावयाच्या सावकारी आणि व्यापार यांचें नियमन व नियंत्रण यांसाठीं जिल्हा कौन्सिलला कायदे करतां येतील.

(२) अशा कायद्यानें—

(अ) परवानदाराखेरीज इतरांस सावकारी करण्यास बंदी घालतां येईल.

( ब ) सावकारानें आकारावयाच्या व वसूल करावयाच्या व्याजाचा कमाल दर ठरवितां येईल;

( क ) सावकारांनीं हिशेब ठेवावे व त्यांच्या हिशेबाच्या वह्या जिल्हा कौन्सिलनें अधिकार दिलेल्या अधिकाऱ्यांना तपासतां याव्या असें बंधन घालतां येईल;

( ड ) त्या जिल्ह्यांत राहणाऱ्या परिशिष्टित जातीबाहेरचा कोणीही इसम कोणत्याही एका वस्तूचा परवान्याखेरीज ठोक अगर किरकोळ व्यापार करणार नाहीं असें ठरवितां येईल.

मात्र, जिल्हा कौन्सिलच्या एकूण सभासदसंख्येपैकीं किमान तीनचतुर्थांश बहुमतानें मान्य झाल्याखेरीज असे कायदे करतां येणार नाहींत.

त्याचप्रमाणें, सदर कायदे करण्यापूर्वी त्या जिल्ह्यांत सावकारी अगर व्यापार करीत असलेल्या कोणाही इसमास या कायद्यान्वयें परवाना देण्याचें नाकारतां येणार नाहीं.

**११. या परिशिष्टानुसार केलेले कायदे, कानू व नियम यांचें प्रसिद्धीकरणः**—या परिशिष्टान्वयें जिल्हा कौन्सिल अगर प्रदेश कौन्सिल यांनीं केलेले कायदे, कानू व नियम ताबडतोब घटकराज्याच्या सरकारी गॅझेटमध्यें प्रसिद्ध केले पाहिजेत व तसे ते प्रसिद्ध झाल्यावरच त्यांना कायदेशीरपणा प्राप्त होईल.

**१२. पार्लमेंट आणि घटकराज्य विधिमंडळ यांचे कायदे स्वायत्त जिल्हे आणि स्वायत्त प्रदेश यांना लागू करणें**:—या घटनेंत कांहींही असलें तरी—

( अ ) या परिशिष्टाच्या परिच्छेद तीनमध्यें जिल्हा-कौन्सिल अगर प्रदेश-कौन्सिल यांनीं ज्याबाबत कायदे करण्यास हरकत नाहीं, म्हणून ज्या बाबींचा उल्लेख करण्यांत आला आहे त्या बाबींसंबंधींचे घटक विधि-मंडळाचे कायदे आणि बिन गाळलेली मादक दारू पिण्याला बंदी करणारे किंवा त्यावर नियंत्रण घालणारे घटक विधिमंडळाचे कायदे, जिल्हा कौन्सिल अगर प्रदेश कौन्सिलनें जाहीर नोटिसीनें तसें प्रकट केल्याशिवाय स्वायत्त जिल्हा किंवा स्वायत्त प्रदेश यांना लागू होणार नाहींत. आणि असें प्रकट करतांना तसा एकादा कायदा तो जिल्हा, प्रदेश किंवा त्याचा कांहीं भाग यांना कांहीं विशिष्ट अपवादांसह किंवा दुरुस्त्यांसह लागू होईल, असें जिल्हा कौन्सिलला जाहीर करतां येईल.

( ब ) पार्लमेंटचा एकादा कायदा किंवा या परिच्छेदाच्या उपपरिच्छेद ( अ ) मधील तरतुदी ज्याला लागू नाहींत असा घटक विधिमंडळाचा एकादा कायदा, एकादा स्वायत्त जिल्हा अगर स्वायत्त प्रदेश यांना लागू होणार नाहीं, असें किंवा एकादा स्वायत्त जिल्हा किंवा स्वायत्त प्रदेश किंवा

त्यांचा कांहीं भाग यांना कांहीं अपवादांसह किंवा दुरुस्त्यांसह लागू होईल, असें जाहीर पत्रिकेनें प्रमुखास आज्ञापितां येईल. असे अपवाद किंवा दुरुस्त्या जिल्हा कौन्सिल किंवा प्रदेश कौन्सिल यांच्या अनुमतीनें ठरविलेल्या असाव्यात व त्याचा त्या पत्रिकेंत स्पष्ट उल्लेख असावा. जिल्हा कौन्सिल किंवा प्रदेश कौन्सिल यांनीं अशी पत्रिका काढण्याची विनंति करणारा ठराव पास केल्यावरच प्रमुखानें वरील हुकुम काढावयाचा आहे.

**१३. वार्षिक अंदाजपत्रकांत स्वायत्त जिल्ह्याच्या अंदाजी जमा-खर्चाचे आंकडे स्वतंत्रपणें दाखविणें:**—आसाम सरकारच्या तिजोरींत पडावयाचे असे स्वायत्त जिल्ह्याच्या अंदाजी उत्पन्नाचे आणि खर्चाचे आंकडे या घटनेच्या १७७ कलमानुसार घटकराज्य विधिमंडळासमोर मांडावयाच्या घटकराज्याच्या वार्षिक अंदाजपत्रकांत स्वतंत्रपणें निर्दिष्ट केले पाहिजेत.

**१४. स्वायत्त जिल्ह्यांच्या कारभाराची चौकशी करून अहवाल सादर करण्यासाठीं कमिशनची नेमणूक:**—( १ ) एकाद्या स्वायत्त जिल्ह्यांतील कारभाराबाबत कांहीं विशिष्ट बाबींची तपासणी करून अहवाल सादर करण्यासाठीं किंवा जिल्ह्याच्या कारभाराबाबत वेळोवेळीं चौकशी करून अहवाल सादर करण्याकरितां आसामच्या प्रमुखाला कमिशनची नेमणूक करतां येईल. ही चौकशी साधारण कारभाराबद्दल किंवा विशेषेंकरून खालील बाबींबद्दल असूं शकेल—

( अ ) जिल्ह्यांतील शैक्षणिक, आरोग्यविषयक आणि दळणवळणाच्या सुखसोयी;

( ब ) जिल्ह्यांबाबत कांहीं नवीन वा विशिष्ट कायद्याची आवश्यकता;

( क ) जिल्हा व प्रदेश-कौन्सिलांनीं केलेले कायदे, कानू व नियम यांची अंमलबजावणी.

या कमिशनची कार्यपद्धति प्रमुखानेंच ठरवावी.

( २ ) अशा प्रत्येक कमिशनचा अहवाल, त्यावरील प्रमुखाच्या शिफारशींसह, आणि आसाम सरकार त्यासंबंधांत काय करणार याच्या खुलासापत्रकासह तद्विषयक मंत्र्यानें घटकराज्य विधिमंडळापुढें ठेवला पाहिजे.

( ३ ) आपल्या मंत्र्यामध्यें कामाची वांटणी करतांना आसामच्या प्रमुखानें एका मंत्र्यावर स्वायत्त जिल्ह्यांच्या सुखसोयींची जबाबदारी टाकावी.

**१५. जिल्हा व प्रदेश कौन्सिलांचे ठराव किंवा कायदे रद्द करणें, किंवा तहकूब ठेवणें :**—( १ ) एकाद्या जिल्हा कौन्सिलचा किंवा प्रदेश कौन्सिलचा एखादा कायदा किंवा ठराव हिंदुस्थानच्या सुरक्षिततेस बाधक आहे अशी प्रमुखाची खात्री पटल्यास त्यानें तो कायदा वा ठराव रद्द अगर तहकूब करावा आणि

अशा कायद्याचा अंमल होऊं नये, किंवा तो चालू राहूं नये किंवा अशा ठरावाची अंमलबजावणी होऊं नये यासाठीं, ( कौन्सिल रद्द करून त्याचे सर्व किंवा कांहीं अधिकार स्वतःकडे घेणें अशासारखी ) जरूर तो उपाययोजना करावी.

( २ ) या परिच्छेदाच्या उपपरिच्छेद ( १ ) प्रमाणें केलेला प्रत्येक हुकुम, त्याच्या कारणाची नोंद करून, शक्य तितक्या लवकर घटक विधिमंडळापुढें ठेवला पाहिजे, आणि विधिमंडळानें रद्द केल्याखेरीज असा हुकुम तो केल्या तारखेपासून बारा महिने अमलांत राहील:

मात्र घटक विधिमंडळानें हुकुम चालू राहावा अशा आशयाचा ठराव पास केल्यास आणि दरम्यान प्रमुखानें तो हुकुम रद्द न केल्यास तो हुकुम आणखी बारा महिने अमलांत राहील.

( ३ ) या परिच्छेदांतील प्रमुखाचें कर्तव्य सर्वस्वीं त्याच्या मर्जीच्या अधिकारांतील राहील.

**१६. जिल्हा किंवा प्रदेश कौन्सिल बरखास्त करणें**:—या परिशिष्टाच्या परिच्छेद १४ प्रमाणें नेमलेल्या कमिशनच्या अभिप्रायानुसार एकादें जिल्हा वा प्रदेश कौन्सिल बरखास्त केल्याचा हुकुम प्रमुख जाहिरनाम्यानें काढूं शकेल, आणि

( अ ) त्या कौन्सिलच्या पुनर्घटनेसाठीं ताबडतोब सार्वत्रिक निवडणुका कराव्यात असा आदेश देऊं शकेल, किंवा—

( ब ) घटक विधिमंडळाच्या पूर्व संमतीनें अशा कौन्सिलच्या अधिकाराखालील टापूचा कारभार स्वतःच्या ताब्यांत घेऊं शकेल किंवा उपरिनिर्दिष्ट परिच्छेदान्वयें नेमलेल्या कमिशनकडे, किंवा त्यास योग्य वाटेल अशा दुसऱ्या एकाद्या संस्थेकडे तो कारभार सोंपवूं शकेल. असा हातीं घेतलेला किंवा सोंपविलेला कारभार बारा महिन्यांपेक्षां अधिक काळ तसा ठेवतां येणार नाहीं.

मात्र जेव्हां या परिच्छेदाच्या उपपरिच्छेद ( अ ) खालीं प्रमुखानें हुकुम काढला असेल तेव्हां नवीन सार्वत्रिक निवडणूक होऊन कौन्सिलची पुनर्घटना होईपर्यंत त्या टापूच्या कारभाराची व्यवस्था प्रमुखानें उपपरिच्छेद ( ब ) मध्यें नमूद केल्याप्रमाणें करावी.

त्याचप्रमाणें जिल्हा अगर प्रदेश कौन्सिलला आपलें म्हणणें घटकराज्य विधिमंडळापुढें मांडण्याची संधि दिल्याखेरीज उपपरिच्छेद ( ब ) प्रमाणें व्यवस्था करतां येणार नाहीं.

**१७. या परिशिष्टाच्या परिच्छेद १९ ला जोडलेल्या कोष्टकाच्या दुसऱ्या भागांतील टापूंना या परिशिष्टांतील तरतुदी लागू करण्याविषयीं**:—( १ ) आसामच्या प्रमुखाला—

( अ ) अध्यक्षाच्या पूर्वसंमतीनें जाहीरनामा काढून या परिशिष्टाच्या १९ परिच्छेदास जोडलेल्या कोष्टकाच्या दुसऱ्या भागांत निर्देशलेले वन्य प्रदेश किंवा त्यांचा कोणताही भाग यांना या परिशिष्टांतील येथवर नमूद केलेल्यांपैकीं एक वा सर्व कलमें लागू करतां येतील व त्यानंतर तो टापू किंवा तो भाग यांवर तसा अमल केला जाईल, आणि

( ब ) अध्यक्षाच्या तशाच पूर्वसंमतीनें वरील कोष्टकाच्या दुसऱ्या भागांत उल्लेखलेला एकादा वन्य प्रदेश किंवा त्याचा भाग त्या कोष्टकांतून वगळतां येईल..

( २ ) या परिच्छेदाचा उपपरिच्छेद ( १ ) याप्रमाणें या कोष्टकाच्या दुसऱ्या विभागांतील कोणत्याही वन्य प्रदेशाबद्दल अगर त्याच्या भागाबद्दल जाहीरनामा काढण्या-पूर्वी अशा प्रदेशाचा किंवा भागाचा कारभार अध्यक्ष आसामच्या प्रमुखाच्या द्वारा त्यास प्रतिनिधि मानून, चालवील. आणि या घटनेच्या आठव्या भागांतील सर्व कलमें, जसा कांहीं तो प्रदेश पहिल्या परिशिष्टाच्या चौथ्या भागांत दर्शविलेल्या मुलुखांप्रमाणेंच आहे, अशा रीतीनें, त्यास लागू होतील.

१८. **संक्रमणकालीन तरतुदी:**—ही घटना अस्तित्वांत आल्यानंतर शक्य तितक्या लवकर आसामच्या प्रमुखानें या परिशिष्टानुसार घटकराज्यांत असलेल्या स्वायत्त जिल्ह्यासाठीं जिल्हा कौन्सिलें स्थापन करण्याची व्यवस्था करावी आणि अशा स्वायत्त जिल्ह्यांत जिल्हाकौन्सिल स्थापन होईपर्यंत त्या जिल्ह्याचा कारभार प्रमुखाकडे त्याच्या स्वतःच्या अखत्यारांत राहील आणि या परिशिष्टांतील कलमांऐवजीं खालील कलमें त्या कारभाराला लागू राहतील.

( अ ) प्रमुखानें जाहीरनामा काढून तसा आदेश दिल्याखेरीज पार्लमेंटचा किंवा घटकराज्य विधिमंडळाचा कोणताही कायदा त्यास लागू होणार नाहीं. असा आदेश देतांना तो कायदा प्रमुखास योग्य वाटेल अशा अपवाद वा दुरुस्त्यांसह त्या टापूला अगर त्यांतील विभागाला लागू होईल असें प्रमुख ठरवूं शकेल;

( ब ) अशा टापूच्या शांतता व सुव्यवस्थेसाठीं प्रमुख कायदे करूं शकेल आणि अशा कायद्यानें त्या वेळीं जारी असलेले पार्लमेंटचे किंवा घटक-राज्य विधिमंडळाचे कायदे रद्द वा दुरुस्त करूं शकेल. या कलमान्वयें केलेले कायदे प्रथम अध्यक्षाला सादर केले पाहिजेत व त्याची अनुमति मिळाल्याखेरीज त्यांना कायदेशीरपणा प्राप्त होणार नाहीं;

( क ) या परिच्छेदाच्या ( अ ) व ( ब ) या कलमांखालील कामें प्रमुखानें स्वतःच्या अखत्यारांत करावयाचीं आहेत.

**१९. वन्य प्रदेशः**—याखालीं दिलेल्या कोष्टकाच्या पहिल्या व दुसऱ्या भागांत दाखविलेले प्रदेश आसामांतील वन्य प्रदेश समजले जातील आणि या कोष्टकांत जेथें जिल्हा किंवा इतर राज्यविभागाचा उल्लेख आहे, तेथें तो उल्लेख ही घटना अमलांत येण्याच्या तारखेस असलेल्या जिल्ह्याचा किंवा राज्यविभागाचा निदर्शक समजावा.

## कोष्टक

## भाग १

१ शिलाँग शहर वगळून खासी व जैनतिया पहाडी जिल्हा

२ गारो पहाडी जिल्हा

३ लुशाई पहाडी जिल्हा

४ नागा पहाडी जिल्हा

५ काचार जिल्ह्याचा उत्तर काचार विभाग.

६ बारपथार आणि सरूपथार मौजे सोडून नौगांग व शिवसागर जिल्ह्यांचा मिकीर पहाडी विभाग.

## भाग २

१ सादिया आणि बालीपारा सरहद्द प्रदेश

२ ( लखमीपूर सरहद्द प्रदेश सोडून ) तिराप सरहद्द प्रदेश

३ नागा वन्य प्रदेश

# परिशिष्ट सातवें

## ( कलम ) २१७

### यादी १—संघविषय—संघयादी

१ हिंदुस्थान आणि त्याचा प्रत्येक भाग यांच्या मुलुखाचें संरक्षण व सामान्यतः सर्व संरक्षण योजना आणि त्याचप्रमाणें युद्धकाळांत विजयप्राप्तीस आणि युद्धसमाप्ती-नंतर परिणामकारक सैन्यविसर्जनास साहाय्यक होतील अशा बाबी.

२ मध्यवर्ति गुप्त पोलिस

३ हिंदुस्थानचें संरक्षण, परराष्ट्रीय संबंध आणि अंतर्गत सुरक्षितता यांसाठीं प्रतिबंधक विनाचौकशी अटक.

४ संघराज्याच्या लष्करी, आरमारी व हवाई दलाची उभारणी, शिक्षण, राखण आणि नियंत्रण व त्यांची भरती; पहिल्या परिशिष्टाच्या तिसऱ्या भागांत दर्शविलेल्या संस्थानांत भरती केलेल्या व उभारलेल्या सशस्त्र सन्यांची संख्या, संघटना आणि नियंत्रण.

५ संघसंरक्षण किंवा युद्धकार्यासाठीं आवश्यक म्हणून विधिमंडळानें जाहीर केलेले उद्योगधंदे.

६ आरमारी, लष्करी व हवाई दलाचे कारखाने.

७ कॅन्टोन्मेंट भागांतील स्थानिक स्वराज्य. अशा भागांतील कॅन्टोन्मेंट अधि-काऱ्यांची सत्ता व त्यांचे अधिकार, अशा भागांतील घरांचें नियंत्रण आणि अशा भागांच्या चतुःसीमा ठरविणें.

८ हत्यारें, बंदुका-तोफा अशीं शस्त्रें, दारूगोळा व स्फोटक द्रव्यें.

९ अणुशक्ति आणि ती निर्माण करण्यास जरूर असलेली खनिज संपत्ति.

१० परराष्ट्रीय राजकारण; संघराज्य आणि कोणताही परकीय देश यांच्या संबंध-विषयक सर्व बाबी.

११ मुत्सद्दी, वकिलाती आणि व्यापारी प्रतिनिधित्व.

१२ संयुक्त राष्ट्रसंघ

१३ आंतरराष्ट्रीय परिषद संघ व इतर संस्था यांत सहभागी होणें आणि त्यांचे निर्णय अमलांत आणणें.

१४ युद्ध आणि शांतता.

१५ परदेशांबरोबर राजकीय तह अगर व्यापारी करार करणें व त्यांचा अंमल करणें.

१६ परराष्ट्रीय अधिकारक्षेत्र.

१७ परदेशांबरोबर व्यापार.

१८ परराष्ट्रीय कर्ज.

१९ नागरिकत्व, त्यांचें संपादन आणि परकीयत्व.

२० देशांतून हकालहट्टी.

२१ पासपोर्ट व व्हिसा.

२२ चांचेगिरी, घोरापराध आणि समुद्रावर अगर अंतराळांत घडलेले आंतरराष्ट्रीय कायद्याविरुद्ध गुन्हे.

२३ हिंदी मुलुखांत प्रवेश, त्यांतून निर्याण आणि हकालपट्टी.

२४ हिंदुस्थानबाहेरील ठिकाणच्या यात्रा.

२५ बंदरांतील वैद्यकीय तपासणी व तद्विषयक रुग्णालयें; खलाशी व दर्यावर्दी लोकांसाठीं रुग्णालयें.

२६ हिंद सरकारनें ठरविलेल्या कस्टम्स सरहद्दीवरून आयात व निर्यात.

२७ टपाल व तारा

२८ टेलिफोन, बिनतारी तारायंत्र, नभोवाणी आणि संदेशवाहतुकीचे इतर प्रकार.

२९ पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँक.

३० विमानमार्ग; विमानें व विमानवाहतुक; विमानगृहांची योजना; विमानगृहें आणि वैमानिक शिक्षणाची व्यवस्था आणि संस्थानें व इतर संस्था यांतून दिल्या जाणाऱ्या तद्विषयक शिक्षणाचें नियमन.

३१ पार्लमेंटनें राष्ट्रीय रस्ते म्हणून जाहीर केलेले खुष्कीचे मार्ग.

३२ राष्ट्रीय जलमार्ग म्हणून पार्लमेंटनें जाहीर केलेल्या नदी-कालव्यांवरील यांत्रिक नौकानयन आणि त्यांचें वाहतुक-नियमन; अशा जलमार्गावरील माल व उतारू यांची वाहतुक.

३३ दर्यावर्दी, नौकानयन,-त्यांत किनाऱ्यांवरील वाहतुकीचा समावेश आहे; व्यापारी नौकानयनाचें शिक्षण आणि संस्थानें किंवा इतर संस्था यांतून दिल्या जाणाऱ्या अशा शिक्षणाचें संघटन व नियमन

३४ आरमारी अधिकारक्षेत्र.

३५ पार्लमेंटच्या कायद्यानुसार जाहीर असलेलीं किंवा जाहीर केलेलीं किंवा सध्याच तशीं असलेलीं मुख्य बंदरें; यांत त्यांची सीमा ठरविणें आणि त्यांच्या शासन-संस्थेचे अधिकार व घटना निश्चित करणें यांचा समावेश आहे.

३६ दीपगृहें; यांत नौकादीप, इषाऱ्याचे कंदील आणि जहाजें व विमानें यांच्या रक्षणाची इतर योजना समाविष्ट आहेत.

३७ विमानमार्गें अगर समुद्रमार्गें माल व उतारू यांची वाहतुक.

३८ संघ रेल्वे, छोटया रेल्वे सोडून इतर रेल्वेच्या बाबतींत सुरक्षितता, कमाल किमान भाडें आणि दर; स्टेशन आणि सर्व्हिस टर्मिनल चार्ज. वाहतुकीचीं साधनें म्हणून रेल्वेच्या कारभारावरील जबाबदारी-यांचें नियमन; माल व उतारू यांच्या वाहतुकीचें साधन म्हणून छोटया रेल्वेवर असणाऱ्या जबाबदारीसंबंधांत आणि सुरक्षितते-संबंधांत नियमन.

३९ दिनांक १५ ऑगस्ट १९४७ ला इंपीरियल लायब्ररी, इंडियन म्युझियम, इंपीरियल वॉर म्युझियम आणि व्हिक्टोरिया मेमोरियल म्हणून ज्ञात असलेल्या संस्था आणि हिंद सरकारनें पूर्णतया अगर खंडशः पैसे देऊन चालविलेल्या व विधिमंडळानें राष्ट्रीय महत्त्वाच्या म्हणून जाहीर केलेल्या संस्था.

४० दिनांक १५ ऑगस्ट १९४७ ला बनारस हिंदु युनिव्हर्सिटी व अलीगड मुस्लिम युनिव्हर्सिटी म्हणून ज्ञात असलेल्या संस्था.

४१ सर्व्हे ऑफ इंडिया, जीऑलॉजिकल ( भूगर्भशास्त्रविषयक ), बोटॅनिकल ( वनस्पतिशास्त्रविषयक ) आणि झूऑलॉजिकल ( प्राणिशास्त्रविषयक ) सर्व्हेज ऑफ इंडिया; संघराज्याची हवामानशास्त्रविषयक ( मिटीरिऑलॉजिकल ) संघटना.

४२ संघराज्याची मालमत्ता व त्यापासून येणारें उत्पन्न; पण अशी मालमत्ता संस्थान हद्दींत असल्यास त्या संस्थानच्या कायद्यानुसार किंवा पार्लमेंटनें निराळा कायदा केला असल्यास त्यानुसार.

४३ संघासाठीं मालमत्ता घेणें अगर ताब्यांत मागणें; अशा घेतलेल्या अगर ताब्यांत मागितलेल्या मालमत्तेसाठीं द्यावयाच्या नुकसानभरपाईचीं तत्वें तिसऱ्या विषय–यादींतील तरतुदींना धरून असतील.

४४ रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया.

४५ संघराज्याचें सार्वजनिक कर्ज.

४६ चलन, परदेशी हुंडणावळ, नाणीं आणि कायदेशीर विनिमयसाधन.

४७ बँकांचे व्यवहार.

४८ चेक, बिल्स ऑफ एक्स्चेंज, प्रॉमिसरी नोटा व तत्सम कागदपत्र.

४९ विमा.

५० संस्था, म्हणजे बँका, विमा कंपन्या व इतर अर्थसंस्था यांसह व्यापारी संस्था यांची घटना, नियमन व विसर्जन; यांत सहकारी संस्थांचा समावेश नाहीं; त्याचप्रमाणें विद्यापीठें वगळून एका राज्यक्षेत्रापुरतेंच मर्यादित ज्यांचें ध्येय नाहीं, अशा व्यापारी अगर बिगर व्यापारी संस्था.

५१ पेटंट, कॉपीराइट, शोध, डिझाइन, ट्रेडमार्क व व्यापारी खुणा.

५२ प्रमुख न्यायालयाची घटना. संघटना, अधिकारक्षेत्र आणि अधिकार व घेण्याची फी.

५३ पहिल्या परिशिष्टाच्या तिसऱ्या भागांत नमूद केलेलीं संस्थानें वगळून हिंदुस्थानच्या कोणत्याही घटक राज्यांत मुख्य ठाणें असलेल्या मुख्य न्यायालयाचें अधिकारक्षेत्र वाढविणें अगर त्या घटकराज्याबाहेरील कोणताही प्रदेश त्या न्यायालयाच्या अधिकार क्षेत्रांतून वजा करणें.

५४ या विषयावलींतील कोणत्याही विषयासंबंधांत प्रमुख न्यायालयाखेरीज इतर सर्व कोर्टांच्या मर्यादा व अधिकार.

५५ शिरगणति.

५६ संघराज्यासाठीं चौकशी, पाहणी अगर आंकडेवार माहिती.

५७ संशोधन, धंदेविषयक अगर तंत्रविषयक शिक्षण आणि खास विद्याभ्यासाचा पुरस्कार यांसाठीं संघ संस्था व संघटना.

५८ संघ नोकरवर्ग आणि संघ पब्लिक सर्व्हिस कमिशन.

५९ संघ नोकरवर्गाचे औद्योगिक कलह.

६० विधिमंडळानें राष्ट्रीय महत्त्वाच्या म्हणून जाहीर केलेल्या ऐतिहासिक व पौराणिक इमारती; शिल्पकलेचे अवशेष आणि प्रदेश.

६१ वजनें आणि मापें यांचें प्रमाण-स्थापन.

६२ अफू, निर्यातीसाठीं विक्री अगर लागवड आणि उत्पादन या विषयांपुरती.

६३ पेट्रोल आणि विधिमंडळानें कायद्यानें ज्वालाग्राही म्हणून जाहीर केलेले इतर द्रव पदार्थ बाळगणें, सांठा करणें अगर हलविणें.

६४ सार्वजनिक हितासाठीं संघनियमित उद्योगवाढ जरूर आहे असें पार्लमेंटनें कायद्यानें जाहीर केल्यास अशा उद्योगधंद्यांची वाढ.

६५ खाणी व तेलाच्या खाणी यांतील कामगार नियमन व सुरक्षितता.

६६ खाणी, तेलाच्या खाणी आणि खनिज संपत्तीची वाढ यांचें नियमन— पार्लमेंटनें कायद्यानें सार्वजनिक हितार्थ संघराज्याच्या नियंत्रणाखालीं तसें व्हावें म्हणून जाहीर केलें असेल तेव्हां.

६७ पहिल्या परिशिष्टाच्या पहिल्या अगर दुसऱ्या भागांत निर्देशलेल्या कोणत्याही घटकराज्याच्या भागांतील पोलिस दलाची सत्ता अगर अधिकारक्षेत्र यांत वाढ; मात्र अशी वाढ एका घटकराज्यांतील पोलिसांना दुसऱ्या घटकराज्याच्या मुलुखांत त्या घटकराज्याच्या अनुमतीशिवाय असा अधिकार वापरतां येणार नाहीं अशी असेल; घटकराज्यांतील पोलिसांची सत्ता व अधिकारक्षेत्र त्या राज्यक्षेत्राबाहेरील रेल्वेला लागू करणें.

६८ पार्लमेंटच्या निवडणुका; अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्या निवडणुका, अशा निवडणुकांची व्यवस्था करण्यासाठीं निवडणूक मंडळ.

६९ अध्यक्षाचा पगार, भत्ता व रजेचे हक्क, संघ-मंत्र्यांचे पगार व भत्ते, मध्यवर्ति वरिष्ठ व कनिष्ठ विधिमंडळांचे सभापति व उप-सभापति यांचे पगार आणि भत्ते, विधिमंडळांच्या सभासदांचे पगार, भत्ते आणि विशेष हक्क; हिंदुस्थानच्या ऑडिटर जनरलचा पगार, भत्ते व नोकरीच्या अटी.

७० पार्लमेंटच्या समित्यांपुढें साक्ष देण्यासाठीं अगर कागदपत्र हजर करण्यासाठीं एखाद्या व्यक्तीला हजर होण्यास भाग पाडणें.

७१ एका घटकराज्यांतून दुसऱ्या घटकराज्याकडे निर्गमन.

७२ आंतर्घटक वैद्यकीय तपासणी

७३ दुसऱ्या विषयावलींतील ३३ वा विषय सोडून इतर आंतर्घटक व्यापार.

७४ पूर-नियंत्रण, कालवे, नौकानयन व विद्युत्शक्ति यांसाठीं आंतर्घटक जलमार्गांची वाढ.

७५ प्रादेशिक जलसीमेबाहेर मच्छीमारी.

७६ संघराज्याच्या संस्थांमार्फत मीठनिर्मिति व मिठाचें वांटप; इतर कोणी मीठ करत असल्यास त्याचें उत्पादन आणि वांटप यांवर नियंत्रण आणि त्यांचें नियमन.

७७ संघराज्यांतील हिंदुस्थानच्या कोणत्याही भागांत गंभीर परिस्थिति उत्पन्न झाल्यास त्याला तोंड देण्याकरतां तरतूद.

७८ हिंद सरकार अगर इतर कोणत्या घटक-राज्य सरकारनें काढलेली लॉटरी.

७९ स्टॉक एक्स्चेंज, वायदे बाजार आणि त्यांच्या व्यवहारांवरील स्टँप-कराव्यतिरिक्त इतर कर.

८० बिल्स ऑफ एक्स्चेंज, चेक, प्रॉमिसरी नोटस्, बिल्स ऑफ लेडिंग, लेटर्स ऑफ क्रेडिट, विम्याच्या पॉलिसी, शेअरचा बदला, डिबेंचर्स, प्रॉक्सीज् आणि पावत्या यांवरील स्टँप-कराचे दर.

८१ बिगरशेती मालमत्तेवरील वारसा कर.

८२ बिगरशेती मालमत्तेवरील मालकी कर.

८३ रेल्वेनें अगर विमानानें वाहतुक केलेल्या माल व उतारूंवर टर्मिनल टॅक्स; रेल्वे भाडें व रेल्वे मालवाहतुकीचे दर यांवरील कर.

८४ बिगरशेती उत्पन्नावरील कर.

८५ कस्टम्स कर, यांत निर्यात कर समाविष्ट आहे.

८६ हिंदुस्थानांत तयार केलेल्या तंबाखू व इतर मालावर अबकारी कर; यांत—

( अ ) मादक पेयें ( पिण्याकरितां योजलेलीं )

( ब ) अफू, चरस व इतर अमली पदार्थ अगर औषधें, बिनअंमली औषधें;

यांचा समावेश नाहीं. तथापि आल्कोहोलचा ज्यांत अंश आहे किंवा वरील उपपरिच्छेद ( ब ) मध्यें उल्लेखलेल्या द्रव्यांचा भाग आहे अशा औषधी अगर सौंदर्यप्रसाधनात्मक बनावटींचा समावेश आहे.

८७ कंपन्यांवरील कर.

८८ शेतीजमीन सोडून व्यक्तीच्या अगर कंपन्यांच्या मालमत्तेच्या किंमतींवर कर; कंपन्यांच्या भांडवलावर कर.

८९ या सूचींतील विषयासंबंधींच्या कायद्याच्या उल्लंघनाचे गुन्हे.

९० कोर्टांत घेतलेली फी सोडून या यादींतील कोणत्याही विषयासंबंधींची फी.

९१ विषयसूचि क्रमांक दोन अगर क्रमांक तीन यांत नमूद नसलेल्या इतर सर्व बाबी त्या दोन्ही सूचींत नमूद नसलेल्या सर्व करासह.

## यादी २–घटकविषय––घटक-यादी

१ सार्वजनिक सुव्यवस्था ( मात्र यांत मुलकी राजव्यवस्थेच्या साहाय्यार्थ लष्करी, आरमारी किंवा हवाई दलाचा उपयोग करतां येणार नाहीं. ); सार्वजनिक, सुव्यवस्थेसाठीं प्रतिबंधक विनाचौकशी अटक; अशी अटक केलेल्या व्यक्ति.

२ न्यायदान; प्रमुख न्यायालयाखेरीज इतर सर्व न्यायालयांची घटना व संघटना आणि त्यांत घ्यावयाच्या फी.

३ या सूचींतील विषयांसंबंधांत मुख्य न्यायालय सोडून इतर न्यायालयांच्या मर्यादा आणि अधिकार; भाडें-कोर्ट आणि मुलकी-कोर्ट यांच्या कार्यपद्धति.

४ पोलिस, यांत रेल्वे पोलिस व गांव पोलिस यांचा अंतर्भाव आहे.

५ तुरुंग, रेफर्मेटरी, बोर्स्टल संस्था किंवा तशाच स्वरूपाच्या इतर संस्था आणि त्यांत डांबलेल्या व्यक्ति; तुरुंग व इतर संस्था यांच्या उपयोगार्थ इतर घटक राज्यांबरोबर व्यवस्था.

६ घटकराज्याचें सार्वजनिक कर्ज.

७ घटकराज्याचा नोकरवर्ग आणि घटकराज्याचें पब्लिक सर्व्हिस कमिशन.

८ बांधकाम, घटकराज्याच्या अधिकारांतील जमिनी व इमारती.

९ संघराज्याच्यासाठीं नसेल अशा वेळीं जमीन जबरदस्तीनें ताब्यांत घेणें. अशा घेतलेल्या किंवा ताब्यांत मागितलेल्या मालमत्तेसाठीं नुकसानभरपाई द्यावयाची त्याचीं तत्त्वें तिसऱ्या विषययादींतील तरतुदींना धरून असतील.

१० ग्रंथालयें, पदार्थसंग्रहालयें आणि घटक राज्याच्या ताब्यांत असलेल्या व त्याच्या पैशावर चालणाऱ्या संस्था.

११ घटक विधिमंडळाच्या निवडणुका; प्रमुखाची निवडणूक अगर ( १३१ कलमांतील दुसरा पर्याय अवलंबला तर ) प्रमुखाची नेमणूक करण्यासाठीं पॅनेलची निवडणूक; या निवडणुकींची व्यवस्था पाहण्याकरितां निवडणूक मंडळ.

१२ घटकप्रमुखाचा पगार, भत्ते व रजेचे नियम, मंत्र्यांचे आणि असेंब्लीचे स्पीकर व डेप्युटी स्पीकर आणि कौन्सिल असल्यास त्याचे चेअरमन व डेप्युटी चेअरमन या सर्वांचे पगार व भत्ते; विधिमंडळाच्या सभासदांचे पगार, भत्ते व विशेष हक्क.

१३ घटकविधिमंडळापुढें साक्ष देण्यासाठीं अथवा कागदपत्र हजर करण्यासाठीं एकाद्या व्यक्तीला हजर राहणें भाग पाडणें.

१४ स्थानिक सरकार, म्हणजे नगरपालिका, इम्प्रूव्हमेंट ट्रस्ट, जिल्हा बोर्ड, खाणी भागांतील वसाहतींतील स्थानिक संस्था, स्थानिक स्वराज्यविषयक किंवा ग्राम-पंचायतीविषयक इतर संस्था यांची घटना व त्यांचे अधिकार.

१५ सार्वजनिक आरोग्य व स्वच्छता, रुग्णालयें व दवाखाने: जन्ममृत्यूची नोंद.

१६ हिंदुस्थानबाहेरील जागा सोडून इतर सर्व ठिकाणच्या यात्रा.

१७ दफन व दफनभूमि; स्मशान व स्मशानभूमि.

१८ शिक्षण, पहिल्या सूचीच्या ४० व्या कलमांत सांगितलेलीं विद्यापीठें सोडून इतर विश्वविद्यालयांसह.

१९ दळणवळण म्हणजे रस्ते, पूल, तरी आणि पहिल्या सूचींत न निर्देश केलेलीं इतर दळणवळणाचीं साधनें; पहिल्या सूचींतील बाबी वगळून इतर बाबींसाठीं छोटया रेल्वे; म्युनिसिपल ट्रामचे, दोरखंडाची रेल्वे; सूचि क्रमांक १ व क्रमांक ३ यांस सोडून अंतर्गत जलमार्ग आणि त्यांवरील वाहतुक सूचि क्रमांक १ मधील मुख्य बंदरें वगळून इतर बंदरें, यंत्रशक्तीवर न चालणाऱ्या अशा इतर गाड्या.

२० पाणी, म्हणजे पाणीपुरवठा, कालवे व पाटबंधारे ड्रेनेज आणि तटबंदी, पाण्याचा सांठा आणि जलशक्ति–सूचि क्रमांक १ मधील कलम ७४ ची तरतूद वगळून.

२१ शेती, यांत शेतीशिक्षण व संशोधन, किडीपासून पिकांचें संरक्षण आणि पिकांच्या आजारांचा प्रतिबंध समाविष्ट आहेत.

२२ गुरांची पैदास, सुधारणा व गुरांच्या रोगांचा प्रतिबंध; जनावरांच्या वैद्यकीचें शिक्षण व धंदा.

२३ कोंडवाडे आणि गुरें दुसऱ्याच्या हद्दींत घुसूं नयेत म्हणून तरतूद.

२४ जमीन, म्हणजे जमिनीसंबंधींचे हक्क, मालक व रयत यांचे परस्पर संबंध आणि फाळा वसुली यांसह जमीन-लागण; शेती जमिनीची फारकत किंवा बदली; जमीन सुधारणा व शेतीसाठीं कर्जे; वसाहत.

२५ अज्ञानकालीन व्यवस्था ( कोर्ट ऑफ वॉर्डस् ), बोजा असलेली व जप्त मालमत्ता.

२६ पुरलेलें द्रव्य.

२७ जंगलें.

२८ संघराज्याच्या सूचि १ मध्यें उल्लेख केला आहे त्या सोडून इतर खाणी व तेलाच्या खाणी व तेलाच्या खाणी आणि खनिज संपत्तीची वाढ.

२९ मच्छीमारी.

३० जंगली पशु व पक्षी यांचें संरक्षण.

३१ गॅस व गॅस-वर्क्स.

३२ घटकराज्यांतर्गत व्यापार; बाजार व जत्रा.

३३ या घटनेच्या २४४ कलमान्वयें इतर घटकराष्ट्रांशीं ठेवावयाच्या व्यापारी संबंधांचें नियमन.

३४ सावकार व सावकारी; शेतकरी कर्जविमोचन.

३५ खाणावळी व खाणावळींचे मालक.

३६ मालाचें उत्पादन, पुरवठा व वांटप.

३७ संघराज्यक्षेत्रांतील सूचि १ मधील उद्योग वगळून, उद्योगधंद्यांची वाढ.

३८ अन्नधान्य व इतर वस्तूंची भेसळ.

३९ वजनें व मापें-प्रमाणस्थापनाविरहित.

४० मादक पेयें आणि अंमलीं औषधें, म्हणजे मद्यें, अफू व इतर अंमली द्रव्यें जवळ बाळगणें, तयार करणें, निपजविणें, हलविणें, विकणें किंवा विकत घेणें,-अफूच्या बाबतींत सूचि १ ला अनुसरून आणि विषारी व अंमली पदार्थांच्या बाबतींत सूचि ३ ला अनुसरून.

४१ गरिबांना साह्याय्य; बेकारी.

४२ सूचि १ मध्यें न दर्शविलेल्या कंपन्या, किंवा विश्वविद्यालयें स्थापन करणें, त्यांचें नियमन किंवा विसर्जन; कंपन्या नसतील अशा व्यापारी, साहित्यिक, वैज्ञानिक, धार्मिक किंवा इतर संघ अगर संस्था; सहकारी संस्था.

४३ धर्मादाय, धर्मादाय संस्था, धर्मादाय व धार्मिक फंड आणि धार्मिक संस्था.

४४ थिएटर्स, सिनेमा व नाटकें, यांत सिनेमा दाखविण्याचा परवाना समाविष्ट नाहीं.

४५ पैज आणि जुगार.

४६ जमीनमहसूल; यांत महसूल ठरविणें व जमा करणें, लँड-रेकॉर्ड ठेवणें, महसूल पाहणी करणें, रेकॉर्ड ऑफ राइट्स् ( हक्क-नोंद ) आणि महसूल-फारकत यांचा समावेश आहे.

४७ सूचि १ मध्यें स्टँप-कराच्या ज्या बाबी सांगितल्या आहेत, त्या सोडून बाकीच्या दस्तऐवजावरील स्टँपकराचे दर.

४८ शेती जमिनीवर वारसा कर.

४९ शेती जमिनीवर मालकी कर.

५० अंतर्गत जलमार्गावर वाहतुक केलेल्या मालावर व उतारूंवर कर.

५१ शेती उत्पन्नावर कर.

५२ घटकराज्यांत बनविलेल्या अगर उत्पन्न केलेल्या खालील वस्तूंवर अबकारी कर आणि हिंदुस्थानच्या इतर भागांत बनविलेल्या अगर तयार केलेल्या तत्सम वस्तूंवर त्याची बरोबरी करण्याकरतां त्याच अगर कमी दराचा कर—

( अ ) मादक पेयें ( मानवी उपयोगासाठीं. )

( ब ) अफू, चरस व इतर अमली औषधें, अमली पदार्थ व बिनअमली औषधें यांत अल्कोहोल किंवा वरील उपपरिच्छेद ( ब ) मध्यें निर्देश केलेल्या वस्तूंचा ज्यांत भाग आहे, अशा औषधी आणि सौंदर्यप्रसाधनात्मक बनावटींचा समावेश नाहीं.

५३ जमिनी व इमारती यांवर कर.

५४ पार्लमेंटनें खनिज संपत्तीची वाढ करण्याबाबत केलेल्या कायद्यानें घातलेलीं बंधनें सोडून खनिज हक्कांवर कर.

५५ डोईपट्टी ( कॅपिटेशन टॅक्स )

५६ धंदे, व्यापार, उद्योग व नोकरी यांवर कर.

५७ जनावरें व नावा यांवर कर.

५८ मालाची विक्री, उलाढाल, किंवा खरेदी यांवर कर; त्यांत घटकराज्यांत असा कर बसण्यास पात्र असलेल्या मालाच्या घटकराज्यांतच होणाऱ्या खपावर किंवा उपयोगावर बसविण्यांत आलेला त्याऐवजींचा कर समाविष्ट आहे. जाहिरातीवरील कर.

५९ ट्रामगाड्या धरून यंत्रशक्तीनें चालणाऱ्या अगर इतर रस्त्यांवर चालण्यासारख्या वाहनांवर कर.

६० विद्युत्शक्तीचा उपयोग आणि विक्री यांवर कर.

६१ स्थानिक क्षेत्रांत विक्री, खप किंवा उपयोग यांसाठीं येणाऱ्या मालावर कर.

६२ चैनीच्या वस्तूंवरील कर; यांत करमणुक, मनोरंजन, पैज व जुगार यांवरील करांचा समावेश आहे.

६३ टोल-कर.

६४ या सूचींतील कोणत्याही विषयासंबंधीं चौकशी अथवा आंकडेवार माहिती.

६५ या सूचींतील विषयासंबंधींच्या कायद्याच्या उल्लंघनाचे गुन्हे.

६६ कोर्टांत घेतलेल्या व्यतिरिक्त या सूचींतील कोणत्याही विषयासंबंधानें आकारलेली फी.

## यादी ३ समान विषय-समान यादी

१ फौजदारी कायदा, यांत ही घटना अमलांत येण्याच्या वेळीं इंडियन पिनल कोडमध्यें समाविष्ट असलेल्या सर्व बाबींचा अंतर्भाव आहे; पण सूचि १ व २ मध्यें नमूद केलेल्या बाबींबाबतचे कायदे आणि मुलकी सत्तेच्या साहाय्यार्थ लष्करी, आरमारी आणि हवाई दलाची मदत घेण्याचें वगळून.

२ ही घटना अमलांत येण्याच्या दिवशीं क्रिमिनिल प्रोसीजर कोडमध्यें नमूद असलेल्या सर्व बाबींसह फौजदारी कामाचा कायदा.

३ एका घटक राज्यांतून दुसऱ्या घटक राज्यांत कैदी किंवा आरोपित लोक यांची बदली.

४ ही घटना अमलांत येण्याच्या तारखेस सिव्हिल प्रोसीजर कोडमध्यें समाविष्ट असलेल्या सर्व बाबी आणि मुदतीचा कायदा यांसह दिवाणी कार्यपद्धति; पहिल्या परिशिष्टाच्या भग १ व २ यांमध्यें नमूद केलेल्या घटक-राज्यांत त्या राज्याबाहेरून वसूल व्हावयाची असलेली कर किंवा जमीन-महसुलाची थकबाकी किंवा इतर वसूल व्हावयाची रक्कम.

५ पुरावा व प्रतिज्ञा; कायदे, सार्वजनिक कृत्यें, रेकॉर्ड आणि न्यायालयांतील कामकाज यांना मान्यता.

६ विवाह व घटस्फोट; मुलें व अज्ञान; दत्तक.

७ मृत्युपत्रें, मृत्युपत्र न करतां मृत्यु आणि वारसा; अविभक्त कुटुंब व वांटणी; ही घटना अमलांत येण्याच्या पूर्वी न्यायप्रविष्ट बाबतींत जेथें दोन्ही पक्षांना व्यक्तिगत कायदा लागू होत होता अशा सर्व बाबी.

८ शेतजमीन खेरीज इतर मालमत्तेची तबदिली (ट्रान्स्फर); खतें आणि दस्तऐवज यांची नोंद.

९ ट्रस्ट आणि विश्वस्त.

१० करार, यांत भागीदारी, एजन्सी, वाहतुकीचे करार, आणि शेत-जमिनीचे करार सोडून इतर विशेष प्रकारचे करार.

११ लवाद.

१२ दिवाळें आणि नादारी.

१३ ॲडमिनिस्ट्रेटर्स-जनरल आणि सरकारी विश्वस्त.

१४ स्टँप–कर, न्यायालयीन स्टँपच्या रूपानें बसविलेले कर व जमा केलेली फी सोडून पण त्यांत स्टँप-कराच्या दराचा समावेश नाहीं.

१५ सूचि क्रमांक २ मध्यें समाविष्ट असलेल्या बाबींच्या कायद्यांत सांगितलेल्या सोडून आक्षेपाई कृति ( ॲक्शनेबल रॉंग्ज )

१६ या सूचींतील विषयांबाबत मुख्य न्यायालय वगळून इतर न्यायालयांचे अधिकार व अधिकारक्षेत्र.

१७ वकिली, डॉक्टरी व इतर धंदे.

१८ वर्तमानपत्रें, पुस्तकें आणि छापखाने.

१९ वेड आणि वेडसरपणा, यांत वेडे आणि वेडसर लोक ठेवण्याच्या स्थळांचा समावेश आहे.

२० विष आणि भयंकर औषधें.

२१ यंत्रशक्तीवर चालणारीं वाहनें.

२२ बंब ( बॉयलर ).

२३ जनावरांना क्रूरतेनें वागविण्यास प्रतिबंध.

२४ उनाडकी; भटक्या जाति.

२५ कारखाने.

२६ कामगार-क्षेत्र; कामगार परिस्थिति; प्रॉव्हिडंट फंड; मालकाची जबाबदारी आणि कामगारांची नुकसानभरपाई; आरोग्य-विमा, त्यांत व्यंगदुर्बलता पेन्शन समाविष्ट आहे; वृद्धापकाल पेन्शन.

२७ बेकारी आणि सामाजिक विमा.

२८ ट्रेड युनियन ( कामगार संघटना ); औद्योगिक आणि मजूर कलह.

२९ एका घटक राज्यांतून दुसऱ्या घटक राज्यांत सांसर्गिक अगर फैलावणारे रोग पसरूं नयेत किंवा माणसें, जनावरें किंवा वनस्पति यांचे रोग पसरूं नयेत म्हणून प्रतिबंध.

३० बिजली.

३१ यंत्रशक्तीवर चालणाऱ्या जहाजांसंबंधांतील अंतर्गत जलमार्गावरील नौकानयन, अशा जलमार्गावरील वाहतुकीचे नियम आणि राष्ट्रीय जलमार्गासंबंधांत सूचि १ मध्यें नमूद केलेल्या बाबी वगळून अंतर्गत जलमार्गावरील माल व उतारू यांची वाहतुक.

३२ सिनेमा फिल्म दाखविण्यास परवानगी.

३३ संघराज्याच्या हुकुमान्वयें विनाचौकशी अटकेंत ठेवलेल्या व्यक्ति.

३४ आर्थिक व सामाजिक नियोजन.

३५ संघ अथवा घटकराज्यासाठीं घेतलेल्या अगर ताब्यांत मागितलेल्या मालमत्तेबद्दल नुकसानभरपाई देण्याबाबतचीं तत्त्वें.

३६ या सूचींतील कोणत्याही विषयाबद्दल चौकशी अथवा आंकडेवार माहिती.

३७ कोर्टांत घेतलेली फी सोडून, या सूचींतील कोणत्याही विषयाबाबत घेण्यांत आलेली फी.

# परिशिष्ट आठवें

[ कलम ३०३ (१) (१०) ]

# परिशिष्टित जाती–भाग १

## मद्रास

१ बागटा
२ भोट्टादास–बोडो भोट्टादा, मुरिया भोट्टादा आणि सोनो भोट्टादा
३ भूमिया–भुरी भुमिया आणि बोडो भुमिया
४ बिसॉय–बारंगी जोडिया, वेन्नांगी ददुआ, फ्रांगी, होल्लार, झोरिया, कोल्लाई, कोंडे, पारंगा, पेंगा जोडिया, सोडो जोडिया आणि टकोरा
५ धक्काडा
६ डोंब–अधिया डोंब, औदिन्य डोंब, चोनेल डोंब, खिश्चन डोंब, मिरगानी डोंब, ओरिया डोंब, पोनाका डोंब, तेलेगा आणि उम्मिया
७ गडाबा–बोडा गडाबा, सेरलाम गडाबा, फ्रांजी गडाबा, जोडिया गडाबा, ओलारो गडाबा, पांगी गडाबा आणि पारंगा गडाबा
८ घासी–बोडा घासी आणि सान घासी
९ गोंदी–मोडया गोंड आणि राजो गोंड
१० गौडू–बाटो, भिरिथिआ, दुधोकोरिया, ह्याटो, जटाको आणि जोरिया
११ कोसल्या गौडूज. बासोथोरिया गौडू, चिट्टी गौडू, डांगयाथ गौडू, दोड्डू कमारिया, दुड्डू कामराव, लडिया गौडू, आणि पुल्लोसोरिया गौडू.
१२ मागथा गौडू, बेर्निया गौडू, बूदो मागथा, डोंगयाथ गौडू, लडया गौडू, पोन्ना मागाथा आणि साना मागाथा.
१३ सीरीथी गौडू
१४ होलवा
१५ जाडापू
१६ जाटापू
१७ कामारा
१८ खट्टी–खट्टी, कामारो आणि लोहारा
१९ कोट्टू
२० कोम्मार
२१ कोंडा धोरस
२२ कोंडा कापूस

२३ कोंडारेड्डी

२४ कोंध–देसया कोंध, डोंगरिया कोंध, कुट्टिया कोंध, टिकिरिया कोंध आणि येनिटी कोंध

२५ कोरिया–बारतिका, बेंथो ओरिया, धुलिया अगर दुलिया, होलवा पायको, पुतिया, सनरोना आणि सिधो पायको

२६ कोया किंवा गौड राजा ऑफ राश कोया, लिंगधारी आपल्या प्रजाजनासह–कोया, (सामान्य) आणि कोट्टु कोया

२७ मडिगा

२८ माला किंवा एजन्सी माला किंवा वाल्मीकि

२९ माळी–कोर्चिआ माळी, पैको माळी आणि पेड्डा माळी

३० मौने

३१ मन्नाधोरा

३२ मुखाधोरा–नूकाधोरा

३३ मुली किंवा मुळिया

३४ मुरिया

३५ ओजलु अगर मेट्टा कोमसाळी

३६ ओमनायटो

३७ पायगारापू

३८ पळासी

३९ पल्ली

४० पेंटिया

४१ पोर्जा–बोडो, बोंडा, दारुवा, दिदुवा, जोडिया, मंडिली, पेंगू, पायडी आणि सलिया

४२ रेड्डी धोरा

४३ रेल्ली किंवा साचंडी

४४ रोणा

४५ सवारा–कापू सवारा, खुल्टो सवारा आणि मलिया सवारा

४६ लखदीव, मिनिकॉय आणि अमीनदीवि बेटांचे रहिवासी

## भाग २

### मुंबई

१ बरडा

२ बावचा

३ भिल्ल

४ चोधरा

५ ढका
६ धोडिया
७ दुबळा
८ गमिट किंवा गामटा
९ गोंड
१० भाथोडी किंवा कातकरी
११ कोंकणा
१२ कोळी महादेव
१३ मावची
१४ नायकडा किंवा नायक
१५ पारधी, अदवीचिंचेर किंवा फासे-पारधी सहित
१६ पटेलिया
१७ पोमला
१८ पोवारा
१९ राथावा
२० तडवी भिल्ल
२१ ठाकूर
२२ वळपाई
२३ वारली
२४ वसावा

## भाग ३

### पश्चिम बंगाल

१ बोतिया
२ चाकमा
३ कुकी
४ लेपचा
५ मुंडा
६ माघ
७ म्रो
८ ओरांव
९ सन्ताळ
१० टिप्पेरा
११ पश्चिम बंगाल सरकारनें जाहीर केलेली दुसरी कोणतीही जात

## भाग ४

### संयुक्तप्रांत

१ भुयिन्या
२ बैश्वार
३ बैगा
४ गोंड
५ खारवार
६ कोळ
७ ओझा
८ संयुक्तप्रांत सरकारनें जाहीर केलेली इतर कोणतीही जात.

## भाग ५

### पूर्व पंजाब

कांगर जिल्ह्यांतील स्पिती आणि लाहौलमधील तिबेटियन लोक

# भाग ६

## बिहार

१ खालीलपैकीं बिहार प्रांतांत राहणारी कोणतीही व्यक्तिः—

१ आसूर
२ बंजारा
३ बाथुडी
४ बेंटकार
५ बिंझिया
६ बिरहोर
७ बिरजिया
८ चेरो
९ चिक बरैक
१० गडाबा
११ घटवार
१२ गोंड
१३ गोराइत
१४ हो
१५ जुआंग
१६ करमाळी
१७ खरिया
१८ खारवार
१९ खतौरी
२० खोंड
२१ किसान
२२ कोळी
२३ कोरा
२४ कोरावा
२५ माहिली
२६ माल पहाडिया
२७ मुंदा
२८ ओरांव
२९ पन्हिया
३० सन्ताळ
३१ सौरिया पहाडिया
३२ सवार
३३ थारू

२ रांची, सिंगभुम, हजारीबाग व सन्ताळ परगणा हे जिल्हे आणि आरशा, बालारामपूर, झालडा, जयपूर, बागमंडी, चांदिल, इच्छागड, वराहभूम, पातमडा, बंदुआ आणि मानबझार या मानभूम जिल्ह्यांतील पोलिस ठाण्याच्या हद्दींत राहणारा खालील जातींचा कोणीही इसमः—

१ बावरी
२ भोगटा
३ भुइया
४ भुमिज
५ घासी
६ पान
७ राजवार
८ तुरी

३ धनबाद उपविभाग किंवा मानभूम जिल्ह्यांतील पुरुलिया, हुरा, पंचा, रघुनाथपूर, संतुरी, नितुरिया, पारा, चास, चंदनकियारी आणि काशीपूर पोलिस ठाण्याच्या हद्दींतील भूमिज जातीचे रहिवासी.

# भाग ७

## मध्यप्रांत

१ गोंड
२ कवार
३ मरिया
४ मुरिया
५ हलबा
६ परधान
७ ओरांव
८ बिंझवार
९ अंध
१० भरिया-भुमिया
११ कोळी
१२ भट्टरा
१३ बैगा
१४ कोळम
१५ भिल्ल
१६ भुइनहार
१७ धनवार
१८ भैना
१९ परजा
२० कामार
२१ भुंजिया
२२ नागरची
२३ ओझा
२४ कोरकू
२५ कोळ
२६ नागासिया
२७ सावरा
२८ कोरवा
२९ मझवार
३० खरिया
३१ सौंता
३२ कोंध
३३ निहाल
३४ बिरहुल ( अथवा बिरहोर )
३५ रौतिया
३६ पांडो

# भाग ८

## आसाम

खालील जाति आणि जमाती :—

१ कचारी
२ बोरो अथवा बोरो-कचारी
३ राभा
४ मिरी
५ लालुंग
६ मिकीर
७ गारो
८ हजोंकी
९ देवरी
१० अबोर
११ मिशमी
१२ दफिया
१३ सिंगफो
१४ खामटी
१५ कोणतीही नाग अगर कुकी जमात
१६ आसाम सरकार जाहीर करील अशी कोणतीही दुसरी जमात

# भाग ९

## ओरिसा

१ खालीलपैकीं कोणत्याही जमातीचा ओरिसा प्रांतांतील रहिवासी:—

१ बागटा
२ बनजारी
३ चेंचू
४ गडाबा
५ गोंड
६ जटापू
७ खोंड ( कोंड )
८ कोंडा–दोरा
९ कोया
१० पारोजा
११ सावरा ( सावर )
१२ ओरांव
१३ सन्ताळ
१४ खारिया
१५ मुंडा
१६ बनजारा
१७ बिनझिया
१८ किसान
१९ कोळी
२० कोरा

२ कोरापुट आणि खोंडमल जिल्ह्यांतील आणि गंजम एजन्सींतील खालीलपैकीं कोणत्याही एका जातीचे रहिवासी:—

१ दोम किंवा डोंबो
२ पान किंवा पानो

३ संबळपूर जिल्ह्यांतील खालीलपैकीं कोणत्याही एका जमातीचे रहिवासी:—

१ बावरी
२ भुइया
३ भुमिज
४ घासी
५ तुरी
६ पान किंवा पानो